# विज्ञान आणि बुध्दिवाद

लेखक :
**प्राचार्य अद्वयानंद गळतगे**
भोज, जि. बेळगाव, ५९१२६३, कर्नाटक

प्रकाशक :
**वेदांतविवेक प्रकाशन**
भोज, जि. बेळगाव, ५९१२६३, कर्नाटक

**दुसरी आवृत्ती**

**प्रकाशन :**
ललिता पंचमी, मंगळवार १६ ऑक्टोबर २००७



मुद्रक :
**कलासंगम प्रिंटींग प्रेस**
२२/१३९३/१, विकास नगर, इचलकरंजी.
☎ (०२३०) २४३८६७७

**किंमत दोनशे रूपये**

# प्राक्कथन

या ग्रंथाची पहिली आवृत्ती सन २००० साली प्रसिध्द झाली. ती संपून बरेच महिने झाले. पुस्तकाची मागणी सतत होऊ लागल्यामुळे ही दुसरी आवृत्ती काही सुधारणा करून प्रसिध्द करीत आहे.

बुध्दिवादाची निखळ विज्ञानाच्या निकषांखाली कडक तपासणी करणारा हा मराठीतील पहिलाच ग्रंथ. विज्ञानवादी चोखंदळ महाराष्ट्रीय विचारवंतांच्या पूर्ण पसंतीस तो उतरला याचे समाधान वाटते. विज्ञानाच्या निकषाखाली बुध्दिवादाच्या मर्यादा उघड करून दाखवणे म्हणजे अंधश्रध्दा पोसणे तर नव्हेच, उलट तो प्रतिष्ठित अंधश्रध्देवरचाच हल्ला आहे, ही गोष्ट या ग्रंथामुळे विचारवंतांना पटली हे या ग्रंथाचे खरे यश आहे.

या ग्रंथाला बापूसाहेब ढाकरे कला अकादमी, दानापूर, जि. अकोला यांचा विज्ञान पुरस्कार प्राप्त झाला. ग्रंथाच्या वैज्ञानिक भूमिकेला जाहीर मान्यता मिळाल्याचेच हे चिन्ह आहे.

- अद्वयानंद गळतगे

# पुरस्कार

श्री. अद्वयानंद गळतगे यांनी आपल्या 'विज्ञान आणि बुध्दिवाद' या प्रस्तुत पुस्तकात आध्यात्मशास्त्रावर आणि गूढानुभवसंपन्न विभूतीवर पूर्ण डोळस श्रध्दा ठेवून बुद्धियोगी वैज्ञानिक दृष्टीकोनातून विश्वोत्पत्ती, जीवोत्पती, गूढानुभूती इ. विषयांचे अभ्यासू वृत्तीने समर्थपणे विश्लेषण केलेले आहे.

केवळ बुध्दिप्रामाण्यवादाने संपूर्ण सत्यशोधन होणार नाही, बुध्दीला सम्यक् श्रध्देची जोड मिळाली तरच विश्वातील अनेक रहस्यांची उकल होईल. अंत:स्फूर्तीने झालेल्या या रहस्योद्घाटनेच्या व्यावहारिक प्रस्थापनेसाठी दीर्घकालीन वैज्ञानिक साधनेची जोड अपरिहार्य असते हे या ग्रंथाचे तात्पर्य आहे.

आपल्या प्राचीन ऋषीमुनींनी योगसाधना आणि अंत:स्फूर्ती या द्वारा विश्वातील अनेक रहस्यांचे उद्घाटन केले. किंबहुना आपले सनातन धर्म सिध्दान्त हे अशा ऋषींच्या सत्यदर्शनावरच आधारित आहेत. अतींद्रिय शक्तीचे अस्तित्व, मरणोत्तर अस्तित्व, पुनर्जन्म इ. विषयक सिध्दान्त हे अशा काही मूलभूत सिध्दान्तांपैकीच आहेत. आजच्या काळातही अशा सिध्दान्तांची सत्यता प्रतिपादन करणारे वैज्ञानिक पुरावे उपलब्ध होत आहेत. अशा काही पुराव्यांचे संकलन आणि विश्लेषण श्री. गळतगे यांनी आपल्या या पुस्तकात केलेले आहे.

आजच्या समाजात सद्धर्म-निष्ठावृत्ती, सुनीतिप्रसारवृत्ती, समाज सद्धारणासातत्य इ. परस्परावलंबित सन्मूल्यांची परिपुष्टी करणाऱ्या श्रध्दांची समाजात वाढ होणे आवश्यक आहे. विविध क्षेत्रांमध्ये (धर्मासह) असलेल्या अंधश्रध्दांना दूर करणे नितांत आवश्यक आहे. विचारवंतांनी स्वमतांधता सोडून देऊन सत्श्रध्दा कोणत्या आणि अंधश्रध्दा कोणत्या याचा विवेकाने शोध घेणे आवश्यक आहे. सत्श्रध्दांचेच अंधश्रध्दा म्हणून उच्चाटन करणे समाजहितदृष्ट्या हानिकारक आहे हे त्यांनी ओळखले पाहिजे. पूर्वानृतग्रहावेशदार्ढ्य, तज्जन्य दुराग्रह, परस्पर द्वेष , स्वार्थ, अहंमन्यता इ. भयंकर अवरोधकांना दूर करूनच सत्याकलनाच्या मार्गावरून योग्य रीतीने वाटचाल होते.

विज्ञान म्हणजे काय- 'सविशेषाणामवगम्यानां तदनुरूपै: शोधसाधनै: सम्यक्शोधदृष्टेर्विशेषत्वादुद्गतं यद् विशेषावगमनं तद् विज्ञानामित्युच्यते।' (सविशेष ज्ञेयांचे तदनुरूप शोध साधनांद्वारे सम्यक्दृष्टीच्या विशेषत्वामुळे प्रकट झालेले जे विशेष ज्ञान त्याला विज्ञान असे म्हणतात.)

यानुसार परामानसशास्त्रही विज्ञानाच्या कक्षेत येते. त्यातील प्रगत संशोधन, आध्यात्मिक सिध्दान्त सिध्द करण्यासाठीच उपयोगी पडत आहे. प्रस्तुत ग्रंथात लेखकाने याचे साधार प्रतिपादन केले आहे. त्याची दखल विचारवंतांना डोळसपणे घ्यावीच लागेल. यातच समाजाचे कल्याण आहे.

समानी व आकूतिः समाना हृदयानि वः
समानमस्तु वो मनो यथा वः सुसहासति ॥ (ऋग्वेद १०/१९१/४ )

इत्यलम्

**परमात्मराज उर्फ राजीव महाराज**
श्रीदत्त देवस्थान,
आडी, ता. चिक्कोडी, जि. बेळगाव.

# मनोगत

**येथे विज्ञाने काय करावे । ऐसे घेसी जरी मनोभावे ।**
**तरी पै आधी जाणावे । तेचि लागे ।।**

-ज्ञाने. ७.३

एकदा एका प्रवाशाने एका राजाला तीन लाकडी बाहुल्या भेट दिल्या. राजाला त्याने त्या कशासाठी भेट दिल्या हे कळेना. म्हणून आपल्या राज्यातील शहाण्या माणसांना बोलावून त्याने त्यांचा त्यांना अर्थ विचारला. कोणालाही तो सांगता येईना. शेवटी एक वृध्द गृहस्थ पुढे झाला. त्याने एक लवचिक तार मागवून घेतली व ती पहिल्या बाहुलीच्या कानाच्या छिद्रात घातली, ती दुसऱ्या कानातून बाहेर आली. नंतर दुसऱ्या बाहुलीच्या कानात ती घातली. ती तोंडातून बाहेर आली. तिसऱ्या बाहुलीच्या कानात घातली पण ती बाहेर आली नाही. राजाला उद्देशून तो गृहस्थ म्हणाला, "महाराज, तीन तऱ्हेचे लोक या जगात आहेत. एक, एका कानाने ऐकून दुसऱ्या कानाने सोडून देणारे, दुसरे, ऐकलेले सर्वांना सांगणारे, आणि तिसरे, ऐकलेले मनातच ठेवून घेणारे." या बाहुल्या म्हणजे शास्त्रज्ञ समजले तर चमत्काराच्या बाबतीत अशाच प्रकारे शास्त्रज्ञांचे तीन वर्ग पडतात. एक, ऐकलेले किंवा पाहिलेले चमत्कार खोटे म्हणून सोडून देणारे, दुसरे, ऐकलेले किंवा पाहिलेले चमत्कार खरे की खोटे हे ठरवू न शकल्यामुळे मनातच ते ठेवून घेणारे, व तिसरे, ऐकलेले किंवा पाहिलेले चमत्कार सर्वांना सांगणारे व त्यांच्या खरेखोटेपणाची शहानिशा करून घेण्यासाठी शास्त्रीय संशोधनाचा जाहीर आग्रह धरणारे. हा ग्रंथ या शेवटच्या शास्त्रज्ञांच्या वर्गाचे प्रतिनिधीत्व करतो.

महात्मा गांधींच्याकडे तीन माकडांच्या मूर्ती होत्या हे प्रसिध्दच आहे. एका माकडाने दोन्ही हातांनी आपले कान झाकून घेतले आहेत, दुसऱ्याने आपले दोन्ही डोळे झाकून घेतले आहेत. आणि तिसऱ्याने आपले तोंड झाकून घेतले आहे. वाईट ऐकू नये, वाईट पाहू नये व वाईट बोलू नये असा संदेश ही माकडे देतात. वाईटाच्या जागी 'चमत्कार' गृहीत धरले तर चमत्कार पहायचे नाहीत, चमत्कार ऐकायचे नाहीत, व चमत्कार सांगायचे नाहीत हे ब्रीद पाळणाऱ्या हल्लीच्या बहुसंख्य रूढीवादी शास्त्रज्ञांचे ही माकडे प्रतिनिधीत्व करतात असे म्हणता येईल. हा ग्रंथ अशा शास्त्रज्ञांचा जाहीर निषेध करणाऱ्यांचे प्रतिनिधीत्व करतो.

या ग्रंथाची भूमिका शुध्द विज्ञानवादी आहे. (शुध्द विज्ञान म्हणजे कुठल्याही तत्त्वज्ञानाची बांधिलकी नसलेले विज्ञान.) शुध्द विज्ञानात 'दैवी' शक्तीला (Divine Power) किंवा परमेश्वराला (Personal God) अजिबात स्थान नाही. सर्व घटना प्राकृतिक आहेत असे शुध्द विज्ञान मानते, व त्यांची नैसर्गिक उपपत्ती शोधते. पण नैसर्गिक उपपत्ती

हे दुधारी शस्त्र आहे. ते जसे अंधश्रध्देवर प्रहार करते, तसे जडवादी तत्वज्ञानावरही प्रहार करते ! आणि हीच जडवादी लोकांची सर्वात मोठी अडचण आहे ! कारण सर्वच नैसर्गिक घटना जडवादी तत्वज्ञानात बसत नाहीत ही वस्तुस्थिती आहे. म्हणून ते या शुध्द विज्ञान-शास्त्राच्या दुसऱ्या 'धारे' कडे नेहमी व पध्दतशीरपणे दुर्लक्ष करीत असलेले दिसून येतात. ती 'धार' जणू अस्तित्वातच नाही असे ते समजतात, नव्हे ते त्यांचे मूलभूत गृहीतकृत्य असून त्या गृहीतकृत्यावरच त्यांचे तथाकथित 'विज्ञान' उभे आहे. या विज्ञानाला आत्मवंचक-अर्थात डोळे झाकून दूध पिणाऱ्या मांजराच्या जातीचे व म्हणून 'खोटे विज्ञान' म्हणता येईल. या आत्मवंचक व खोट्या विज्ञानाला उघडे पाडणे, त्याचे खरे स्वरूप वाचकांपुढे ठेवणे हा या ग्रंथाचा मुख्य उद्देश आहे.

आदिकालिक मानव नैसर्गिक घटनांना चमत्कार समजत होता. चमत्कार समजून त्यांची पूजा करीत होता. कारण त्यांचा अर्थ किंवा त्यांच्या पाठीमागचा कार्यकारणभाव त्याला कळत नव्हता. आजही असे अनेक घटनाप्रकार आहेत की ज्यांचा अर्थ वा कार्यकारणभाव मानवाला ज्ञात नाही. प्रश्न असा आहे की, अशा घटनांची भोळेपणाने चमत्कार समजून पूजा करायची का? की त्यांच्या पाठीमागचा कार्यकारणभाव समजून घेण्याचा प्रयत्न करायचा? की अशा घटना घडतच नाहीत, घडणे शक्य नाही असे म्हणून शत्रूला भिऊन वाळूत डोके खुपसणाऱ्या शहामृगाची भूमिका स्वीकारायची? काही जण अशी भूमिका स्वीकारताना दिसून येतात. पण ही भूमिका वेळ काढू व आत्मवंचक असून ती अवैज्ञानिक आहे. आणि म्हणून ती फार काळ टिकू शकणार नाही हे या ग्रंथात वाचकांच्या मनावर बिंबविण्याचा प्रयत्न केला आहे.

## या ग्रंथाच्या मथळ्याविषयी थोडेसे

प्रस्तुत ग्रंथातील प्रकरणे विज्ञानाच्या दृष्टिकोनातून आणि संशोधनातून बुध्दिवादाचा अपुरेपणा-नव्हे दिवाळखोरपणा-कसा सिध्द होतो हे दाखवून देणारे असल्यामुळे पुस्तकाला 'विज्ञान आणि बुध्दिवाद' असा मथळा दिला आहे. (मूळ 'विज्ञान, बुध्दिवाद आणि चमत्कार' या बृहद्ग्रंथाचा हा पहिला भाग आहे.) या ग्रंथातील पुरावेनिदर्शक घटना, दाखले व संदर्भ हे प्रामुख्याने पाश्चात्य वैज्ञानिक लेखकांच्या ग्रंथातून घेतले आहेत. (आपल्याकडील पुरावेनिदर्शक घटना सादर करण्यासाठी **'विज्ञान आणि चमत्कार'** हा खास एक स्वतंत्र ग्रंथ लिहिला असून तो उपर्युक्त बृहद्ग्रंथाचा दुसरा भाग आहे.) कारण बुध्दिवादाचा अपुरेपणा( वा दिवाळखोरपणा) दाखवून देणाऱ्या अतींद्रिय घटनांचे वैज्ञानिक निकषाखालचे संशोधन हे प्रामुख्याने पाश्चात्य देशात व तेही गेल्या शंभर वर्षातच झाले आहे. भौतिक (=इंद्रियगम्य) विश्वात अतींद्रिय घटनासुध्दा घडतात हे वैज्ञानिक निकषाखाली प्रथम सिध्द झाल्याखेरीज भौतिक विश्वाबरोबरच एक अतींद्रिय

विश्वही अस्त्विात आहे ही वस्तुस्थिती विज्ञान मान्य करणार नाही. म्हणून अतींद्रिय घटना वैज्ञानिक निकषाखाली तपासण्याचे व त्या सत्य असल्याचे सिध्द करण्याचे प्रयत्न अनेक पाश्चात्य शास्त्रज्ञांनी केले आहेत. त्या प्रयत्नांना यश आले तर वैज्ञानिक निकषाखालीच अतींद्रिय घटना 'असत्य' म्हणणारा बुध्दिवाद आपोआपच खोडून निघतो. म्हणूनच हे प्रयत्न अयशस्वी झाले आहेत हे सिध्द करण्याचे प्रयत्न पाश्चात्य बुध्दिवाद्यांनी व भौतिकवाद्यांनी केले आहेत. हा वाद पाश्चात्य अतींद्रिय विज्ञानात विशेष गाजला असल्यामुळे त्याची चर्चा पाश्चात्य अतींद्रिय संशोधनाच्या संदर्भात (अर्थात अत्यंत संक्षेपाने) करावी लागली आहे. भारतीय योगशास्त्राच्या दृष्टीने विचार करणाऱ्यांना ही चर्चा अगदीच अळणी वाटेल. पण विज्ञान-मग ते अतींद्रिय विज्ञान असेना का- अळणीच असते, हे लक्षात ठेवलेपाहिजे. ते अग्नीपरीक्षेने-कडक अटीखाली -अनुभव तपासते, म्हणून त्याचे मूल्य.

येथे एक अपसमज दूर केला पाहिजे. बुध्दिवादाला विरोध म्हणजे बुध्दीलाच विरोध, व तोही तात्त्विक दृष्टीने, असे कांही लोक समजतात, *बुध्दी व बुध्दिवाद यातील फरक न समजल्यामुळे हा अपसमज निर्माण झाला आहे.* वास्तविक बुध्दिवादाला हा विरोधासाठी विरोध नसून बुध्दिवाद खरा की खोटा याची ही वैज्ञानिक निकषाखाली तपासणी आहे. येथे तत्त्वाचा (Principle) प्रश्न नसून तथ्याचा (Fact) प्रश्न आहे. बुध्दिवादी लोक तथ्याकडे डोळेझाक करतात व तत्त्वाचा बडेजाव माजवतात! आणि तेही विज्ञानाच्या नावाखाली! ही एका प्रकारची 'वैज्ञानिक' अंधश्रध्दाच आहे असे म्हणता येईल. खरे तर हिला मतांधता म्हणणेच अधिक योग्य होईल. कारण ती विज्ञानविरोधी आहे. मानवाला बुध्दीची गरज आहे हे कोणीही नाकारत नाही. पण बुध्दीची गरज म्हणजे बुध्दिवादाची गरज नव्हे. हे कळण्यासाठी स्त्रीवादाचे (Feminism) उदाहरण घेता येईल. स्त्रीचे समाजातील अनन्यसाधारण महत्व कोणीही नाकारत नाही, पण स्त्री ही जीवशास्त्रीय दृष्ट्या स्वत:चे *स्त्रीत्व टिकवून* समाजात पुरूषाचे अनुकरण करू शकत नाही, ही जीवशास्त्रीय वस्तुस्थिती आहे. करू शकते असे स्त्रीवादी मानत असतील तर ती त्यांची मतांधता ठरते. जीवशास्त्रीय तथ्याविषयीच्या त्यांच्या अज्ञानाचे ते द्योतक ठरते. त्याचप्रमाणे बुध्दीचे मानवाच्या जीवनातील अनन्यसाधारण महत्व मान्य करूनही बुध्दिवाद (rationalism) हा स्वत:ची तर्कप्रतिष्ठा सांभाळून विज्ञानाची बरोबरी करू शकत नाही, ही वस्तुस्थिती आहे. करू शकतो असे बुध्दिवादी मानत असल्याकारणाने ते त्यांचे विज्ञानाच्या स्वरूपाविषयीचे वा कार्यपध्दतीविषयीचे अज्ञान दर्शविते. म्हणून ती त्यांची मतांधताच ठरते. विज्ञान बुध्दिप्रधान आहे हे नि:संशय खरे आहे. पण म्हणून ते बुध्दिवादी आहे असे ठरत नाही. ते कसे हे हा ग्रंथ वाचून वाचकांना कळेल.

**-अद्वयानंद राघोबा गळतगे**

## अनुक्रमणिका

प्रस्तावना

१. भौतविज्ञानाकडून अतींद्रिय-विज्ञानाकडे/१

२. विज्ञानातील चमत्कारांकडून चमत्कारांच्या विज्ञानाकडे/१३

३. बुध्दिप्रामाण्यवाद आणि परामानसशास्त्र /२४

४. विज्ञानाच्या दृष्टिकोनातून मरणोत्तर अस्तित्व/४५

५. पुनर्जन्म /८३

अ) विज्ञानाच्या दृष्टिकोनातून पुनर्जन्म सिध्दांत

ब) पुनर्जन्मसिध्दांतावरील एका बुध्दिवादी टीकेला वैज्ञानिक प्रत्युत्तर

६. खरे विज्ञान आणि खोटे विज्ञान: बुध्दिवादाचा विज्ञानाच्या दृष्टिकोनातून परामर्श/१०९

७. विश्व आणि मानव: ज्ञानेश्वरांच्या विश्वात्मक देवाच्या संकल्पनेची वैज्ञानिक मीमांसा/१६७

८. बुध्दियोगी विज्ञान: एका नव्या विज्ञान -युगाचा जन्म/१८३

९. सत्याची बुध्दिवादी कसोटी: एक वैज्ञानिक परीक्षण/२१४

१०. विज्ञानाच्या दृष्टीकोनातून विवेकवाद आणि गूढानुभूतिवाद/२२४

११. पुन्हा विज्ञानाच्या दृष्टीकोनातून विवेकवाद आणि गूढानुभूतिवाद/२४८

पूर्वप्रसिध्दी -**पैलतीर**, कोल्हापूर

प्रकरण ५ **अबकडई**, मुंबई

# प्रस्तावना

**तस्मात् शास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ ।**
**ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्म कर्तुमिहार्हसि ॥**

**– *भगवद्गीता (१६-२४)***

एका जन्मजात आंधळ्याची एक गोष्ट सांगतात. एकदा या जन्मजात आंधळ्याची बायको मुलाला वरून दूध घालत असताना ते रडू लागले. ते ऐकून आंधळ्याने बायकोला मूल का रडते असे विचारले. बायकोने मूल दूध घालत असल्यामुळे रडत असल्याचे सांगितले. तेव्हा आंधळ्याने मुलाला रडविणारे दूध कसले असते , हे जाणण्याच्या उद्देशाने बायकोला विचारले,

'दूध कसले असते?'

बायको म्हणाली, 'दूध पांढरे असते.'

आंधळ्याने विचारले, 'पांढरे म्हणजे कसले?'

बायको म्हणाली 'बगळ्यासारखे.'

आंधळा म्हणाला, 'बगळा कसला असतो?'

बायकोने आपला कोपरापासूनचा एक हात वर केला व पंजा बगळ्याच्या चोचीप्रमाणे पुढे वाकवून तो त्या आंधळ्याजवळ नेऊन ती म्हणाली,

'बगळा असा असतो.'

आंधळ्याने बायकोचा हात आपल्या हातांनी चाचपून पाहात म्हटले,

'अबब ! आत्ता कळलं दूध घालताना मूल का रडतं ते !'

या दृष्टांतातील आंधळा म्हणजे बुध्दिवादी होय. या दृष्टांतातील आंधळ्याच्या 'मूल का रडते' हे समजावून घेण्याच्या प्रयत्नासारखाच बुध्दिवादाचा विश्वाचे स्वरूप व त्यातील कार्यकारणभाव समजावून घेण्याचा प्रयत्न असतो. आंधळा जसे स्पर्शेंद्रियाला जे कळते, तेच 'सत्य' होय असे मानतो. त्याप्रमाणे बुध्दिवादी तर्कबुध्दीला जे कळते तेच 'सत्य' होय असे मानतो. अशा रीतीने 'बुध्दिवाद्याचे तर्कशास्त्र' हे या दृष्टांतातील आंधळ्याचे तर्कशास्त्र' समजावयास हरकत नाही.

येथे बुध्दिवादी दोन आक्षेप घेतील. एक, या दृष्टांतातील आंधळा जन्मजात आंधळा असल्यामुळे त्याला पांढरे म्हणजे काय हे कदाचित कळत नसेल. पण त्याने स्वत: दूध कधीच प्यालेले नाही, असे काही होणार नाही. दुसरे, त्याने दूध

कधीच प्यालेले नाही, असे समजले तरी दुधाला स्पर्श करून ते बगळ्यासारखे घन स्वरूपाचे किंवा बगळ्याच्या आकाराचे नसते, तर पातळ असते याची स्वतः त्याला खात्री करून घेता येते. तेव्हा आंधळ्याची उपमा बुध्दिवाद्याला लागू होत नाही.

येथे एक गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे की, दृष्टांत एखादी गोष्ट समजावून देण्यासाठी दिलेला असतो. तो शब्दशः खरा म्हणून घ्यावयाचा नसतो.[१] हा दृष्टांत बुध्दिवादाचे स्वरूप सुलभ रीतीने वाचकांना समजावे म्हणून दिलेला आहे. आंधळा प्रत्यक्षात कसा वागतो हे सांगण्यासाठी दिलेला नाही. एखादा मनुष्य जन्मजात आंधळा असता तर तो कसा वागला असता, हे या दृष्टांताने सांगावयाचे नसून एखादा जन्मजात आंधळा बुध्दिवादी असता तर तो कसा वागला असता, हे या दृष्टांताने सांगावयाचे आहे. या दृष्टीने विचार केला तर तो जन्मजात 'आंधळा बुद्धिवादी' कसा वागतो, हे पाहणे उद्‌बोधक आहे.

पहिली गोष्ट म्हणजे तो स्वतः दूध पिऊन,म्हणजे दुधाचा स्वतः अनुभव घेऊन त्याचे स्वरूप समजावून घेत नाही. दुसरे, दुधाला स्पर्श करूनही तो ते समजावून घेत नाही. तर त्यासाठी तो 'बायको' हे साधन वापरतो.

आता कोणतेही साधन हे वस्तूचे खरे स्वरूप कधीच पूर्णपणे प्रकट करू शकत नाही. ते फक्त आपल्या वैशिष्ट्यानुसार त्या वस्तूचे आंशिक स्वरूपच प्रकट करते. त्यामुळे त्या वस्तूचे आंशिक स्वरूपच कळते. उदा. 'डोळे' या साधनाने फक्त रंग दिसेल; नाकाने वास कळेल इत्यादी. त्याचप्रमाणे त्या आंधळ्याला 'बायको' च्या साधनाने 'दूध' बगळ्यासारखे असते, हे आंशिक सत्य कळले आणि त्यावरून त्याने मूल का रडते याचा 'शोध' लावला. येथे मूल रडण्याचे कारण समजण्यासाठी त्याने एक गृहीतकृत्य वापरले आहे. (हेच त्याचे 'बुध्दिवादी तत्त्वज्ञान' होय.) ते असे की, 'मूल शारीरिक वेदना झाल्याखेरीज रडत नाही.' हे गृहीतकृत्य प्रत्यक्ष अनुभवाला नेहमीच उतरते काय, याची त्या आंधळ्याने चौकशी करण्याची तसदी घेतलेली नाही; आणि ती तो घेणारही नाही. (म्हणूनच त्याला 'गृहीतकृत्य' किंवा 'तत्त्वज्ञान' म्हणायचे.) मूल रडते त्या अर्थी निश्चितपणे दूध शारीरिक वेदना निर्माण करीत असले पाहिजे असे तो समजतो. मूल रडण्याची शारीरिक वेदनेखेरीज अन्य कारणे असू शकतात, हे त्याच्या गावीही नाही. कारण हे त्याच्या 'तत्त्वज्ञाना'त बसत नाही. म्हणून त्या कारणांचा तो शोध घेत नाही. यालाच 'बुध्दिवाद' म्हणतात.

हे बुध्दिवादी तत्त्वज्ञान अत्यंत सरळमार्गी आहे हे यावरून स्पष्ट आहे. अडचण एवढीच की प्रत्यक्ष जीवन वा जग बुध्दिवादी समजतो तसे अत्यंत सरळमार्गी

नाही. त्याला अनेक फाटे फुटले आहेत. त्यात अनेक गुंतागुंती आहेत. हे अधिक स्पष्ट करून सांगता येईल. दूध घालताना मूल शारीरिक वेदना झाल्याखेरीज रडणार नाही, असे बुध्दिवादी का गृहीत धरतो? कारण त्याचे दुसरे एक सरळमार्गी गृहीतकृत्य आहे. ते म्हणजे 'भूक लागलेल्या मुलाला दूध घातले, तर त्याला नेहमी सुखच होते,' हे होय. पण हे खरे नाही. नाहींतर भूक लागली असतानाही लहान मुलांना 'हा घास चिऊचा, हा घास काऊचा,' असे म्हणून बळजबरीने भरवावे लागले नसते. भूक लागलेली असतानाही मुलाला दूध घालताना सुख होण्याऐवजी दुःख होण्याची (खरे तर ते मूल दूध न पिण्याची) अनेक कारणे संभवतात. उदा. त्याला दूध आवडत नसले पाहिजे; त्याच्या इच्छेविरूध्द आई त्याला दूध घालत असली पाहिजे; त्याचे लक्ष इतर गोष्टीकडे (उदा. खेळण्याकडे) जास्त आकर्षिले गेले असले पाहिजे; किंवा त्याला जसे पाहिजे तसे आई दूध घालत नसली पाहिजे. (उदा. त्याला झोके घेत दूध प्यावेसे वाटत असेल.) इत्यादी.

ही सर्व कारणे मानसिक आहेत; शारीरिक नाहीत. पण आंधळ्या बुध्दिवाद्याला ती दिसत नाहीत. याचे कारण तो डोळ्यानी आंधळा आहे हे नाही, तर तो बुध्दीने आंधळा आहे हे आहे. म्हणचे त्याचे 'तत्त्वज्ञान' आंधळे आहे. यालाच 'बुध्दिवाद' म्हणतात. हे तत्त्वज्ञान आहे, विज्ञान नाही, हे यावरून स्पष्ट आहे. कारण वैज्ञानिक अशाप्रकारे वस्तुस्थितीकडे डोळेझाक करीत नाही. त्याची कसलीच 'गृहीतकृत्ये' नसतात. कसलेच 'तत्त्वज्ञान'नसते. सर्व शक्यतांचा तो खुल्या मनाने विचार करतो व त्यांचा शोध घेतो. त्यासाठी तो अनेक प्रयोग करतो. अनेक साधने वापरतो. आंधळा बुध्दिवादी असे काहीच करत नाही. तो फक्त 'बायको' व 'स्पर्शेंद्रिय' या दोन साधनांवरच विसंबून राहतो. ('बायको' म्हणजे गणित किंवा तर्कशास्त्र व 'स्पर्शेंद्रिय' म्हणजे भौतिक उपकरणे.) त्यामुळे 'दूध बगळ्यासारखे' आहे हे 'स्पर्शेंद्रिय' या भौतिक (तथाकथित 'वैज्ञानिक') साधनाने पडताळून पाहिलेले 'सत्य' हेच वैज्ञानिक सत्य आहे, या भ्रमात तो राहतो. पण बायको हे साधन गणिताप्रमाणे असून ते कधीही सत्य समजावून देऊ शकणार नाही. गणितातील चिन्हे वा आकडे कशाबद्दल आहेत हे गणित सांगू शकत नाही. ते गणिताबाहेरील प्रयोग व अनुभवाने ठरवून समजावून घ्यावे लागते. उदा. आंधळ्याची बायको 'दूध बगळ्यासारखे असते' असे म्हणण्याऐवजी 'दूध चुन्यासारखे असते', किंवा 'दूध पिठासारखे असते' असेही म्हणू शकली असती; आणि तरीही तो आंधळा दुधाच्या खऱ्या स्वरूपाविषयी पूर्वीइतकाच अनभिज्ञ

राहिला असता. आंधळ्याला दुधाचे ज्ञान होण्यासाठी दूध पिणे हाच एकमेव उपाय आहे. तेच सत्य जाणण्याचे एकमेव साधन आहे. 'बगळा,' 'चुना', 'पीठ' हे त्या आंधळ्या बुध्दिवाद्याच्या 'बुध्दिवादी' रूपी गणितातील आकडे किंवा चिन्हे आहेत. ते दुधाची जागा कधीच घेऊ शकणार नाहीत.

या आंधळ्याचा दुधाविषयीचा दृष्टिकोण समजावून घेतला तर बुध्दिवाद्याचा अतींद्रिय घटनांविषयी काय दृष्टिकोण आहे हे वाचकांच्या लक्षात येईल. आंधळा जसे 'बायको' च्या साधनाने व स्पर्शेंद्रियाने कळणाऱ्या 'बगळ्या'खेरीज 'दूध' म्हणून काही नाही असे म्हणतो, त्याप्रमाणे बुध्दिवादीही भौतिक साधनांनी आणि पाच ज्ञानेंद्रियांनी कळणाऱ्या (इंद्रियगम्य) घटनाखेरीज 'अतींद्रिय' म्हणून कांही असणे शक्य नाही असे समजतो. आणि आंधळा जसे दूध पिऊन पाहात नाही, त्याचप्रमाणे बुध्दिवादी अतींद्रिय (परामानसशास्त्रीय) प्रयोग करून अनुभव घेऊन पहात नाही. ( किंवा ज्यांनी ते केले आहेत त्यांच्यावर विश्वास ठेवत नाही.) आंधळा व बुध्दिवादी यांच्यात फरक इतकाच की, या दृष्टांतातील हा आंधळा जन्माने आंधळा आहे, तर बुध्दिवाद्यांनी आंधळ्याचे सोंग पांघरले आहे! हे सोंग आपल्या विशिष्ट तत्त्वज्ञानामुळे त्यांना पांघरावे लागले आहे. त्यांचे हे आंधळे तत्त्वज्ञान त्यांना वैज्ञानिकदृष्ट्या डोळस बनू देत नाही. पण दुर्दैव असे की, बौध्दिकदृष्ट्या सुध्दा ते त्यांना डोळस बनू देत नाही ! म्हणजे ते केवळ वैज्ञानिकदृष्ट्याच नव्हे तर बौध्दिकदृष्ट्याही आंधळे आहेत असे दिसून येते. उदा. श्रध्दा व अंधश्रध्दा यात त्यांना कांहीच फरक दिसत नाही. सर्व श्रध्दा या अंधश्रध्दाच आहेत असे ते समजतात. त्यामुळे ईश्वरावरील श्रध्दासुध्दा त्यांच्या दृष्टीने अंधश्रध्दाच ठरते. आता एखादी गोष्ट अस्तित्वात नसल्याबद्दल, ती खोटी असल्याबद्दल पुरावे असतानासुध्दा जर एखादी व्यक्ती त्या गोष्टीवर श्रध्दा ठेवत असेल तर तिच्या त्या श्रध्देला अंधश्रध्दा म्हणता येईल. (पुराव्याकडे डोळेझाक करणे म्हणजे आंधळेपणाने श्रद्धा ठेवणे होय.) अशा रीतीने *पुराव्याकडे डोळेझाक करणे ही अंधश्रध्दा होय, ही अंधश्रध्देची व्याख्या मान्य असेल तर माणसांच्या सर्व श्रध्दा अंधश्रध्दा ठरावयाच्या झाल्यास त्या सर्व श्रध्दांविरूध्द त्या खोट्या असल्याबद्दल पुरावे सापडले आहेत असे म्हणता आले पाहिजे.* पण असे पुरावे सापडले आहेत असे कोणीच म्हणू शकणार नाही. ईश्वराचेच उदाहरण घ्यावयाचे झाले तर ईश्वर अस्तित्वात नसल्याबद्दल पुरावे सापडले आहेत असे कोणीही म्हणू शकणार नाही. कारण असे पुरावे उपलब्ध करताच येत नाहीत. आणि म्हणून ईश्वरावरील श्रध्दा ही अंधश्रध्दा ठरू शकत नाही. कोणी म्हणेल की ईश्वर आहे याबद्दल तरी पुरावे कोठे आहेत? पुरावे नाहीत असे नाही पण ते दुसऱ्यांना देता येत

नाहीत. म्हणूनच तिला श्रध्दा म्हणायचे. पुरावे देता आले असते तर ते 'वास्तव' च (Fact) बनले असते. तिला श्रध्दा म्हणण्याची गरजच उरली नसती.[२]

मग बुद्धिवादी सर्व श्रध्दा या अंधश्रध्दा आहेत, असे कशाच्या आधारे म्हणतात? केवळ तर्कवादाने ते असे म्हणतात. त्यांचा हा तर्कवाद असा की, बुद्धी व श्रद्धा या आगदी भिन्न, किंबहुना परस्परविरोधी गोष्टी आहेत. ते बुद्धी म्हणजे तर्कशुद्ध विचारशक्ती समजतात. बुद्धी म्हणजे 'तर्कशुद्धता' समजले तर तद्विरूद्ध गोष्ट जी श्रद्धा, ती आपोआपच 'तर्कदुष्टता' ठरते असे त्यांचे म्हणणे असते. पण हे म्हणणे खरे नाही. पुन्हा ईश्वराचेच उदाहरण घ्यायचे तर ईश्वरावरील श्रद्धा ही तर्कदुष्ट किंवा तर्कविसंगत आहे, असे म्हणता येत नाही. किंवा तार्किकदृष्ट्या ईश्वर अस्तित्वात नसल्याचे कोणालाही दाखवून देता येत नाही. आणि येणे शक्य नाही.[३] म्हणजे तर्कवादानेही ईश्वरावरील श्रद्धा ही अंधश्रद्धा ठरत नाही. तरीही बुद्धिवादी ही अंधश्रद्धा असल्याचे मानतात. इतकेच नव्हे तर तर्कशास्त्रदृष्ट्या, म्हणजे बुद्धी व श्रद्धा यात परस्परविरोध आहे, या तर्काच्या आधारे हे आपण सिद्ध करू शकतो, असा दावा करतात. उदा. पुढील उतारा पाहा :-

''अस्तिपक्ष (ईश्वर आहे म्हणणारा) श्रद्धावादी भूमिकेत तर नास्तिपक्ष बुद्धिवादी भूमिकेतअसतो. श्रद्धा व बुद्धी याबाबत 'बुद्धीचा प्रांत जिथे संपतो, तिथे श्रद्धेचा प्रांत सुरू होतो' असे खुद्द स्वामी विवेकानंदांनीच सांगितले असल्यामुळे, जिथे बुद्धी आहे तिथे श्रद्धा व जिथे श्रद्धा आहे तिथे बुद्धी असणार नाही, हे ओघानेच येते. यातून तर्कशास्त्रदृष्ट्या अचूक व धक्कादायक असा निष्कर्ष निघतो की, बुद्धी अश्रद्ध असते व श्रद्धा निर्बुद्ध असते...अशा रीतीने श्रद्धेत बुद्धी नसल्यामुळे 'डोळस श्रद्धा' हे शब्द अर्थहीन ठरतात.''[४]

'डोळस श्रद्धा' म्हणून काही असणे शक्य नाही, म्हणजे सर्व श्रद्धा या अंधश्रद्धाच असतात, (यात ईश्वरावरील श्रद्धाही आली) हा जो या ईश्वर न मानणाऱ्या लेखकाने 'तर्कशास्त्रदृष्ट्या अचूक निष्कर्ष' काढला आहे, तो ईश्वर मानणाऱ्या विवेकानंदांच्या एका कथित वचनाच्या आधारे काढला आहे, ही यातील गंमत आहे. याचा अर्थ असा होतो की, विवेकानंद स्वत:लाच आपल्या या तथाकथित वचनाने अंधश्रद्ध ठरवत आहेत आणि तेही 'अचूक तर्कशास्त्रा' ने! पण विवेकानंद बोलून चालून अध्यात्मवादी असल्यामुळे कदाचित त्यांची ही तथाकथित अंधश्रद्धा कोणी क्षम्य वा समर्थनीय मानील. पण न्यूटन, आईन्स्टाईन यांसारखे जागतिक कीर्तीचे बुद्धिवादी शास्त्रज्ञ या 'अचूक तर्कशास्त्रा' ने अंधश्रद्ध ठरतात

याचे काय? कारण हे शास्त्रज्ञही ईश्वर मानणारे आहेत. तरीही काही बिघडत नाही. ते ईश्वर मानत असतील तर विज्ञानाबाहेर मानतात;[५] व म्हणून ते त्या क्षेत्रात अंधश्रद्धच ठरतात असे बुद्धिवादी म्हणतील. अडचण एवढीच की *खुद्द विज्ञानच अंधश्रद्ध असल्याचे* विज्ञानवादी दृष्टीकोणाचा आग्रह धरणाऱ्या खुद्द बर्ट्रांड रसेल या कट्टर बुद्धिवाद्याने म्हटले आहे ! किंवा मान्य केले आहे म्हणा हवे तर. कारण ज्या कार्यकारणभावावर विज्ञानाची उभारणी झाली आहे, तो कार्यकारणभाव हीच एक 'अंधश्रद्धा' असल्याचे प्रसिद्ध तत्त्ववेत्ता डेव्हिड ह्यूम याने दाखवून दिले असून त्याचे म्हणणे आजपर्यंत कोणालाही खोडून काढता आलेले नाही, असे रसेलने आपल्या 'Is Science Superstitious?' या निबंधात म्हटले आहे.[६] आता बुद्धिवादी ज्याला स्वत:चा बालेकिल्ला समजातात, त्या विज्ञानाचा पायाच जर अशा रीतीने 'अंधश्रद्धा' ठरत असेल तर ते कशाच्या आधारावर ईश्वरावरील श्रद्धेवर अंधश्रद्धा म्हणून हल्ला चढविणार? तथापि, विज्ञान अंधश्रद्धेवर आधारले आहे असे ह्यूमने दाखवून दिले असल्याचे (Made it appear) रसेलने जे म्हटले आहे, ते खट्याळपणे लिहिण्याच्या त्याच्या शैलीमुळे होय. वास्तविक ह्यूमने आपल्या **'A Treatise of Human Nature'** या ग्रंथात सविस्तरपणे जे दाखवून दिले आहे ते एवढेच की, विज्ञानातील कार्यकारणभाव तर्कशास्त्रावर आधारलेला नाही. (किंवा तसा आधारला असल्याचा पुरावा नाही.) म्हणजे विज्ञानातील कार्यकारणसंबंधाचा आधार तर्कशुद्ध नाही. आणि म्हणून विज्ञानातील कार्यकारणभाव ही एक श्रद्धा ठरते. अंधश्रद्धा ठरत नाही. एखाद्या गोष्टीविरूद्ध पुरावा असूनही जर कोणी तिच्यावर श्रद्धा ठेवीत असेल, तरच ती अंधश्रद्धा ठरते, या निकषानुसार विज्ञानातील कार्यकारणभाव ही अंधश्रद्धा ठरत नाही, तर केवळ श्रद्धा ठरते. यावरून हे स्पष्ट आहे की, **ज्या श्रद्धेवर विज्ञान उभे आहे, ती श्रद्धा ईश्वराचे अस्तित्व मानणाऱ्या श्रद्धेहून तत्त्वत: वेगळी नाही**. म्हणून बुद्धिवाद (तर्कवाद) म्हणेज विज्ञान समजून व त्याच्या (विज्ञानाच्या) विरोधात श्रद्धेला उभे करून तिला अंधश्रद्धा ठरवणे चुकीचे आहे.बुद्धिवाद्यांनी तिला अंधश्रद्धा ठरविले (म्हणजे सर्वच श्रद्धा या अंधश्रद्धा ठरविल्या) तर या निकषानुसार विज्ञानही अंधश्रद्ध ठरते.[७]

सर्व श्रद्धा अंधश्रद्धा आहेत, हा जो बुद्धिवाद्यांचा सिद्धांत आहे, तो बुद्धी व श्रद्धा यात विरोध आहे या गृहीतकृत्यावर आधारलेला असून तो विवेकानंदांच्या वरील कथित वचनावर अवलंबून नाही, हे मात्र येथे लक्षात ठेवले पाहिजे. हे त्यांचे

खास तत्त्वज्ञान आहे. हे त्यांचे तत्त्वज्ञान चुकीचे असल्याचे तर्कवादाने (ह्यूम व रसेल यांची साक्ष काढून) वर दाखवून दिलेच आहे. पण हे विज्ञानवादानेही दाखवून देता येईल.

मानवाने आपल्या बुद्धीच्या जोरावर अनेक वैज्ञानिक नियम शोधून काढले आहेत. उदा. न्यूटनचे गतीविषयक नियम, उष्णतागतीशास्त्राचे नियम इत्यादी हे सर्व नियम अबाधित आहेत असे गृहीत धरले नाही, तर ते नियम या संज्ञेला पात्र ठरत नाहीत. या नियमाविरूद्ध एक जरी घटना घडल्याची आढळली , तरी ते नियम विज्ञानाच्या गृहीतकृत्यानुसार खोटे ठरतात. पण हे सर्व तथाकथित 'अबाधित' नियम 'भानामती' क्षणार्धात गुंडाळून ठेवते असे आढळून येते.[८] म्हणून ते सर्व नियम खोटे म्हणायचे काय? खोटे म्हणायचे तर सर्व विज्ञानच खोटे ठरते. पण विज्ञान खोटे नाही. कारण त्याच्याच आधारे आपले जीवन सुरळीत चालले आहे आणि भौतिक प्रगतीही होत आहे. पण विज्ञानाचे नियम भानामतीच्या घटनांमुळे बाधित होत असल्यामुळे खरेही म्हणता येत नाहीत. अशा रीतीने ज्याला खरेही म्हणता येत नाही व खोटेही म्हणता येत नाही, तरीही जे अनुभवाला येते, जी वस्तुस्थिती आहे , तिलाच श्रद्धा म्हणायचे. कारण बुद्धी एखादी गोष्ट एक तर खरी किंवा खोटी मानते. खरे आणि खोटे हे दोन्ही बुद्धीत एकत्र नांदू शकत नाहीत. श्रद्धेत मात्र ते तसे नांदू शकतात.[९] म्हणूनच बुद्धिवादी भानामती खोटी म्हणतात. तिला अंधश्रद्धा मानतात. पण एखाद्या गोष्टीविरूद्ध पुरावे असतानाही तीवर कोणी श्रद्धा ठेवत असेल तरच तिला अंधश्रद्धा म्हणावे, या निकषानुसार भानामती अंधश्रद्धा ठरत नाही. कारण भानामतीविरूद्ध पुरावे तर नाहीतच; पण तिच्या खरेपणाबद्दलच पुरावे भरपूर प्रमाणात आढळून येतात. त्यांच्याकडे डोळे उघडून न पाहणारे बुध्दिवादीच अंधश्रध्द ठरतात, असे म्हणणे प्राप्त आहे. (हे कसे हे सोदाहरण व पुराव्यानिशी **विज्ञान आणि चमत्कार** व **विज्ञान आणि अंधश्रध्दा निर्मूलन** या दोन ग्रंथात दाखवून दिले आहे.)

वस्तुस्थिती अशी आहे की मानवी जीवनाकडे वस्तुनिष्ठ दृष्टीने पाहिले तर मानवी जीवनात श्रद्धेशिवाय बुद्धीचे व बुद्धीशिवाय श्रद्धेचे चालू शकत नाही असे आढळून येते. ही गोष्ट प्रत्यक्षात शंभर टक्के बुध्दिवादी व शंभर टक्के श्रद्धावादी (अंधश्रद्धाळू) कोणीच असू शकत नाही, या वस्तुस्थितीवरून स्पष्ट होईल. असले जीवन प्रतिज्ञेवरही कोणाला जगता येणार नाही. म्हणून श्रद्धा व बुद्धी यांच्यामधील विरोध कृत्रिम (खोटा) असून त्यापैकी एकाचा एकतर्फी आग्रह धरणे अव्यवहार्य

ठरते. पण हा विरोध खरा आहे अशा गृहीतकृत्यावर सर्व श्रद्धा अंधश्रद्धा ठरवून त्यांचे निर्मूलन करण्याची प्रतिज्ञा कांही बुद्धिवाद्यांनी केली असून त्यासाठी त्यांनी चळवळही सुरू केली आहे.[१०] पण वरील कारणासाठी ती अव्यवहार्य ठरते. आणि म्हणून तिला यश येण्याची सुतराम् शक्यता नाही. याच कारणासाठी ती मूठभर लोकांची चळवळ राहिली आहे. ही चळवळ श्रद्धा व अंधश्रद्धा यात काय फरक आहे, हे स्पष्ट न करताच त्यांनी सुरू केली असल्यामुळे ती करणारे लोक तसा फरकच करीत नाहीत, अशी सर्वांची भावना झाली असून त्यामुळे त्यांना श्रद्धाळू लोकांचा -आणि बहुसंख्य लोक श्रद्धाळू (अंधश्रद्धाळू नव्हे) आहेत.-(अप्रकट) विरोध राहिला आहे. ही चळवळ करणारे लोक हा फरक स्पष्ट करू शकले असते, तर कदाचित त्यांना त्यांचा विरोध झाला नसता. (कारण अंधश्रद्धा विरोधाला कोणीही जाणता मनुष्य विरोध करणार नाही.) पण तसा फरक हे लोक आपल्या बुद्धिवादी 'तत्वज्ञाना'मुळेच करू शकत नाहीत, ही वस्तुस्थिती आहे. कारण ज्या देवीला स्वत:ला मूल होत नाही, म्हणून दुसऱ्यांचे मूल बळी देण्यात येते, किंवा गुप्त खजिना मिळावा म्हणून स्वत:च्या मुलाचाही बळी देण्यात येतो, त्या देवीला विरोध करणाऱ्या या लोकांना पंढरपूरचा विठोबा कसा मान्य होतो? असा प्रश्न निर्माण होतो; आणि म्हणून बळी मागणाऱ्या देवीबरोबर पांडुरंगालाही त्यांना विरोध करावा लागतो व संतांची शुद्ध भक्ती व माथेफिरूंचे वरील अघोरी कृत्य ही एकाच मापाने मापावी लागतात ! याला धार्मिक वा अध्यात्मवादी लोक आंधळे तर्कशास्त्र म्हणतील ! पण हे त्यांचे बुद्धिवादी तर्कशास्त्र होय ! (कारण ते श्रध्दा व अंधश्रध्दा यात फरक करीत नाही.)[११]

वेश्याव्यवसाय नाहीसा करण्याचा प्रयत्न करून नीतिवादी थकून गेले. मद्यपानाचे उच्चाटन करण्याचा प्रयत्न करून गांधीवादी थकून गेले. गरीबीचे उच्चाटन करण्याचा प्रयत्न करून समाजवादी (वा साम्यवादी) थकून गेले. तसे अंधश्रद्धांचे निर्मूलन करण्याचा प्रयत्न करून हे बुद्धिवादीही थकून जातील. पण म्हणून तसा प्रयत्न करू नये, असे कोणी म्हणणार नाही; किंवा वेश्याव्यवसाय, मद्यपान, गरीबी व अंधश्रद्धा या गोष्टी प्राचीन कालापासून चालत आल्या असून त्या नाहीशा होणे शक्य नाही, अशी पराभूत मनोवृत्ती बाळगण्याचीही आवश्यकता नाही. त्या अनादी कालापासून चालत आल्या असतील तर त्याविरूद्ध लढताना थोडी व्यावहारिक दृष्टी ठेवावी, असे फार तर म्हणता येईल. पण हा व्यवहार्य अव्यवहार्यतेचा प्रश्न नाही. प्रश्न आहे तो आपल्यापुढील समस्येची योग्य जाण किंवा समज असण्याचा.

वरील उदाहरणातील वेश्या (किंवा वेश्याव्यवसाय) कोणाला (वा कशाला) म्हणावे, हे तो प्रश्न हाताळणाऱ्यांना माहीत होते. तसेच मद्यपान व गरीबी म्हणजे काय याचीही स्पष्ट कल्पना त्याविरूद्ध लढणाऱ्यांना होती. पण अंधश्रद्धा कशाला म्हणावे, हेच या लोकांनी ठरविलेले नसताना ते त्याविरूद्ध लढत आहेत! हिला अंधारातील तलवारबाजी म्हणता येईल ! म्हणून वरील सर्व लढ्यांना कोणाचाही विरोध नसला तरी अंधश्रद्धा निर्मूलन चळवळीला मात्र विरोध झाला आहे. पण हा विरोध कांही मूठभर विचारवंतांचाच झाला असून बहुसंख्य लोकांनी या चळवळीची उपेक्षाच केली आहे. प्रस्तुत लेखकाचा या चळवळीकडे पाहण्याचा दृष्टिकोण प्रामुख्याने उपेक्षेचाच होता व आहे. पण विज्ञानाच्या नावाखाली त्यांनी जाहीरपणे आव्हाने देऊन सत्याला असत्य म्हणण्याचा सपाटा चालविल्यामुळे ही उपेक्षावृत्ती टाकून त्यांची देखल घेणे त्याला भाग पडले. जनतेचा बुद्धिभेद विज्ञानाच्या नावाखाली होत असलेला खपवून घेणे प्रस्तुत लेखकाला मुळीच मान्य होण्यासारखे नव्हते. तो बुद्धिभेद अंधश्रद्धानिर्मूलन या गोंडस नावाखाली होतो म्हणून क्षम्य ठरत नाही. अंधश्रद्धा निर्मूलन चळवळीविरूद्ध लेखनी उचलण्याचे हेच कारण आहे.

विज्ञानाला आपल्या दावणीला बांधून आपली विशिष्ट विचारसरणी विज्ञानाच्या नावाखाली 'सत्य' म्हणून खपविण्याचा अनेकांनी आतापर्यंत प्रयत्न केला आहे. (मार्क्सवाद हे त्याचे प्रसिद्ध उदाहरण आहे.) त्यांच्या या प्रयत्नाला काही काळ यशही आले आहे. पण शेवटी सत्याचाच विजय झाला आहे. वैज्ञानिक पद्धतीला कांही अर्थ असेल, तर वैज्ञानिक सत्य हे कधीच अगोदर ठरत नसते, हे कधीही विसरून चालणार नाही. ते धार्मिक सत्याप्रमाणे सनातन नसते, तर नित्यनूतन असते. त्याचा सतत शोध लागत असतो. आणि त्यामुळे विज्ञानात प्रस्थापित सत्य नावाची चीज नसते. पण दुर्दैवाने धर्माप्रमाणे विज्ञानातही प्रस्थापितांचा गट तयार झाला असून तो विज्ञानाच्या प्रगतीला खीळ घालत आहे.पण जातीच्या विज्ञानवाद्यांना ही खीळ तोडून पुढील वाटचाल करावी लागणार आहे. त्यासाठी बराच विरोध सहन करावा लागणार आहे. अनेक तऱ्हेच्या आरोपांना तोंड द्यावे लागणार आहे. नवीन सत्यासाठी ते आवश्यक आहे. टी. एच्. हक्स्ले याने म्हटले आहे की, ''नवीन सत्याच्या नशीबी नेहमी पाखंडी म्हणवून घेणेच लिहिलेले असते.'' पण याच्याही पुढे जाऊन असे म्हणता येईल की, ''नवीन सत्याच्या पदरी नेहमी 'अनौरसपणा' येतो !'' म्हणजे त्याला कायदेशीर बाप नसतो ! आणि म्हणून विवाहबाह्य संबंधातून जन्मलेल्या अपत्याप्रमाणे त्याला प्रारंभी

समाजबहिष्कृत ठरविण्यात येते ! अतींद्रिय सत्य हे काही नवीन सत्य नसले (उलट ते सर्वात प्राचीन सनातन सत्य आहे.) तरी या विज्ञानवादी युगात वैज्ञानिक पद्धतीचा वापर करून (टेस्ट ट्यूब बेबीप्रमाणे) ते जन्माला आले असल्यामुळे नवीन सत्य ठरले असून, ते प्रस्थापित सत्य उलथून पाडत असल्यामुळे प्रस्थापित विज्ञानाचा वारसा सांगणाऱ्यांनी त्याला विज्ञानबहिष्कृत ठरविले आहे. जडवाद हा युगधर्म बनलेल्या युगात जडवाद खोटा ठरविणाऱ्या या विज्ञान व धर्म यांच्या (अनौरस) संबंधातून जन्मलेल्या अतींद्रीय वैज्ञानिक सत्याचा पाठपुरावा करणे म्हणूनच 'पाप' ठरले आहे. पण अतींद्रिय सत्याचा पाठपुरावा करणे, हे प्रस्थापित जडवादी विज्ञानाच्या दृष्टीने हल्ली पाप असले, तरी विज्ञान-कृती व पद्धतीच्या दृष्टीने ते पुण्यकृत्यच असल्याने त्याचा पाठपुरावा करणे, आज ना उद्या विज्ञानपद्धतीशी निष्ठा बाळगणाऱ्यांना भागच आहे. त्यांनी तसे केले नाही तर ते अवैज्ञानिक ठरतील व स्वत:च विज्ञानबहिष्कृत बनतील! पण विज्ञानाच्या इतिहासात 'बहिष्कृत' ठरणे म्हणजे 'मरून जाणे' होय असे टी.एच्. हक्सले याने जे म्हटले आहे, तेच शेवटी खरे ठरते ! तो म्हणतो- "A new scientific truth does not triumph by convincing its opponents and making them see the light, but because its opponents eventualy die and a new generation grows up that is familar with it" याचा अर्थ असा- "नवीन वैज्ञानिक सत्य त्याच्या विरोधकांना पटल्यामुळे (विज्ञानात) प्रस्थापित होत नाही. तर ते (विरोधक) मेल्यानंतर त्याची तोंडओळख असणारी नवी पिढी जन्माला आल्यानंतर प्रस्थापित होते." हल्ली अतींद्रिय विज्ञानाला विरोध करणारेच मृत्यूपंथाला लागले आहेत! आणि २१ व्या शतकातील नवी पिढी अतींद्रिय विज्ञानाशी घरोबा निर्माण झालेली अशी वाढणार आहे, यात मुळीच संशय नाही.



## संदर्भ टिपा

१. प्लेटोचा **Republic** मधील प्रसिद्ध गुहेचा दृष्टांत या दृष्टीने पाहण्यासारखा आहे. त्यात प्लेटोने एका गुहेत काही लोक आजन्म हात-पाय डोके बांधलेल्या अवस्थेत बसलेले आहेत, असे चित्र रंगवले आहे. पण असे आजन्म कोणी बसत नाही.

२. ईश्वराविषयीचे पुरावे दुसऱ्यांना देता येत नाहीत, हे सुद्धा निरपवादपणे खरे नाही. दुसऱ्यांना ते हटकून देता येत नाहीत इतकेच. ते देणाऱ्या व पाहणाऱ्यांमध्ये

कांही पात्रता यावी लागते. **'दिव्यं ददामि ते चक्षुः।'** हे गीतेतील श्रीकृष्णाचे अर्जुनाला उद्देशून म्हटलेले वाक्य या संदर्भात महत्वाचे आहे. 'तुम्ही ईश्वर पाहिला आहे काय?' असा प्रश्न विचारणाऱ्या बुद्धिवादी नास्तिक नरेंद्राचे रामकृष्णांच्या सानिध्यात श्रद्धावादी आस्तिक विवेकानंदांत जे रूपांतर झाले, तेही या संदर्भात लक्षात ठेवण्यासारखे आहे. यादृष्टीने पाहता ईश्वराचे अस्तित्व ही केवळ श्रद्धा नसून 'वास्तव' च ठरते. एवढेच की ते आध्यात्मिक वास्तव आहे. भौतिक वास्तव नाही. आध्यात्मिक वास्तव व भौतिक वास्तव यामध्ये बरेच लोक गल्लत करतात. ते ईश्वर म्हणजे शरीरधारी (भौतिक वास्तव) समजतात. भौतिक वास्तवसुद्धा आधुनिक विज्ञानाच्या (क्वाँटम सिद्धांताच्या) दृष्टीने 'भौतिक' नाही, असे हल्ली जेथे शास्त्रज्ञांना म्हणावे लागते, तेथे आध्यात्मिक वास्तवाची भौतिक स्वरूपात अपेक्षा करणे, कसे शास्त्रीय ठरेल? (क्वाँटम सिद्धांतानुसार कोणत्याही वस्तूला निरपेक्ष काटेकोर भौतिक अस्तित्व असू शकत नाही. "Independent reality in the ordinary physical sense can be ascribed neither to the phenomena nor to the agencies of observation." N. Bohr, **Atomic Physics and the Description of Nature**, 1936)

३. तत्त्वज्ञानात ईश्वराच्या अस्तित्वाबद्दलची 'सिध्दता' देण्यात येते, पण ती वास्तविक सिध्दता (Proof) नसते, तर ते युक्तिवाद (Arguments) असतात. या युक्तिवादांनी ईश्वराचे अस्तित्व जसे सिद्ध होत नाही, तसे विरुद्ध युक्तिवादांनी ते असिद्धही होत नाही. कारण ईश्वर हा 'प्रमेय' नाही. (**भ. गी.**- २.१८)

४. **'प्रसाद'** दिवाळी अंक १९८९ पृ. ७३

५. विज्ञानाबाहेर ईश्वराचे अस्तित्व मानण्याऐवजी विश्व समजून घेण्याच्या विज्ञानाच्या प्रयत्नातूनच ईश्वराचे अस्तित्व कसे भावते, हे आईन्स्टाईनने वेळोवेळी प्रतिपादले आहे. उदा. आईन्स्टाईन म्हणतो, "My religion consists of an humble admiration of the illimitable superior spirit who reveals himself in the slight details we are able to perceive with our frail and feeble minds. That deeply emotional conviction of the presence of a superior reasoning power, which is revealed in the incomperhensible universe, forms my idea of God". **The Universe and Dr. Einstein** - by Lincoln Barnett, Collins, 1956 -p-113. **The World As I See It**, या ग्रंथातही आईन्स्टाईनने नेमका हाच विचार व्यक्त केला आहे. विश्वाच्या बुडाशी "Superior Spirit" किंवा "Superior Reasoning power" असल्याची आईन्स्टाईनची श्रद्धा त्याच्या विश्व वैज्ञानिक (बुद्धिवादी) दृष्टीने समजून घेण्याच्या प्रयत्नातून निर्माण झाली आहे, हे लक्षात ठेवले पाहिजे.

६. **Sceptical Essays**, Unwin Paperbacks 1985 - p. 35

७. विवेकानंदाप्रमाणे कोणाही एका विचारवंताचे वरीलप्रमाणे एखादे आलंकारिक

भाषेतील कथित वाक्य घेऊन कांहीही सिद्ध करता येते, हे वरील उदाहरणावरून स्पष्ट होईल. आईनस्टाईनचेही असेच एक आलंकारिक वाक्य प्रसिद्ध आहे. ते असे "Science without religion is lame and religion without science is blind". (**Ideas and Opinions** p.46) (विज्ञान धर्माशिवाय पांगळे आहे व धर्म विज्ञानाशिवाय आंधळा आहे.) येथे विज्ञान म्हणजे बुद्धी व धर्म म्हणजे श्रद्धा समजले तर बुद्धी व श्रद्धा यामध्ये विरोध कल्पिणे चुकीचेच नव्हे, तर आत्मघातकीपणाचे आहे, असे आईनस्टाईनला सुचवायचे आहे हे स्पष्ट आहे आणि आईनस्टाईन बुद्धिवादी व विज्ञानवादी असल्यामुळे त्याच्या या वाक्याला खचित जास्त महत्त्व आहे.

८. प्रस्तुत लेखकाचे दुसरे पुस्तक **'विज्ञान आणि चमत्कार'** पाहावे.

९. कॉंटम सिद्धांत बुद्धिवाद्यांना अडचणीचा ठरला आहे, तो या सिद्धांताने प्रस्थापित केलेली दोन परस्परविरोधी सत्ये (कण आणि तरंग) प्रकाशात एकत्र नांदू शकतात ही वस्तुस्थिती मान्य करणे त्यांच्या बुध्दीला जड जात असल्यामुळे होय. कॉंटम सिद्धांत हा अशारीतीने भौतिक विज्ञानातील श्रद्धेचा (बुध्दिबाह्य) विषय ठरतो; बुद्धीचा (तर्काचा) नाही. म्हणूनच या सिद्धांताला 'तो अपुरा आहे' या सबबीखाली बुद्धीवाद्यांचा विरोध होत राहिला आहे.

१०. अलीकडे तर त्यासाठी कायदा करण्याचाही आग्रह धरण्यात आला आहे.

११. २४ नोव्हेंबर १९८९ च्या 'इंडियन एक्सप्रेस' मध्ये एका मुसलमान जोडप्याने आपणाला मूल व्हावे म्हणून दुसऱ्यांचे (हिंदूचे) मूल बळी दिल्याची बातमी फोटोसह आली आहे. यावरून अंधश्रद्धा धर्म जाणत नाही, हे स्पष्ट होते, (इस्लामला मूर्तिपूजा मान्य नाही.) पण अंधश्रद्धानिर्मूलनवाले मुस्लिमांवरील अंधश्रद्धांकडे जाणूनबुजून दुर्लक्ष करतात असे आढळून येते.



१

# भौतविज्ञानाकडून अतींद्रिय विज्ञानाकडे

जे मानवाच्या पाच ज्ञानेंद्रियांना जाणवते तेवढेच खरे आहे, अशा गृहीतकृत्यावर भौतविज्ञान (Physics) आधारलेले आहे. या उलट पाच ज्ञानेंद्रियांच्या पलीकडेही एक विश्व आहे, असे अतींद्रिय विज्ञान मानते. अशा रीतीने परस्परविरूद्ध गृहीतकृत्यांवर आधारलेली अभ्यासक्षेत्रे एकत्र येणे कसे शक्य आहे, असे वरील मथळा वाचून वाचकांना वाटले तर ते स्वाभाविक आहे. अतींद्रिय विश्व अस्तित्वात आहे, असे समजले तरी त्याचा वैज्ञानिक पद्धतीने अभ्यास कसा शक्य आहे? असा प्रश्नही कांही जणांना पडणे शक्य आहे.

जे पाच ज्ञानेंद्रियांना जाणवते, त्याचाच फक्त वैज्ञानिक पद्धतीने अभ्यास करणे शक्य आहे, असे समजण्याचे कारण नाही. मनोविज्ञान हे मनाचा वैज्ञानिक पद्धतीने अभ्यास करते. पण मन हे इंद्रियविषय होऊ शकत नाही. पण म्हणून मनच अस्तित्वात नाही, असे म्हणता येणार नाही. जीवविज्ञान (Biology) जीवाचा वैज्ञानिक पद्धतीने अभ्यास करते. पण जीव इंद्रियविषय नाही. पण म्हणून जीवच अस्तित्वात नाही, असे म्हणता येणार नाही. जीव व मन हे स्वतंत्रपणे अस्तित्वात नसून ते भौतिक विश्वाचेच भाग आहेत, असे मात्र भौत वैज्ञानिक म्हणू शकतात. पण ते भौतिक विश्वाचे कसे भाग होऊ शकतात, हे वैज्ञानिक पद्धतीने सिद्ध करणे भाग आहे. तसे सिद्ध झालेले नाही. मनाचा किंवा जीवाचा 'फॉर्म्युला' तयार करता आलेला नाही. पण म्हणून त्यांचा वैज्ञानिक पद्धतीने अभ्यासच करता येत नाही, असे समजता येईल काय?

तथापि, भौतवैज्ञानिक अतींद्रिय विश्वाचे अस्तित्व मान्य करीत नाहीत. असे मान्य न करण्याचे जे कारण देण्यात येते ते असे की, अतींद्रिय शक्ती ज्या मनावर आरोपित करण्यात आली आहे, ते मन भौतविश्वाच्या माध्यमाशिवाय कार्यच करू शकत नाही. उदा. माझे विचार तुमच्यापर्यंत पोचण्यासाठी हे छापलेले पुस्तक आवश्यक आहे. पण छापलेल्या पुस्तकाच्या माध्यमाशिवाय किंवा अन्य कोणत्याही भौतिक माध्यमाशिवाय माझे विचार तुम्हाला कळणे शक्य आहे, असे मी म्हटले तर? तुम्ही म्हणाल हे अशक्य

आहे. म्हणजे भौतशास्त्रज्ञाप्रमाणे सामान्य मनुष्यसुद्धा असे घडणे शक्य नाही असे समजतो. पण असे घडणे शक्य आहे, इतकेच नव्हे तर असे अनेक वेळा घडून येत असते, आणि हे प्रयोगानेही दाखवून देता येते. पुढील प्रत्यक्ष केलेल्या प्रयोगावरून हे दिसून येईल.

## मन स्थळकाळाची मर्यादा ओलांडू शकते

एका बंद खोलीत बसून मी काही चित्रे काढीत आहे व दुसऱ्या एका बंद खोलीत तुम्ही बसलेले आहात. मी जी चित्रे काढीत आहे, तीच चित्रे हुबेहूब तुम्ही काढावीत असे मी म्हटले, तर तुम्ही हे अशक्य आहे असे म्हणून हा प्रयोगच करणार नाही. पण बऱ्याच गोष्टी अशक्य समजून प्रयोग न केल्यामुळेच 'अशक्य' ठरल्या आहेत, हे खाली दिलेल्या प्रत्यक्ष प्रयोगात काढलेल्या चित्रांवरून दिसून येईल.



**चित्र क्रमांक १.**

पहिल्या ओळीतील चित्रे एका खोलीत बसून इंग्लंडमधील जस्टिस ऑफ पीस व युनिव्हर्सिटी कॉलेजचे गव्हर्नर गुथ्री यांनी काढली आहेत व खालच्या ओळीतील चित्रे मिस एडवर्डस् या बाईने दुसऱ्या एका खोलीत बसून गुथ्रीशी कसलाही भौतिक संपर्क न ठेवता काढली आहेत. दोन्ही चित्रांतील साम्य हे योगायोगाने निर्माण होणे शक्य नाही. म्हणजे दोन मनांचा येथे थेट-भौतिक माध्यमाशिवाय-संबंध घडून आला आहे. हे स्पष्ट आहे. भौतविज्ञानानुसार एकाचे विचार दुसऱ्याला भौतिक माध्यमाशिवाय कळणे शक्य नाही, पण येथे भौतिक माध्यमाशिवाय एकाचे विचार दुसऱ्याला कळाले आहेत. कोणी म्हणेल, मग नेहमीच्या व्यवहारात असे का घडत नाही? अर्थात असे का घडत नाही, हे वैज्ञानिकांनीच शोधून काढायचे आहे. याचे वरवरचे उत्तर असे की, कांही व्यक्तींना अतींद्रिय शक्तींची देणगी मिळाली आहे; पण प्रत्येक व्यक्तीत ही शक्ती सुप्तावस्थेत असल्याचे प्रयोगाने सिध्द झाले आहे. प्रत्येक व्यक्तीला तिचा विकासही

करता येतो. ही शक्ती लाभलेल्या व्यक्ती दुर्मिळ आहेत, असेही समजण्याचे कारण नाही. आमच्या तुमच्यात अशा बऱ्याच व्यक्ती आहेत. पण त्यांना आपल्यात ती शक्ती आहे हे माहीत नाही. त्याचा त्यांनी शोध लावलेला नाही, इतकेच. अप्टन सिंक्लेअर



**चित्र क्रमांक २.**

(ज्याला अमेरिकेचा चार्ल्स डिकन्स म्हणतात) या अमेरिकेच्या प्रसिध्द कादंबरीकाराने सहज आपल्या पत्नीवर प्रयोग केल्यानंतर तिच्यात ही शक्ती असल्याचे आढळून आले.

वरील चित्र क्रमांक २ मध्ये डावीकडील चित्रे सिंक्लेअरने काढली आहेत आणि उजवीकडील चित्रे त्याची पत्नी क्रेग हिने काढली आहेत. अशी शंभरावर चित्रे **'Mental Radio'** नावाच्या ग्रंथात त्यांनी प्रसिद्ध केली आहेत. या ग्रंथाचे वैशिष्ट्य म्हणजे एका भौतशास्त्रज्ञानेच या ग्रंथाला - या प्रयोगांना पाठिंबा देणारी प्रस्तावना लिहिलेली आहे. हा भौतशात्रज्ञ दुसरा तिसरा कोणी नसून जगप्रसिद्ध आईन्स्टाईन हा आहे. [ ही उदाहरणे जुनी असली तरी अशाच प्रकारची शास्त्रज्ञांनी सप्रयोग सिद्ध केलेली असंख्य उदाहरणे असून ती सर्वसामान्य माणसात दूरस्थ व्यक्तीचे विचार व वस्तू जाणण्याचे सामर्थ्य असल्याचे निरपवादपणे सिद्ध करतात. नमुन्यासाठी पाहा **Mind Reach**-R. Targ and H. Puthof (1976). BBC ने दूरदर्शनवर दाखवलेल्या डॉक्युमेंटरीच्या पुस्तकातील भाग १ 'Powers of Mind. **In Search of the Dead** - J. Iverson (1992). या प्रयोगासंबंधीचा टार्ग आणि पुथॉफ यांचा लेख "Nature" या मातब्बर नियतकालिकानेही प्रसिद्ध केला आहे. (**Nature** vol. 251,1974) यावर जी टीका झाली तिलाही पुन्हा प्रत्यक्ष प्रयोगांनीच परिणामकारकपणे उत्तर देण्यात आले आहे. (**Mind at Large** - ed. C.Tart, H. Puthof R. Targ. 1979)]

एका ठिकाणच्या व्यक्तीच्या मनातील विचार दुसऱ्या ठिकाणी असलेल्या व्यक्तीला भौतिक माध्यमाशिवाय कळू शकतात, या वस्तुस्थितीवरून मनाला स्थळाचे बंधन नाही, मन स्थळाची मर्यादा ओलांडू शकते, हे सिद्ध होते. स्थळाप्रमाणेच काळाचेही मनाला बंधन नाही, ते काळाची मर्यादाही ओलांडू शकते; म्हणजे भविष्यकालीन घटनाही मनाला कळू शकतात, हे अनेक प्रयोगांनी सिद्ध झाले आहे. अमेरिकेतील नॉर्थ कॅरोलिना प्रांतातील ड्यूक युनिव्हर्सिटीमध्ये जे. बी. ऱ्हाईन यांनी यासंबंधी अनेक प्रयोग केले आहेत. हे कसे शक्य आहे, असे वाटल्यामुळे इंग्लंडमधील एस्. जी. सोल या गणितशास्त्रज्ञानेही असे प्रयोग करून पाहण्याचे ठरविले आणि त्यालाही काही व्यक्तीवरील प्रयोगात हे घडू शकते, असे आढळून आले. (सोलने सतत १० वर्षे हे प्रयोग केले असून २३ प्राध्यापक या प्रयोगाचे साक्षीदार आहेत . अपोलो १४ या अंतराळयानातून चंद्रावर उतरणाऱ्या डॉ. एड्गार मिचेल याने १९७१ साली पृथ्वीवरील व्यक्तीशी केलेल्या प्रयोगातही असे यश आले आहे.) यानंतर इतर अनेकांनी असे प्रयोग करून या गोष्टीचा पडताळा पाहिला आहे. (उदा. जी. एन्. एम्. टिरेल, कार्लिस ऑसिस, हेल्मट स्मिट इ. लंडन येथील 'कॉलेज ऑफ सायंटिफिक स्टडीज' येथे डगलस जॉन्सन याने अनेकांना आपल्यात ही शक्ती असल्याचे प्रयोगाने व प्रशिक्षणाने दाखवून दिले आहे.)

## मन भौतिक विश्वाची मर्यादा ओलांडू शकते

मनाला स्थळाकाळाचेच बंधन नाही असे नसून भौतिक विश्वाचेही बंधन

नाही, असे आढळून आले आहे. म्हणजे मन भौतवस्तूमध्ये इच्छित बदल घडवून आणू शकते आणि यासंबंधीचे वैज्ञानिक प्रयोगही जे. बी. ऱ्हाईन यांनीच प्रथम ड्यूक युनिव्हर्सिटीमध्ये करून पाहिले, आणि इतरांनी नंतर त्यांचा तशाच प्रकारच्या प्रयोगांनी पडताळा पाहिला. कधीकधी असले प्रयोग स्वाभाविकपणे, अभावितपणे घडून येतात आणि मग सर्वांनाच अशा गोष्टींचा अनायासेच पडताळा येतो. उदा. ज्याला आपण 'भानामती' म्हणतो अशा घटनांमध्ये भौतिक माध्यमाशिवाय वस्तू इकडच्या तिकडे जाऊन पडणे, आपोआप वस्तू पेटणे इत्यादी प्रकार घडतात (याचा विचार **विज्ञान आणि चमत्कार** या ग्रंथात विस्ताराने केला आहे.) येथे कोणाचे मन हे घडवून आणण्यास जबाबदार असते हे ओळखणे सहजसुलभ नसते. तथापि, असे प्रत्यक्ष घडून येते याचा पडताळा डब्ल्यू जी. रोल, जे. जी. प्रॅट, हॅन्स बेंडर इत्यादी शास्त्रज्ञांनी प्रत्यक्ष प्रयोगांनी पाहिला आहे. याशिवाय हस्तस्पर्शाने रोग बरे करण्याचे सामर्थ्य काही लोकांत आढळून येते. असे सामर्थ्य असलेल्या व्यक्तीवर प्रयोग करून डॉ. बी. ग्रॅड, डॉ. जे. एम्. स्मिथ इत्यादी शास्त्रज्ञांनी याचाही पडताळा पाहिला आहे. अलीकडे काही व्यक्तींनी भौतिक वस्तूत केवळ मन:सामर्थ्याने एकदम मोठे बदल घडवून आणण्याचे सामर्थ्य आपल्यामध्ये असल्याचे सप्रयोग अनेक शास्त्रज्ञांना (यात भौतिक शास्त्रज्ञही आहेत) दाखवून दिले आहे. उदा. रशियातील कुलगिना ही बाई इतर अनेक गोष्टीपैकी बेडकाच्या हृदयाचे ठोके कमी जास्त करू शकते, किंवा बंदही करू शकते; इस्त्रायलचा यूरी गेलर हा पोलादी चमचे वाकवू शकतो; अमेरिकेचा इंगो स्वान चुंबकमापात व तपमापकात बदल घडवून आणू शकतो इत्यादी.

अशा रीतीने अतींद्रिय घटनांमुळे भौतिक शास्त्रातील गृहीतकृत्ये व सिद्धांत खोटी ठरत असल्यामुळे भौतिक शास्त्रज्ञांना या घटना फार मोठया अडचणीच्या ठरल्या असल्यास नवल नाही. या अडचणी दोन प्रकारच्या आहेत. पहिल्या प्रकारची अडचण अशी की, या घटना खऱ्याही म्हणता येत नाहीत व खोट्याही म्हणता येत नाहीत. खऱ्या म्हटल्या तर वैज्ञानिक गृहीतकृत्ये व सिद्धांत खोटे ठरतात व ते का खोटे ठरतात हे सांगावे लागते. पण ते सांगता येत नाही. खोट्या म्हणावे तर वैज्ञानिक पद्धतीनेच त्या घटना घडत असल्याचे सिद्ध झाले आहे. दुसऱ्या प्रकारची अडचण अशी की, या घटना वैज्ञानिकदृष्ट्या खऱ्या म्हणून स्वीकाराव्या तर त्या नेहमी घडत नाहीत. ज्या घटना नेहमीच्या व सार्वत्रिक (Universal) आहेत, त्यांचाच फक्त विज्ञान स्वीकार करते. तशा त्या नसतील तर त्या तशा का नाहीत याविषयी वैज्ञानिक उपपत्ती दिली पाहिजे. पण या घटनांची तशी वैज्ञानिक उपपत्ती देता येत नाही. ज्याची वैज्ञानिक उपपत्ती देता येत नाही, ते वैज्ञानिकदृष्ट्या अस्तित्वातच नाही, असे मानण्याचा विज्ञानाचा प्रघात आहे. पण तसे येथे मानता येत

नाही. कारण या घटनांचे अस्तित्व वैज्ञानिक दृष्ट्याच सिद्ध झाले आहे. असा हा वैज्ञानिकापुढील पेचप्रसंग आहे.

## क्वांटम भौतशास्त्र

सुदैवाने या पेचप्रसंगातून वैज्ञानिकांची सुटका अनपेक्षित रीतीने झाली आहे. आश्चर्य म्हणजे ज्या भौतिकशास्त्रापुढे हा पेचप्रसंग निर्माण झाला होता, त्या भौतिक शास्त्रातील क्वांटमच्या सिद्धांतामुळेच हा पेचप्रसंग सुटला आहे ! तो कशा रीतीने सुटला आहे, याचे सविस्तर विवेचन करण्यासाठी क्वांटमचा सिद्धांत वाचकांना समजावून सांगावा लागेल. ते अर्थातच या मर्यादित ग्रंथात शक्य नाही. तथापि, त्याची थोडीशी कल्पना यावी, म्हणून कांही प्रातिनिधिक स्वरूपाचे विवेचन करणे आवश्यक आहे.



**चित्र क्रमांक ३**

चित्र क्रमांक ३ मध्ये दाखविल्याप्रमाणे एका फटीतून प्रकाशकिरण सोडले, तर त्या फटीची प्रतिमा पलीकडील पडद्यावर चित्रात दाखविल्याप्रमाणे पडते. फटीऐवजी गोल प्रतिमा का मिळते? या प्रश्नाचे उत्तर प्रकाश हा तरंगांनी युक्त असल्यामुळे होय. हे आहे. तरंग लांबीपेक्षाही फटीची रूंदी कमी असल्यामुळे प्रकाश तरंग पलीकडे विस्तार पावतात व प्रतिमा विस्तृत बनते.

आता चित्र क्रमांक ४ मध्ये दाखविल्याप्रमाणे एका फटीऐवजी दोन फटींतून प्रकाश सोडला तर दोन गोल प्रतिमा किंवा दोन्हींची मिळून एक मोठी गोल प्रतिमा मिळण्याऐवजी चित्रात दाखविल्याप्रमाणे अनेक उभ्या प्रतिमा (कमी जास्त प्रकाशाच्या) मिळतात. हे असे का बरे? याचे उत्तर असे की, प्रकाश-तरंग दोन्ही फटींतून जाताना

त्याचे उंचवटे (Crests) जेथे एकत्र होतात, तेथे प्रकाश व जेथे तरंगाचे सखल भाग (Trough) एकत्र होतात, तेथे काळसर भाग निर्माण होतो. १८०३ साली हा प्रयोग करून थॉमस यंग या शास्त्रज्ञाने प्रकाश तरंगमय आहे हे सिद्ध केले.



चित्र क्रमांक ४

पण ज्याला 'फोटो इलेक्ट्रिक इफेक्ट' म्हणतात, तो प्रयोग करून आईन्स्टाईनने प्रकाश हा कणांचा (Particle किंवा Photon) बनला असल्याचे दाखवून दिले आणि त्याबद्दल १९२१ साली आईन्स्टाईनला नोबेल पारितोषिक मिळाले.[१] अशा रीतीने प्रकाश हा कणांचाही बनला आहे व तरंगांचाही बनला आहे असे म्हणावे लागते. परंतु चित्र क्रमांक ५ मध्ये दाखविल्याप्रमाणे कण व तरंग हे परस्परा विरूद्ध गुणधर्मांनी युक्त आहेत.




चित्र क्रमांक ५

कण एके ठिकाणी (मर्यादित जागेत) असतो, तर तरंग (अमर्यादित जागेत) पसरलेले असतात. कणाला निश्चित ठिकाण असते, तसे तरंगाला निश्चित ठिकाण नसते. अशा प्रकारे "जो निश्चित ठिकाणी असतो, पण त्याच वेळी जो निश्चित ठिकाणी नसतो, तर पसरलेला असतो." असे प्रकाशाचे परस्पराविरूद्ध वर्णन करावे लागते.

प्रकाशाचे असे वर्णन ईशोपनिषदात आढळते,

**तदेजति तन्नैजति तद्दूरे तद्वन्तिके ।। ५ ।।**

तो चालतो,तो चालत नाही. तो दूर आहे तो जवळ आहे.

कठोपनिषदातही अशा प्रकारचे वर्णन आहे.

**आसीनो दूरं व्रजति शयानो याति सर्वत: ।। (१.२.२.)**

एके ठिकाणी बसलेला असतो, तरीही दूरपर्यंत जात असतो, एके ठिकाणी झोपलेला असतो, तरीही सर्वत्र पसरलेला असतो.

## गूढवादी भौतिकशास्त्र

हे वर्णन आत्म्यासंबंधीचे आहे हे खरे, पण आत्मा प्रकाशमय आहे, असे उपनिषदेच म्हणतात. उदा. **'अंत:शरीरे ज्योतिर्मयो हि शुभ्रो ।'** असे मुण्डकोपनिषदात आत्म्याचे वर्णन आहे. शुभ्र प्रकाशमय असा शरीरात राहणारा हा आत्मा आहे, असा याचा अर्थ होतो. प्रकाश ज्याप्रमाणे कण व तरंग अशा परस्परविरूद्ध गुणधर्मांनी युक्त आहे, तसाच आत्मा हा सुद्धा अणू व विभू (पसरलेला) असल्याचे वर्णनही उपनिषदात येते. [ तंत्रशास्त्रात यालाच बिन्दू व नाद (wave) म्हटले आहे.] अशा प्रकारे आधुनिक भौतिकशास्त्रज्ञांची प्रकाशाविषयीची भाषा व अध्यात्मशास्त्राची आत्म्याविषयीची भाषा सारखीच, म्हणजे गूढ (परस्परविरूद्ध) असल्याची आढळून येते. ई.पी. विग्नेर या नोबेल पारितोषिक विजेत्या भौतिकशास्त्रज्ञाने प्रकाश व मन (Consciousness) यांच्यात साम्य स्पष्टपणे कल्पिले आहे. (**Symmetries and Reflections**-by E. P. Wigner P. 202, 208) आणि आश्चर्य म्हणजे आत्मा प्रकाशमय असल्याचे अध्यात्मशास्त्र सांगते.(**अंत:शरीरे ज्योतिर्मयो हि शुभ्रो ।**) हा योगायोग आहे काय? हा योगायोग नसून भौतिकशास्त्रज्ञ अध्यात्मशास्त्राची दारे ठोठावत आहेत; नव्हे प्रत्यक्ष आत प्रवेश करून अध्यात्मवादी (गूढवादी) बनले आहेत, असे म्हणावे लागते. हे वरील प्रयोगाचा थोडा विस्ताराने विचार केला तर स्पष्ट होईल.[२]

प्रकाश तरंगांप्रमाणेच कणांनीही बनला असल्यामुळे चित्र क्रमांक ३ व ४ यामधील प्रयोगांचा प्रकाशकणांच्या दृष्टीने विचार करू. दोन्ही चित्रांकडे पाहिल्यास असे दिसून येते की, एक फट उघडी ठेवली तर जो भाग (पांढरे वर्तुळ) प्रकाशमय झाला आहे, त्याच भागात दुसरी फट उघडी ठेवली तर काळे पट्टे तयार होतात. म्हणजे त्या ठिकाणी प्रकाश दिसून येत नाही. याचा अर्थ असा की, एखादा प्रकाशाचा कण (फोटॉन) एक फट उघडी ठेवली असता जेथे आदळतो, त्या ठिकाणी दुसरी फट उघडे ठेवली तर तो आदळत नाही. आता प्रश्न असा आहे की, दुसरी फट उघडी ठेवली आहे की नाही, हे त्या प्रकाशकणाला (फोटॉनला) कसे कळते? दुसरी फट उघडी ठेवली आहे की नाही यावर एखाद्या प्रकाशकणाचे वर्तन अवलंबून असल्याने तो कण ही माहिती मिळवून निर्णय घेतो असे म्हणावे लागते ! पण माहिती मिळवून निर्णय घेणे हे सजीवाचे लक्षण आहे. पण ते त्याच्या ठिकाणी दिसून येत असल्याने तो सजीव आहे असे ठरते ! आणि आत्मा सजीवाचे लक्षण असल्याने प्रकाश हा आत्मायुक्त किंवा आत्मा हा प्रकाशयुक्त असल्याचे उपनिषद्कारांचे म्हणणे खरे ठरते !

पण आईन्स्टाईनच्या $E=mc^2$ या समीकरणानुसार भौतिक वस्तू हे ऊर्जेचेच एक रूप असल्याने व फोटॉन किंवा प्रकाशकण ही ऊर्जाच असल्याने सर्व भौतिक वस्तूच आत्मायुक्त ठरतात. अशा रीतीने ईशोपनिषदातील,

**यस्मिन् सर्वाणि भूतानि आत्मा एवाभूत् विजानत: ।**

'जेथे सर्व पंचमहाभूतेच आत्मा बनली आहेत' हे म्हणणेही खरे ठरते. येथे ती आत्मा कशी बनली आहेत असा कोणाला प्रश्न पडेल, म्हणून उपनिषद्कारांनी 'विजानत:' हा शब्दप्रयोग केला आहे. म्हणजे विज्ञानाच्या (वि+ज्ञा) दृष्टीने असा त्यांनी स्पष्ट खुलासा केला आहे. हे विज्ञान अर्थात १९ व्या शतकातील यंत्रवादी न्यूटोनियन विज्ञान नव्हे, तर २० व्या शतकातील गूढवादी क्वांटम विज्ञान !

वरील चर्चेचा निष्कर्ष असा की, अध्यात्मशास्त्राप्रमाणे आधुनिक भौतिक विज्ञानही भौतिक विश्व हे आत्मरूप किंवा चैतन्यमय आहे असे मानते आणि जे चैतन्यमय आहे, त्यामध्ये चैतन्यशक्तीने मन: सामर्थ्याने बदल घडवून आणणे अशक्य नाही, हे तत्त्वत: मान्य होण्यास हरकत नाही. अशा प्रकारे ज्याला Psychokinesis म्हणतात, ज्यामध्ये मन:सामर्थ्याने भौतिक वस्तूत इच्छित बदल घडवून आणता येतात, जे जे. बी. ऱ्हाईन इ. शास्त्रज्ञांनी वैज्ञानिक प्रयोगांनी सिद्ध केले आहे व जे कुलगिना, यूरी गेलर इ. व्यक्तींमध्ये व भानामतीसारख्या प्रकारात प्रकटपणे आढळून येते, ते आधुनिक भौतिकशास्त्रीय चौकटीतही बसते. तसे ते बसत असल्याची कबुली स्वत: भौतिक शास्त्रज्ञांनीच आपल्या वैज्ञानिक शब्द प्रयोगात योग्य ते बदल करून दिली आहे. उदा. प्रिन्स्टनचे भौतिक शास्त्रज्ञ जॉन ए. व्हीलर यांनी भौतिक घटनांचे निरीक्षण करणाऱ्याला पूर्वीप्रमाणे 'निरीक्षक' (Observer) असे म्हणण्याऐवजी भौतिक घटनांचे 'भागीदार' (Participator) म्हणावे असे सुचविले आहे. कारण वैज्ञानिक हा भौतिक घटनांचे तटस्थपणे निरीक्षण करतो, ही कल्पना आता कुचकामी ठरली आहे. कारण ज्याचे तो 'निरीक्षण' करतो ते निर्जीव नाही, तर 'निरीक्षण' करणाऱ्याप्रमाणेच सजीव आहे ! आणि ज्याचे शास्त्रज्ञ निरीक्षण करतो, ती भौतिक वस्तू व निरीक्षण करणारा शास्त्रज्ञ ही दोघेही एकाच चैतन्यमय विश्वाचे भागीदार आहेत ! म्हणजेच विश्व हे सहयोगी आहे. [३]

## एकात्म विश्व

भौतिक विश्व हे चैतन्यमय व सहयोगी आहे, इतकेच नव्हे तर ते एकात्मही आहे, असा अलीकडील (१९८२) भौतिकशास्त्रातील बेलच्या सिद्धांतावरून निष्कर्ष निघतो. क्वांटम भौतिकशास्त्रातील या सिद्धांताला प्रत्यक्ष प्रयोगाने बळकटी मिळाली असून तो 'ॲस्पेक्ट प्रयोग' या नावाने ओळखला जातो. या सिद्धांतानुसार भौतिक

विश्वात एकाच ठिकाणी जे घडते ते अन्यत्र घडणाऱ्या घटनांशी संबंधित असते. भौतिकशास्त्रातील प्रस्थापित कल्पनेनुसार भौतिक विश्वातील दोन घटनांचा संबंध प्रकाशाच्या वेगाने मिळणाऱ्या माहितीनेच घडून येणे शक्य आहे. पण बेलच्या सिद्धांतानुसार हा संबंध एकसमयावच्छेदेकरून -म्हणजे प्रकाशापेक्षा ही जलद मिळणाऱ्या संदेशाने -घडून येतो. ज्या विश्वात हे घडून येते त्याला 'एकात्म विश्व' म्हणतात.आणि एकात्म विश्व हेच अतींद्रिय विश्व होय. कारण अतींद्रिय घटनाच एकसमयावच्छेदेकरून घडून येतात. कारण कितीही लांबच्या अंतरावरील घटना अतींद्रिय पद्धतीने (Telepathy) कळायला कसलाही वेळ लागत नाही. अशा रीतीने वर उल्लेख केलेले गुथ्री व अप्टन सिंक्लेअर यांचे प्रयोग हे आधुनिक भौतिकशास्त्राच्या चौकटीत चपखल बसतात.

जे विश्व स्थळाच्या दृष्टीने एकात्म आहे, ते काळाच्या दृष्टीनेही एकात्म असावयास पाहिजे. म्हणजे जे 'येथे' घडते ते 'तेथे' घडण्यावर जसे अवलंबून आहे, तसे जे 'आज' घडते ते 'उद्या' घडण्यावर अवलंबून आहे. दुसऱ्या शब्दांत काळाचे आपण भूत, वर्तमान व भविष्य असे जे तुकडे पाडतो, ते कृत्रिम व म्हणून खोटे आहेत. भूतकाल होऊन गेलेला नाही. व भविष्यकाल अजून व्हायचा आहे, असेही नाही. दोन्हीही वर्तमानच आहेत. म्हणून भूत व भविष्यकाल जाणणे शक्य आहे. याविषयी फेनमन या भौतिक शास्त्रज्ञाने कालाच्या उलट दिशेने जाणाऱ्या कणांचा, ज्यांना अँटिपार्टिकल -विरोधी कण म्हणतात, त्यांचा शोध लावून या कालाविषयींच्या अतींद्रिय किंवा आध्यात्मिक कल्पनेला वैज्ञानिक पुष्टी दिली आहे.[४]

आपण काल भूतकालाकडून भविष्यकालाकडे जात आहे असे मानतो. पण फेनमनच्या शोधानुसार काल भविष्याकडून भूतकालाकडे जात आहे ! (या शोधाबद्दल १९६५ साली फेनमनला नोबेल पारितोषिक मिळाले आहे!) ज्याला 'फेनमनची आकृती' (Feynman's Diagram) म्हणतात, त्या आकृतीत जो कण भूतकालातून भविष्यकालाकडे जात आहे, तो कण आकृती फिरवली की भविष्यातून भूतकालाकडे जात असल्याचा दिसतो! काळाच्या या कल्पनेनुसार मी जसा भूतकालाचे 'अपत्य' ठरतो, तसे भविष्यकालाचे 'भूत' ही ठरतो! म्हणजे माझे अस्तित्व भूतकालाप्रमाणेच भविष्यकालावरही अवलंबून आहे. दुसऱ्या शब्दांत मी भूतकालाप्रमाणेच भविष्यकालाशीही जखडला गेलो आहे. कशाने? हे भौतिकशास्त्र सांगू शकत नाही. अध्यात्मशास्त्र मात्र 'कर्माने' हे उत्तर देते. आणि या जखडण्यालाच 'पुनर्जन्म' हे नाव देते. यातून सुटका करून घेणे म्हणजे स्थलकालातीत होणे होय.

वर म्हटले आहे की, ''फेनमनच्या शोधानुसार काल भविष्यकालाकडून भूतकालाकडे जात आहे.'' पण विज्ञानाच्या काटेकोर भाषेत असे म्हणावयास पाहिजे की, ''विज्ञानाच्या दृष्टीने फेनमनचा शोध असे सांगतो की, अणुच्या सूक्ष्म जगात

(Sub-atomic Region) 'काला' ला अर्थ नाही.'' (नाही तरी काल भविष्यकालाकडून भूतकालाकडे जाण्याचा अनुभव आम्हाला कुठे येतो?) याचा अर्थ असा की, 'काल' ही मानवनिर्मित कल्पना आहे. विज्ञाननिर्मित कल्पना नाही. विज्ञानात CPT नावाचे एक प्रमेय (Theorem) आहे. (यातील C म्हणजे 'चार्ज' P म्हणजे 'पॅरिटी' आणि T म्हणजे 'टाईम') या प्रमेयानुसार निसर्गाला 'धन -ऋण' 'डावे -उजवे' आणि 'भूत -भविष्य' हा भेद मान्य नाही. म्हणजे या भेदाला मानवनिर्मित अर्थ असला तरी निसर्गाच्या दृष्टीने अर्थ नाही, असे विज्ञानाचे हे प्रमेय सांगते. आपल्याला या ठिकाणी C आणि P शी कांही कर्तव्य नाही. फक्त T चा - कालाचा- आपण विचार करीत आहोत. 'काला' ला वरील विज्ञानाच्या प्रमेयानुसार अर्थ नाही, याचा अर्थ असा की, विज्ञानाचा तथाकथित कार्यकारणभाव (Causality) हा मुळात विज्ञानाचा नाही; मानवनिर्मितच आहे! आपण 'कारण' अगोदर आणि त्याचे 'कार्य' नंतर घडते असे म्हणतो. पण कालाला अर्थ नसेल तर हे म्हणणे बरोबर नाही असे विज्ञानाच्या दृष्टीने ठरते! 'कार्य' हे आपल्या दृष्टीने नंतर घडत असले तरी ते निसर्गाच्या दृष्टीने अगोदर घडते व 'कारण' नंतर घडते असे मानण्यात विज्ञानाच्या दृष्टीने कांहीच अडचण नाही ! मी वर ''मी जसा भूतकालाचे 'अपत्य' ठरतो, तसे भविष्यकालाचे 'भूत' ही ठरतो!'' असे का म्हटले हे आता वाचकांच्या लक्षात येईल. (याला विज्ञानाच्या भाषेत Advance Action किंवा Backward Causation म्हणतात.) याचा अर्थ भविष्य हे 'भविष्य' नाही, आणि भूत हे 'भूत' नाही. म्हणजेच कालाच्या दृष्टीने (स्थलाप्रमाणेच) विश्व 'एकात्म' आहे.

## यापुढील संशोधन

अशा रीतीने विश्व स्थलाच्या दृष्टीने एकात्म असल्याच्या भौतविज्ञानातील आधुनिक सिद्धांतामुळे विचारसंक्रमण (Telepathy)- भौतिक माध्यमाशिवाय एकाचे विचार दुसऱ्याला कळणे - शक्य असल्याचे ठरते आणि ते कालाच्या दृष्टीने एकात्म असल्याच्या सिद्धांतामुळे भविष्यकाल जाणणे (Precognition) किंवा भूतकाल जाणणे (Retrocognition) शक्य असल्याचे ठरते. तसेच दोन्ही सिध्दांतामुळे वर्तमानकाळ जाणणे किंवा अंतर्ज्ञान (Clairvoyance) शक्य असल्याचे ठरते. भौतीक विश्व चैतन्यमय किंवा आत्मस्वरुप असल्याच्या कल्पनेमुळे भौतिक वस्तूत मन:सामर्थ्याने बदल घडवून आणणे (Psychokinesis) शक्य असल्याचे ठरते. पण या सर्व गोष्टी विज्ञानाच्या दृष्टीने तत्त्वत: शक्य असल्या तरी त्या प्रत्यक्षात घडू शकतात, याला वैज्ञानिक दृष्टीनेच पुरावा मिळाला पाहिजे. आणि तसा पुरावा मिळाला असल्याचे वर सांगितलेच आहे. कारण ज्याप्रमाणे आधुनिक भौतिकशास्त्र हे अतींद्रियाकडे वाटचाल करीत आहे,

तसे अतींद्रिय संशोधन हे विज्ञानाकडे वाटचाल करीत आहे - ते अधिक अधिक वैज्ञानिक बनत आहे. अतींद्रिय क्षेत्रातील संशोधकांना येणाऱ्या या वैज्ञानिक यशामुळे ते आता इतके धीट बनले आहेत, की ते मृत्यूनंतरच्या आत्म्याच्या अस्तित्वाचे व पुनर्जन्माचेही वैज्ञानिक पद्धतीने संशोधन करू लागले आहेत आणि त्यामध्येसुद्धा त्यांना अनपेक्षित यश मिळत आहे.



## संदर्भ टिपा

१. या फोटो इलेक्ट्रिक इफेक्टच्या सहाय्यानेच उपग्रहात सौरशक्तीचे विद्युत्शक्तीमध्ये रूपांतर करण्यात येते व संदेशवहनासाठी शक्तिसंचय करण्यात येतो.

२. भौतशास्त्रज्ञ गूढवादी बनले असल्याचे एक उघड उदाहरण म्हणजे जेम्स जीन्स या प्रसिद्ध भौतशास्त्रज्ञाने आपल्या प्रसिद्ध ग्रंथाला 'Mysterious Universe' (गूढविश्व) असे दिलेले नाव होय.

३. भौत वस्तूत मन:सामर्थ्याने कसा बदल घडून येतो, हे माहीत झालेले नाही. हा पुढील संशोधनाचा विषय आहे. हे घडून येऊ शकते, याला भौतशास्त्राची आता तात्त्विक मान्यता आहे इतकेच.

४. अँटिपार्टिकल्सचा शोध डिरॅक व अँडर्सन यांनी लावला. ते काळाच्या विरूद्ध प्रवास करतात, याचा शोध फेनमनने लावला.



२



# विज्ञानातील चमत्कारांकडून चमत्कारांच्या विज्ञानाकडे

*विज्ञानावर निष्ठा ठेवणारे लोक चमत्कार नाकारतात. या उलट चमत्कारांवर विश्वास ठेवणारे लोक, विज्ञानाला चमत्कारांची उपपत्ती लावता येणे शक्य नाही असे समजतात. वस्तुत: चमत्कार नाकारणारे व चमत्कारावर विश्वास ठेवून चमत्कारांच्या वैज्ञानिक उपपत्तीची शक्यता नाकारणारे हे दोघेही चमत्कारांचा अर्थ मर्यादित करतात. पण चमत्कारांविषयीची ही मर्यादित किंवा रूढ कल्पना कितपत बरोबर आहे? आधुनिक वैज्ञानिक संशोधनाने या रूढ कल्पनेलाच धक्का दिला आहे. त्यामुळे चमत्कारांवर विश्वास ठेवणाऱ्यांप्रमाणेच चमत्कार नाकारणारे लोकसुद्धा एकप्रकारे अंधश्रद्ध ठरले आहेत !*

प्रस्तुत प्रकरणाचे शीर्षक वाचून कोणालाही असे वाटण्याची शक्यता आहे. की, विज्ञानातही चमत्कार आहेत, आणि चमत्कारांचेही विज्ञान आहे. असे जर असेल तर ज्या विज्ञानात चमत्कार आहेत, त्याला विज्ञान कसे म्हणावे व ज्या चमत्कारांचे विज्ञान आहे त्याला चमत्कार कसे म्हणावे, असा साहजिकच प्रश्न उपस्थित होईल; कारण आपण विज्ञान व चमत्कार हे एकत्र नांदू शकत नाहीत, त्या परस्पराविरूद्ध संकल्पना आहेत असे समजतो. मग या शीर्षकाचा अर्थ काय?

## हा चमत्कार मानावयाचा काय?

एखादी व्यक्ती पाण्यावरून चालत गेली तर तो एक चमत्कार ठरतो आणि एखादी व्यक्ती विस्तवावरून चालत गेली तर तोही चमत्कार ठरतो. पण या दोन चमत्कारांमध्ये फरक आहे; तो असा की, पाण्यावरून चालणाऱ्यांची उदाहरणे कोणी पाहिलेली नाहीत, याउलट विस्तवावरून चालणाऱ्यांची अनेक उदाहरणे पाहावयास मिळतात. तरीसुद्धा विस्तवावरून चालणे हा चमत्कार समजला जातो, याचे कारण हे अशक्य आहे, असे सामान्यपणे समजले जाते. पण हे शक्य आहे असे काहीजण म्हणतात. आता हे शक्य आहे असे प्रयोगाने सिद्ध झाले तर तो चमत्कार न ठरता सहनशीलतेचा पराक्रम (Feat of Endurance) ठरेल. पाण्यावरून चालणे मात्र शक्य आहे असे

कोणी म्हणणार नाही,[१] आणि तो निर्विवाद चमत्कार ठरेल कारण यात गुरूत्वाकर्षणाविषयीच्या नियमाचा भंग आहे. यावरून भौतिकशास्त्रातील प्रस्थापित नियमाचा जेथे उघड व स्पष्ट भंग होतो तेथे चमत्कार घडतो, असे म्हणता येईल.

पण समजा, विस्तवावरून चालणे शक्य असेल तर ते केव्हा शक्य आहे, किती शक्य आहे, याविषयी शास्त्रज्ञांना निश्चितपणे कांही सांगता येत नाही. अशा परिस्थितीत एखाद्याने शास्त्रज्ञांच्या कल्पनांना धक्का देण्याइतपत पराक्रम करून दाखविला, तर तो चमत्कार समजावयाचा काय? स्वत:ला हिंदू फकीर म्हणवून घेणाऱ्या अमेरिकेच्या ओहिओ प्रांतातील वूस्टर गावच्या 'कोमार' नाव धारण केलेल्या एका माणसाने १४९४ फॅरेनहाईट इतक्या तापमानाच्या इंगळावरून २५ फूटांपर्यंत चालत जाऊन (त्याची 'गिनीज बुक' च्या १९८५ च्या आवृत्तीमध्ये नोंद झालेली आहे.) स्वत:च्या पायांना काहीच इजा होऊ शकत नसल्याचे दाखवून दिले आहे.[२] हा चमत्कार मानावयाचा काय? डॉक्टर आणि शास्त्रज्ञ हे आपल्या शास्त्रांत कसे बसते, हे प्रत्यक्ष त्याची तपासणी करूनही सांगू शकलेले नाहीत. (इंग्लंडमधील मेडनहेड येथे भरलेल्या 'इंटरनॅशनल फेस्टिवल ऑफ योग अँड इसोटेरिक सायन्सेस' मध्ये १४ ऑगस्ट १९७६ मध्ये 'कोमार' ने हा विक्रम प्रस्थापित केला आहे.)

पण समजा, हा माणूस हे कसे साध्य करून दाखवू शकतो, हे शोधून काढण्याचे त्यांनी ठरविले व त्याची निरनिराळ्या तऱ्हेने तपासणी केली, त्याची सर्व माहितीही विचारून घेतली व त्यांना असे आढळून आले की, तो आपल्या मनावरच ताबा ठेवतो व त्यामुळेच हे शक्य झाले आहे. (हे इलेक्ट्रोएन्केफेलोग्राम या मेंदूच्या विद्युल्लहरी मोजण्याच्या साधनावरून समजू शकते. कोमार हा कीतीही वेदना झाल्या तरी अल्फा किंवा थीटा लहरी - ज्या वेदनाहीन अवस्थेच्या द्योतक आहेत - निर्माण करतो असे आढळून आले आहे.) आणि मनावर ताबा ठेवणे त्याला योगशास्त्रातील काही प्रक्रियांचा अभ्यास करून साध्य झाले आहे, तर या चमत्कारातील विज्ञान काय आहे हे थोडेफार स्पष्ट झाले असे म्हणता येईल . मग हा चमत्कार भौतिक आणि शरीरशास्त्राच्या प्रचलित कल्पनांच्या दृष्टीने चमत्कार वाटला, तरी योगशास्त्राच्या दृष्टीने तो चमत्कार वाटणार नाही. आणि यातून चमत्काराच्या विज्ञानाकडे वाटचाल होऊ शकेल. पण विज्ञानातील चमत्कार हा काय प्रकार आहे ?

## निसर्ग चमत्कार

वर म्हटले आहे की, ज्यामध्ये निसर्गनियमांचा उघड भंग दिसतो, तेथे चमत्कार घडला असे म्हणता येईल. पण कित्येकदा निसर्गनियमच चमत्कार ठरतात. (किंवा निसर्गनियमांचा नैसर्गिकरीत्याच 'भंग' होतो.) उदाहरणार्थ, कधी कधी उत्तर ध्रुवावर वातावरणात आकाशातून प्रचंड पडदे लोंबत असल्याचे दृश्य दिसते. समुद्रात राहणारे

साल्मन मासे नदीच्या प्रवाहाविरूद्ध पोहत जाऊन ठराविक वेळी ठराविक ठिकाणी अंडी घालतात; (रस्त्यात धबधबा असला तरी तो चढून जातात.) हजारो मैलांचा प्रवास करून काही पक्षी वर्षाच्या ठराविक वेळी, ठराविक ठिकाणी येतात; राजापुरची गंगा ठराविक वेळी प्रगट होते; क्वचित कोंबडा अंडी घालतो; क्वचित माणसाला जन्मतःच प्राथमिक अवस्थेतील शेपूट असते; किंवा शरीरावर अनेक ठिकाणी अनेक स्तन आढळून येतात; क्वचित मुलाच्या शरीरात (अनपेक्षीत जागी) गर्भ आढळून येतो, क्वचित मेलेला माणूस जिवंत होतो; क्वचित असाध्य रोगाने जर्जर झालेला मनुष्य अनपेक्षितपणे एकदम खडखडीत बरा होतो (Spontaneous Remission) इत्यादी. आता या सर्व गोष्टी कशा घडतात, हे शास्त्रज्ञांना सांगता येत नाही. पण समजा, त्या सांगता आल्या तरी त्या चमत्कार नव्हेत असे कोणी म्हणणार नाही. त्यांना निसर्ग चमत्कार म्हटले म्हणून त्यातील चमत्कृती कमी महत्वाची ठरत नाही.

याच्याही पुढे जाऊन वैज्ञानिकांनी शोधून काढलेले वैज्ञानिक नियम हेच चमत्कारयुक्त आहेत असे का म्हणू नये ? वर सांगितलेले पाण्यावरून चालण्याचेच उदाहरण घ्या. पाण्यावरूनच काय, हवेतून चालण्याचे उदाहरण घेऊ ! हवेतून चालणे अशक्य आहे काय? असा प्रश्न विचारला तर या अंतराळ युगात कोणीही 'हे अशक्य नाही' असेच उत्तर देईल.

कारण हल्ली हवा नसलेल्या पोकळीतही अंतराळवीरांनी चालून दाखविले आहे. आता समजा, अशा गुरुत्वाकर्षणविरहित जगात (अंतराळातील वसाहतीत) एखाद्या मुलाचा जन्म झाला, त्या अवस्थेतच तो वाढला, तर त्याला त्याची इतकी सवय होईल की, पृथ्वीवर परत आल्यावर त्याला माणसे जमिनीवर चालत असलेली पाहून आश्चर्याचा धक्का बसेल. हा चमत्कार ते कसा करून दाखवू शकतात, याचे संशोधन केले पाहिजे असे तो म्हणेल.[३] तात्पर्य, चमत्कार हा रूढ कल्पनांवर आधारलेला आहे असे म्हणता येईल. जी कल्पना रूढ झाली आहे, ती एरव्ही चमत्कारयुक्त असली तरी केवळ सवयीमुळे तिच्यातील चमत्कार नाहीसा झालेला असतो. उदा. ज्या गुरुत्वाकर्षण शक्तीचा (पाण्यावरून वा हवेतून चालण्यामुळे) भंग झाला तर चमत्कार घडला असे म्हणता येईल, असे जे वर म्हटले ती गुरुत्वाकर्षणशक्ती हाच मुळी एक मोठा चमत्कार आहे, हे तिची आम्हाला सवय झाली असल्यामुळे आमच्या लक्षात येत नाही. पण न्यूटनने तिच्याविषयीचा शास्त्रीय सिद्धांत मांडण्यापूर्वी शास्त्रज्ञांनीसुद्धा त्या शक्तीला चमत्काराच्या सदरात ढकलले होते, हा इतिहास आहे. न्यूटनच्या पूर्वी केप्लरने पृथ्वीवरील समुद्रातील भरती ओहोटी ही सूर्याच्या व चंद्राच्या आकर्षणशक्तीमुळे घडून येतात, असे जेव्हा प्रतिपादन केले तेव्हा गॅलिलिओने त्याला 'गूढ कल्पनाविलास' (Occult Fancy) म्हटले होते, हे लक्षात ठेवले पाहिजे आणि त्याबद्दल गॅलिलिओला दोष देता येत नाही.

कारण सूर्य व चंद्र हे पृथ्वीवर कसा प्रभाव पाडू शकतात (Action at a distance) याचे स्पष्टीकरण स्वत: न्यूटननेही दिलेले नाही. गुरुत्वाकर्षण शक्ती ही कशी व का कार्य करते हे आपणास माहीत नाही, असे स्पष्ट विधान न्यूटनने केले आहे.[४] एखाद्या शक्तीला नाव दिले म्हणजे ती शक्ती समजली किंवा तिची उपपत्ती लागली असे म्हणता येणार नाही; आणि विज्ञानाचे एक महत्वाचे लक्षण वा अंग उपपत्ती देणे (Explantion) हेही आहे, हे लक्षात घेतले तर गुरुत्वाकर्षण शक्तीची उपपत्ती लागली आहे, असे तिच्याविषयीच्या केवळ गणिती नियमांच्या शोधावरून म्हणता येणार नाही. गॅलिलिओने उल्लेखिलेले तिच्याविषयीचे गूढ (आणि म्हणून त्यातील चमत्कार) अजून कायम आहे. (न्यूटनला गुरुत्वाकर्षण शक्तीची उपपत्ती लावता न आल्यामुळे न्यूटनच्या हयातीतच काही साहित्यिकांनी न्यूटनचे विडंबनात्मक पात्र घालून नाटके रचली होती!)

## चमत्कार कशाला म्हणावे ?

कोणी म्हणेल की चमत्कार या शब्दाच्या अर्थाची ही फारच ओढाताण झाली. पण तसे मुळीच नाही. हे लक्षात येण्यासाठी एक उदाहरण घेऊ. रशिया या भौतिकवादी देशामध्ये - ज्या देशामध्ये भौतिक विश्वात दैवी, अध्यात्मिक वा अलौकिक अशा कुठल्याही शक्ती अस्तित्वात नाहीत, असे तत्त्वज्ञान प्रसृत करण्यात आले आहे - निना कुलगिना नावाच्या बाईचे काही प्रयोग तेथील शास्त्रज्ञांनी प्रसिद्ध केले आहेत. त्यांची फिल्मही घेण्यात आली आहे. ही एक सामान्य स्त्री असून ती दूर अंतरावरून कुठल्याही भौतिक साधनाशिवाय व स्पर्श न करता टेबलावर ठेवलेल्या (काडीपेटीतील) काड्या वेगवेगळ्या दिशेने पसरवू शकते; होकायंत्राची सुई फिरवू शकते; घड्याळाचा लंबक चालू असेल तर बंद करू शकते व बंद असेल तर चालू करू शकते; तराजूच्या दोन्ही पारड्यांचे वजन कमीजास्त करू शकते; एखादी हलकी वस्तू अंतराळी उचलू शकते. टेबलावर उभी केलेली सिगारेट उभ्यानेच (खाली पडू न देता) चालवू शकते; बेडकाच्या हृदयाचे ठोके कमीजास्त करू शकते किंवा अजिबात बंद करू शकते. आणि हे सर्व फसवेगिरी अशक्य असलेल्या (Fraudproof) परिस्थितीत, हस्तस्पर्श न करता, कसल्याही भौतक साधनाशिवाय, म्हणजे केवळ मन:सामर्थ्याने अनेक शास्त्रज्ञांच्यासमोर अनेकदा करून दाखविले आहे. (अमेरिकेत यूरी गेलरने याच्या पेक्षाही अधिक विलक्षण प्रयोग करून दाखविले आहेत. पण रशिया भौतिकवादी असल्यामुळे रशियाचे उदाहरण येथे घेतले आहे.) आता प्रश्न असा आहे की, एखाद्या जिवंत व्यक्तीला दूर अंतरावरून एखाद्या भौतिक वस्तूवर परिणाम घडवून आणता येत असेल व तो चमत्कार समजण्यात येत असेल, तर सूर्य व चंद्र या निर्जीव वस्तूंना पृथ्वीवरील पाण्यासारख्या भौतिक वस्तूवर परिणाम घडवून आणता येणे, हाही एक चमत्कार का मानू नये? तसे न मानण्याचे कारण

एकच. ते म्हणजे एक घटना नेहमी घडते, तर दुसरी क्वचित घडते. कुलगिना व गेलरप्रमाणे सर्वांना ही शक्ती प्राप्त झाली. तर तो चमत्कार राहणार नाही.

पण कधीतरी घडणारी (अपवादात्मक) घटना म्हणजे चमत्कार - मग ती नैसर्गिक असो वा मनुष्यकृत असो - असे समजले तर चमत्कार शब्दांतील चमत्काराचा अर्थच निघून जाईल. कारण मग कधीतरी उगवणारा धूमकेतू, कधीतरी येणारा पाहुणा हे ही चमत्कार मानावे लागतील. नेहमी घडणारी चमत्कारयुक्त घटना अंगवळणी पडल्यामुळे तिच्यातील चमत्कार आपणास दिसत नाही. म्हणून कधीतरी घडणारी बिन चमत्काराची घटना नजरेत भरते म्हणून ती चमत्कार ठरत नाही. म्हणून चमत्काराचा खरा अर्थ समजून घेतला पाहिजे. पण येथे आपणाला लोक कशाला चमत्कार म्हणतात, यापेक्षा विज्ञानाच्या दृष्टीने कशाला चमत्कार म्हणावे हे पाहावयाचे आहे. विज्ञानाच्या दृष्टीने अशी घटनाच घडणे शक्य नाही. जर घडत असेल तर तो चमत्कार नसून, वैज्ञानिक नियमांचा तो अपवादही नसून, त्या नियमातील वा सिद्धांतातील उणिवा आहेत असे ठरते. तथापि, शीर्षकामध्ये 'विज्ञानातील चमत्कार' असा शब्दप्रयोग केला आहे. हे विज्ञानातील चमत्कार कसले बरे? हे विज्ञानातील चमत्कार समजावून घेण्यापूर्वी चमत्कार अशक्य आहेत, असे म्हणणाऱ्यांचे विज्ञान प्रथम समजावून घेतले पाहिजे.

## चमत्कार अशक्य म्हणणाऱ्यांचे विज्ञान

चमत्कार अशक्य आहेत असे म्हणणारे चमत्काराचा अर्थ 'भौतिकशास्त्राने प्रस्थापित केलेल्या नियमांचा भंग' असा करतात. पण असे मानण्याचे काहीच कारण नाही, हे वर हवेतून चाालणाऱ्यांच्या व विस्तवावरून चालणाऱ्यांच्या प्रयोगावरून स्पष्ट झालेच असेल. हवेतून चालणाऱ्या माणसाला जमिनीवरून चालणे हाच 'भौतिक नियमांचा भंग' वाटेल, तर विस्तवावरून चालणाऱ्या माणसाला आपण कोणत्याही नियमांचा भंग करीत आहोत, असे कधीच वाटणार नाही. आपण एखादा विशिष्ट दृष्टिकोण स्वीकारून त्यालाच चिकटून बसल्यामुळे हे सर्व वाद निर्माण होतात आणि त्यामुळेच 'चमत्कार' ही निर्माण होतात. वास्तविक निसर्गात चमत्कार नावाची गोष्टच नसते. सर्व घटना नैसर्गिकच असतात. (नाहीतर त्या घडल्याच नसत्या.) ज्या घटना आपणाला समजत नाहीत त्यांना आपण 'चमत्कार' हे नाव देतो इतकेच. म्हणजे नैसर्गिक घटना समजून घेण्याच्या आपल्या असमर्थतेतून 'चमत्कार' निर्माण होतात. जितकी आपली असमर्थता अधिक तितके 'चमत्कार' ही अधिक . सेंट किल्डा बेटातील लोकांना त्या बेटाला एखादे जहाज येऊन पोहोचल्यानंतर पडसे होत असे; हे ऐकून डॉ. जॉन्सनने म्हटले होते की, असा चमत्कार घडणे अशक्य आहे. पण खरोखरच असे घडत होते. कारण तो चमत्कार नव्हता. 'जंतुनिर्मित रोगाचा सिद्धांत' प्रस्थापित झाल्यानंतर- व्हायरस

जंतुमुळे पडसे होते, हे माहीत झाल्यानंतर - ही गोष्ट स्पष्ट झाली. वटवाघळे अंधारातसुध्दा सर्व अडथळे चुकवून मार्गक्रमण करतात, हा चमत्कार नसल्याचे, वाघळे स्वनातीत (अल्ट्रासाउंड) लहरींच्या साहाय्याने वस्तू शोधतात (पाहतात) हे सिद्ध झाल्यानंतर कळले. कांही कुत्री चोर शोधून काढतात, हा आता कोणालाच चमत्कार वाटत नाही. घुशींना क्ष - किरणांचा 'वास' येऊ शकतो. आपणाला ऐकायला न येणारे ध्वनी कुत्र्यांना ऐकायला येतात. डॉल्फिन मासे स्वनातीत लहरींच्या साहाय्याने इतर डॉल्फिनशी संपर्क साधतात, इत्यादी शोधांमुळे प्राणी जगातील बऱ्याच चमत्कारांचा उलगडा झाला असून कुत्री (किंवा मांजरे) पूर्वी कधीही न पाहिलेले मालकाचे नवीन घर शोधून काढल्याची जी उदाहरणे घडली आहेत, तीही अशाच शोधांमुळे भविष्यात समजू शकतील.

पण अशा रीतीने प्रस्थापित नियमांचा भंग म्हणजे 'चमत्कार' अशा चुकीच्या समजुतीने चमत्कार अशक्य आहेत, असे म्हणणाऱ्यांचा संकुचित दृष्टिकोण खुद्द विज्ञानाविषयीच्याच संकुचित दृष्टिकोणातून निर्माण झाला आहे, हे येथे आवर्जून सांगितले पाहिजे. असे लोक असे समजतात की, विज्ञानाने भौतिक विश्वासंबंधी शोधून काढलेले नियम अबाधित व स्वयंपूर्ण असून या विश्वासंबंधी विज्ञानाला सर्व ज्ञान झाले आहे. नवीन शोधून काढण्यासारखे काही शिल्लक राहिलेले नाही. असा दृष्टिकोण स्वीकारणाऱ्यांच्या विज्ञानाला 'यंत्रवादी विज्ञान' म्हणतात. विश्व हे एक प्रचंड यंत्र आहे, असे ते समजतात. अशा यांत्रिक विश्वात सर्व घटना यांत्रिकपणे, अबाधितपणे व निरपवादपणे घडत असल्याने 'चमत्कार' अशक्य ठरतात. मानव हाही एक यंत्रच समजला जातो. (हे यंत्र अर्थात अधिक गुंतागुंतीचे आहे इतकेच !) एकोणिसाव्या शतकातील या दृष्टिकोणाचा प्रवक्ता म्हणून लाप्लासचा उल्लेख करता येईल. त्याने 'यांत्रिक विश्व' (Mecanique Celeste) हा पाच खंडांचा ग्रंथ लिहिला असून त्याची पहिली आवृत्ती निघाल्यानंतर तो ग्रंथ नेपोलियन बादशहाला भेट देण्यासाठी त्याच्याकडे तो गेला असता नेपोलियन बादशहाने त्याला विचारले, ''महाशय लाप्लास ! आपण आपल्या ग्रंथात ईश्वराचा एकदाही उल्लेख केलेला नाही असे ऐकतो. एवढ्या प्रचंड ग्रंथात हा उल्लेख आपण कसा व का टाळला ?'' यावर लाप्लास म्हणाला, ''मला ईश्वराच्या गृहीत कृत्याची गरज नाही.'' ('Je nai pas besoin de cette hypothese')

ईश्वराच्या गृहीतकृत्याची गरज मानवाला विश्वातील न समजणाऱ्या गोष्टींची कारणमीमांसा देण्यासाठी असल्याने लाप्लासला सुचवायचे होते की, विश्वात मानवाला न समजण्यासारखे (चमत्कार वगैरे) कांही नाही.

या यंत्रवादी विज्ञानात केवळ शंभर वर्षात इतके परिवर्तन घडून आले की सर जेम्म जीन्स या प्रसिद्ध भौतिक शास्त्रज्ञाला असे म्हणावे लागले की, ''आज जवळजवळ सर्वच भौतिक शास्त्रज्ञांमध्ये विश्व हे यंत्र नाही याबद्दल एकमत झाले आहे असे म्हणावयास

हरकत नाही. विश्व हे दिवसेंदिवस एखाद्या प्रचंड यंत्रापेक्षा एका प्रचंड विचारशक्तीसारखे भासू लागले आहे.'' आपल्या ग्रंथाला त्याने गूढ विश्व (Mysterious Universe) असेच मुळी नाव दिले आहे. विज्ञानामध्ये व वैज्ञानिक दृष्टिकोणामध्ये अशा प्रकारे परिवर्तन घडून येण्यास काय कारण घडले बरे? विसाव्या शतकाच्या सुरुवातीला विज्ञान क्षेत्रात लागलेले एकाहून एक विलक्षण व आश्चर्यकारक शोधच याला कारणीभूत ठरले असून त्यामुळे भौतिक शास्त्रज्ञ हल्ली विश्वाचे मूळ स्वरूप जाणून घेणे विज्ञानाला शक्य नसल्याच्या निष्कर्षाप्रत आले आहेत. हे शोध म्हणजेच विज्ञानातील चमत्कार होत.

## विज्ञानातील चमत्कार

हे आधुनिक विज्ञानातील शोध या अर्थाने चमत्कार आहेत की ते मानवाच्या रूढ कल्पनांना धक्का देणारे ठरले आहेत. किंबहुना ते मानवाची तर्कशक्ती अवरुद्ध किंवा कुंठित करणारे ठरले आहेत असे म्हणता येईल. या वैज्ञानिक चमत्कारांपुढे परीकथेतील चमत्कारही फिके पडतील ! ही काही मासलेवाईक उदाहरणे पाहा-

परीकथा असली तरी ती कार्यकारणभावावर आधारलेली असते. पण आधुनिक विज्ञानातून कार्यकारणभावाचेच (Causality) उच्चाटन झाले आहे ! १९२७ साली लागलेल्या या शोधानुसार- याला 'हायजेनबर्गचे अनिश्चिततेचे तत्त्व' (Heisenberg's Uncertainty Principle) असे म्हणतात- एखाद्या इलेक्ट्रॉनचे स्थान आणि वेग एकाच वेळी माहीत होत नाही. स्थान माहीत झाले तर वेग माहीत होत नाही व वेग माहीत झाला तर त्याचे स्थान माहीत होत नाही. भाकीत करणे (Prediction) हे विज्ञानाचे व्यवच्छेदक लक्षण मानले, तर भाकीत करावयास लागणाऱ्या या दोन्ही घटकांच्या ज्ञानाच्या अभावी अनिश्चित परिस्थिती निर्माण होते. ही परिस्थिती प्रयोगाच्या रचनेतील अपूर्णतेमुळे अगर दोषामुळे निर्माण होत नसून वस्तूच्या मूलभूत स्वरूपामुळे ती निर्माण होते, हे येथे लक्षात ठेवले पाहिजे. अशा रीतीने भौतिकशास्त्राचा कार्यकारणभाव हा मूलाधारच या शोधने उखडून टाकला आहे. (भाकीत हे कार्यकारणभावावर आधारलेले असते.)

आता भौतिकशास्त्रातील आणखी एका कल्पनेला हादरा देणारा हा शोध पाहा. (याला बोहरची Complementarity कल्पना म्हणतात.) इलेक्ट्रॉन हा कण आहे, हे सर्वांना माहीत आहे; तसेच क्ष-किरण हे तरंग (Waves) आहेत, हेही सर्वांना माहीत आहे. आणि कण व तरंग या सर्वस्वी वेगळ्या -नव्हे परस्परविरोधी गोष्टी आहेत, हेही सर्वांना माहीत आहे. पण इलेक्ट्रॉन हे कणाप्रमाणे तरंगही आहेत व क्ष-किरण हे तरंगाप्रमाणेच कणही (Particle) आहेत, असे जेव्हा सांगण्यात येते, तेव्हा हे लोक शुद्धीवर राहून बोलत आहेत काय, असा तुम्हाला प्रश्न पडला तर त्याबद्दल तुम्हाला दोष देता येणार नाही. पण या गोष्टी प्रत्यक्ष प्रयोगाने सिद्ध झाल्या असल्याने असे बोलण्याबद्दल

शात्रज्ञांना दोष देता येत नाही. (पहिल्याला डेव्हिसन-जर्मर प्रयोग म्हणतात व दुसऱ्याला कॉम्प्टन इफेक्ट म्हणतात.)

आता Complementarity चा आणखी एक नमुना पहा. इलेक्ट्रॉन हे अणुकेंद्रकाभोवती विशिष्ट कक्षेत फिरतात हे प्रसिद्ध आहे. कधीकधी हे इलेक्ट्रॉन कक्षा बदलतात. म्हणजे एका कक्षेतून (ऊर्जापातळीतून) दुसऱ्या कक्षेत (ऊर्जापातळीत) उड्या मारतात. पण वास्तविक या उड्या नसतात. म्हणजे असे की, एका कक्षेतून दुसऱ्या कक्षेत जाताना हे इलेक्ट्रॉन मार्गक्रमण न करता जातात ! तुम्हाला पुण्याहून मुंबईला जाताना मार्गक्रमण न करता जायला सांगितले तर तुम्ही म्हणाल, ''हा काय मूर्खपणा आहे? हे अशक्य आहे !'' पण इलेक्ट्रॉनना हे शक्य आहे ! आणि हा मूर्खपणा नाही.

हे तर कांहीच नाही. इलेक्ट्रॉनची यापेक्षाही मोठी करामत पहायची असेल, तर एखाद्या धातूच्या पातळ पापुद्र्याला दोन सूक्ष्म छिद्रे पाडून त्यावर इलेक्ट्रॉनचा मारा केला, तर त्याचे तरंगात रूपांतर होते, असे छायाचित्राच्या साहाय्याने आढळून येते. आता इलेक्ट्रॉन हा कण असल्याने तो दोन्ही छिद्रांतून एकाच वेळी जाणे अशक्य आहे, हे उघड आहे. पण इलेक्ट्रॉनचा शोध लावणाऱ्या जे. जे. थॉमसन यांचा मुलगा जॉर्ज थॉमसन या शास्त्रज्ञाने हा प्रयोग प्रत्यक्ष करून ब्रिटिश असोसिएशनच्या आपल्या अध्यक्षीय भाषणात १९६० साली असे म्हटले आहे की, ''सामान्य कल्पनेप्रमाणे, एखादा कण एखाद्या दोन छिद्रे असलेल्या पडद्यावर सोडला तर तो एकाच छिद्रातून जाणे शक्य आहे. पण इलेक्ट्रॉनच्या बाबतीत हे खरे नाही.'' म्हणजे इलेक्ट्रॉन एकाच वेळी दोन्ही छिद्रातून जाऊ शकतो ! सिरील बर्ट या मानसशास्त्रज्ञाने या प्रयोगाला उद्देशून म्हटले आहे की, ''इलेक्ट्रॉनची ही करामत माझ्या माहितीप्रमाणे लोककथांतील भुतांनाही करून दाखवता आलेली नाही !''

आता न्यूट्रिनो या कणांची करामत पाहा. या कणांना वस्तुमान किंवा भार नाही, विद्युतभारही नाही, चुंबकीय क्षेत्र नाही. म्हणजे ज्या गुणांच्या साहाय्याने एखाद्या कणाचे भौतिक अस्तित्व सिद्ध होते, ते गुणच या कणांना नाहीत. मग ते अस्तित्वात आहेत हे कशावरून ? ते इतर कणांवर परिणाम करत असल्याचे आढळून येतात; म्हणूनच ते अस्तित्वात आहेत असे म्हणायचे ! यांना भौतिक शास्त्रातील निर्गुण ब्रह्म म्हणायला हरकत नाही !

आतापर्यंत वर्णिलेले कण स्थलाच्या बाबतीत करामत करणारे आहेत. कालाच्या बाबतीत करामत करणाऱ्या कणांना विरोधी कण (Anti-Particles) असे संबोधण्यात येते. हे कण या अर्थाने विरोधी की, इतर कण वर्तमानकालातून भविष्याकडे वाटचाल करीत आहेत, तर हे भूत कालाकडे वाटचाल करीत आहेत! म्हणजे या कणांचा माणूस बनला तर तो म्हातारा होण्याऐवजी तरुण व बाल होत जाईल. (अर्थात तत्त्वत:)

## तर्क विसंगती आणि स्थूल व सूक्ष्म जगातील फरक

यांना मी विज्ञानातील चमत्कार म्हणतो. याचे कारण केवळ माणसाच्या सामान्य कल्पनांना हे शोध धक्का देणारे आहेत म्हणूनच नव्हे, तर तर्कालाही ते न पटणारे आहेत म्हणून होय. (एकच कण एकाच वेळी दोन छिद्रांतून जाणे, मधला मार्ग आक्रमण न करता एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी जाणे, या गोष्टी तर्कविसंगत आहेत.) भौतिक शास्त्रात असले शोध लावल्याबद्दल मध्ययुगात या शास्त्रज्ञांना लोकांनी ब्रूनोप्रमाणे वधस्तंभावर जिवंत जाळले असते! पण कालमहिमा असा की अशा विक्षिप्त शोधांबद्दल या शास्त्रज्ञांना हल्ली नोबेल पारितोषिके मिळाली आहेत ! ( कालचक्राच्या उलटे प्रवास करणाऱ्या कणांच्या शोधाबद्दलही !)

अशा रीतीने जी घटना तर्काला पटत नाही, जी तर्कविसंगत आहे, तरीही घडते, तो चमत्कार होय अशी चमत्काराची वैज्ञानिक व्याख्या मान्य केली, तर ज्या घटनेत तर्कविसंगती नाही, ती घटना चमत्कार मानण्याचे कारण नाही हे ओघानेच येते. या दृष्टीने पाहता वर उल्लेख केलेल्या कुलगिना या रशियन स्त्रीचे प्रयोग चमत्कार ठरत नाहीत. कारण हस्तस्पर्श न करता व भौतिक साधन न वापरता एखादी भौतिक वस्तू हलवून दाखविण्यात कसलीही तर्कविसंगती नाही. (या बाबतीत भौतिक शास्त्रातील गुरूत्वाकर्षण शक्तीचे उदाहरण दिलेच आहे. दुसरे चुंबकत्वाचे उदाहरण देता येईल. याखेरीज मानवी मज्जासंस्थेमध्ये बाह्य भौतिक वस्तूंवर परिणाम घडवून आणण्याचे सामर्थ्य असल्याबद्दलचे प्रसिद्ध ब्रिटिश मज्जासंस्थाविशारद (Neurologist) ग्रे वाल्टर याने केलेल्या प्रयोगांवरून सिद्ध झाले आहे. सुमारे २० मायक्रोव्होल्ट इतक्या मेंदूच्या विद्युल्लहरींच्या साहाय्याने टेलिव्हिजनवर हाताने बटन न दाबता चित्र पाडण्याचे मेंदूचे सामर्थ्य वाल्टरने सप्रयोग दाखवून दिले आहे. या प्रयोगाचा त्याच्या शब्दातील निष्कर्ष असा : ("Effect of will can influence external events whithout movement or overt action through the impalpable electrical surges of one's own brain.")

तरी तो चमत्कार आहे असे आपणास वाटते; याचे कारण वर म्हटल्याप्रमाणे ती घटना नेहमी घडणारी नाही म्हणून होय. पण तार्किकदृष्ट्या ती अशक्य नाही, जसे एकच कण दोन छिद्रांतून एकाच वेळी जाणे तर्कशास्त्रदृष्ट्या अशक्य आहे. आधुनिक भौतिकशास्त्रात मात्र हे शक्य आहे. नव्हे, असे प्रत्यक्ष घडते असे म्हणतात. जे तर्कशास्त्रात बसत नाही, ते जर अशा प्रकारे घडत असेल व विज्ञानात बसत असेल, तर जे तर्काला विरोधी नाही ते घडत असेल तर ते विज्ञानात का बसू नये? पण तुम्ही 'कुलगिनाची घटना तुमच्या विज्ञानात बसते का हो ?' असे कोणत्याही भौतिक शास्त्रज्ञाला विचारा, तो

निश्चित 'नाही' असे उत्तर देईल. हे असे का बरे ? याला तो असे उत्तर देईल की, सूक्ष्म जगतातील (Sub-atomic) नियम स्थूल जगताला लागू नाहीत. पण सूक्ष्म जगताचा अभ्यास हे शास्त्रज्ञ कशासाठी करत आहेत? स्थूल जग समजण्यासाठीच ना? मग स्थूल जगात जे घडते, (कुलगिनाची घटना) ही तुमच्या सूक्ष्म जगताच्या अभ्यासाने जर कळत नसेल तर तुमच्या सूक्ष्म जगताच्या अभ्यासात कोठे तरी उणीव आहे, असे का समजू नये?[५] स्थूल जग समजण्यासाठी सूक्ष्म जगताचा अभ्यास नसून सूक्ष्म जग समजण्यासाठी स्थूल जगाचा हा अभ्यास आहे, अशी शाब्दिक मखलाशी येथे कोणी करील, तरी त्याने प्रश्न डावलता येत नाही. कुलगिनाची घटना सूक्ष्म जगतातील आहे की स्थूल जगतातील? सूक्ष्म जगतातील असेल तर तिची सूक्ष्म जगतातील नियमांनी व स्थूल जगतातील असेल तर स्थूल जगतातील नियमांनी तिची उपपत्ती लावण्याची जबाबदारी शास्त्रज्ञ टाळू शकत नाहीत. स्थूल जगतातील नियमांनी तिची उपपत्ती लावता येत नसेल तर 'स्थूल जगताच्या अभ्यासाने सूक्ष्म जग समजून' कांही उपयोग नाही. उपपत्ती लावण्यासाठी स्थूल व सूक्ष्म असा फरक करावयाचा असेल तर असा फरक करून उपपत्ती तरी लावता आली पाहिजे, अन्यथा असा फरक करण्याची काहीच गरज नाही. (मग ही सूक्ष्म जगताच्या अभ्यासातील उणीव न ठरता सर्व विज्ञानाचीच उणीव ठरते !) आणि प्रत्यक्षात कांही शास्त्रज्ञ (त्यात मानसशास्त्रज्ञाप्रमाणेच भौतिक शास्त्रज्ञही आहेत) ही उणीव आहे हे मान्य करतात, आणि ही उणीव भरून काढण्याचा ते प्रयत्नही करत आहेत. दुसऱ्या शब्दांत, ज्याला सामान्य लोक चमत्कार म्हणतात, पण जे वास्तवात चमत्कार नाहीत, ते वैज्ञानिकदृष्ट्या समजावून घेण्याच्या प्रयत्नाला ते लागले आहेत. त्यांच्या या प्रयत्नातून एक नवेच शास्त्र उदयाला आले आहे. त्याचा पुढील प्रकरणात विचार करू.

## टीप

भौतिक (वा मानस) शास्त्रात उणीव आहे, हे काही शास्त्रज्ञांना मान्य नाही. हे शास्त्रज्ञ कुलगिनाचे प्रयोग फसवेगिरीचा प्रकार समजतात. (या प्रयोगात फसवेगिरी कशी शक्य आहे, हे स्पष्ट करण्याचे मात्र ते कटाक्षाने टाळतात. उभी सिगारेट उभ्यानेच चालवून दाखविणे, बेडकाच्या हृदयाचे ठोके कमीजास्त करणे, या बाबतीत भौतिकशास्त्रवादी रशियन शास्त्रज्ञांना कोणत्या भौतिक साधनांनी फसविणे शक्य आहे, हे स्पष्ट करण्याची जबाबदारी हे शास्त्रज्ञ टाळू शकत नाहीत.) पण ग्रे वाल्टरच्या प्रयोगाकडे मात्र ते कानाडोळा करतात. शास्त्रज्ञांमध्येसुद्धा अंधश्रद्धा कशी असू शकते -नव्हे कशी दृढमूल असू शकते- हे यावरून दिसून येते.

## संदर्भ टिपा

१. हे शक्य आहे असे म्हणून त्याचा मुंबईत जाहीर प्रयोग करण्याची जाहिरात देणाऱ्या कोणा राव नावाच्या कर्नाटकातील मनुष्याचा तो प्रयत्न सपशेल फसल्याची (की तो पैसे उकळण्याचा डाव होता?) बऱ्याच वर्षांपूर्वीची घटना काही वाचकांना स्मरत असेलच. (हा प्रयोग 'ब्लिटझ्' साप्ताहिकातर्फे आयोजित करण्यात आला होता.)

२. इतक्या उष्णतेच्या इंगळावरून चालताना त्यांच्या रेयॉन पँटचे पाय वितळत असत. प्रेक्षकांना या इंगळाच्या खड्ड्याजवळ १५ फुटापर्यंतसुद्धा येणे शक्य होत नसे !

३. हे उदाहरण केवळ काल्पनिक असले तरी त्यातील गृहीतकृत्य काल्पनिक नाही. बऱ्याच वर्षांपूर्वी निश्चित सांगायचे तर ७६ साली लांडग्यांनी पाळलेल्या 'भालू' नावाच्या मुलाला 'माणूस' बनविण्याचा लखनौच्या डॉक्टरांनी केलेला प्रयत्न अयशस्वी झाला होता. त्याला दोन पायांवर चालायला शिकविण्यात सुद्धा त्यांना अपयश आले होते. हे लक्षात ठेवले तर माणूस सवयीचा गुलामच नव्हे, तर सवयीमुळे कसा संपूर्ण बदलू शकतो, हे दिसून येते. (याला माणसात आणण्याचे सर्व प्रयत्न निष्फळ ठल्यानंतर लखनौमध्ये १९ व्या वर्षी मरण पावला, अशी 'इंडीयन एक्सप्रेस' ने आपल्या २६ फेब्रुवारी १९८५ च्या अंकात बातमी दिली आहे.)

४. असे विधान न्यूटनने एका मित्राला लिहिलेल्या पत्रात केले असून Action-at-a-Distance (दूर अंतरावरील क्रिया) या अर्थाने 'गुरुत्वाकर्षणशक्ती' ही एक 'मूर्ख कल्पना' (Absurdity) आहे, असे त्याने स्पष्ट म्हटले आहे !

५. ही उणीव लपविण्यासाठी संभवनीय सिद्धांत (Theory of Probability) वर आधारलेल्या संख्याशास्त्राचा अवलंब करण्यात येतो; सूक्ष्म जगाला स्थूल जग जोडण्यात येते, पण ही व्यावहारिक तडजोड आहे. त्यामुळे अज्ञान लपते. पण ज्ञान होत नाही. ही तडजोड झुगारून देणाऱ्या बेलच्या प्रयोगाला अलीकडे (१९८२ साली) आधार मिळाला असून त्यामुळे स्थूल जग व सूक्ष्म जग हा भेद खोटा असल्याचे सिद्ध झाले आहे. (पाहा- **Bell's Theorem and World Process** - H. Stapp).



३

# बुद्धिप्रामाण्यवाद आणि परामानसशास्त्र

बुद्धिप्रामाण्यवाद हा शब्द Rationalism या इंग्रजी शब्दाचा अनुवाद असून (मात्र बुध्दिवाद हा सुटसुटीत शब्दच येथे वापरण्यात येईल.) विश्वाकडे पाहण्याचा तर्काधिष्ठित दृष्टिकोण म्हणून त्याला एक विशेष अर्थ प्राप्त झालेला आहे. दोन अधिक दोन बरोबर चार हे सत्य गणिती असले, तरी भौतिक विश्व ते निरपवादपणे (वा अबाधितपणे) पाळते, अशी बुद्धिवाद्यांची श्रद्धा आहे.[१] दुसऱ्या शब्दांत विश्वाचे कार्य मानवी तर्कानुसार वा मानवी बुद्धीने शोधलेल्या नियमानुसार चालते, किंवा विश्वाचे कोडे तर्काने सोडविता येते- थोडक्यात विश्व बुद्धिगम्य आहे- अशी बुध्दिवाद्यांची श्रद्धा आहे . मानवाची पंच ज्ञानेंद्रिये हे बुद्धिवाद्यांचे दुसरे श्रद्धास्थान आहे. विश्वाचे ज्ञान केवळ पाच ज्ञानेंद्रियांमार्फतच (किंवा त्यांची शक्ती वाढविणाऱ्या वैज्ञानिक उपकरणांमार्फतच) होऊ शकते, असे बुध्दिवाद मानतो. विश्वाचे ज्ञान तर्काने होऊ शकते- विश्व बुध्दिगम्य आहे- या बुद्धिवाद्यांच्या श्रद्धेला आधुनिक भौतविज्ञानातील शोधांनीच तडा गेला असून ही श्रद्धा भौतिक विज्ञानाच्या दृष्टीने तरी निराधार असल्याचे दिसून आले आहे, हे मागील दोन प्रकरणांत आपण पाहिले आहेच (आणि सहाव्या प्रकरणातही पुन्हा सविस्तरपणे पाहणार आहोत). प्रस्तुत प्रकरणात मानवाच्या पंचज्ञानेंद्रियांमार्फतच विश्वाचे ज्ञान होऊ शकते, ही बुद्धिवाद्यांची जी दुसरी श्रद्धा आहे, ती कितपत बरोबर आहे हे पाहावयाचे आहे.

## एक विलक्षण नाट्य

१४ जून १९५५ रोजी घडलेली ही घटना. अमेरिकेतील बोस्टन या शहरातील एका वेल्डिंगच्या कारखान्यात व्हिर्टेकर व त्याचा जोडीदार वेल्डिंगचे काम (झाळकाम) करीत होते. सहा वाजेपर्यंत तरी हातातील ते काम पूर्ण होणार नव्हते. पण साडेपाचलाच व्हिर्टेकरने एकाएकी घरी जाण्याचा निर्णय घेतला. आपल्या कामातील जोडीदाराला असे एकटे सोडून यापूर्वी तो कधीच गेला नव्हता आणि म्हणून व्हिर्टेकरचा हा निर्णय थोडा विलक्षणच होता. दुसरी एक विलक्षण गोष्ट त्याने केली. त्याने नेहमीप्रमाणे जवळचा वाहनांची गर्दी नसलेला १२८ क्रमांकाचा रस्ता न धरता दूरचा, वाहनांची तुफान गर्दी

असलेला ईस्ट स्ट्रीट हा रस्ता धरला. हा विलक्षण निर्णय त्याने का घेतला? आपणाला तसे जावेसे वाटले, एवढेच या प्रश्नाला तो उत्तर देतो.

या नाट्यातील दुसरी व्यक्ती व्हिटॅकरचा मालक सलीव्हान हा आहे. सलीव्हान बोस्टन शहरातील दुसऱ्या भागात होता. तेथे असताना त्याला वॉशिंग्टन रस्त्यावरील पाईपांचे झाळकाम करण्यासाठी त्याच्या कंपनीतील कामगार पाठवावे, असा एक तातडीचा आदेश आला. पण त्याचे सर्व कामगार कामात गुंतलेले असल्यामुळे काय करावे हा त्याच्यापुढे प्रश्न उभा राहिला. शेवटी हे काम स्वत:च करायचे असा त्याने निर्णय घेतला. वॉशिंग्टन रस्त्यावर चर काढून टाकलेल्या लोखंडी पाईपांचे आतून व बाहेरून झाळकाम करायचे होते. सलीव्हानने साडेचारला कामाला सुरवात केली. पाच वाजेपर्यंत त्याने आतले झाळकाम पूर्ण केले व बाहेरच्या कामाला तो लागला. थोडे काम झाले नाही तोच एकदम वरची दरड कोसळली व सलीव्हान तापून लाल झालेल्या पाईपाशी गाडला गेला. आपण वाचत नाही, अशी खात्री झालेली असतानाही त्याने आपला एक हात कसाबसा वर केला. (यावेळी आपल्या पाच मुलांची आपणाला आठवण झाली व आपण परमेश्वराची पश्चात्तापयुक्त करुणा भाकली, असे तो म्हणतो.)

इकडे व्हिटॅकरला आपण वॉशिंग्टन मार्गाच्या बाजूने जाणाऱ्या ईस्ट स्ट्रीट रस्त्याने का आलो, हे कळत नव्हते. इतक्यात सलीव्हान कंपनीतील एक कामगार त्याला भेटला व त्या भागात आपल्या कंपनीने अलीकडे काम घेतले नसल्याचे त्याला सांगितले. त्यामुळे त्याला घरी परतावे असे वाटू लागले. तरीही तो तसाच आपली कार चालवीत राहिला आणि अचानक त्याला आपल्या कंपनीची जनरेटर असलेली ट्रक रस्त्याकडेला उभी असलेली दिसली. तो कार थांबवून खाली उतरला व चरीत डोकावून पाहिले. पाईपा खडकांनी बुजवलेल्या होत्या. उघड्या पाईपा दिसेपर्यंत तो तसाच चालत राहिला आणि मग परत फिरला. इतक्यात त्याला एक मानवी हात खडकाबाहेर आलेला नजरेस पडला. असा तर्क करण्यात आला आहे की, व्हिटॅकर तेथे केवळ पंधरा मिनिटे उशिरा पोचला असता, तर सलीव्हान मेला असता. पण सलीव्हान जिवंत राहिला. आणि तेही व्हिटॅकर तेथे वेळेवर पोहोचल्यामुळेच होय.

## एक पांढरा कावळा

या घटनेची वैज्ञानिक उपपत्ती देता येते काय? येत असेल तर ती कोणती ? बुद्धिवादी लोक हा केवळ योगायोग आहे, असे म्हणून हे प्रकरण झटकून मोकळे होतील. सलीव्हानने मात्र आपण परमेश्वराची करुणा भाकली, म्हणूनच वाचलो असे म्हणतो. ही घटना योगायोगाने घडली असे म्हणणाऱ्यांनी व्हिटॅकर हातातील काम अर्ध्यात टाकून अर्धातास अगोदर का निघाला? व जवळचा गर्दी नसलेला रस्ता सोडून लांबचा गर्दीचा

रस्ता त्याने का धरला? या प्रश्नांची बुद्धीला पटणारी (समर्पक) उत्तरे दिली पाहिजेत. ती अर्थातच देता येत नाहीत. या प्रश्नांची वैज्ञानिक पद्धतीने समर्पक उत्तरे देता आली नसती, तर कदाचित योगायोगाचे किंवा सलीव्हानचे परमेश्वरी कृपेचेही उत्तर स्वीकारता आले असते. (अर्थात तेवढ्यावरून या पर्यायी उपपत्त्या बरोबर आहेत, असे ठरत नाही.) पण या घटनेची वैज्ञानिक पद्धतीने उपपत्ती लावता येत असल्याने त्यांची गरज नाही. या घटनेची समर्पक उपपत्ती लावणाऱ्या विज्ञानाला अतींद्रिय -विज्ञान किंवा परामानसशास्त्र (Parapsychology) हे नाव असून या शास्त्रानुसार मानवी अंतर्मनाच्याद्वारा माहितीची देवाणघेवाण होऊ शकते व याच देवाणघेवाणीतून हे नाट्य घडले आहे. ही देवाणघेवाण पुढीलप्रमाणे घडली, असे परमानसशास्त्र सांगते. सलीव्हानच्या अंतर्मनाने आपण संकटात असल्याचा संदेश व्हिटॅकरच्या अंतर्मनाला पाठवला. व्हिटॅकरच्या अंतर्मानने तो ग्रहण करून व्हिटॅकरला त्याप्रमाणे योग्य ती पाऊले तातडीने उचलण्यास प्रेरणा दिली. हा केवळ तर्क असून असे मानण्याला आधार काय? हा पहिला प्रश्न व ही सर्व घटनाच काल्पनिक नसेल कशावरून ? - हा दुसरा प्रश्न या संदर्भात बुद्धिवादी उपस्थित करतील. या दोन्ही प्रश्नांची चर्चा पुढे होणार असल्यामुळे येथे तूर्त एवढेच सांगू इच्छितो की, जिची बुद्धिवादाने समर्पक उत्तरे देता येत नाहीत, अशी ही एकच घटना नसून अशा अनेक घटनांची उदाहरणे आहेत आणि हीच बुद्धिवादाची सर्वात मोठी अडचण आहे. तसे पाहिले तर अशी एक जरी घटना प्रत्यक्षात घडल्याची आढळून आली तरी ती बुद्धिवाद खोटा ठरविण्यास पुरेशी आहे. कारण सर्व कावळे काळे आहेत, असा बुद्धिवादाचा सिद्धांत आहे असे जर समजले आणि एखादा जरी कावळा पांढरा आढळून आला, तरी बुद्धिवाद्यांचा तो सिद्धांत खोटा ठरतो. म्हणून विश्वाविषयीच्या बुद्धिवाद्यांच्या सिद्धांताला वरील घटनेसारख्या एखाद्या घटनेनेही बाधा येते. पण अशा अनेक घटना आहेत, ही वस्तुस्थिती आहे आणि म्हणून बुद्धिवाद विश्वाकडे पाहण्याचा यथार्थ (Truthful) दृष्टीकोण होऊ शकत नाही, असे मानावे लागते.[२]

मी वर म्हटले आहे की अशा घटनांची अनेक उदाहरणे आहेत. ग्रंथविस्तार होणार असला तरी या विषयाची स्पष्ट कल्पना यावी, म्हणून कांही उदाहरणे येथे देणे आवश्यक वाटते.

## एक विलक्षण माणूस

पीटर हर्कोस या नावाचा एक डच रंगारी शिडीवर उभा राहून भिंत रंगवत असताना ३० फूट उंचावरून एकदम खाली पडला व त्याच्या डोक्याला जबर मार बसला. तावडतोब त्याला रुग्णालयात हलविण्यात आले. शुद्धीवर आल्यावर त्याला विचित्र जाणीव होऊ लागली. एकाएकी त्याला दुसऱ्यांच्या मनातील विचार समजू लागले !

त्याच्या शेजारच्या खाटेवरील रुग्णाकडे पाहून पीटरला जाणवले की, त्याने त्याला वडिलांनी दिलेले सोन्याचे घड्याळ विकले असून त्यामुळे त्याला आपण वाईट असल्याची भावना सारखी डाचत आहे. पीटरने तसे बोलून दाखवताच त्या रुग्णाने हे आश्चर्यचकित होऊन मान्य केले. पीटरची शुश्रुषा करण्यास आलेल्या नर्सला त्याने सांगितले की, तिच्या मैत्रिणीने तिला एक सूटकेस दिलेली असून तिने ती जपली पाहिजे आणि त्या नर्सने हे खरे असल्याचे व ती सूटकेस आपण आगगाडीत सकाळीच विसरून आल्याचे आश्चर्यचकित होऊन मान्य केले. एका ब्रिटीश गुप्तहेराचे अपेंडिक्सचे ऑपरेशन झाले होते. तो बरा होऊन रुग्णालयातून जाताना पीटरने सांगितले की दोन दिवसांनी त्याला कॅल्व्हर स्ट्रीटवर जर्मन गेस्टॅपो गोळ्या घालून ठार करणार आहेत आणि दोन दिवसांनी त्याला कॅल्व्हर स्ट्रीटवर जर्मन गेस्टॅपोनी खरोखरीच गोळ्या घालून ठार केले. या घटनेनंतर लगेच एक डच पोलीस तेथे आला व पीटर जर्मनीचा हेर असल्याच्या संशयाने (नाहीतर त्याला जर्मन गेस्टॅपो त्या ब्रिटीश हेराला ठार करणार आहेत, हे कसे कळले?) त्याला गुदमरून ठार करण्यासाठी जवळची एक उशी उचलली. इतक्यात पीटरच्या तोंडून "Como aborrenzo la metanza !" असे स्पॅनिश भाषेतील उद्‌गार बाहेर पडले. या स्पॅनिश भाषेतील वाक्यांचा अर्थ आहे, ‘‘मला एखाद्याला ठार मारणे आवडत नाही.’’ हे वाक्य ऐकून त्या डच पोलिसाने एकदम उशी फेकून दिली व पीटरकडे आश्चर्याने पाहात तो म्हणाला, ‘‘याला माझ्या मनातले विचार कसे समजले?’’ कारण त्या डच पोलिसाचे बालपण स्पेनमध्ये गेले होते व तो मनात नेहमी स्पॅनिश भाषेतच विचार करीत असे! अशा रीतीने पीटरच्या बाबतीत अशा अनेक घटना घडू लागल्या की ज्यामुळे पीटरमध्ये दुसऱ्यांचे विचार जाणण्याचे सामर्थ्य असल्याचे स्पष्ट झाले. इतकेच नव्हे तर एखाद्या वस्तूला स्पर्श करून त्या वस्तूच्या संपर्कात आलेल्या लोकांचा इतिहास जाणण्याचे सामर्थ्यही असल्याचे स्पष्ट झाले. नंतर पोलिसांनी अनेक गुन्ह्यांचा तापस त्याच्या साहाय्याने लावला. त्याची मुलाखत घेणाऱ्यांना पुष्कळदा असे आढळून येत असे की, त्यांनी विचारलेल्या प्रश्नांना उत्तरे देण्याऐवजी न विचारलेल्या पण मनात योजलेल्या प्रश्नांना तो अगोदर उत्तर देई व नंतर विचारलेल्या प्रश्नांना उत्तरे देई ! त्याला फोन केल्यानंतर त्याने फोन उचलताच पलीकडे कोण फोन करीत आहे व तो का करीत आहे हे त्याला कळत असे ! पीटरमधील या शक्तीची अनेक शास्त्रज्ञांनी परीक्षा घेऊन तिच्या खरेपणाबद्दल स्वत:ची खात्री करून घेतली आहे. (या शास्त्रज्ञांत रूढ धर्म व देव न मानणारा ज्युलियन हक्स्ले हा प्रसिद्ध जीवशास्त्रज्ञही आहे.)

## एक विलक्षण माध्यम (Medium)

एकोणिसाव्या शतकाच्या शेवटी युरोपात डी. डी. होम या नावाचा एक माध्यम

होऊन गेला. (या लोकांतील माणसांचा परलोकातील आत्म्याशी संबंध घडवून आणणाऱ्यांना माध्यम म्हणतात.) या माध्यमाचे वैशिष्ट्य म्हणजे तो इतर माध्यमांप्रमाणे आपले कार्यक्रम अंधारात न करता पूर्ण प्रकाशात करीत असे! आणि त्यामुळे त्याच्यातील सामर्थ्याविषयी कोणालाही संशय घ्यायला जागा नव्हती. या माध्यमाची परीक्षा प्रसिद्ध भौतिक शास्त्रज्ञ विल्यम क्रूक्स (थालियमचा शोध लावणारा व रेडियोमीटरचा जनक) याने घेऊन त्याच्यावरील प्रयोगाचे वर्णन Quarterly Journal of Science मध्ये प्रथम प्रसिद्ध केले. तेव्हापासून डी. डी. होमचा विज्ञान जगात बोलबाला होऊ लागला. त्याच्या अतींद्रिय सामर्थ्याचे प्रकार खरोखरच विस्मयकारक होते. त्याने आपल्या बैठकीला सुरुवात केल्यानंतर (तो बैठकीत इतर माध्यमाप्रमाणे सहसा तंद्रीत जात नसे.) प्रथम सबंध खोली भूकंप झाल्याप्रमाणे हादरत असे. नंतर हळूहळू समोरचे टेबल आपोआप वर उचलले जाई - ते कधी कधी खुर्चीवर बसलेल्या प्रेक्षकांच्या डोक्यांच्याही वर जात असे व कलंडले जाई. पण कलंडले तरी त्यावरील वस्तू खाली पडत नसत. अशा अधांतरी अवस्थेत थोडा वेळ राहिल्यानंतर ते हळूहळू खाली येत असे. कित्येकदा प्रेक्षकांजवळील वस्तू अज्ञात हातांनी हिसकावून घेतल्या जात व नव्या वस्तू त्यांच्या मांडीवर येऊन पडत. नंतर ॲकॉर्डियन वाद्य अदृश्य हातांनी (कधीकधी ते अधांतरी तरंगत असताना) वाजवले जाई. कधीकधी मानवी हात दृग्गोचर होत असत (Materialization), व कधीकधी होम स्वत: अधांतरी तरंगत असे (Levitation). या प्रयोगाबाबत अशी टीका करण्यात आली होती की, हा हिप्नॉटिझमने (मोहिनी विद्येने) निर्माण केलेला आभास आहे. प्रत्यक्षात असे काहीच घडत नाही. पण ही टीका अनाठाई आहे. कारण हिप्नॉटिझमचा प्रयोग सर्वांवर शंभर टक्के यशस्वी होत नाही, हे टीकाकारही मान्य करतात. आणि होमचे प्रयोग एकदाही फसलेले नाहीत किंवा एखाद्यालाही त्यात लबाडी असल्याचे आढळून आलेले नाही. शिवाय पुष्कळदा टेबल खाली आदळून त्याची मोडतोड झाल्याचे नंतर आढळून आलेले असल्यामुळे हा हिप्नॉटिझमने निर्माण केलेला भास नव्हे हे सिद्ध होते.

## एक विलक्षण घटना

जर्मनीमधील रोझेनहाईम या बव्हेरियन शहरात १९६७ च्या डिसेंबर महिन्यात एका वकिलाच्या ऑफिसमध्ये अचानक एकसारखे बल्ब उडू लागले. (जळून जाऊ लागले). निऑन लाईट विझू लागले. फ्युजा उडू लागल्या. विद्युतप्रवाहात चढउतार होत नसल्याची कार्गर व झिचा या दोन भौतिक शास्त्रज्ञांनी मुख्य प्रवाहात (मेन सप्लायमध्ये) विद्युतमापक उपकरणे बसवून खात्री करून घेतली. त्यांच्या मताप्रमाणे या प्रकारात फसवणुकीला मुळीच जागा नव्हती. त्यांच्या मते ज्ञात भौतिक कारणाशिवायच

हे घडत होते. छताला लोंबकळणारे दिवे अचानक हेलकावे खात. भिंतीवरील चित्रेही हेलकावे खात. त्या वकिलाच्या ऑफिसातील चार फोन एकदम खणाणत. पण प्रत्यक्षात कोणीही फोन केलेला नसे ! फोनवरचे बोलणे अचानक मध्येच तुटत असे. एकसारखे फोन होऊ लागल्यामुळे त्या वकिलाची फोन बिले भरमसाठ वाढू लागली. (कधीकधी मिनिटाला सहा कॉल्स येत !) सर्व प्रकारच्या साधनांनी व उपायांनी तपास करूनही हे कोण करते किंवा कसे घडनू येते, हे कळू न शकल्यामुळे शेवटी शास्त्रज्ञांनी हात टेकले. प्रत्यक्ष या घटना पाहणारे ४० साक्षीदार असून त्यात वकिलाच्या अशिलाशिवाय गुन्ह्यांचे अन्वेषण करणारे पोलिस, विद्युत उपकरणांचे व फोनचे तंत्रज्ञ व वृत्तपत्रकारही होते. या घटनांचे वैशिष्ट्य म्हणजे स्वत: ''जर्मन असोसिएशन फॉर द ॲडव्हान्समेंट ऑफ सायन्स'' या जर्मनीच्या विज्ञानसंघाने त्यांचे संशोधन केले आहे, व *हे प्रकरण विज्ञानाच्या ज्ञात भौतिक नियमांच्या आधारे अनाकलनीय असल्याचे मान्य केले आहे.* या घटनेला जर्मन भाषेत 'पोल्टरगाईस्ट' (भानामती) म्हणून संबोधण्यात येत असून (हाच जर्मन शब्द इंग्रजीतही रूढ झाला आहे.) त्या वकिलाच्या ऑफिसात काम करणाऱ्या एका एकोणीस वर्षे वयाच्या मुलीच्या उपस्थितीतच या घटना घडत असल्याचे शास्त्रज्ञांना आढळून आले आहे.[३]

## एक विलक्षण भाकीत

मॉर्गन रॉबर्टसन नावाच्या एका अमेरिकन लेखकाने Futility नावाची एक कादंबरी लिहिली असून त्यामधील कथानक तंद्री (Trance) अवस्थेत त्याला सुचले, हे त्याचे वैशिष्ट्य होय. ही कादंबरी त्याने १८९८ साली लिहिली आणि १९१२ साली म्हणजे १४ वर्षांनी सर्व तपशीलासह त्यात लिहिल्याप्रमाणे प्रत्यक्षात घडून आले. अगदी नावासह! त्या कादंबरीत टिटॅन नावाच्या जहाजाची हिमनगाशी टक्कर होऊन त्याचानाश झाल्याचे त्याने लिहिले होते. आणि १४ वर्षांनंतर ज्या जहाजाचा अटलांटिक महासागरात हिमनगाशी टक्कर होऊन नाश झाला, त्या जहाजाचेही नाव होते टिटॅन ! प्रत्यक्षात अपघात झालेल्या जहाजाचे आकारमान, लांबी-रूंदी, उतारू वाहून नेण्याची क्षमता, त्यातील लाईफ बोटी, त्याचे टनेज (वजन) त्याला असलेल्या प्रोपेलर्सची संख्या, त्याचा वेग, अपघाताचे ठिकाण इत्यादी सर्व तपशील रॉबर्टसनच्या त्या कादंबरीत लिहिल्याप्रमाणेच होता ! इतक्या सर्व गोष्टी योगायोगाने घडून येणे कसे शक्य आहे ? हा योगायोग नसल्याचे सिद्ध करणारी एक गोष्ट म्हणजे या अपघाताच्या २० वर्षे अगोदर या अपघातात बुडून मरण पावलेल्या डब्ल्यू. टी. स्टीड या लेखकाने अटलांटिक महासागरात हिमनगाशी टक्कर होऊन एक जहाज बुडाल्याची एक कथा लिहिली होती, व अपघाताच्या दोनच वर्षे अगोदर एका जाहीर व्याख्यानात आपणाला पाण्यात बुडून मरण्यासंबंधीची भावना सारखी

सतावत असल्याचे म्हटले होते . एका मित्राने तर त्याला पत्र लिहून टिटॅन जहाज आपल्या पहिल्याच प्रवासात नाश पावणार असल्याचे भविष्य कथन केले होते. येथे स्टीडने अपघाताच्या २० वर्षे अगोदर त्या अपघाताच्या भविष्याचा आराखडा तयार केला. १४ वर्षे अगोदर रॉबर्टसनने त्यात तपशील भरला, आणि प्रत्यक्ष अपघाताच्या काही दिवस अगोदर स्टिडच्या एका मित्राने त्यावर शेवटचे शिक्कामोर्तब केले. असा पद्धतशीर क्रम आढळून येतो.(एका व्याापऱ्याने प्रवासाला निघण्याच्या आदल्याच दिवशी टिटॅन बुडाल्याचे स्वप्न पडल्यामुळे आपले त्या जहाजाचे तिकीट रद्द केले असल्याचे आढळून आले आहे.) यात योगायोगाला कोठेच थारा मिळत नाही ! (या ऐतिहासिक घटनेचे संशोधन आयन स्टिव्हेन्सन या शास्त्रज्ञाने केले आहे.)[४]

वरील उदाहरणे केवळ नमुन्यादाखल दिली असून अशी असंख्य उदाहरणे देता येण्यासारखी आहेत. ती बुद्धिवाद्यांना अडचणीची ठरत असल्याने त्यांच्याकडे ते सतत मुद्दाम दुर्लक्ष करीत आले आहेत. अडचणीची ठरणारी सत्ये नेहमी दृष्टीआड करण्याची सवय कोणत्या प्रवृत्तीतून निर्माण होते, हे पाहण्यासारखे असून ती विज्ञानाला नवीन नाही. त्यासाठी विज्ञानाची कार्यपद्धती काय आहे, हे पाहिले पाहिजे.

## बौद्धिक सुसंगती विरुद्ध वैज्ञानिक प्रगती

बौद्धिक सुसंगती शोधणे हे विज्ञानाचे प्रमुख कार्य आहे. ही सुसंगती शोधताना विज्ञान हे अनुभवशील (Empirical) आहे, या वस्तुस्थितीकडे शास्त्रज्ञांचे कधीकधी दुर्लक्ष होते. प्रत्यक्षात बौद्धिक सुसंगतीशिवाय कुठलाही वैज्ञानिक सिद्धांत प्रस्थापित होऊ शकत नसल्यामुळे ही सुसंगती जपणे, हे विज्ञानाचे आद्य कर्तव्य मानले जाते. या सुसंगतीसाठी वैज्ञानिक प्रगतीची जबर किंमत कधीकधी द्यावी लागली, तर ती देऊनसुद्धा सुसंगती जपणे वैज्ञानिकांना आवश्यक वाटू लागते. एखादे अडचणीचे ठरणारे अनुभवजन्य सत्य नजरेआड करण्याची त्यामुळे शास्त्रज्ञांना सवय जडते. एखादी गोष्ट नेहमीच्या व्यवहारात आढळत नाही, म्हणून ती कधीच घडत नाही, असे मानण्याची प्रवृत्ती त्यामुळे निर्माण होते. नेहमीचे कावळे काळे दिसतात . यावरून पांढरे कावळे असणेच शक्य नाही, असा मग निष्कर्ष काढला जातो. विज्ञानाच्या इतिहासावरून ही गोष्ट स्पष्ट होते. युक्लीडची भूमिती एकेकाळी अबाधित म्हणून स्वीकारण्यात आली होती. त्रिकोणांच्या तीन कोनांची बेरीज दोन काटकोनाइतकी असते, असे आढळून येते. म्हणून ती नेहमीच (सर्व परिस्थितीत) दोन काटकोनाइतकी असते, असे मानण्याची चूक त्यामुळे करण्यात आली; व काही परिस्थीतीत ती दोन काटकोनापेक्षा कमी व काही परिस्थितीत ती दोन काटकोनापेक्षा जास्त होते, हे कळायला अनुभवाचे क्षेत्र विस्तारावे व बरेच दिवस जावे लागले. न्यूटनचा गुरूत्वाकर्षणाचा सिद्धांतही बरीच वर्षे अबाधित म्हणून स्वीकारण्यात

आला होता. तो अबाधित राहावा म्हणून बुध ग्रहाच्या कक्षेच्या विक्षिप्तपणाचे (Eccentricity) अडचणीचे ठरणारे सत्यही दृष्टीआड करण्यात आले ! (बुध ग्रहाच्या कक्षेची उपपत्ती न्यूटनच्या तत्त्वानुसार लावता येत नव्हती.) पण अनुभवाचे विश्व जसे विस्तार पावू लागले, तशी या अडचणीच्या ठरणाऱ्या सत्यांची संख्या वाढू लागली व ती नाकारणे दुरापास्त झाल्यामुळे ती मान्य करून विज्ञानात सामावून घेण्याची गरज तीव्र होऊ लागली; आणि मग सापेक्षता सिद्धांताची नवी सुसंगती शोधण्यात आली ! (हल्ली खगोल शास्त्रातील कृष्ण विवराच्या - Black hole - नव्या शोधामुळे सापेक्षता सिद्धांतातही बदल सुचविण्यात येऊ लागले आहेत, नव्हे पर्यायी सिध्दांतही मांडले जात आहेत !) तात्पर्य विज्ञानात अंतिम असे काहीच नसून ते सतत बदलणारे असते; आणि याचे मुख्य कारण विज्ञान अनुभवशील आहे हे आहे. अनुभवशील सत्याला प्रथम प्राधान्य देऊन नंतर सुसंगती शोधण्याचा प्रयत्न केला तरच वैज्ञानिक प्रगती सुलभ होते, असा विज्ञान- इतिहासावरून स्पष्ट धडा मिळतो. हा धडा बुद्धिवादी वैज्ञानिकांच्या गळी अजून उतरलेला दिसत नाही. अतींद्रिय घटनांचे अनुभवजन्य सत्य (Empirical Truth) बुद्धिवादी किती दिवस नाकारणार आहेत? ही त्यांचीआत्मवंचना असून ती ते विज्ञानाच्या नावाखाली का करीत आहेत, याची तपासणी करणे आवश्यक आहे . पण हे करण्यापूर्वी अतींद्रिय शक्तीचे अस्तित्व नाकारण्यासाठी ते जे कांही गैरसमज मुद्दाम पसरवीत असतात व गैरलागू मुद्दे उपस्थित करीत असतात, त्यांचा विचार करणे आवश्यक आहे.

## अतींद्रिय संशोधकांविषयी कांही गैरसमज

अतींद्रिय शक्तीचे संशोधन करणाऱ्यांमध्ये वैज्ञानिक दृष्टीकोणाचा अभाव असतो, आणि म्हणून त्यांची दिशाभूल सहज होऊ शकते (Gullible) असा एक आरोप बुद्धिवाद्यांकडून करण्यात येतो. हा आरोप करून त्यांना असे सूचित करावयाचे असते की, हे संशोधक भ्रमालाच सत्य मानतात व इतरांमध्येही भ्रम निर्माण करतात. हा आरोप एक तर या विषयीच्या अज्ञानातून निर्माण झाला असावा किंवा बुद्धिपुरस्सर गैरसमज पसरविण्यासाठी करण्यात येत असावा. पहिली गोष्ट म्हणजे अतींद्रिय विषयाचे संशोधन करण्यासाठी १८८२ साली इंग्लंडमध्ये स्थापन झालेल्या "ब्रिटीश सोसायटी फॉर सायकिकल रिसर्च" या संस्थेच्या खुद्द सभासदांनीच आपल्यात अतींद्रिय शक्ती असल्याचे सांगणाऱ्या अनेक माध्यमांची वैज्ञानिक पद्धतीने काटेकोरपणे तपासणी करून त्यांची बिंगे बाहेर पाडण्याची मोलाची कामगिरी केली आहे. दुसरी गोष्ट म्हणजे या संस्थेचे अनेक सभासद व भूतपूर्व अध्यक्ष हे आंतरराष्ट्रीय कीर्तीचे नामवंत शास्त्रज्ञ होते. इलेक्ट्रॉनचा शोध लावणारा जे. जे. थॉमसन हा शास्त्रज्ञ या संस्थेचा उपाध्यक्ष होता, तर उत्क्रांतिवादाचा (डार्विनबरोबर ) सिद्धांत मांडणारा ए. आर. वॉलेस हा जीवशास्त्रज्ञ या संस्थेचा सन्मान्य सभासद होता. या संस्थेचे तीन भूतपूर्व अध्यक्ष विज्ञानाचे नोबेल

पारितोषिक विजेते होते ! व दहा अध्यक्ष एफ. आर. एस्. (फेलो ऑफ रॉयल सोसायटी) होते! (हा किताब जगात अत्यंत दुर्लभ मानण्यात येतो. प्रथितयश शास्त्रज्ञांना व विचारवंतानाच तो मिळतो.) अतींद्रिय विषयाचे संशोधन करण्यासाठी स्थापन झालेल्या या संस्थेच्या अध्यक्षामध्ये आंतरराष्ट्रीय कीर्तीची भौतशास्त्रज्ञ, मानसशास्त्रज्ञ, तत्वज्ञ, खगोलशास्त्रज्ञ, वैद्यकशास्त्रज्ञ, बॅरिस्टर, डी. लिट. पदवीधर, जीवशास्त्रज्ञ, नीतिशास्त्रज्ञ, राज्यशास्त्रज्ञ, भाषापंडित अशी विविध क्षेत्रांतील तज्ज्ञ मंडळी आढळून येतात.[५] इंग्लंडचा एक माजी पंतप्रधानही या संस्थेचा अध्यक्ष होता. ग्लॅडस्टन हा प्रसिद्ध माजी पंतप्रधान या संस्थेचा सन्मान सभासद होता. (ग्लॅडस्टनने तर अतींद्रिय विषयाचे संशोधन हे जगातील सर्वात महत्वाचे संशोधन होय, असे म्हटले आहे) आईन्स्टाईननेही अतींद्रिय शक्तीचे अस्तित्व मान्य केले असून तिचे साक्षेपी संशोधन झाले पाहिजे, असे आग्रही प्रतिपादन केले आहे. (अप्टन सिंक्लेअरच्या **'Mental Radio'** या ग्रंथाला आईन्स्टाईनने लिहिलेली प्रस्तावना पाहा.) हल्ली रशियासह जगातील सर्व राष्ट्रात या विषयावर संशोधन करणाऱ्या संस्था स्थापन झालेल्या असून एकट्या अमेरिकेत ५६ विद्यापीठे, व महाविद्यालये यांनी याविषयाला गुणप्रदान (Credit) विषय म्हणून मान्यता दिली आहे. या सर्व लोकांची दिशाभूल झाली आहे किंवा ते भ्रमाच्या पाठीमागे लागले आहेत, असे म्हणणे ही एक तर अज्ञानाची नाही तर ढोंगीपणाची परिसीमा होय.

## अतींद्रियाविषयी आणखी एक अपप्रचार

अतींद्रियांचे वैज्ञानिक पद्धतीने संशोधन करणाऱ्या परामानसशास्त्राविषयी ते शास्त्रच नव्हे, असा एक अपप्रचार करण्यात येतो. ''अमेरिकन असोसिएशन फॉर द ॲडव्हान्समेंट ऑफ सायन्स'' या अमेरिकेच्या मातब्बर विज्ञान संघाने परामानसशास्त्राला शास्त्र म्हणून मान्यता देऊन ('पॅरासायकॉलॉजी असोसिएशन'ला आपल्या संघाचे सभासदत्व देऊन) हे शास्त्र नव्हे, असे म्हणणाऱ्या लोकांना परस्पर उत्तर दिले आहे ! (ही मान्यता परामानसशास्त्राला १९६९ साली मिळाली) परामानसशास्त्र हे शास्त्र नव्हे, असे म्हणण्याचे असे कारण देण्यात येते की, भौतिकशास्त्राप्रमाणे परामानसशास्त्रात पुनरावर्ती प्रयोग (Repeatable Experiments) करता येत नाहीत. हा युक्तिवाद भौतशास्त्र व परामानसशास्त्र यातील भेद दृष्टीआड करून करण्यात आलेला असल्याने अस्थानी आहे. जे नियम निर्जीव वस्तूला लागू होतात, तेच नियम सजीव वस्तूला -(आणि तेही तरल म्हणून प्रसिद्ध असलेल्या मनाला!) लागू व्हावेत, ही अपेक्षा कशी बाळगता येईल? मन म्हणजे, एक लोखंडी गोळा आहे काय की ज्यावर कोठेही, कितीही, केव्हाही व कसाही प्रयोग करावा आणि हव्या त्या परिणामाची नेहमी अपेक्षा करावी?[६] प्रयोगशीलता हे विज्ञानाचे व्यवच्छेदक लक्षण आहे, असे मानून परामानसशास्त्राला शास्त्राचा दर्जा

नाकारावयाचा झाल्यास भूगर्भशास्त्र, पुरातनवस्तुशास्त्र हीही शास्त्रे नव्हेत असे म्हणावे लागेल; कारण या शास्त्रात प्रयोगच अशक्य आहेत ! तथापि परामानसशास्त्रात प्रयोग करण्यात आले असून बऱ्याच अंशी पुनरावर्तित्वही साध्य झाले आहे. हे पुनरावर्तित्व Ganzfeld या नव्या तंत्राने २८ संशोधनसंस्थांनी स्वतंत्रपणे प्रस्थापित केले आहे. (पाहा, **Research in Parapsychology** 1974, 75 आणि 76 हे तीन ग्रंथ.) Ganzfeld हे पाश्चात्यांचे कृत्रिम 'ध्यान' म्हणता येईल) आणि हेच एक मोठे आश्चर्य आहे. कारण याची अपेक्षाच धरणे चूक आहे. हे मर्यादित यश मिळण्याचे कारण मानसशास्त्रीय नियम परामानसशास्त्रातही कांही अंशी लागू होत असल्याचे आढळून येतात.[७]

## प्रायोगिक परामानसशास्त्र -बुद्धिवाद्यांना अंतिम उत्तर !

वर ग्रंथविस्ताराचा धोका पत्करूनही जी अतींद्रिय शक्तीची उदाहरणे दिली आहेत, त्याविषयी बुद्धिवाद्यांचे दोन आक्षेप आहेत. एक म्हणजे या घटना किंवा व्यक्ती अपवादात्मक असून त्या नित्याच्या व्यवहारातील नाहीत, किंवा नेहमीच्या अनुभवाच्या नाहीत, आणि म्हणून शास्त्रज्ञांनी त्यांची दखल घेतलेली नाही, व घेण्याचे कारण नाही. कारण विज्ञान हे नित्य घडणाऱ्या घटनांचाच तेवढा विचार करते. दुसरा आक्षेप म्हणजे या घटना खऱ्या आहेत, असे मानण्यासाठी कसलाही पुरावा नाही. कदाचित ज्या शास्त्रज्ञांनी त्या घटनांचे संशोधन केले, त्यांच्या पुरत्या त्या खऱ्या असतील. पण विज्ञानाचे कार्य हे व्यक्तिनिरपेक्ष असल्याने इतरांनाही त्यांचे खरेपण पडताळून पाहता आले पाहिजे. दुसऱ्या शब्दांत, ज्या योगे इतरांनाही त्यांचे खरेपण पडताळून पाहता येईल, असा प्रयोगशीलता हा गुण त्यांच्या ठिकाणी असावयास पाहिजे, तो नाही.

हे आक्षेप विचारात घेऊन, तसेच अतींद्रिय शक्ती ही अपवादात्मक आहे, की सार्वत्रिक (Universal) आहे, हे शोधण्यासाठी १९२७ साली अमेरिकेतील ड्यूक युनिव्हर्सिटीमध्ये परामानसशास्त्राची एक प्रयोगशाळा स्थापून प्रथम सर्वसामान्य व्यक्तीवर प्रयोग करण्याचे जे. बी. ऱ्हाईन या जीवशास्त्रज्ञाने ठरविले . या प्रयोगात पाच तऱ्हेची चिन्हे असलेले २५ पत्ते (Cards) तयार करण्यात आले होते. एका खोलीत एक व्यक्ती हे पत्ते पाहून त्यांची क्रमवार नोंद करीत असे व दुसऱ्या खोलीत दुसरी व्यक्ती त्याच क्रमाने ते कोणते असावेत, या विषयीच्या आपल्या अंदाजाची नोंद करून ठेवत असे. अशा हजारो नोंदी झाल्यानंतर त्यातील बरोबर किती व चुकीच्या किती याची तपासणी करून त्यावरून संख्याशास्त्राच्या (Statistics) साहाय्याने या प्रयोगातील यशस्विता (Significance) ठरविण्यात येत असे. ही यशस्विता संख्यात्मक पद्धतीने ठरविण्यात येत असल्यामुळे अत्यंत क्लिष्ट झाली असून सामान्य माणसाला त्यात कांहीच रस वाटणार नाही. पण सर्व शास्त्रीय प्रयोग असे क्लिष्टच असल्याने हा त्यांचा दोष मानण्याऐवजी

गुणच मानला पाहिजे. या प्रयोगांनी पुढील तीन गोष्टी स्पष्ट झाल्या आहेत.

१) दुसऱ्याच्या मनातील (दुसऱ्याने पाहिलेले किंवा त्याला माहीत असलेले) पत्ते ओळखण्याचे सामर्थ्य सामान्य माणसात आहे. दुसऱ्या शब्दांत, दुसऱ्याचे मन जाणण्याचे सामर्थ्य मानवी मनात आहे. याला परचित्तज्ञान (Telepathy) हे नाव देण्यात आले आहे.

२) दुसऱ्याने न पाहिलेले पत्ते (दुसऱ्याला पत्त्याची माहिती नसतानासुद्धा) ते ओळखण्याचे सामर्थ्य सामान्य व्यक्तीत आहे. दुसऱ्या शब्दांत, जगात कोणालाही ज्ञात नसलेली वस्तू ओळखण्याचे सामर्थ्य मानवी मनात आहे. याला अज्ञातवस्तुज्ञान किंवा अंतर्ज्ञान वा अंतर्दृष्टी (Clairvoyance) हे नाव देण्यात आले आहे.

३) दुसऱ्याने न पाहिलेले पण भविष्यात पाहणार असलेले पत्ते ते त्याने पाहण्यापूर्वीच ओळखण्याचे सामर्थ्य सामान्य माणसात आहे. याला अनागतवस्तुज्ञान किंवा भविष्यज्ञान (Precognition) हे नाव देण्यात आले आहे.

यानंतर कांही वर्षांनी जे. बी. ऱ्हाईन यांनी फासे (Dice) टाकण्याचे प्रयोग केले व इच्छित फासे टाकण्याचे सामर्थ्य सामान्य व्यक्तीत असल्याचे याच संख्याशास्त्रीय पद्धतीचा अवलंब करून दाखवून दिले. या शक्तीला 'मनश्चलनशक्ति' (Psychokinesis) हे नाव देण्यात आले आहे. ही शक्ती जेव्हा एकदम, उत्स्फूर्तपणे व मोठ्या प्रमाणात प्रकट होते, तेव्हा त्याला भानामती (Poltergeist) असे म्हणतात. (हे प्रयोग यांत्रिक पद्धतीने फसवणूक अशक्य असलेल्या परिस्थितीत (Fraud Proof) हेल्मट स्मिट या शास्त्रज्ञाने नंतर यशस्वीपणे करून दाखवले आहेत.)

हे प्रयोग अत्यंत चिकाटीने कित्येक वर्षे करून ऱ्हाईन यांनी आपले निष्कर्ष "Extra-Sensory Perception" या ग्रंथात १९३४ साली प्रथम प्रसिद्ध केले असून येथे केलेल्या अत्यंत त्रोटक वर्णनावरून त्यातील कष्टाची किंवा दीर्घकालीन चिकाटी व परिश्रमाची कोणालाही कल्पना येणार नाही.

हे प्रयोग प्रसिद्ध झाल्यानंतर त्याविरुद्ध पुढील तीन प्रकारचे आक्षेप घेण्यात आले.

१) या प्रयोगात वापरलेले संख्याशास्त्र सदोष आहे.

२) शास्त्रीयतेच्या दृष्टीने या प्रयोगात पुरेशी काळजी घेण्यात आलेली नाही.

३) या प्रयोगात लबाडी (Fraud) आहे.

या आक्षेपांचा आता याच क्रमाने विचार करु.

१) भौतशास्त्रासारख्या इतर शास्त्रीय प्रयोगात जे संख्याशास्त्र वापरले जाते, तेच संख्याशास्त्र या प्रयोगातही वापरलेले असल्याने हा आक्षेप व्यर्थ आहे. शिवाय या प्रयोगात नेमके दोष कोठे आहेत, हे कोणीही सांगितलेले नाही. अमेरिकेच्या स्टॅटिस्टिकल इन्स्टिट्युटच्या अध्यक्षाने व आर. ए. फिशरसारख्या जगप्रसिद्ध संख्याशास्त्रज्ञाने या प्रयोगात

वापरलेले संख्याशास्त्र व्यक्तिश: तपासून ते निर्दोष असल्याचा निर्वाळा दिला आहे.

२) एकाच खोलीत समोरासमोर बसून हे प्रयोग सुरूवातीला केले गेल्यामुळे हा आक्षेप घेण्यात येतो. पण नंतर दोन वेगवेगळ्या खोल्यांत किंबहुना दोन वेगवेगळ्या इमारतीत बसून हे प्रयोग करण्यात आले आहेत. अशा प्रयोगातही तितकेच यश आलेले असल्याने हा आक्षेप फोल ठरतो.

३) इतर आक्षेप फोल ठरल्यानंतर 'लबाडी' हा बुद्धिवाद्यांचा आवडता आक्षेप नेहमी ठरलेला असतो. पण असे प्रयोग इतरांनीही करून पाहिलेले असून त्यांनाही असेच यश मिळाले असल्याने हाही आक्षेप फोल ठरतो.[८]

या संदर्भात आयसेंक या प्रसिद्ध मानसशास्त्रज्ञाचे एक विधान येथे उध्दृत करण्यासारखे आहे. तो म्हणतो, ''ज्यांना प्रथम अतींद्रिय शक्तीचे अस्तित्व मान्य नव्हते, नव्हे जे प्रारंभी त्याचे विरोधक होते, असे शेकडो मान्यवर व प्रतिष्ठित शास्त्रज्ञ व जगभर विखुरलेल्या सुमारे ३० विद्यापीठांतील संशोधनशाखा यांनी एकत्र येऊन अतींद्रिय शक्ती खरी आहे, हे दाखविण्यासाठी एक व्यापक कट केला आहे, असे जर कोणाला म्हणावयाचे नसेल, तर याविषयी नि:पक्षपाती मनुष्याला एकच निष्कर्ष काढावा लागतो, तो म्हणजे विज्ञानाला अज्ञात अशा मार्गाने दुसऱ्याचे मन व दूरस्थ वस्तू जाणण्याचे सामर्थ्य मानवी मनात आहे.''

"Unless there is a gigantic conspiracy involving some 30 university departments all over the world and several hundred highly respected scientists in various fields, many of them originally hostile to the claims of the psi researches, the only conclusion the unbiased observer can come to is that there are people who can obtain knowledge existing in other people's minds or in outer world by means as yet unknown to science."

## हे निष्कर्ष का मान्य नाहीत?

मी वर म्हटले आहे की, ग्रंथविस्ताराचा धोका पत्करूनही जी अतींद्रिय शक्तीची उदाहरणे दिली आहेत, ती अपवादात्मक असल्याने त्यांची आपण दखल घेत नाही, असे कांही बुद्धिवादी वैज्ञानिकांतर्फे सांगण्यात येते. म्हणून जे. बी. ऱ्हाईन यांनी अतींद्रिय शक्ती अपवादात्मक नसून सर्वसामान्य व्यक्तीतही सार्वत्रिक स्वरूपात (Universal) कमीजास्त प्रमाणात अस्तित्वात असल्याचे वैज्ञानिक पद्धतीने प्रयोग करून संख्याशास्त्राचा उपयोग करून सिद्ध केले. त्यानंतर तरी वैज्ञानिकांनी त्यांची दखल घ्यावयास नको काय? पण ती दखल त्यांनी घेतलेली नाही, ही वस्तुस्थिती आहे. याचे काय कारण असावे बरे? मॅक्डुगल या मानसशास्त्रज्ञाने एक तर्क केला आहे की, मध्ययुगीन

अंधश्रद्धा व जादूटोणा या विरूद्ध विज्ञानाने मिळवलेला विजय अतींद्रिय शक्तीचे अस्तित्व मान्य केले तर वाया जाईल, अशी शास्त्रज्ञांना भीती वाटते. त्यांना वाटते की, आपण या क्षेत्रात एक तसूभर मान्य केले तर लोक हातभर किंवा वावभर गृहीत धरतील व पुन्हा अंधश्रध्देचा सुळसुळाट होईल ! हा तर्क कितपत बरोबर आहे, हे सांगता येत नाही. पण शास्त्रज्ञ अत्यंत क्लिष्ट प्रयोग करून जे निष्कर्ष काढतात, त्यावरून सामान्य लोक आपले वर्तन ठरवत नाहीत. नांहीतर विज्ञानात आघाडीवर असलेल्या युरोप-अमेरिकेतच जादूटोणा Black Magic करणाऱ्यांचे संघ स्थापन झाले नसते !

खरे कारण माझ्या मते भावनिक आहे.[१] कांही लोकांना आपल्या आवडत्या सिद्धांताविरूद्ध एखादी घटना घडते, हेच मान्य होत नाही. ती घडावी ही गोष्टच त्यांना आवडत नाही, आणि जी गोष्ट आवडत नाही, ती घडतच नाही असे ते मानतात(आत्मवंचना!). मग एक तर तिच्याकडे दुर्लक्ष करणे किंवा ती खोटी आहे, हे सिद्ध करण्याचा प्रयत्न करणे, हे दोनच पर्याय त्यांच्यापुढे उरतात. ती खोटी आहे, हे सिद्ध करणे कठीण असल्यामुळे याविषयी प्रयोग करणाऱ्यांच्या हेतूविषयीच मग शंका घेण्यात येते. अतींद्रिय शक्तीवरील प्रयोगाबाबत लबाडी (Fraud) चा आरोप वरचेवर का करण्यात येतो, याचा यावरून उलगडा होईल. काही शास्त्रज्ञ मात्र अतींद्रिय शक्तीचे अस्तित्व अज्ञानातून किंवा निव्वळ आडमुठेपणातून नाकारतात, ही वस्तुस्थिती आहे. याविषयी आयसेंक हा मानसशास्त्रज्ञ म्हणतो की, ''एखाद्या क्षेत्रात नैपुण्य (Specialization) संपादन केलेल्या शास्त्रज्ञाचे मत इतर त्याने नैपुण्य संपादन न केलेल्या विषयात प्रमाण म्हणून स्वीकारणे धोक्याचे असते. कारण त्यात त्याचे ज्ञान शून्य असल्यामुळे आपल्या नैपुण्यक्षेत्रातील पूर्वग्रह त्यात घुसडून तो त्याविषयी आडमुठेपणा (Pigheadedness) स्वीकारतो.'' बऱ्याच तज्ज्ञ शास्त्रज्ञांचे अतींद्रियविषयक धोरण असे आडमुठेच आहे आणि त्याचे हेच कारण आहे.

आता कोणी म्हणेल की, अतींद्रिय शक्तीचे अस्तित्व वैज्ञानिक पद्धतीने सिद्ध केल्यानंतरसुद्धा ते आडमुठेपणाने नाकारणारे शास्त्रज्ञ खरोखरीच कोणी आहेत काय? ही पाहा उदाहरणे:

वॅरेन वीव्हर हा कम्युनिकेशन (दळणवळण) सिद्धांताचा संस्थापक शास्त्रज्ञ म्हणतो की, ''अतींद्रिय शक्ती मला बौद्धिकदृष्ट्या अस्वस्थ करणारी आणि मनाला यातनादायक वाटते, आणि म्हणून जे. बी. ऱ्हाईन यांनी सादर केलेले तिच्या आस्तित्वाविषयीचे पुरावे मला नाकारता येत नसले, तरी ते मी स्वीकारीत नाही.''

हेब हा मानसशास्त्रज्ञ खुलेपणाने म्हणतो की, अतींद्रिय शक्तीचे अस्तित्व सिद्ध करणाऱ्या आणखी (Further) पुराव्याची आपल्याला आता गरज नाही. कारण

त्या शक्तीच्या अस्तित्वाला काही अर्थ नाही. ती तर्कविरुद्ध व बुद्धीला न पटणारी आहे; आणि म्हणून ती आपणाला मुळीच मान्य नाही.[१०]

विल्यम जेम्स या प्रसिद्ध मानसशास्त्रज्ञापुढे एका आघाडीच्या जीवशास्त्रज्ञाने पुढील उद्‌गार काढल्याचे जेम्स याने आपल्या **'The Will to Believe'** या ग्रंथात म्हटले आहे. हा जीवशास्त्रज्ञ म्हणतो, "अतींद्रिय शक्ती खरी असली, तरी शास्त्रज्ञांनी एकत्र येऊन ती दडपून टाकली पाहिजे; किंवा सर्वांपासून ती लपवून ठेवली पाहिजे. कारण निसर्गाच्या एकवाक्यतेला (Uniformity of Nature) त्यामुळे बाधा येते व विज्ञानाचे कार्य चालणे अशक्य होते."

## बुद्धिवाद : विज्ञानाच्या प्रगतीतील एक अडथळा !

बुद्धीला पटत नाही म्हणून किंवा मनाला यातना देते म्हणून एखादे सत्य झाकून ठेवून विज्ञानाचे कार्य करणाऱ्या या शास्त्रज्ञांच्या वैज्ञानिक दृष्टिकोणाविषयी काय बोलावे ! नको असलेले वैज्ञानिक सत्य दडपून टाकू इच्छिणारे हे शास्त्रज्ञ मूल रडू लागले तर त्याला स्तनपान देण्याऐवजी त्याच्या तोंडात बोळा कोंबायला सांगतील ! अशा पद्धतीने विज्ञानाचे कार्य करणे बुद्धिवाद्यांना आवडत असले, तरी शास्त्रज्ञांनी तसे करणे ही विज्ञानवृत्तीशी प्रतारणा ठरेल. कारण बुद्धीला न पटणाऱ्या गोष्टी स्वीकारणे, हे विज्ञानाचे पहिले कर्तव्य असल्याचे विज्ञानाच्या जन्माचा इतिहासच सांगतो. वैज्ञानिक वृत्तीचा उदय पृथ्वी विश्वाच्या केंद्रभागी नसून ती एका कोपऱ्यात आहे या तत्कालीन लोकांच्या बुद्धीला न पटणाऱ्या कोपर्निकसच्या सूर्यकेंद्री सिद्धांतापासून झाला. वैज्ञानिक दृष्टिकोण आपल्या भावना -आपणास काय वाटते हे -बाजूला ठेवायला प्रथम सांगतो. (Dispassionate Attitude). आपल्या समोरच्या पुराव्यांवर प्रथम विश्वास ठेवायला, ते स्वीकारायला, विज्ञान सांगते. याउलट पुराव्यापेक्षा आपल्या विचारांना, आपणाला काय वाटते याला, बुद्धिवादी अधिक महत्व देतात. या दृष्टीने बुद्धिवाद हा विज्ञानाच्या प्रगतीतील एक अडथळा ठरतो. याविषयी ए. एन. व्हाईटहेड या प्रसिद्ध शास्त्रज्ञाच्या **Science and the Modern World** या ग्रंथातील पुढील (स्वैर अनुवाद केलेला) उतारा अभ्यसनीय आहे. "विज्ञानाचे मूळ स्वरूप बुद्धिवादाला विरोधी असेच राहिले आहे. गॅलिलिओच्या 'डायलॉग्ज ऑन दी टू सिस्टेम्स ऑफ द वर्ल्ड' या ग्रंथावरून हे स्पष्ट होते. गॅलिलिओ तत्कालीन बुद्धिवाद्यांचे म्हणणे खोडून काढण्यासाठी घटना कशा (How) घडतात, याबद्दल विज्ञानाला कर्तव्य असल्याचे वरचेवर सांगत राहतो; तर त्याचे बुद्धिवादी विरोधक त्या का (Why) घडतात, हे सांगणे विज्ञानाचे काम समजून स्वत:ला समाधानकारक असा एक सुसंगत बौद्धिक सिद्धांत तयार करतात व

वास्तविकतेकडे पूर्णपणे डोळेझाक करतात. गॅलिलिओ अपरिवर्तनीय व मुर्दाड वास्तविकता (Irreducible and Stubborn Facts) विचारात घेण्याचा सतत आग्रह धरतो. गॅलिलिओचे ऐतिहासिक बंड म्हणजे अथपासून इतिपर्यंत बुद्धिवादाला विरोध करणारी एक चळवळच होती... पाशवी वास्तविकतेचे (Brute Facts) चिंतन करण्यासाठी ते एक पाचारण होते. आणि ते पाचारण मध्ययुगीन चिवट बुद्धिवादाच्या विरोधावर आधारलेले होते.''

पृथ्वी विश्वाच्या केंद्रभागी स्थिर आहे, असे मानणाऱ्यांच्या बुद्धीला ती एका कोपऱ्यात असून सूर्याभोवती फिरते, ही पाशवी वास्तविकता मान्य नव्हती. कारण ती त्यांना आवडत नव्हती. तिच्याकडे (दुर्बिणीतून) डोळे उघडून पाहण्यास ते तयार नव्हते,[११] जसे आजचे शास्त्रज्ञ अतींद्रिय शक्तीच्या पुराव्याकडे पाहण्यास तयार नाहीत.(अधिक पुराव्याची गरज नाही, हे हेबचे म्हणणे वर दिलेच आहे) आणि पाहिले तरी ते सत्य स्वीकारण्यास ते तयार नव्हते. खुद्द फ्रान्सिस बेकन हा आघाडीचा शास्त्रज्ञ सूर्य केंद्रभागी असून पृथ्वी त्याच्या भोवती फिरते, हे कोपर्निकसचे खगोलशास्त्रीय सत्य मान्य करण्यास तयार नव्हता व हयातभर तयार झाला नाही, असे इतिहास सांगतो ! ज्या घटनेची सवय नाही जी एकदम अनोळखी आहे, ती स्वीकारण्यास माणसांचा नेहमीच विरोध होत आला आहे. मग भले ती माणसे शास्त्रज्ञ असोत ! (नव्या गोष्टींना जनावरेच बुजतात असे नाही!) कारण माणसाच्या बुद्धीला लागलेले वळण एकदम बदलू शकत नाही. जेव्हा टेलिग्राफचा शोध लागल्याचे एडिनबर्गच्या प्रोफेसर टेट यास सांगण्यात आले, तेव्हा तो म्हणाला की हे निव्वळ थोतांड आहे - शास्त्रीयदृष्ट्या हे घडणेच अशक्य आहे! एडिसनने शोध लावलेला फोनोग्राफ जेव्हा मायग्रॉन याने पॅरिसच्या अकॅडेमी ऑफ सायन्सच्या सभासदांपुढे प्रथम वाजवून दाखवला, तेव्हा त्यांनी मायग्रॉनवर असा आरोप केला की, मायग्रॉनने आवाजाची दिशाभूल करणाऱ्या माणसाला (Ventriloquist) कोठेतरी लपवून ठेवले असले पाहिजे! कारण त्यांच्या मते धातूच्या पत्र्यामध्ये मानवी आवाज निर्माण करण्याचे सामर्थ्य असणेच शक्य नाही! हिप्नॉटिझमला (संमोहनशास्त्र किंवा मोहिनी विद्या) सुद्धा प्रथम थोतांडच मानण्यात आले होते. हिप्नॉटिझम वैद्यकशास्त्रात वापरणारे लोक भोंदू असून त्यांची या व्यवसायातून हकालपट्टी केली पाहिजे, असे वैद्यकशास्त्रज्ञ म्हणत होते. जेव्हा हिप्नॉटिझमच्या साहाय्याने मोठ्या शस्त्रक्रियासुद्धा वेदना न होता करता येतात, असे प्रत्यक्ष दाखवून देण्यात आले, तेव्हा वैद्यकशास्त्रज्ञांनी हे अशक्य असून रुग्णांना या भोंदूनी लाच दिल्यामुळे ते रुग्ण वेदना होत नसल्याचे सोंग करतात असे म्हटले होते ! हिप्नॉटिझम हल्लीसुद्धा शास्त्रज्ञांना समजलेला नाही. पण त्याची शास्त्रज्ञांच्या बुद्धीला सवय झाल्यामुळे तो स्वीकारण्यात आला आहे. म्हणून अतींद्रिय शक्तीच्या अस्तित्वाला विरोध होतो, यात आश्चर्य नाही. आश्चर्य आहे

ते शंभर वर्षे या शास्त्रात कार्य होऊनही त्याला विरोध होतो आणि तोही शास्त्रज्ञांकडून याचे ! याला तसेच जबरदस्त कारण असले पाहिजे.

## विश्वाकडे पाहण्याच्या वैज्ञानिक दृष्टीत क्रांती

मी वर म्हटले आहे की, कांही लोकांना आपल्या आवडत्या सिद्धांताविरूद्ध एखादी घटना घडते हेच मान्य होत नाही, कारण ती त्यांना आवडत नाही. आणि जी घटना आवडत नाही, ती घडत नाही असे ते मानतात. पण अशा घटना वरचेवर घडू लागल्या तर? शास्त्रीय पद्धतीने त्या खऱ्या असल्याचे पुन:पुन्हा सिद्ध होत राहिले तर ? मग त्या घडतात, हे त्यांना मान्य करावे लागते. पण मग त्यांच्याशी आपले कर्तव्य नाही, अशी नवी भूमिका ते घेतात. त्यांच्याकडे ते सरळ दुर्लक्ष करतात! जणू त्या घडत नाहीत, अशा थाटात ते वागतात. ही त्यांची आत्मवंचना असली तरी तिची त्यांना फिकीर नसते. ते आपल्या स्वत:च आखून घेतलेल्या मर्यादित क्षेत्रात कार्य करीत राहतात. हल्ली काही शास्त्रज्ञांची हीच अवस्था असून ते असे का वागतात, याचे अनेकांना आश्चर्य वाटते. याचे एक साधे उत्तर असे आहे की, ते असे वागले नाहीत, तर त्यांची अवस्था दयनीय होते. त्यांच्या जीवनातील आशय व हेतूच नाहीसा होतो. त्यांना आपल्या पायाखालची जमीनच नाहीशी झाल्यासारखी वाटते ![१२] पण त्यांची अशी का अवस्था व्हावी? त्यांना असे का वाटावे?

हा प्रश्न विचारणाऱ्यांनी युरोपचा इतिहास आठवावा. पृथ्वी सूर्याभोवती फिरते, हे सत्य बोलून दाखवल्याबद्दल गॅलिलिओचा प्रस्थापितांनी अनन्वित छळ का केला? ब्रूनोला वधस्तंभावर जिवंत का जाळले ? परामानसशास्त्रज्ञांना निदान ही वागणूक मिळत नाही, हे त्यांनी आपले नशीब समजावे! वस्तुत: गॅलिलिओ आणि ब्रूनो यांनी हल्ली परामानसशास्त्रज्ञ जे करीत आहेत, त्याहून वेगळे काही केले नव्हते. त्यांनीसुद्धा या परामानसशास्त्रज्ञाप्रमाणेच प्रस्थापितांना मान्य नसलेले (आवडत नसलेले) पण खरे असलेले पुराव्यांसह जगापुढे मांडले. पण याबद्दल त्यांना जी वागणूक मिळाली, तिच्या पाठीमागची मनोवृत्ती समजून घेतली, तर हल्ली अतींद्रिय शक्तीच्या अस्तित्वाला विरोध करणाऱ्यांची मन:स्थिती समजेल. फरक इतकाच, मध्ययुगीन लोक प्रस्थापित धर्माच्या नावाखाली नव्याने उदय होणाऱ्या विज्ञानाला विरोध करीत होते. हल्लीचे लोक प्रस्थापित विज्ञानाच्या व बुद्धिवादाच्या नावाखाली नव्याने उदय होणाऱ्या परामानसशास्त्राला विरोध करीत आहेत. थोडक्यात हा सुद्धा पूर्वीप्रमाणेच एक अंधश्रद्धे विरूद्धचा लढा आहे (अर्थात बुध्दीवादाच्या नावाखाली वावरणाऱ्या नव्या अंध्दश्रध्देविरुध्दचा लढा !) हीही एक विश्वाकडे पाहण्याच्या दृष्टिकोणातील क्रांती आहे. (ती रक्तहीन आहे, म्हणून कमी

महत्वाची समजू नये !) हिला कोणी क्रांती म्हणणे पसंत करीत असले, तरी शास्त्रीय परिभाषेत तिला Paradigm Shift (विश्वाकडे पाहण्याच्या दृष्टिकोणातील बदल) असे संबोधतात. विश्वाकडे पाहण्याच्या टोलेमीच्या दृष्टिकोणाचा त्याग करून व कोपर्निकस दृष्टिकोणाचा स्वीकार करून मानवाने वैज्ञानिक प्रगतीमधील एक मोठे पाऊल उचलले. आता परत विश्वाकडे पाहण्याच्या बुद्धिवादी दृष्टिकोनाचा त्याग करून व परामानसशास्त्रीय दृष्टिकोणाचा स्वीकार करून मानवाने वैज्ञानिक प्रगतीतील दुसरे मोठे पाऊल उचलण्याची गरज निर्माण झाली आहे. पण हे पाऊल पूर्वीपेक्षाही अधिक जड ठरण्याची लक्षणे दिसत आहेत. कारण यात प्रस्थापित (रूढ) वैज्ञानिकांचे हितसंबंध गुंतले आहेत.

## भौतिकवादाला (Materialism) कायमची मूठमाती !

प्रस्थापितांना अतींद्रिय विज्ञानातील शोधामुळे आपल्या पायाखालची जमीनच नाहीशी होत आहे असे जे वाटते, ते बरोबर आहे काय? त्यांना भीती वाटत असावी, की अतींद्रिय विज्ञान हे प्रस्थापित वैज्ञानिक नियम खोटे ठरविते ! ते समजत असावेत की, अतींद्रिय विषयाचे संशोधक आपली सारी विवेकशक्ती व सारे ज्ञात नियम गुंडाळून ठेवतात व काय वाटेल ते घडेल अशी अपेक्षा बाळगतात! अतींद्रिय विषयाबाबत ही मोठी गैरसमजूत आहे. कारण अतींद्रिय विज्ञानातील घटना या भौत-विज्ञानातील कोणत्याही नियमांचे कधीच उल्लंघन करीत नाहीत, ही वस्तुस्थिती आहे. भौतविज्ञानातील ज्ञात नियमांनी त्या घटनांची उपपत्ती लावता येत नाही, म्हणून बुद्धिवाद्यांना त्या घटना ज्ञात नियमांचे उल्लंघन करतात असे वाटते. पण हा त्यांचा भ्रम आहे. पाण्यात काठी बुडविली तर ती वाकडी दिसते, म्हणून ती खरोखरीच वाकडी होते असे कोणीच म्हणत नाही. प्रकाशशास्त्राचे नियम माहीत नसणाऱ्याला या गोष्टीची उपपत्ती लावता येत नाही, म्हणून तो हा चमत्कार मानत नाही, की भ्रम आहे असेही म्हणत नाही; तर त्याला काहीतरी शास्त्रीय कारण असले पाहिजे, आपणास ते माहीत नाही, असे मानून तिकडे दुर्लक्ष करतो. बुद्धिवादी मात्र जिची त्यांना रूढ वैज्ञानिक नियमांनी उपपत्ती लावता येत नाही, त्या घटनेला चमत्काराच्या सदरात ढकलतात व त्यामुळे आपल्या स्थानाला धोका पोचतो, अशी चुकीची समजूत करून निष्कारण वाद माजवतात. हो ! त्यांचे मानीव (Assumed) स्थान मात्र खरोखरच धोक्यात आले आहे, हे मान्य केले पाहिजे. हे मानीव स्थान म्हणजे भौतिक जग व भौतिक नियम एवढेच खरे आहेत, असे मानणारा त्यांचा भौतिकवादी (Materialist) दृष्टिकोण होय. (आणि हे स्थान धोक्यात आले आहे म्हणूनच ते परामानसशास्त्राला कडाडून विरोध करीत असावेत काय?) कारण परामानसशास्त्रामुळे भौतिकवादाला कायमची मूठमाती मिळाली आहे! विश्वाविषयीच्या वैज्ञानिक दृष्टिकोणातील दुसऱ्या बदलाचे ते एक अनिवार्य फलित आहे.

## टिपा

१. ऐतिहासिकदृष्ट्या अतींद्रिय शक्ती हा विषय भुताटकी, अंगात येणे, जादूटोणा, चेटूक इत्यादी गोष्टींशी निगडीत असल्यामुळे या विषयाकडे पाहण्याचा माणसांचा दृष्टिकोण कधीच नि:पक्ष किंवा शास्त्रीय राहू शकलेला नाही. नेहमीच तो भावनात्मक राहिलेला आहे. त्यामुळे या विषयाच्या बाबतीत नेहमीच दोन अगदी टोकाचे दृष्टिकोण आढळून येतात. एक : याविषयी आंधळी श्रद्धा बाळगणे म्हणजे याविषयी पुराव्याचा विचार न करता सर्व काही खरे असते, असे मानणे व दुसरे याविषयी आंधळी अश्रद्धा बाळगणे म्हणजे याविषयी पुराव्याचा विचार न करता सर्व काही खोटे असते, असे मानणे. याविषयी खरे खोटे निवडणारा शास्त्रीय दृष्टिकोण असू शकतो, हे कळायला मनुष्याला नेहमी जड गेल्याचे दिसून येते. या बाबतीत पुरुषाच्या स्त्रीकडे पाहण्याच्या ऐतिहासिक दृष्टिकोणाशी या दृष्टिकोणाची तुलना करण्यासारखी आहे. इतिहासावरून दिसून येते की, पुरुषाचा स्त्रीकडे पाहण्याचा दृष्टिकोणही कधीच नि:पक्ष किंवा शास्त्रीय राहिलेला नाही. नेहमीच तो भावनात्मक राहिलेला आहे. या ऐतिहासिक - पौराणिक दृष्टीतून पाहता, असे दिसून येते की, पुरुषाने स्त्रीला एक तर देवता (किंवा जगन्माता) मानलेली आहे, नाहीतर चेटकीण (किंवा भोगदासी) मानलेली आहे. तिला बरोबरीचा माणूस म्हणून मानणे त्याला नेहमीच जड गेल्याचे दिसून येते. समाजशास्त्राने स्त्रीचा शास्त्रीय दृष्टिकोणातून विचार करून तिला जसे पुरुषाबरोबरीचे समाजात स्थान दिले आहे, तसे परामानसशास्त्राने अतींद्रिय विषयाकडे शास्त्रीय दृष्टीने पाहून त्याला विज्ञानात इतर वैज्ञानिक विषयाबरोबरीचे मानाचे स्थान दिले आहे. त्यामुळे स्त्रीला भोगदासी (किंवा चेटकीण) मानणाऱ्या जुन्या पुरुषप्रधान समाजातील पुरुषाप्रमाणे किंवा तिला देवता मानणाऱ्या जुन्या धर्ममार्तंडाप्रमाणे अतींद्रिय हे थोतांड मानणारे प्रस्थापित विज्ञानवादी व बुद्धिवादी व अतींद्रियातील सर्वच चमत्कार खरे मानणारे अंधश्रद्धाळू हे दोघेही अस्वस्थ होणे स्वाभाविक आहे !

२. अतींद्रिय शक्ती मुळात अस्तित्वातच नाही, असे अगोदरच गृहीत धरण्याचा विज्ञानवृत्तीला न शोभणारा पूर्वग्रहदूषित दृष्टिकोण स्वीकारून, केवळ कांही भोंदुगिरी करणाऱ्यांची उदाहरणे निवडून व कांही घटनांचा चुकीचा अर्थ लावून अभिनिवेशयुक्त उथळ व प्रचारकी धाटाचे (Propagandist) लिखाण करणाऱ्या श्रीलंकेच्या कोवूर या भौतिकवाद्याची **'Begone Godmen'** व **'Gods, Demons and Spirits'** ही दोन पुस्तके म्हणजे भारतीय कम्युनिस्टांचे प्रचारकी वाङ्‌मय होय. त्याची शास्त्रीय किंबहुना बौद्धिक किंमत शून्य आहे. ( या दोन्ही पुस्तकांना कम्युनिस्ट विचाराच्या मेनन नामक लेखकाने व केरळच्या ई. एम. एस्. नंबुद्रीपाद या मार्क्सवादी कम्युनिस्ट राजकीय पुढाऱ्याने प्रस्तावना लिहिल्या आहेत !) या दोन्ही पुस्तकांत परामानसशास्त्रातील शेकडो खऱ्या व प्रमाणीभूत (Documented) घटनांपैकी एकाही घटनेचा उल्लेख नाही. व जे. बी. ऱ्हाईन यांच्यावर खोटी टीका करणाऱ्या काही अप्रसिद्ध बुद्धिवाद्यांच्या मतांचे मात्र उल्लेख आवर्जून केले आहेत. ( या पुस्तकात सर्वत्र बुद्धिपुर:सर सत्याचा अपलाप

करण्यात आला असून अतींद्रिय शक्तीच्या संशोधनात आपली हयात घालविलेल्या ऱ्हाईनसारख्या शास्त्रज्ञावर, त्याला नीट निरीक्षणसुद्धा करता येत नसल्याचा आरोप करण्यात आला आहे. अतींद्रिय संशोधन क्षेत्रात लबाडी करणाऱ्या एका अप्रसिद्ध शास्त्रज्ञाचे उदाहरण देऊन सबंध परामानसशास्त्र लबाड ठरविणाचा अश्लाघ्य प्रयत्नही करण्यात आला आहे. या संदर्भात जेम्स डी. वॅटसन या नोबेल पारितोषिक विजेत्या जैवरसायन शास्त्रज्ञाने म्हटले आहे की, आपल्या जैवरसायन - Biochemistry या शास्त्रात प्रत्येक वर्षी एका तरी शास्त्रज्ञाची लबाडी उघडकीस येते. पण म्हणून ते शास्त्रच लबाड किंवा खोटे ठरत नाही.) अशक्य व चुकीच्या अटी घालून एक लाख रूपयांचे बक्षीस ठेवणाऱ्या व ते कोणी जिंकू शकलेले नाही म्हणून अतींद्रिय शक्ती खोटी म्हणणाऱ्या कोवूरच्या चेल्यांनी महाराष्ट्रातील (किंवा भारतातील) लोकांची अंधश्रद्धा नाहीशी करण्यापूर्वी रशियासारख्या कम्युनिस्ट देशातील शास्त्रज्ञांचा अतींद्रिय शक्तीवरील विश्वास कसा चुकीचा आहे, हे प्रथम दाखवून द्यावे. (त्यासाठी त्यांनी हवे तर आपल्या जवळचे - असतील तर - एक लाख रूपये खर्च करावेत.) त्यासाठी **"Psychic Discoveries Behind the Iron Curtain"** आणि **"The New Soviet Psychic Discoveries"** या दोन प्रसिद्ध ग्रंथातील अतींद्रिय शक्तीविषयी कम्युनिस्ट शास्त्रज्ञांचे शोध खोटे अगर चुकीचे आहेत, एवढे सिद्ध केले तरी पुरेसे आहे.

३. मृत्यूनंतरच्या अवस्थेविषयीचा (मृत्यूनंतर काय?) विचार हाही परामानसशास्त्रीय विषय असून त्याची चर्चा पुढील प्रकरणात करू.

## संदर्भ टिपा:-

१. "Nature is written in Mathematical Language"- Galileo. बुद्धिवादी विज्ञानाचा आपल्या मताच्या पुष्ट्यर्थ आधार घेत असले तरी बुद्धिवाद विज्ञानाने समर्थनीय ठरू शकत नाही. हे पुढे स्पष्ट केले आहे.(प्रकरण ६)

२. विल्यम जेम्स या प्रसिद्ध अमेरिकन मानसशास्त्रज्ञाने मिसेस पायपर नावाच्या माध्यमाची स्वत: अनेकदा परीक्षा घेऊन तिच्यात अतींद्रिय शक्ती असल्याची स्वत:ची खात्री झाल्यानंतर ''मिसेस पायपर हा माझा पांढरा कावळा आहे!'' असे याच कारणासाठी म्हटले होते.

३. एखाद्या विशिष्ट व्यक्तीच्या उपस्थितीतच अशा घटना घडून येत असल्याचे इतरत्रही आढळून आलेले असल्यामुळे या घटनांचे संशोधन करणाऱ्या मॅक्स प्लॅंक इन्स्टिट्युटच्या कार्गर या भौतशास्त्रज्ञाने या संबंधी असे क्रांतीकारक विधान केले आहे की, यापूर्वी भौतशास्त्रातील मूलभूत संशोधन म्हणजे भौतीक वस्तूचे संशोधन होते. येथून पुढे मात्र भौतशास्त्रातील मूलभूत शोध लावण्यासाठी मानवाचे संशोधन करावे लागणार आहे.

४. अतींद्रिय गोष्टीवर विश्वास नसणाऱ्या रूडयार्ड किपलिंग या प्रसिद्ध लेखकाला एकदा एक स्वप्न पडले आणि त्यातील सर्व तपशिलाप्रमाणे प्रत्यक्ष घडून आले, असे त्यानेच

लिहिले आहे. लंडन आणि न्यूयॉर्क येथे 'सेंट्रल प्रिमॉनिशन' रजिस्टर स्थापन केलेले असून जगातील सर्व देशातून भाकीते जमा करण्याचे ते काम करते. या रजिस्टरमध्ये पुढील सर्व घटनांची भाकीते अगोदरच नोंदविण्यात आली होती. उदा. : ओर्नेसिस टँकरची जलसमाधी, अंतराळातील सर्व प्रसिद्ध अपयशे, रॉबर्ट केनेडी व मार्टिन ल्यूथर किंग यांची हत्या, नासेरचा हृदयाघात, क्रुश्चेवचा मृत्यू आणि इतर अनेक घटना (Precognition and Retrocognition - D. Dean in **Psychic Exploration** - Ed. Edgar Mitchell 1974.)

५. लेखाचा विस्तार वाढेल म्हणून या सर्व लोकांची नावे देण्याचे मुद्दाम टाळले आहे. हे सर्व लोक आपापल्या क्षेत्रात तज्ज्ञ म्हणून प्रसिद्ध आहेत.

६. अमूक गोष्ट अमूक अटीखाली करून दाखविणाऱ्यास (जवळ नसलेल्या) एक लाख रूपयांचे बक्षीस देऊ करणारे कांही चाणाक्ष बुद्धिवादी मात्र मन म्हणजे एक लोखंडी गोळा नाही व त्यावर वाटेल तसे प्रयोग करून हव्या त्या परिणामाची अपेक्षा धरता येत नाही हे ओळखतात ! नाहीतर एक लाख रूपयांचे बक्षीस तेवढे रूपये जवळ नसताना त्यांनी देऊ केलेच नसते. (श्रीलंकेच्या कोवूरनी आपल्याजवळ एक लाख रूपये नसतानाही हे बक्षीस आपण जाहीर केले होते, हे मान्य केले आहे.)

७. भौतशास्त्रातील प्रयोगांचे पुनरावर्तित्वसुद्धा गणिती निश्चितीच्या (Mathematical Certainty) स्वरूपाचे नसून केवळ संभवनीयता (Probability) या स्वरूपाचे आहे, हे लक्षात ठेवावे.

८. कूव्हर या शास्त्रज्ञाने असे प्रयोग केले, पण त्याला यश आले नाही असे सांगण्यात येते. पण कूव्हरचा डाटा तपासून पाहिल्यानंतर असे आढळून आले की त्याचे संख्याशास्त्र चुकीचे होते व काढलेले निष्कर्षही चुकीचे होते ! जी. आर. प्राइस यानेही ऱ्हाईनवर लबाडीचा आरोप केला. पण १६ वर्षानंतर त्याला आपली चूक कळून आली व ज्या 'Science' या मातब्बर नियतकालिकात त्याने हा आरोप केला होता, त्याच नियतकालिकातून त्याने हा आरोप जाहीरपणे क्षमायाचनापूर्वक परत घेतला. हे शास्त्रीय वृत्तीला शोभणाऱ्या प्रामाणिकपणाचे एकमेव उदाहरण आहे. अशी माघार घेण्याची पाळीच येऊ नये अशा प्रकारची एका बुद्धिवाद्याने टीका केली आहे. ती वाचून कोणालाही हसू आल्यावाचून राहणार नाही. तो म्हणतो, ''परामानसशास्त्रीय परिणाम लबाडीने निर्माण करता येत असतील तर मग परामानसशास्त्रातील प्रयोग समाधानकारक मानताच येत नाहीत. मग प्रत्यक्ष प्रयोगात लबाडी असो वा नसो.'' (C. E. M. Hansel, **ESP : A Scientific Evaluation** 1966) या कसोटीवर सर्वच विज्ञान संशयास्पद व असमाधानकारक ठरते ! कोणताही शास्त्रीय प्रयोग प्रामाणिक म्हणून स्वीकारता येत नाही! जगात काही लोक फसवेगिरी करतात म्हणून संपूर्ण जग फसवणुकीवर चालते असे म्हणण्यासारखे हे आहे!

९. 'भावनिक' हा व्यावहारिक भाषेतील शब्द झाला. शास्त्रीय पारिभाषेत याला Anosognosia म्हणतात. या मनोविकृतीत उजव्या मेंदूला जे कळते ते डावा मेंदू स्वीकारत

नाही. तर्कशुद्ध वा सुसंगत विचार करणे हे डाव्या मेंदूचे कार्य आहे. तर उजव्या मेंदूला तर्कातील विसंगतीही खपते. उजवा मेंदू जेव्हा तर्काला न पटणारे स्वीकारायला सांगतो तेव्हा डावा मेंदू त्याविरूद्ध बंड करतो व तार्किक वा 'शास्त्रीय' सुसंगतीच्या नावाखाली वास्तवे नाकारण्याचे तंत्र अवलंबतो. यालाच व्यावहारिक भाषेत आत्मवंचना (Self-deception) म्हणतात.

१०. हेब म्हणतो- "I do not accept ESP for a moment because it does not make any sense... My own rejection of Rhine's views is, in the literal sense prejudiced." यावर आल्डस हक्सलेने असे म्हटले आहे, "That a man of science should allow a prejudice to outweigh evidence seems strange enough. It is even stranger to find a psychologist rejecting a psychological discovery simply because it cannot be explained. Psi...is intrinsically no more inexplicable than, say, perception or memory."

११. पहिली दुर्बीण तयार करणाऱ्या गॅलिलिओने यासंबंधी केपलरला लिहिलेल्या पत्रात अशी तक्रार करून म्हटले आहे, "Oh my dear Kepler, how I wish that we could have one hearty laugh together! Here at Padua is the principal professor of philosophy, whom I have repeatedly and urgently requested to look at the moon and planets through my glass which he pertinaciousluy refuses to do." **The Metaphysical Foundations of Modern Physical Science** - by E. A. Burtt. (1954)

१२. अप्टन सिंक्लेअर हा लेखक आपल्या **Mental Radio** या ग्रंथात म्हणतो की, त्याच्या टी. एच. बेल या भौतवादी मित्राने त्याच्याजवळ असे कबूल केले की, तो टेलीपथी (परचित्तज्ञान) मान्य करूच शकत नाही. कारण ते मान्य केले तर ज्या मूलभूत कल्पनांवर त्याचे सारे जीवन आधारलेले आहे, त्या कल्पनाच सोडून दिल्यासारखे होईल ! (Abandoning the fundamental notions on which his whole life is based).



४

# विज्ञानाच्या दृष्टिकोणातून मरणोत्तर अस्तित्व

*[परामानसशास्त्र मरणोत्तर अस्तित्वाचेही संशोधन करते आणि म्हणून परामानसशास्त्राच्या बुद्धिवादी विरोधकांना ओघानेच मरणोत्तर अस्तित्वही नाकारणे भाग पडते. (खरे म्हणजे मरणोत्तर अस्तित्वाला - परलोकाच्या कल्पनेला -त्यांचा मुळात विरोध असल्यामुळे आणि त्याचा परामानसशास्त्र अभ्यास करीत असल्यामुळेच त्या शास्त्राला त्यांचा विरोध असतो.) काहीजण मात्र (यात बुद्धिवाद्यांचा समावेश होत नाही.) मरणोत्तर अस्तित्व नाकारण्यासाठी अतींद्रिय शक्तीचा आधार घेतात. म्हणजे हे लोक अतींद्रिय शक्तीच्या अस्तित्वामुळे मरणोत्तर अस्तित्वाच्या तथाकथित पुराव्याची उपपत्ती लावता येते व त्यामुळे मरणोत्तर अस्तित्व मानण्याची गरज नाही असे म्हणतात. अशा रीतीने मरणोत्तर अस्तित्व नाकारण्यासाठी अतींद्रिय शक्तीचे अस्तित्व मान्य करण्यावाचून गत्यंतर नाही हे या लोकांना मान्य करावे लागत असल्यामुळे यांना बुद्धिवादी म्हणता येत नाही. तसे स्वत:ला विज्ञानवादी मात्र ते अवश्य म्हणवून घेतात आणि याच विज्ञानवादी दृष्टिकोणातून ते मरणोत्तर अस्तित्व नाकारत असतात. पण अतींद्रिय शक्तीचे अस्तित्व नाकारण्यासाठी बुद्धिवादी उपयोगात आणत असलेल्या युक्तिवादाप्रमाणेच मरणोत्तर अस्तित्व नाकारण्यासाठी उपयोगात आणत असलेले या तथाकथित विज्ञानवाद्यांचे युक्तिवादही वैज्ञानिक निकषावर टिकत नाहीत असे आढळून येते. म्हणजेच बुध्दिवाद्याप्रमाणेच हे तथाकथित विज्ञानवादीही पूर्ण व खऱ्या अर्थाने विज्ञानवादी नाहीत असे ठरते. हे कसे हे येथे दाखवून देण्याचा प्रयत्न केला असून त्यामुळे विज्ञानवादाचा मुखवटा घातलेल्या बुद्धिवादाची (भौतवादाची) कशी पीछेहाट होत आहे हे स्पष्ट होते.]*

मानवी संस्कृतीच्या प्राचीन अवशेषापैकी बहुसंख्य अवशेष हे मानवाच्या प्रेत संस्काराच्या प्रथेतून मिळालेले असून हे अवशेष उपलब्ध झाले नसते, तर मानवाच्या प्रागैतिहासिक (Prehistory) कालाविषयीची आपली माहिती फारच तुटपुंजी राहिली असती. निअँडर्थल मानवापासून आधुनिक मानवापर्यंत प्रेतसंस्कार आणि मरणोत्तर अस्तित्वाविषयीच्या कल्पना हा एक समान धागा आढळून येतो. मानवी इतिहासाच्या दृष्टीने हा एक अतिशय महत्वाचा धागा असून अर्नोल्ड टॉयंबी या प्रसिद्ध इतिहासकाराने असे म्हटले आहे की, मरणोत्तर जीवनाविषयी प्राचीन मानवाला आस्था वाटली नसती,

तर त्याच्या मरणपूर्व जीवनाविषयीच्या माहितीला आपण मुकलो असतो.[१]

## मरणोत्तर अस्तित्वाच्या कल्पनेची सार्वत्रिकता

मानवाला मरणानंतरच्या अवस्थेविषयी नेहमीच का कुतूहल वाटत आले आहे बरे? वास्तविक जीवनाच्या झगड्यात नामशेष (Extinct) झालेल्या नीअँडर्थल मनुष्याला भौतिक जगापलीकडे काहीच दिसावयास नको होते. नग्नावस्थेत वावरणाऱ्या प्राथमिक अवस्थेतील मानवालासुद्धा मरणोत्तर अवस्थेचा का विचार करावासा वाटला बरे? हाच विचार तत्त्वज्ञानाच्या अत्यंत प्रगत अवस्थेतील मानवालासुद्धा करावासा वाटावा, हा केवळ योगायोग आहे काय?[२] एखादा विचार सार्वत्रिक स्वरूपात आढळावा, ही गोष्ट त्या विचाराच्या सामर्थ्याचे द्योतक नाही काय? पण एखादा विचार सामर्थ्यशाली आहे, म्हणून तो खरा आहे, असे म्हणता येईल काय? किंवा एखादा विचार सार्वत्रिक आहे म्हणून त्यात बराच तथ्यांश असला पाहिजे, असे तरी म्हणता येईल काय? प्रत्येक गोष्ट विज्ञानाच्या कसोटीवर तपासून पाहण्याच्या हल्लीच्या युगात असे कोणीच म्हणणार नाही. मरणोत्तर अस्तित्वावरील श्रद्धा कितीही बलवत्तर वा सार्वत्रिक असली तरी तिला वैज्ञानिक आधार शोधण्याची प्रवृत्ती हल्ली सर्वत्र दिसून येत असून ती या दृष्टीने स्वागतार्ह म्हटली पाहिजे.

## मरणोत्तर अस्तित्वाविरुद्ध तात्त्विक आक्षेप

मरणोत्तर अस्तित्व हा वैज्ञानिक संशोधनाचा विषय होऊ शकत नाही, असा तात्त्विक दृष्टिकोणातून काही जणानी आक्षेप घेतला आहे.[३] या लोकांचे म्हणणे असे की, विज्ञान हे स्थलकालाच्या चौकटीत राहून कार्य करीत असल्यामुळे व मरणोत्तर अस्तित्वाची कल्पना ही स्थलकालातीत असल्यामुळे तिचे वैज्ञानिक संशोधन अशक्य आहे. हल्ली अतींद्रिय संशोधन विज्ञानमान्य झाले असल्यामुळे या आक्षेपाचा विचार करण्याची मुळीच गरज नाही. तथापि विज्ञान स्थलकालाच्या चौकटीत राहून कार्य करते, ही कल्पनाच चुकीची असल्याचे खुद्द भौतवैज्ञानिकांनीच दाखवून दिले असून त्यामुळे हा आक्षेप मुळातच अस्थानी ठरतो.[४] मरणोत्तर अस्तित्वाची कल्पना त्रिमितीमध्ये करता येत नाही, हे खरे आहे. पण इलेक्ट्रॉनचीही कल्पना त्रिमीतीमध्ये करता येत नाही. म्हणून इलेक्ट्रॉनच अस्तित्वात नाही, असे शास्त्रज्ञ म्हणत नाहीत किंवा त्याविषयी प्रयोग व संशोधन करणे अशक्य आहे, असेही समजत नाहीत.

अतींद्रिय शक्ती खरी आहे, हे मान्य केले तरी त्यामुळे मरणोत्तर अस्तित्व सिद्ध होत नाही, असे काहीजण म्हणतात. कारण त्यांच्या मते अतींद्रिय शक्तीची उपपत्ती स्थलकालाच्या मर्यादेत राहून कार्य करणाऱ्या भौतिक विज्ञानाच्या साहाय्याने लावता येणे शक्य आहे. त्यासाठी मरणोत्तर जगाचे अस्तित्व गृहित धरण्याची जरूरी नाही.[५]

टेलिपथी (परचित्तज्ञान), क्लेअरव्हॉयन्स(दूरवस्तुज्ञान) या अतींद्रिय शक्ती मरणोत्तर अस्तित्व सिद्ध करतात, असे कोणीच म्हणत नाहीत. टेलिपथी व क्लेअरव्हॉयन्स यांची रूढ विज्ञानाच्या कल्पनांनी उपपत्ती लावता येते, असे समजले तरी, (हे हल्ली शक्य झालेले नाही, मात्र टॅकीयान व न्यूट्रिनोसारख्या कल्पित- Hypothetical - कणांच्या साहाय्याने टेलिपथीची उपपत्ती लावण्याचा काहींनी प्रयत्न केला आहे.) भविष्यज्ञानाबद्दल असे म्हणता येत नाही. कारण भविष्यज्ञान (प्रीकॉग्निशन) हे रूढ विज्ञानात मुळीच बसत नाही.[६] इतकेच नव्हे, तर भविष्यज्ञान हे भौतिक जगापलीकडे आणखी एक अदृश्य जग असल्याचे सूचित करते. हे कसे ते शेजारच्या आकृतीवरून स्पष्ट होईल. (आकृती नं. १ पाहा.)




**आकृती क्र. १**

अ, आ, इ, ई या लांबी व रूंदी या दोनच मिती असलेल्या पातळीतून घोड्याच्या नालेच्या आकाराच एक लोहचुंबक हळूहळू वरून खाली सरकवला जात आहे, अशी कल्पना करा. या नालेला चित्रात दाखविल्याप्रमाणे चार रंगाचे भाग आहेत असे समजा. लांबी व रुंदी या दोनच मिती असलेल्या अ, आ, इ, ई पातळीवरील प्राण्यांना नालेच्या आकाराचा चुंबक दिसणार नाही हे उघड आहे. तर जेथे तो चुंबक त्या पातळीला छेदतो तेथे त्यांना दोन मितीची चौरसे दिसतील. जसजसे नाल खाली सरकवली जाईल तसतसे त्या प्राण्यांना त्या त्या रंगाची चौरसे दिसू लागतील. हल्ली पांढऱ्या रंगाची चौरसे कोठे आहेत ? असे त्यांना विचारले तर ती भूतकाळात गेली, हल्ली पांढऱ्या रंगाची चौरसे अस्तित्वात नाहीत. हल्ली हिरव्या रंगाची चौरसे अस्तित्वात आहेत, असे ते म्हणतील. तांबड्या रंगाच्या चौरसाबद्दल विचारले तर ती भविष्यकाळात आहेत,

असे ते म्हणतील. तीन मितीच्या पातळीवरील आम्हाला मात्र संपूर्ण नाल दिसत असल्यामुळे सर्व रंगाची चौरसे हल्ली (वर्तमानकाळातच) अस्तित्वात आहेत असे आम्ही म्हणू. दोन मितीच्या पातळीवरील प्राण्यांना हे कसे शक्य आहे असा प्रश्न पडेल. भविष्यकाळातील वस्तू वर्तमानकाळात कशी असेल (व म्हणून दिसेल) असे ते म्हणतील. पण समजा, या दोन मितीच्या जगातील प्राण्यांना असे आढळून आले की, त्यांच्यापैकी काही व्यक्तींना भविष्यज्ञान होऊ शकते, तर ते आपला दृष्टिकोण बदलतील व भविष्यकालाचे ज्ञान हे अतींद्रिय ज्ञान असून ही अतींद्रिय ज्ञानवस्तू वस्तुत: भविष्यकालात नसून वर्तमानकालातच आहे, पण आपल्या दोन मितीच्या जगातील वर्तमानकालात ती नसून तीन-मितीच्या जगातील वर्तमानकालात आहे, असा सिद्धांत ते मांडतील. हे तीन मितीचे जग जाणण्यासाठी आम्हाला आपले दोन मितीचे जग ओलांडून जावे लागेल म्हणजे मरावे लागेल, असे ते म्हणतील. म्हणजेच मरणोत्तर तीन मितीच्या जगाच्या अस्तित्वाचा सिध्दांत ते अतींद्रिय भविष्य-ज्ञानाच्या आधारावर मांडतील.

दोन मितीच्या जगातील प्राण्यांच्या जागी तीन मितीच्या जगातील आम्ही आहोत अशी कल्पना केली व आमच्यातील काही व्यक्तींना भविष्यज्ञान होऊ शकते असे आम्हाला आढळून आले, तर आम्हालाही असाच सिध्दांत मांडावा लागेल. आणि प्रत्यक्षात मनुष्याला भविष्यज्ञान होऊ शकते, असे प्रयोगांती आढळून आले आहे.[७] आणि त्याच्या आधारावर चार (अगर जास्त) मितीचे मरणोत्तर जग असल्याचा सिध्दांत तात्त्विकदृष्ट्या आम्हाला स्वीकारावा लागेल. (आकृती क्र. २ पाहा.)




**आकृती क्र. २**

*सरळ रेषेवरील व्यक्तीच्या दृष्टीने कालाची विभागणी भूत, वर्तमान व भविष्य अशी झालेली असली तरी रेषेबाहेरील व्यक्तीला तिन्ही कालाचे ज्ञान एकाच वेळी होईल. सरळ रेषा हे आपले जग व रेषेबाहेरील जग हे मृतात्म्यांचे जग होय.*

दोन मितीच्या जगातील प्राण्यांची कालाची कल्पना जशी तीन मितीच्या जगातील आमच्या दृष्टीने चुकीची ठरते, तसे तीन मितीच्या जगातील आमची कालाची कल्पना - भूत-वर्तमान - भविष्य ही कालाची विभागणी - चार मितीच्या मरणोत्तर-

जगातील लोकांच्या (मृतात्म्यांच्या) दृष्टीने चुकीची ठरते. (म्हणजे प्रत्यक्ष भविष्यज्ञान होत असल्यामुळे रूढ विज्ञानाचा भविष्यज्ञान (Precognition) अशक्य असल्याचा सिद्धांत खोटा तर ठरतोच, पण तात्त्विकदृष्ट्या चुकीचाही ठरतो). दोन मितीच्या जगातील प्राण्यांना आमच्या तीन मितीच्या जगाची जशी कल्पना करता येत नाही, तशी तीन मितीच्या जगातील आम्हालाही मरणोत्तर (चार मितीच्या) जगाची कल्पना करता येणार नाही.[८] मरणोत्तर जगाचे अस्तित्व विज्ञानपद्धतीने म्हणजे तीन मितीच्या जगातील कल्पनेने व भाषेने सिद्ध करण्यातील ही अडचण नेहमीच राहील हे उघड आहे.

अशा रीतीने मरणोत्तर अस्तित्व (वा जग) तात्त्विकदृष्ट्या शक्य असल्याचे सिद्ध केले, तरी ते वैज्ञानिकदृष्ट्या सिद्ध झाले असे होत नाही. त्यासाठी वैज्ञानिक दृष्टिकोणातून पुरावे सादर करावे लागतील. पण काहींनी मरणोत्तर अस्तित्वाविरूद्ध वैज्ञानिक दृष्टिकोणातून काही युक्तिवाद केले असून त्यांची प्रथम दखल घेणे प्राप्त आहे.

## मरणोत्तर अस्तित्वाविरुद्ध वैज्ञानिक युक्तिवाद

हे सर्व शरीरशास्त्र (Physiology) आणि मज्जाशास्त्र (Neurology) यावर आधारले आहेत. म्हणजे मन हे स्वतंत्र तत्त्व नाही, ते मेंदूवर आधारलेले आहे, मेंदूपासून ते वेगळे नाही (Identity Theory) असे ते प्रतिपादन करतात. त्यासाठी पुढील पुरावे देण्यात येतात.

जाणीव (Consciousness) ही मेंदूशी, म्हणजे जिवंत व्यक्तीशी नेहमी संलग्न असल्याची दिसून येते. शरीर नष्ट झाल्यावर, किंवा डोक्याला जबर मार दिल्यावर, किंवा भुलीचे औषध दिल्यावर जाणिवेची परिचित बाह्य लक्षणे नाहीशी होतात. तसेच अफू, गांजा, मद्य इ. अमली पदार्थांचे सेवन केले तर मनाच्या अवस्थेत लक्षणीय बदल घडून येतो. तसेच निरनिराळ्या इंद्रियांचे उद्दीपन केले तर मनावर त्याचा परिणाम निरनिराळ्या स्वरूपात होतो. मेंदू व इंद्रिये यांना जोडणारे मज्जातंतू तोडले तर मनाला इंद्रियज्ञान होत नाही. तसेच मेंदूचा एखादा भाग शस्त्रक्रियेने वा अपघाताने नष्ट झाला किंवा इतर भागांपासून अलग केला (Prefrontal Lobotomy) तर मानसिक सामर्थ्य वा जाणीव वा व्यक्तित्वही बदलते. यावरून मन हे स्वतंत्रपणे अस्तित्वात नसून मज्जासंस्थेवर व मेंदूवर ते पूर्णपणे अवलंबून आहे हे सिद्ध होते. मेंदू नष्ट झाला, तर मनही नष्ट होते असे मानणेच सयुक्तिक आहे, हे यावरून स्पष्ट होईल.

उत्क्रांतीच्या दृष्टीने पाहिले तर निरनिराळ्या प्राण्यांच्या मेंदूची उत्क्रांती निरनिराळ्या पातळीवर दिसून येते व तदनुरूप त्यांची बुद्धीही निरनिराळ्या पातळीची दिसून येते. ही गोष्ट बुद्धी मेंदूहून वेगळी नाही हे सिद्ध करते.

हा युक्तिवाद तात्त्विक दृष्टीनेही समर्थनीय असल्याचे सांगण्यात येते. मन हे स्वतंत्र तत्त्व मानले तर विज्ञानाच्या एका मुलभूत तत्त्वाला बाधा येते असे सांगण्यात येते. हे तत्त्व म्हणजे शक्तीच्या अविनाशित्वाचे तत्त्व होय. (Principle of conservation of energy). कारण मनामुळे शरीरात चलनवलनादी क्रिया होतात. याचा अर्थ मनामुळे शरीरात एकदम शून्यातून अतिरिक्त शक्ती निर्माण होते असा होतो. शिवाय अभौतिक मन भौतिक शरीरावर कसा परिणाम करू शकेल? हा अडचणीचा प्रश्न आहेच. कारण, कार्य आणि कारण ही एकाच स्वरूपाची -एकाच पातळीवर चालणारी- प्रक्रिया आहे. या सर्व कारणासाठी मन हे मेंदूहून भिन्न नसून ते मेंदूतील भौतरासायनिक प्रक्रियांचा परिपाक आहे, असे मानणेच युक्त होय. आणि मेंदू नष्ट होताच म्हणजे मृत्यूच्या वेळी मनही नष्ट होते, असे मानणेच वैज्ञानिकदृष्ट्या युक्त होय. [१]

व्यक्तिमत्वाच्या दृष्टीने पुढील युक्तिवाद करण्यात येतो. मनुष्याच्या मृत्यूनंतर त्याचे मन किंवा आत्मा शिल्लक राहात असेल तर त्याची सर्व लक्षणेही शिल्लक राहिली पाहिजेत. या लक्षणांनाच आपण व्यक्तिमत्व (Personality) म्हणतो. पण व्यक्तिमत्व हे अनुभवातून तयार होते. आणि अनुभव जिवंतपणी मिळतात. मृत्यूनंतर अनुभव कसे मिळणार आणि व्यक्तिमत्व शाबूत कसे राहणार हा प्रश्न आहे. अनुभवातून व्यक्तिमत्व हळूहळू तयार होणे म्हणजे दगडविटापासून हळूहळू घर बांधले जाणे होय. आणि मृत्यू म्हणजे बांधलेले घर नष्ट होणे होय. घर नष्ट झाल्यावर घराचा आत्मा किंवा घराचे व्यक्तिमत्व मागे राहते हे म्हणणे जितके खरे, तितकेच माणसाचे शरीर नष्ट झाल्यावर त्याचा आत्मा अगर व्यक्तिमत्व मागे राहते हे म्हणणे खरे आहे.

या विचारसरणीला शरीरशास्त्रीय बैठक दिली, तर जो दृष्टीकोण तयार होतो, त्याला वर्तनवाद (Behaviourism) म्हणतात. या दृष्टिकोणानुसार भावना, विचार, इच्छा इत्यादींना स्वतंत्र अस्तित्व नाही. ती केवळ भिन्न भिन्न रूपात प्रकट झालेल्या शारीरिक वर्तनाला दिलेली नावे आहेत. जाणीव किंवा मन म्हणूनही काहीअस्तित्वात नाही. अस्तित्वात आहे ते फक्त वर्तन होय.

वरील सर्व युक्तिवाद मनाचे स्वतंत्र अस्तित्व नाकारतात व शरीर हे एक यंत्र आहे, व मेंदू हा एक संगणक (कॉम्प्युटर) आहे असे गृहीत धरतात. हे यंत्र अर्थात भौतरासायनिक घटकांनी बनलेले आहे (Physico-chemical Machine) पण हे यंत्रच आहे. आणि हे यंत्र नष्ट झाले तर त्याचा आत्मा मागे राहतो या म्हणण्यात जितके तथ्य आहे तितकेच शरीर नष्ट झाले तर त्याचा आत्मा मागे राहतो या म्हणण्यात तथ्य आहे, असा या मतप्रणालीच्या लोकांचा युक्तिवाद आहे. ही मतप्रणाली शरीरशास्त्रीय आणि

मज्जाशास्त्रीयदृष्ट्या बरोबर असेल, तर मरणोत्तर अस्तित्वाची भाषा करणे हा वैज्ञानिक मूर्खपणा ठरतो. म्हणून या मतप्रणालीची शास्त्रीयदृष्ट्या चिकित्सा करणे आवश्यक आहे.

## विज्ञानातील यंत्रवाद: युक्तिवादांना उत्तर

१९ व्या शतकात, विश्व हेच एक प्रचंड यंत्र आहे, असे शास्त्रज्ञ मानत होते. पण या शतकाच्या प्रारंभी भौतविज्ञानात लागलेल्या क्रांतिकारक शोधामुळे शास्त्रज्ञांना ही कल्पना सोडून द्यावी लागली. शरीरशास्त्रज्ञ व मज्जाशास्त्रज्ञ मात्र आपल्या क्षेत्रात ही कल्पना सोडून द्यायला अजूनही तयार नाहीत. याचे कारण या शास्त्रात व यांना आधारभूत असलेल्या जीवशास्त्रात यंत्रवादी दृष्टिकोण स्वीकारल्यामुळे या शास्त्रात प्रगती झाली आहे, हे खरे आहे. त्यामुळे यंत्रवादाला व भौतिकवादाला तात्त्विक विरोध करणारे शास्त्रज्ञसुद्धा हा दृष्टिकोण संशोधनासाठी स्वीकारत असल्याचे दिसून येतात.[१०] पण भौतिकवादी व यंत्रवादी दृष्टिकोणामुळे जीवशास्त्रात प्रगती झाली आहे, म्हणून तो दृष्टिकोण बरोबर आहे असे ठरत नाही. एखाद्या दृष्टिकोणाचा खरेखोटेपणा ठरविण्यासाठी विज्ञानाचे स्वतंत्र निकष आहेत. या निकषावर यंत्रवादी व भौतिकवादी दृष्टिकोण जीवशास्त्रात बरोबर ठरतो का ? हा प्रश्न आहे.

रेण्विक जीवशास्त्रातील (Molecular Biology) अलीकडच्या काळातील प्रचंड यशामुळे जीवाच्या यांत्रिक कल्पनेला जोराची चालना मिळाली आहे. जीवाविषयीच्या या यंत्रवादी कल्पनेचा पुरस्कार जॅक् मोनो या नोबेल पारितोषिक - विजेत्या रेण्विक जीवशास्त्रज्ञाने आपल्या **Chance and Necessity** या ग्रंथात हिरीरीने केला आहे. (हा फ्रेंचमधून इंग्रजीत भाषांतर केलेला ग्रंथ आहे.) पण या कल्पनेचा प्रतिवाद अनेक मातब्बर -आणि त्यापैकी काही नोबेल पारितोषिक विजेते असलेल्या- शास्त्रज्ञांनी आपल्या या विषयावरील ग्रंथात तितक्याच समर्थपणे केला आहे. (उदा. एल्सासर,[११] पोलॅन्यी,[१२] बेलॉफ्,[१३] कोएस्लर,[१४] पॉप्पर आणि एक्लीस,[१५] थोर्प[१६] इत्यादी) त्यांच्या युक्तिवादाची चर्चा येथे करण्याचे कारण नाही. यंत्राच्या वैज्ञानिक निकषाला जीव उतरतो का? हा आपल्यापुढील मुख्य प्रश्न आहे. यंत्रातील निरनिराळे घटक सुटे करून पुन्हा जोडता येत असल्यामुळे व ते जोडल्यानंतर यंत्र पूर्ववत् कार्य करू शकत असल्यामुळे या सुट्या घटकांहून अतिरिक्त अशा 'यंत्र-आत्म्या' च्या गृहीतकृत्याची जशी जरूरी नाही, तशी जीवपेशीतील भौतरासायनिक घटकांहून वेगळ्या 'जीवतत्त्वा' च्या (Life Principle) किंवा 'जीवात्म्या' च्या (Soul) गृहीतकृत्याची आवश्यकता नाही, असे यंत्रवाद्यांचे म्हणणे आहे. कारण भौतरासायनिक घटकांद्वारा सर्व जैविक प्रक्रियांची व जाणीवेची उपपत्ती लावता येते, असा यंत्रवाद्यांचा व भौतवाद्यांचा दावा आहे.[१७] हा दावा खरा आहे काय? हा पहिला प्रश्न आणि यंत्राप्रमाणे जीवपेशीतील

भौतरासायनिक घटक सुटे करून व परत जोडून पूर्ववत कार्य करू शकणारी जीवपेशी तयार करणे, जीवशास्त्रज्ञांना शक्य झाले आहे काय? हा दुसरा प्रश्न. या दोन्ही प्रश्नांची स्पष्ट नकारात्मक उत्तरे आहेत. मग हे दावे का करण्यात येतात?आज शक्य नसले तरी भविष्यात हे शक्य होईल असे या यंत्रवादी व भौतवादी लोकांचे म्हणणे असून हल्लीच्या अज्ञानावर कोणताही (जीववादी वा अध्यात्मवादी) सिद्धांत रचणे चुकीचे आहे, असा त्यांचा याविषयीचा युक्तिवाद आहे. पण हा युक्तिवाद फसवा आहे. कारण जीववादी वा अध्यात्मवादी सिद्धांत हल्लीच्या अज्ञानावर रचण्यात आलेला नसून जीवशास्त्रातील शोधावर तो रचलेला आहे. उदा. भ्रूणावस्थेतील बेडकाच्या (Embryo Frog) पाठीवरील त्वचापेशी त्याच्या मेंदूच्या जागी बसवल्या, तर नवीन जागेत त्या त्वचा पेशी, त्वचा पेशी न राहता मेंदूपेशीत रूपांतरित होतात व मेंदूचे कार्य करू लागतात असे आढळून येते. शेपटीतील पेशी डोळ्याच्या जागी बसवल्या, तर डोळ्याऐवजी तेथे शेपूट तयार होत नाही, तर डोळाच तयार होतो, असे आढळून येते. यंत्रवाद खराअसेल तर असे व्हायला नको आहे. हे शोध अशा रीतीने यंत्रवादात बसत नाहीत. स्वत: जॅक मोनो याने हे शोध यंत्रवादात बसत नसल्याचे आपल्या उपरोक्त ग्रंथात मान्य केले आहे. इतकेच नव्हे तर या घटनांचे वर्णन (त्यांची उदाहरणे न देता) त्याने चमत्कारयुक्त (Miraculous) या शब्दात केले आहे. (मात्र यंत्रवादाच्या दृष्टीने या घटना चमत्कारयुक्त असल्या तरी जीववादी व अध्यात्मवादी दृष्टीने त्या तशा नाहीत.)

जीववादाविरूद्ध किंवा अध्यात्मवादाविरूद्ध ज्युलियन हक्स्ले, डोब् झान्स्की इत्यादी शास्त्रज्ञांनी डार्विनच्या उत्क्रांतिवादाची कास धरली आहे. जीववादी व अध्यात्मवादी डार्विनचा उत्क्रांतीवाद नाकारत नाहीत. पण ही उत्क्रांती प्रक्रिया पूर्णपणे यांत्रिक स्वरूपाची वा आंधळी आहे, असे प्रतिपादन हे नव-डार्विनवादी (Neo-Darwinists) नैसर्गिक निवडीच्या (Natural Selection) तत्त्वाचा आधार घेऊन जे करतात, त्याला जीववाद्यांनी आव्हान दिले आहे.[१८] याविषयी सविस्तर चर्चा करणे येथे शक्य नाही. तो आपल्यापुढील मुख्य विषयही नाही. पण हा मुद्दा फ्रेड हॉइलच्या एका उदाहरणाने स्पष्ट करता येईल. फ्रेड हॉइल या खगोल व विश्वरचना शास्त्रज्ञाने (Cosmologist) उत्क्रांतीची प्रक्रिया डार्विनच्या नैसर्गिक निवडीच्या तत्त्वानुसार चालते, हे खरे असेल -म्हणजे ती आंधळी प्रक्रिया आहे, हे खरे असेल - तर ती प्रक्रिया किती असंभाव्य आहे, हे दाखवून देण्यासाठी पुढील उदाहरण दिले आहे. सहा बाजू सहा वेगवेगळ्या रंगांनी रंगविलेले फासे ( त्यांना 'रूबिक क्यूब' असे म्हणतात) एकाच रंगात जुळवायचे असून हे काम एक आंधळा करतो आहे अशी कल्पना केली आणि त्याचे संभाव्यशास्त्राच्या (Theory of Probability) सहाय्याने गणित मांडले, तर ही

जुळवणूक बरोबर होण्यासाठी ५००००००००००००००००००० वेळा त्याला प्रयत्न करावा लागेल, तेव्हा कुठे एकदा हा प्रयोग यशस्वी होईल ! एका प्रयत्नाला ३० सेकंद लागतात असे समजले, तर पृथ्वी उत्पन्न झाल्यापासून आजपर्यंत तो आंधळा हा प्रयत्न करीत राहिला, तरी तो यशस्वी होणार नाही, असे आढळून येते.[१९] दुसऱ्या शब्दांत नैसर्गिक निवडीच्या तत्त्वाने - म्हणजे आंधळ्या प्रक्रियांनी-उत्क्रांती अशक्य आहे, असे ठरते. याच न्यायाने पृथ्वीवर जीवाची उत्पत्ती आंधळ्या प्रक्रियांनी होणे अशक्य असल्याचे दाखवून देण्यात आले आहे.[२०] या संदर्भात फ्रेड हॉइल म्हणतो -

"A common-sense interpretation of the fact suggests that a superintellect has monkeyed with physics as well as chemistry and biology and that there are no blind forces worth speaking about in nature" (भौतिकशास्त्र, रसायनशास्त्र आणि जीवशास्त्र यामध्ये अतिश्रेष्ठ बुद्धिमत्तेने हस्तक्षेप केल्याखेरीज केवळ आंधळ्या शक्तींनी या घटना घडून येणे शक्य नसल्याचा व्यावहारिक निष्कर्ष काढणे भाग आहे.)[२१]

## यंत्रवाद विरुद्ध अतींद्रियवाद

यंत्रवाद व भौतवाद स्वीकारल्याने सुरुवातीला भौतिकशास्त्रात प्रचंड प्रगती झाल्यामुळे शास्त्रज्ञांनी अतिउत्साहाच्या भरात विश्व हे एक प्रचंड यंत्र असल्याचा घाईने निष्कर्ष काढला. पण नंतर नवीन शोध लागल्यामुळे तो मागे घेऊन विश्व हे यंत्र नसून एक मोठा विचार (Great Thought) असल्याचा दृष्टिकोण त्यांना स्वीकारावा लागला.[२२] अशीच काहीशी परिस्थिती जीवशास्त्रात निर्माण होण्याची चिन्हे दिसत आहेत.

पेनसिल्व्हानिया युनिव्हर्सिटीच्या स्टीवर्ट काऊफमन् या शास्त्रज्ञाने संगणकाच्या सहाय्याने दाखवून दिले आहे की, प्रत्येक पेशीत दहा हजार आनुवंशिक घटक आहेत, असा रास्त अंदाज केला तर या घटकातील माहितीच्या साहाय्याने पेशीची संरचना व्हायची झाली, तर $१०^{३०००}$ (म्हणजे एकापुढे तीन हजार शून्ये) इतक्या निरनिराळ्या जुळवणुकी व्हावयास पाहिजेत ! हा आकडा इतका प्रचंड आहे की, याचा अर्थ पेशीची संरचना अशक्य आहे, असा होतो. प्रत्यक्षात मात्र केवळ शंभर जुळवणुकीत पेशीची संरचना होत असल्याचे आढळून येते.[२३] हे कसे शक्य आहे ? आंधळ्या प्रक्रियांनी हे होत नाही, हे उघड आहे. निसर्गात हा 'डोळसपणा' कोठून आला? अतींद्रिय पातळीवरील या घडामोडी आहेत, असे म्हणण्यावाचून गत्यंतर नाही. हा निव्वळ तर्क (Speculation) नाही. हे प्रयोगाने सिद्ध झाले असून जीवशास्त्रातील या अतींद्रिय शक्तींचे अस्तित्व प्रयोगाने सिध्द केल्याचे अभूतपूर्व कार्य रूपर्ट शेल्ड्रेक या (एकेकाळी भारतात-हैद्राबाद येथे काम केलेल्या) ब्रिटिश शास्त्रज्ञाने केले आहे.

१९८१ साली शेल्ड्रेकने **A New Science of Life** हे पुस्तक लिहिले. आणि **Nature** या आंतरराष्ट्रीय कीर्तीच्या विज्ञानविषयाला वाहिलेल्या मातब्बर नियतकालिकाने त्या पुस्तकाची संभावना 'जाळण्याच्या लायकीचे' अशी केली! असे काय आहे बरे त्यात? त्यात लेखकाने जीव हे यंत्र नाही, जीवातील प्रक्रिया अतींद्रिय पातळीवर चालतात, हे सप्रमाण दाखवून दिले आहे. जीवातील या नव्याने शोध लागलेल्या प्रक्रियेला त्याने Formative Causation असे नाव दिले असून, त्याचे अस्तित्व प्रयोगाने कोणालाही पडताळून पाहता येईल, असे त्याने सुचविले आहे. म्हणून **New Scientist** या दुसऱ्या एका प्रसिद्ध नियतकालिकाने अशा प्रकारच्या प्रयोगांच्या कल्पनांसाठी एक स्पर्धा आयोजित केली. यशस्वी स्पर्धकांना काहींनी हजारो डॉलर्सची बक्षिसेही जाहीर केली. आश्चर्य म्हणजे १९८६ पर्यंत केलेले या विषयीचे प्रयोग संपूर्ण यशस्वी झाले असून जाहीर केलेली बक्षिसेही प्रयोग सुचविणाऱ्यांनी जिंकली आहेत. विज्ञानातील एखादा सिद्धांत बरोबर आहे की नाही, हे ठरविण्यासाठी प्रयोगाच्या कल्पनांची स्पर्धा आयोजित करण्याचा, त्यासाठी बक्षिसे लावण्याचा व ती बक्षिसे जिंकून त्यातील कांही प्रयोगांनी तो सिद्धांत बरोबर असल्याचे दाखवून देण्याचा विज्ञानाच्या इतिहासातील हा पहिलाच प्रसंग असावा! ही बक्षिसे १०,०००, ५,००० व १५०० डॉलर्सची होती. पहिले व तिसरे बक्षिस अमेरिकेच्या व दुसरे इंग्लंडच्या मानसशास्त्रज्ञांनी जिंकले. (**The Presence of the Past** - R. Sheldrake,1988) या प्रयोगामुळे यंत्रवाद विरूद्ध अतींद्रियवाद या वादाचा निकाल अतींद्रियवादाच्या बाजूने लागून जीवशास्त्रात एका नव्या युगाची नांदी झाली आहे, असे म्हणावयास हरकत नाही.

## विचार करणारी यंत्रे व संगणक मेंदू

पण एवढ्यावरून जीवशास्त्रातील यंत्रवादाचे (व भौतिकवादाचेही ) संपूर्ण उच्चाटन झाले, असे समजण्याचे कारण नाही. वर मन हे स्वतंत्र व स्वायत्त तत्त्व नसल्याचे, मेंदूवर पूर्णपणे ते अवलंबून असल्याचे जे युक्तिवाद शरीरशास्त्रीय व मज्जाशास्त्रीय पुराव्यांच्या आधारे करण्यात आले आहेत, त्यांना उत्तर देण्यासाठी केवळ शरीर यंत्र नाही, एवढेच दाखवून देऊन भागणार नाही. मेंदू हे यंत्र नाही हेही दाखवून द्यावे लागेल. त्यासाठी मज्जा व मेंदूशास्त्रातील शोधांचा मागोवा घ्यावा लागेल. पण मेंदू हे संगणक असल्याचे उलट्या रीतीने दाखवून देण्याचा अलीकडे जो प्रयत्न काही यंत्रवाद्यांकडून होत आहे, त्याची प्रथम दखल घेतली पाहिजे. या दृष्टिकोणानुसार संगणक मेंदूप्रमाणे विचार करीत असेल, तर मेंदू संगणक आहे, हे आपोआप सिद्ध होते! संगणक माणसाप्रमाणे विचार करू शकतात, असा प्रथम सिद्धांत मांडणारा विचारवंत (की संगणक?) म्हणजे ए. एम्. ट्यूरिंग होय. ट्यूरिंगच्या मते संगणक विचार करू शकते, इतकेच नव्हे तर ते बुद्धिमानही

असू शकते.[२४] ट्यूरिंगच्या पाऊलावर पाऊल ठेवून काहींनी संगणकाला भावना आहेत, स्वतंत्र इच्छा (Free Will) आहे, ते माणसाप्रमाणे दमतात, वगैरे मानण्यात कसलीच अडचण नाही असे प्रतिपादिले आहे.[२५] हल्ली स्वतःच्या चुका दुरूस्त करणारी आणि म्हणून शिकणारी (Learning) आणि बुद्धिबळे खेळणारी संगणके तयार करण्यात आली असून अनेक बुद्धिबळपटूंना हरवून मिनेसोटा प्रांतातील खुल्या बुद्धिबळ स्पर्धेत एका संगणकाने प्रवेश केल्याचे कार्ल सॅगन याने अभिमानाने सांगितले आहे.[२६] असे संगणक विचार करते, असे समजण्यास काहीच हरकत असू नये, असे काहींना वाटणे शक्य आहे. हल्ली संगणकांना होणाऱ्या 'व्हायरस' रोगाचीही चर्चा सुरू असल्यामुळे संगणक जिवंत असल्याचाही काहींना साक्षात्कार होईल !

या विचारसरणीतील दोष, स्पष्ट करून सांगण्याची गरज भासू नये, इतका तो उघड आहे. पण असे विधान केले तर हे यंत्रवादी, विधान करणाऱ्यावर तो मानवकेंद्री (Anthropocentric) असल्याचा आरोप करतात ! म्हणून त्यातील दोष त्यांच्याच भाषेत कांहीनी दाखवून दिला असून त्या पद्धतीला गोडेलचा थेरम (प्रमेय) म्हणतात. या थेरमचा येथे विचार करण्याची आवश्यकता नाही. इतके सांगितले तर पुरेसे आहे की, कितीही बुद्धिमान संगणक तयार केले, तरी ते मानवी मनाप्रमाणे कधीच विचार करू शकणार नाही, हे या थेरमवरून दाखवून देता येते.[२७] हा थेरम म्हणजे गणिताच्या भाषेतील उत्तर आहे. पण दुसरे एक उत्तर या यंत्रवाद्यांना देण्यात आले असून ट्यूरिंगजवळ त्याचे प्रत्युत्तर नसल्याचे त्याने स्वतःचं मान्य केले आहे. हे उत्तर म्हणजे मानवी मनाची अतींद्रिय शक्ती होय. ही शक्ती यंत्राजवळ असणे शक्य नाही.[२८]

मानवी मेंदू म्हणजे एक संगणक आहे, ही कल्पनाही चुकीची आहे. कारण मानवी मेंदूचा भाग नष्ट केला तरी त्याच्या कार्यात, फारसा व्यत्यय येत नाही. पण संगणकाचा एखादा भाग नष्ट केला तरी तो संगणक म्हणून काम करीत नाही. कार्ल प्रिब्रॅम या अमेरिकन मज्जाशास्त्रज्ञाने मेंदू हा संगणकाप्रमाणे काम करीत नसून होलोग्राफी या भिंगविरहित फोटोतंत्राप्रमाणे काम करीत असल्याचे दाखवून दिले आहे.[२९] मेंदूशास्त्रात हा इतका क्रांतिकारक सिद्धांत आहे की त्यामुळे प्रिब्रॅमला मेंदूचा आईन्स्टाइन असे सुचविण्यापर्यंत काहींची मजल गेली आहे.[३०] अशा रीतीने 'विचार करणारी यंत्रे' व 'संगणक मेंदू' यांची कल्पना फोल असल्याचे दाखवून दिल्यानंतर मेंदू व मन यांचे तादात्म्य कल्पिणाऱ्या युक्तिवादांचा विचार मज्जा व मेंदूशास्त्रातील शोधाच्या संदर्भात केला पाहिजे.

## मेंदू आणि मन यांचा संबंध

मेंदू शास्त्रातील सर्वात जटिल प्रश्न असा की, मेंदूतील मज्जापेशींच्या

(Neurons) उद्दीपनाने रंग, आवाज, चव इ. गुणांची व सुखदु:खादी भावनांची कशी निर्मिती होते ? प्रसिद्ध नोबेल पारितोषिक विजेता मज्जाशास्त्रज्ञ चार्लस शेरिंग्टन याने म्हटले आहे की, ''मेंदूत विद्युत-प्रक्रिया होणे आणि रंग, छाया-प्रकाशांचा खेळ लगेच दिसणे, अंतराची लगेच जाणीव होणे यात प्रचंड फरक आहे.''[३१] कारण मेंदूतील विद्युत प्रक्रिया म्हणजे रंग, छायाप्रकाश व अंतर नव्हे. ॲड्रियन या मज्जाविशारदाने म्हटले आहे की, ''मेंदू विषयीची जी माहिती आम्हाला नेहमीच अज्ञात राहणार आहे, ती म्हणजे मज्जापेशीतील विद्युततरंगाने कल्पना व विचार कसे निर्माण होतात याविषयीची किंवा एखाद्या विचारामुळे कोणत्या मज्जापेशी कार्यान्वित व्हाव्यात, हे कसे ठरते या विषयीची होय.''[३२] आणि म्हणून ए. जे. आयर या तत्त्ववेत्त्याने म्हटले आहे की, मेंदूशास्त्रातील नवीन शोधामुळे हा प्रश्न सुटणे शक्य नाही. कारण मेंदूचे कितीही शास्त्रीय ज्ञान मिळाले तरी ते भौतिक ज्ञानच राहणार आहे. पण आपला मूळ प्रश्न भौतिक घटकातून म्हणजे मेंदूतून अभौतिक कल्पना, भावना, विचार (म्हणजेच अभौतिक मन) कसे उत्पन्न होते, हा असून तो भौतिक ज्ञानाच्या वाढीने सुटणार नाही. म्हणून काहीजण हा विज्ञानाचा प्रश्न नसून तत्त्वज्ञानाचा प्रश्न मानतात. पण हा प्रश्न तत्त्वज्ञानाचा मानला, तर तो तर्कशास्त्राने सोडवता येतो असे मानावे लागेल. पण तसा तो सोडवता येत नाही ही वस्तुस्थिती आहे.[३३] म्हणून परत मज्जाशास्त्राकडेच वळले पाहिजे.

मनाचा उगम भौतिक असेल, तर मेंदूच्या कोणत्या तरी एखाद्या भागात 'जाणीवे'चे केंद्र असावे, असे मानणे अस्थानी होणार नाही. पण जाणीवेचे असे केंद्र मेंदूत मज्जाशास्त्रज्ञांना सापडलेले नाही. [ देकार्त या फ्रेंच तत्त्ववेत्त्याने 'पायनीयल ग्रंथी' (अध्यात्मवाद्यांचा तिसरा डोळा) हे जाणीवेचे इंद्रिय मानले होते.] निरनिराळ्या शास्त्रज्ञांनी निरनिराळ्या काळी मेंदूतील निरनिराळी ठिकाणे जाणीवेचे केंद्र मानले असले तरी (उदा. मोठा मेंदू, लिंबिक सिस्टेम, रेटिक्युलर फॉर्मेशन इ.) असे मानायला निर्णायक असा कसलाच पुरावा नाही. मेंदूसंशोधनामध्ये मेंदूचा बराच भाग तटस्थ (Uncommited) असल्याचा आढळून आला असून त्यामुळे मेंदूचा कोणताही भाग नष्ट झाला, तरी मेंदूचे (मनाचे) कार्य अडत नाही. कारण ते काम तटस्थ मज्जापेशी उचलतात, असे प्रयोगांती दिसून आले आहे.[३४] १९४३ साली लालसेनेतील एक अधिकारी लेव्ह झासेट्स्की याच्या डोक्याच्या पाठीमागील डावा भाग उडवला गेला परिणामी त्याचे लिहिण्या-वाचण्याचे सामर्थ्य पूर्ण नष्ट झाले. पण थोड्याच दिवसात त्याला हे सामर्थ्य परत प्राप्त झाले आणि ३००० पृष्ठांचे आत्मचरित्र त्याने लिहिले.

स्वतंत्र स्मरण केंद्रही मेंदूत सापडलेले नाही. हायपोथॅलॅमस हा मेंदूतील भाग भावनेशी निगडित असल्याचे आढळून आले असले तरी मॅसरमनने मांजरावर केलेल्या प्रयोगाने असे दिसून आले आहे की, हायपोथॅलॅमसमध्ये भावना उदय पावत नसून ते

इंद्रिय भावनेच्या अभिव्यक्तीशी निगडित आहे. याचा अर्थ मन मेंदूमार्फत कार्य करते. मेंदूतून उदय पावत नाही असा होतो. प्रसिद्ध कॅनेडियन मज्जाशास्त्रज्ञ विल्डर पेनफील्ड याने तीस वर्षांच्या मेंदूवरील संशोधनानंतर पुढील निष्कर्ष काढला आहे-

"It will always be impossible to explain the mind on the basis of neuronal action within the brain... the mind must be viewed as a basic element in itself."

(मेंदूतील मज्जापेशीतील प्रक्रियांच्या आधारावर मनाची उपपत्ती लावणे कधीच शक्य होणार नाही. मन हे स्वतंत्र तत्त्व मानणेच भाग आहे.[३५])

वरील निष्कर्ष पेनफील्ड याने रुग्णांच्या उघड्या मेंदूच्या निरनिराळ्या भागांचे विद्युत उद्दीपन करून केलेल्या प्रयोगांवरून व निरीक्षणावरून काढला आहे. हे प्रयोग रुग्णांना स्थानिक भुलीचे औषध देऊन, म्हणजे रुग्ण पूर्ण शुद्धीवर असताना केलेले असून त्यावरून मेंदू व मन हे एकच नसून त्यांचे तादात्म्य वरवरचे असल्याचे दिसून येते. मॉंट्रीयल येथे पेनफिल्ड आणि त्याचे सहकारी यांनी केलेल्या प्रयोगांवरून असे दिसून आले आहे की, मेंदूच्या एखाद्या भागाचे विद्युत उद्दीपन केले तर रुग्णांना आपल्या अवयवांची हालचाल आपोआप (अनिच्छेने) होत असल्याची दिसून येते. ही हालचाल आपण स्वेच्छेने करीत आहोत, असे त्यांना वाटत नाही. उलट आपल्या अवयवांची होत असलेली हालचाल पाहून त्यांना आश्चर्य वाटते. जोस डेलगॅडो याने एका रुग्णाचा या विषयीचा अनुभव कथन केला आहे. या रुग्णाने मेंदूतील विद्युत उद्दीपनाने आपली मूठ वळत असल्याचे पाहून ती मूठ वळण्याचे टाळण्यासाठी आटोकाट प्रयत्न केला. पण यश आले नाही तेव्हा तो म्हणाला, ''डॉक्टर, तुमची वीज माझ्या इच्छाशक्तीपेक्षा जास्त सामर्थ्यशाली आहे. हे मी कबूल करतो.'' शरीरातील चलनवलन करणारी संस्था (Motor Strip) आणि इच्छाशक्ती (Will) या अगदी भिन्न असून पहिलीचा उपयोग दुसरी (इच्छाशक्ती) आपले साधन म्हणून वापरते. जे. सी. एकलस या नोबेल पारितोषिक विजेत्या मज्जाशास्त्रज्ञाने आपल्या **Self and Its Brain** या ग्रंथात मेंदूतील मज्जापेशीय यंत्रणेच्या सहाय्याने मनाच्या कार्याची उपपत्ती लावणे अशक्य असल्याचे सविस्तरपणे दाखवून दिले आहे.

जगातील मेंदूवर संशोधन करणाऱ्या आठ देशातील प्रमुख केंद्रांना भेटी देऊन निगेल कॅल्डर या संशोधकाने **The Mind of Man** नावाचे एक शोध इतिवृत्त लिहिले आहे. त्यातील Human Power या प्रकरणात तो म्हणतो, ''मानवी मनाची सृजनशक्ती नेमकी कशात आहे हेच अजून जेथे ज्ञात नाही, तेथे ती मेंदूच्या कोणत्या भागात कार्य करते हे कशाच्या आधाराने ठरवणार?'' आणि हे केंद्र माहीत झाले म्हणजे त्याचे कार्य

समजले असे तरी म्हणता येईल काय? तो म्हणतो,

"Pointing to areas of the brain, especially involved with language is no more an explanation of how they work than is a plan of the United Nations building an explanation of international politics."

(मेंदूतील भाषेच्या केंद्राकडे बोट करून ते कसे कार्य करते, हे जर समजत असेल तर संयुक्त-राष्ट्र-संघाच्या इमारतीच्या नकाशाकडे बोट केले तर आंतरराष्ट्रीय राजकारण समजते असे का मानू नये ?) मेंदू व मन यांचा संबंध यंत्राप्रमाणे एकास एक आहे असे समजणे भाबडेपणाचे आहे, असे कॅल्डरला सुचवायचे आहे.

मन मेंदूहून वेगळे नसल्याबद्दल जे युक्तिवाद वर दिले आहेत, ते युक्तिवाद करणाऱ्यांना या मेंदूशास्त्रातील शोधांची कल्पना नाही काय? जरूर आहे. पण ते युक्तिवाद करताना एक तर त्या शोधाकडे ते पूर्ण दुर्लक्ष करतात किंवा यंत्रवाद खरा ठरविणारे शोध भविष्यात लागतील, अशी आशा बाळगतात. के. आर. पॉप्पर या विचारवंताने अशा प्रकारच्या भौतिकवादी दृष्टिकोणाला Promissory Materialism (वचन देणारा भौतिकवाद) असे म्हटले आहे.[३६] (म्हणजे भविष्यात सिद्ध करू असे वचन देणारा भौतिकवाद. किती वर्षांनी ही वचनपूर्ती ते करणार आहेत हे तेच जाणोत!) खरे तर याला 'आडमुठा भौतिकवाद' हे नाव जास्त शोभते ! (कारण हल्ली लागलेल्या शोधाकडे दुर्लक्ष करून आपला आवडता सिद्धांत पुरावे नसताना दामटणे हा आडमुठेपणा आहे.) कारण शास्त्रीय दृष्टिकोण बाळगणारा मनुष्य आपली आवडती मते बाजूला ठेवून शास्त्रीय पुरावे प्रांजळपणे मान्य करतो. स्वत: पेनफील्ड हा मज्जाशास्त्रज्ञ आपले शोध लागण्यापूर्वी भौतिकवादीच होता. पण आपल्या शोधामुळे त्याने आपला भौतिकवादी दृष्टिकोण बदलला.[३७] तसे हे लोक आपला दृष्टिकोण बदलत नाहीत, इतकेच नव्हे तर आपल्या भौतिकवादातील अडचणींचा विचार व त्यांचे निराकरण करण्याचा प्रयत्नही ते करत नाहीत. यातील सर्वात मोठी अडचण म्हणजे परामानसशास्त्रातील शोध होय. या शोधाविषयीही ते वाळूत डोके खुपसताना आढळून येतात.

## मन स्वतंत्र शक्ती असल्याचा निर्णायक पुरावा - टेलिपथी

टेलिपथी किंवा परचित्तज्ञान किंवा विचारसंक्रमण हे भौतिकविज्ञानाच्या व मज्जाशास्त्राच्या प्रचलित कल्पनात न बसणारे आहे. यापैकी रशियन शरीरशास्त्रज्ञ व्हॅसीलिएव्ह याने प्रयोग केले असून त्याची पुनरावृत्ती अन्य तऱ्हेने इतर शास्त्रज्ञांनी केली आहे. हे प्रयोग फॅरेडे पिंजऱ्यामध्ये करण्यात येतात. फॅरेडे पिंजरा हा तांब्याच्या तारांपासून करण्यात आलेला असतो, व त्यातून विद्युत्प्रवाह सोडण्यात येतो. या पिंजऱ्याच्या आत टेलिपथी संदेश ग्रहण करणारी व्यक्ती बसलेली असते. विजेचा प्रवाह पिंजऱ्याच्या तारांतून वाहत असल्यामुळे बाहेरचे विद्युत-तरंग पिंजऱ्याच्या आत जाऊ

शकत नाहीत. तसेच प्रकाश, आवाज इत्यादीपासूनही आतील व्यक्ती अलग केलेली असते. संदेश पाठविणारी व्यक्ती लांब अंतरावर (दुसऱ्या इमारतीत) बसलेली असते. आतील व्यक्तीचा बाह्य जगाशी मेंदूमार्फत होणारा संपर्क अशा रीतीने पूर्णपणे तोडला गेलेला असल्याने तिच्या मेंदूला बाहेरून कसलाच संदेश पोचणार नाही हे उघड आहे. कारण सर्व प्रकारचे भौतिक तरंग-आवाज, विद्युत, रेडिओ, प्रकाश इत्यादी आतील व्यक्तीला पोचत नाहीत. आणि तरीही आतील व्यक्तीला दुसऱ्या इमारतीत बसलेल्या व्यक्तीचे विचार (आणि तिने काढलेली रेखाचित्रे) कळतात ! मज्जाशास्त्रज्ञांना आतील व्यक्तीच्या मेंदूला हे ज्ञान कसे होते हे सांगता येत नाही. याचे कारण मेंदू म्हणजे मन नव्हे हेच होय.[३८] अभौतिक मन अभौतिक माध्यमाच्याद्वारा अभौतिक विचार ग्रहण करते असा याचा अर्थ असून हे अभौतिक मन भौतिक मेंदूच्या माध्यमातून समजून घेणे अशक्य आहे असा या प्रयोगांचा निष्कर्ष आहे.

आता मन अभौतिक असेल व मनाच्या इच्छाशक्तीने शरीराची हालचाल होत असेल तर शक्तीच्या अविनाशित्वाच्या तत्त्वाला बाधा येत नाही काय? कारण अशा हालचालीत मनाची शक्ती शून्यातून निर्माण होऊन भौतिक शक्तीमध्ये रूपांतरित होते असे मानावे लागते. याला उत्तर असे की, शक्तीच्या अविनाशित्वाचे तत्त्व कृत्रिमपणे इतर शक्तिस्रोतापासून अलग केलेल्या परिस्थितीत लागू होते. संपूर्ण विश्वाला ते लागू होते की नाही हे माहीत नाही, म्हणजेच ते विज्ञानाचे केवळ एक गृहीतकृत्य (Postulate) आहे. आणि संपूर्ण विश्वाला ते लागू होते असे मानले, तरी सी. डी. ब्रॉड याने म्हटल्याप्रमाणे एका ठिकाणी शक्ती नाहीशी झाली (किंवा निर्माण झाली) तर तितकीच शक्ती विश्वाच्या दुसऱ्या भागात भरून निघत असेल (किंवा कमी होत असेल) आणि ही क्रिया मनामुळे घडून येत असेल, तर या नियमाला बाधा येते, असे समजण्याचे काहीच कारण नाही.[३९]

आता अभौतिक मन भौतिक मेंदूपासून व शरीरामार्फत कसे कार्य करते बरे? हा प्रश्न आहे. कार्यकारणभावाच्या नियमाला-एकाच पातळीवर चालणारी ती प्रक्रिया आहे या समजुतीला-त्यामुळे बाधा येत नाही काय? मन व शरीर यांच्यातील संबंधाविषयी तत्त्वज्ञानात अनेक सिद्धांत -(उदा. Interactionism, Parallelism, Indentity Theory, Aspect Theory इत्यादी) - मांडण्यात आले असून कोणताही सिद्धांत संपूर्ण दोषरहित नसल्यामुळे कार्यकारणभावाची कल्पनाच या बाबतीत अस्थानी असल्याचे काहीजण समजतात व विमानात जसा पायलट, जहाजात जसा कप्तान, कारमध्ये जसा चालक तसा शरीरात आत्मा(अगर मन) कार्य करतो (Ghost in the Machine - यंत्रातील भूत) या कल्पनेचा आधार घेण्यात येतो. पण ही आलंकारिक भाषा वापरल्याने

मूळ प्रश्नातील अडचण नाहीशी होत नाही. हे माहीत असूनही या कल्पनेचा स्वीकार बऱ्याच जणांनी केला आहे. याचे कारण इतके दिवस त्याला दुसरा पर्याय नव्हता हे होय. पण शेल्ड्रेकच्या वर उल्लेख केलेल्या जीवशास्त्रातील अतींद्रिय शक्तीच्या शोधामुळे ही अडचण आता उरलेली नाही. त्यामुळे यंत्रवाद नाकारणाऱ्यांना पुन्हा आत्म्याच्या कार्यासाठी पाठीमागच्या दाराने यंत्रवाद आणण्याची (यंत्रातील भूत, कारमधील चालक इत्यादी कल्पनेत शरीर हे यंत्र असल्याचे अप्रत्यक्षपणे मान्य करावे लागते.) आता आवश्यकता उरलेली नाही. मन अगर आत्मा अतींद्रिय पातळीवर शरीरावर परिणाम करू शकतो आणि पर्यायाने शरीरामार्फत कार्य करू शकतो, असे आता मानता येते.[४०] उत्क्रांतीच्या निरनिराळ्या अवस्थेतील प्राण्यांची बुद्धी प्राण्यांच्या त्या त्या अवस्थेतील मेंदूवर का अवलंबून असल्याची दिसते, या प्रश्नाची उकलही उत्क्रांती डोळस प्रक्रिया असल्याचे व मेंदूचे व शरीराचे कार्य हे केवळ भौतिक शक्तींनी मर्यादित नसल्याचे मान्य केल्यास होते.

## मन व शरीर यांच्या पलीकडे

मरणोत्तर अस्तित्वाविरुद्धच्या युक्तिवादांचा विचार करताना आतापर्यंत मन व आत्मा एकच असल्याचे व मन अभौतिक असल्याचे आपण गृहीत धरलेले आहे, हे जीव, शरीर व मज्जा (वा मेंदू) शास्त्राच्या संदर्भात केलेल्या चर्चेवरून वाचकांच्या लक्षात आलेच असेल. पाश्चात्य देशात देकार्त या फ्रेंच तत्त्ववेत्त्याने मन हे शरीराहून वेगळे स्वयंभू तत्त्व असल्याचे व शरीर (किंवा भौतिक वस्तू) हेही एक तितकेच स्वतंत्र व स्वयंभू तत्त्व असल्याचे प्रतिपादन केल्यापासून ही दुक्कल विज्ञान व तत्त्वज्ञानातील कोणत्याही चर्चेला पायाभूत म्हणून गृहीत धरण्यात येते. (देकार्तने शरीर हे एक यंत्र मानले होते. त्यामुळे या विषयीच्या चर्चेत भौतिकवादासाठी कधीकधी यंत्रवाद गृहीत धरण्यात येतो.) याला तत्त्वज्ञानात द्वैतवाद (Dualism) म्हणतात. या विरुद्धच्या दृष्टिकोणाला एकेरीवाद (Monism) म्हणतात. (मात्र याची भारतीय दर्शनातील द्वैत व अद्वैतवादाशी गल्लत करू नये.) पण तत्त्ववेत्त्या मनाने तयार केलेले हे कप्पे प्रत्यक्ष विश्वात खरोखर आहेत का? याचा वैज्ञानिक संशोधनाने निकाल लावता येत असला तरी पूर्वग्रहदोषामुळे तसा प्रयत्न कोणी यापूर्वी न केल्यामुळे शरीर व मन यांच्यातील संबंधविषयीची पाश्चात्य तत्त्ववेत्त्यांची चर्चा म्हणजे केवळ एक एरंडाचे गुऱ्हाळ बनली आहे.

या दृष्टीने भारतीय विचारवंत फारच प्रगत ठरतात. त्यांनी मन हे पाश्चात्याप्रमाणे अभौतिक न मानता भौतिक मानले असून पंचमहाभूतांच्या पंक्तीला त्याला बसविले आहे.[४१] प्राणही भौतिक मानलेला असून तो शरीराचा आधार असल्याचे म्हटले आहे. आणि हा दृष्टिकोण अलीकडील वैज्ञानिक संशोधनाने बरोबर असल्याचे

दिसून आले आहे. कारण तथाकथित भौतिक घटनांच्या पलीकडच्या आणि मनाच्या रूढ कल्पनेशी न जुळणाऱ्या अशा काही घटनांचा शोध शास्त्रज्ञांना लागला असून शरीर नष्ट झाल्यावर आत्मा मागे राहतो, हे म्हणणे काटेकोरपणे बरोबर नाही, असे त्यावरून म्हणावे लागते. कारण दृश्य शरीराच्या पलीकडे व अदृश्य आत्म्याच्या अलीकडे अपवादात्मक परिस्थितीत (आणि अपवादात्मक व्यक्तींना) दृश्य रूप धारण करणारे शरीर असल्याचे आढळून आले असून त्याचा विद्युत उपकरणाने फोटो घेता येतो व वजनही करता येते असे दिसून आले आहे.[४२] याला पाश्चात्य व रशियन शास्त्रज्ञांनी 'बायोप्लाझ्मा' किंवा 'इनर्जी बॉडी' अशी नावे दिली असून आपल्याकडील प्राण शरीराशी किंवा लिंगदेहाशी ती वर्णने जुळतात. या शोधामुळे जीवशास्त्रातील पूर्वी अनाकलनीय ठरलेल्या काही चमत्कृतियुक्त घटनांवर त्यामुळे प्रकाश पडतो. उदा. सॅलॅमँडर नावाच्या सरड्याच्या जातीतील प्राण्यांचे अवयव तुटले तर ते पुन्हा फुटतात. मानवासारख्या उच्चवर्गातील प्राण्यांत ते फुटत नसले तरी तुटलेल्या अवयवांच्या जागी अदृश्य स्वरूपात अवयव असून त्या अवयवात कधी कधी असह्य वेदना काही लोकांना होतात. (Phantom Limb Pain) आणि त्या वेदना कसल्याही औषधोपचाराने नाहीशा करता येत नाहीत असे आढळून येते. पण हे अदृश्य अवयव अतींद्रिय सामर्थ्य असलेल्या काही लोकांना दिसू शकतात. इतकेच नव्हे तर ते त्यांचे तपशीलवार वर्णनही करु शकतात.[४३] दृश्य शरीरातच अदृश्य शरीर समांतर स्वरूपामध्ये कार्य करीत असते, असा यावरून निष्कर्ष निघत असून आतापर्यंतच्या वैद्यकशास्त्रातील अनाकलनीय किंवा चमत्कृतीयुक्त घटनातील तथाकथित चमत्कार त्यामुळे नाहीसा होतो. उदा. शरीरातील निरनिराळ्या भागात केवळ सुया टोचून (अक्यूपंक्चरने) रोग बरा करणे, केवळ हस्त स्पर्शाने रोग बरा होणे, वैद्यकीयदृष्ट्या (Clinically) मेलेला मनुष्य पुन्हा जिवंत होणे इत्यादी.[४४] हे प्राणशरीर केवळ माणसातच नव्हे, तर इतर प्राण्यांत व वनस्पतीतही आढळून येते. अशा रीतीने प्राण हा सर्व जीवांचा आधार असून तो जीवजगताची एकात्मता दाखवून देतो. जीवजगतात अतींद्रिय पातळीवर चालणाऱ्या प्रक्रियांचा शोध शेल्ड्रेकने लावला असल्यामुळे या गोष्टीला पुष्टीच मिळते. अतींद्रिय शास्त्रातील शोधामुळेही या गोष्टीला पुष्टी मिळते. उदा. वनस्पतींना भावना असतात, या जगदीशचंद्र बोसांच्या शोधानंतर त्यांना अतींद्रिय ज्ञानही होऊ शकते, हे क्लीव्ह बॅक्स्टरने दाखवून दिले आहे.[४५] तसेच मानवेतर प्राण्यांनाही अतींद्रिय ज्ञान होऊ शकते हे आता निर्णायकपणे सिद्ध झाले आहे.[४६] मात्र वनस्पती व प्राणी नष्ट झाल्यावर त्यांची प्राणशरीरेही अल्पावधीत नष्ट होतात, असा कांही शास्त्रज्ञांचा याविषयीच्या प्रयोगावरून समज झाला आहे.[४७] माणसाचा प्राणदेहही त्याच्या मृत्यूनंतर काही अवधीने नष्ट होतो, असे मानायला जागा

आहे. (त्याच्या लिंग वा वासनादेहाबद्दल मात्र असे म्हणता येणार नाही.)

## जिवंतपणी देह सोडण्याचा अनुभव (O. B. E.)

आश्चर्याची गोष्ट म्हणजे हा प्राणदेह व त्यावर आधारलेला वासनादेह दृश्य शरीरापासून *जिवंतपणी* सुटा होऊ शकत असल्याचे आढळून आले आहे. हा अनुभव अपघातात सापडले असता, तीव्र स्वरूपाच्या आजारात, अत्यंत दमलेल्या-थकलेल्या अवस्थेत किंवा सहजगत्या सुद्धा एखाद्या व्यक्तीला येऊ शकतो. अशा अनुभवांची असंख्य उदाहरणे असून पुढील उदाहरण, तो अनुभव एका एम्. डी. एफ्. आर. सी. असलेल्या डॉक्टरालाच आला असल्यामुळे नमुन्यादाखल देत आहे.

रॉयल फ्लाईंग कोअरमध्ये मेडिकल ऑफिसर असताना या डॉक्टराला वाहून नेणारे विमान क्लेअर मॅरेसच्या विमानतळावर निघताक्षणीच कोसळले कॉकपिटमधून बाहेर फेकला गेलेला हा डॉक्टर मेल्यासारखा पाठीवर पडला. ज्या ठिकाणी तो पडला होता. ते ठिकाण खळग्यात होते. तेथून विमानतळावरील इमारती मुळीच दिसत नव्हत्या. पण त्या डॉक्टरला आपला देह पाठीवर पडलेला व (त्या अपघातात सुदैवाने वाचलेला) त्या विमानाचा पायलट त्या देहाकडे पळत जात असलेला, व इतर लोकांचीही त्याला वाचवण्यासाठी धावपळ होत असलेली दिसत होती. हँगरमधून अँब्युलन्स बाहेर पडलेली, नंतर लगेच बंद पडलेली, लगेच तिचा चालक बाहेर येऊन हँडलने इंजिन चालू केलेले, परत बसून अपघाताच्या जागेकडे ती वळवलेली, इतक्यात एक डॉक्टर जवळच्या दवाखान्यातून पळत येऊन त्या गाडीत चढलेला, परत गाडी थांबलेली, डॉक्टर बाहेर पडून दवाखान्यात जाऊन काहीतरी घेऊन परत आलेला, परत गाडी सुरू झालेली इत्यादी. हे सर्व अंदाजे शंभर फूट उंचावरून तो पाहात होता. (आणि अपघाताचे ठिकाण सखल भागात असल्यामुळे एवढ्याउंचावरून पाहिल्याखेरीज त्याला इमारती, अँब्युलन्स व वरील घटना दिसणे शक्य नव्हते.) शुद्धीवर आल्यावर त्याने वरीलप्रमाणे घटना घडल्याचे आपण पाहिल्याचे सांगितले, आणि मदत कार्यात गुंतलेल्या संबंधित व्यक्तिंनी त्या खऱ्या असल्याचे मान्य केले.[४८]

हा अपवादात्मक अनुभव समजण्याचे कारण नाही. डॉ. सिलिया ग्रीन या ऑक्सफर्ड इन्स्टिट्यूट ऑफ सायकोफिजिकल रिसर्चची मुख्य असलेल्या विदुषीने अशा प्रकारचा अनुभव आलेल्या लोकांची माहिती मिळवून १९६८ साली लिहिलेल्या **Out of Body Experiences** या ग्रंथात ३४ टक्के लोकांना असा अनुभव आयुष्यात एकदा तरी आल्याचे आपणाला आढळून आले असल्याचे म्हटले आहे.[४९] असा अनुभव अनेक प्रसिद्ध लोकांनाही आला असून त्यामध्ये वुइल्यम वर्डस्वर्थ, एमिली ब्रॉंट, जॉर्ज

इलियट, जॉर्ज मेरिडिथ्, लॉर्ड टेनिसन, अर्नोल्ड बेनेट , डी. एच. लॉरेन्स, व्हर्जीनिया वुल्फ, बर्नार्ड बेरेन्सन, जॉन बुचन, आर्थर कोएस्लर, अर्नेस्ट हेमिंग्वे यासारखे प्रसिद्ध लेखक व कवी असून त्यापैकी बऱ्याच जणांनी आपल्या आत्मचरित्रात हे अनुभव कथन केले आहेत.

काही लोकांना स्वेच्छेने आपल्या देहातून सुटे होता येते, असे आढळून आले असून असे सामर्थ्य असलेल्या इंगो स्वान, कीथ स्टुअर्ट हरारी, अलेक्स टानाऊस यांच्यावर कार्लिस ऑसिस व त्याचे सहकारी, रॉबर्ट मॉरिस, चार्लस् टार्ट इत्यादी शास्त्रज्ञांनी प्रयोग केले आहेत. हे प्रयोग हे लोक अतींद्रिय सामर्थ्याने दूरस्थ वस्तू जाणत नसून प्रत्यक्ष तेथे सूक्ष्म शरीराने जाऊन जाणतात, हे निश्चित करण्यासाठी केलेले आहेत. तेथे भौतिक परिणाम घडून आला तर तेथे ते सूक्ष्म शरीराने हजर होते असे म्हणता येते. पण भौतिक परिणाम दुरूनसुद्धा मन:सामर्थ्याने घडवून आणता येतो, हे आता असे (सायकोकायनेसिसचे) सामर्थ्य असलेल्या लोकांच्या उदाहरणावरून सिद्ध झालेले असल्याने हा पुरावा निर्णायक मानता येत नाही. म्हणून कार्लिस ऑसिसने मांजरासारख्या प्राण्यांचा, किंवा दृष्टिभ्रम निर्माण करणाऱ्या उपकरणांचा उपयोग केला आहे. या प्रयोगात बरेच यश आले आहे.

हे सूक्ष्म शरीर काहीना दिसूही शकते. (वरील प्रयोगात पोस्नर या व्यक्तीला हरारीचे 'भूत' दिसल्याचे आढळून आले आहे.) अशा प्रकारची उदाहरणे बरीच असून येथे एक प्रसिद्ध व अत्यंत प्रमाणीभूत (Well documented) उदाहरण देत आहे.

विल्मॉट नावाचा एक उद्योगपती 'सिटी ऑफ लिमेरिक' या जहाजातून युरोपहून अमेरिकेला आपल्या कुटुंबियांना भेटण्यासाठी जात होता. १३ ऑक्टोबर रोजी जहाजात असताना त्याला एक स्वप्न पडले. स्वप्नात त्याच्या केबिनमध्ये रात्रीच्या पोषाखात त्याची पत्नी आली. पण केबीनमध्ये दुसरी एक व्यक्ती असल्याचे पाहून दाराजवळ ती थोडी घुटमळली, पण लगेच पुढे झाली व खाली वाकून तिने विल्मॉटचे चुंबन घेतले, व नंतर ती लगेच निघून गेली. सकाळी त्याच्या खोलीतील सवंगडी त्याला म्हणाला, "तुला अशा रीतीने एखादी स्त्री भेटावी, हे खरोखर तुझे भाग्य आहे." विल्मॉटने त्याला याविषयी खोदून विचारल्यानंतर त्याने जे आपण पाहिल्याचे सांगितले, ते विल्मॉटला स्वप्नात दिसलेले दृश्यच होते. २३ ऑक्टोबर रोजी विल्मॉट घरी पोचताच त्याच्या पत्नीने पहिला प्रश्न केला, तो म्हणजे "मी तुम्हाला बोटीत भेटले हे तुम्हाला माहीत आहे काय?" हा होय. आणि तिने आपणाला नवऱ्याची कशी चिंता वाटू लागली (कारण याच सुमारास वृत्तपत्रात एक बोट वादळात सापडून नष्ट झाल्याची बातमी प्रसिद्ध झाली होती.) व या चिंतेतच १३ ऑक्टोबर रोजी झोपी गेल्यानंतर पहाटे ४ वाजता एकदम आपण आकाशमार्गे समुद्रावरून त्याच्याकडे कसे आलो, त्याच्या

केबिनमध्ये आल्यावर तेथे दुसऱ्या व्यक्तीला पाहून कसे घुटमाळलो, नंतर पुढे होवून कसे त्याचे चुंबन घेतले इत्यादी सांगितलेच, पण विल्मॉट कोठे होता, ती दुसरी व्यक्ती कोठे होती इत्यादी गोष्टींचा तपशीलही बोटीतील आतल्या भागाची माहिती नसताना व पूर्वी कधी ती केबिन पाहिलेली नसताना तिने बरोबर सांगितला.[५०]

## दुसऱ्या देहात प्रवेश (Possession)

दृश्य शरीरातून अदृश्य (सूक्ष्म) शरीर बाहेर पडणे शक्य असेल, तर बाहेरील एखादे सूक्ष्म शरीर या पहिल्या शरीरात प्रवेश करणे का अशक्य असावे? आणि अशा प्रकारचा परकायाप्रवेश शक्यच नव्हे तर हा प्रवेश अनेकदा घडून येत असल्याची असंख्य उदाहरणे आढळून येतात.[५१] हा प्रवेश खरा (Genuine) आहे, त्या व्यक्तीच्या सुप्त किंवा दुय्यम व्यक्तिमत्वाने आपल्या सुप्त इच्छा तृप्त करण्यासाठी घेतलेले हे सोंग नाही, हे ठरविणे मात्र महत्वाचे असते. ( फ्रॉईडवादी लोक हिस्टेरिया या मनोरोगात असे घडते असे म्हणतात.) याविषयी बरेच संशोधन झाले आहे. वाल्टर प्रिन्स या संशोधकाने डोरिस या अनेक व्यक्तिमत्वांनी (Multiple Personalities) पछाडलेल्या एका मुलीला आपल्या घरी ठेवून घेऊन सतत तीन वर्षे तिच्यातील बदलणाऱ्या व्यक्तिमत्वांचा अभ्यास करून S. P. R. या संस्थेला जे इतिवृत्त सादर केले आहे, त्यावरून ही बदलणारी व्यक्तिमत्वे स्वतंत्र असल्याचा निष्कर्ष निघतो.[५२] **Three Faces of Eve** या प्रसिद्ध पुस्तकातील ख्रिस्तीन साइझमोअर या मुख्य पात्रावरील निरिक्षणानेही या निष्कर्षाला बळकटी मिळते. ख्रिस्तीन हिला नायलॉनची ॲलर्जी होती. पण तिच्यात दुसरे व्यक्तिमत्व शिरल्याबरोबर नायलॉनमुळे निर्माण झालेल्या पुटकुळ्या नाहीशा होत असत. ख्रिस्तीनला ऱ्हस्व दृष्टिदोष असल्यामुळे चष्मा वापरावा लागे. पण तिच्यातील दुसऱ्या व्यक्तिमत्वाला चष्म्याशिवाय दिसत असे. एकदा तिला भूल दिली असता तिच्यात दुसऱ्या व्यक्तिमत्वाने प्रवेश केला आणि लगेच भुलीचा परिणाम अदृश्य झाला. या घटनांची उपपत्ती लावायची झाल्यास वेगवेगळ्या व्यक्तिमत्वांची वेगवेगळी सूक्ष्म शरीरे असतात, असे गृहीत धरल्यावाचून गत्यंतर नाही. कारमधील चालक, यंत्रातील भूत (आत्मा) इत्यादी कल्पना कशा चुकीच्या आहेत, हे अशा उदाहरणावरून स्पष्ट होते. (कारण या उदाहरणातील चालक बदलला तरी कार बदलत नाही. येथे मात्र चालक व कार दोन्ही बदलतात.)

ही कल्पना बरोबर असेल तर एकाच व्यक्तीत दोन भिन्न व्यक्तिमत्वांच्या सूक्ष्म शरीरांचे दोन भिन्न अवयव का असू नयेत? असे विचारणेही शक्य आहे. आणि प्रत्यक्षात अशी उदाहरणेही आढळतात. उदा. ॲन्न विन्सर या स्त्रीचा उजवा हात जागेपणी निकामा असल्याचा पण झोपेत लिहिणे, खुणेने संभाषण करणे इत्यादी गोष्टी करीत असल्याचा आढळून येतो.[५३] कधी कधी काही माध्यमांच्या हातात मृतात्मा प्रवेश

करतो आणि संदेश अगर त्या व्यक्तीच्या कुवतीबाहेरचे साहित्य लिहिण्याचे काम करतो, असेही आढळून आले आहे. उदा. पर्ल क्यूरॅन या स्त्रीने आपोआप लिहिणाऱ्या हाताने (Automatic Writing) सोळाव्या शतकातील (जुन्या) इंग्रजीत कथा, कादंबऱ्या इत्यादी अत्यंत उच्च दर्जाचे साहित्य निर्माण केले असून लंडन युनिव्हर्सिटीचा प्राध्यापक सी. एच. एस्. शिलर याने त्याचे वर्णन 'भाषाशास्त्रीय चमत्कार' (Philological Miracle) असे केले आहे. या बाईचे शिक्षण फक्त आठवीपर्यंत झाले आहे.[५४]

आयलीन गॅरेट ही एक उच्चविद्याविभूषित स्त्री असून ती 'माध्यम' (परलोकातील मृतात्म्याशी जिवंत व्यक्तीचा संबंध घडवून आणणारी व्यक्ती ) म्हणून काम करते. पण याविषयी शास्त्रीय संशोधन झाले पाहिजे, असा दृष्टिकोण ती बाळगत असल्यामुळे शास्त्रज्ञांच्या सर्व तऱ्हेच्या प्रयोगांना व परीक्षांना ती स्वखुशीने सामोरी जाते. ती तंद्रावस्थेत (Trance) गेल्यानंतर 'उवानी' व 'लतीफ' हे 'परलोकातील गाईड' तिच्या शरीराचा ताबा घेतात. तिच्या त्यावेळच्या शरीराची शरीरशास्त्रीयदृष्ट्या तपासणी केली तर असे आढळून येते की, तिच्या शरीराची चयापचय क्रिया (Metabolism) त्या त्या व्यक्तीच्या संचाराच्या वेळी वेगवेगळी असते. व तिची स्वतःची चयापचय क्रिया या दोन्हीहून वेगळी आहे. ही गोष्ट प्रत्येक व्यक्तीचे सूक्ष्म शरीर वेगळे असते, असा बहुव्यक्तिमत्वाच्या संदर्भात वर जो निष्कर्ष काढला आहे त्याला पुष्टी देणारी आहे. तसेच हे 'गाईड' (मग ते कोणीही असोत) स्वतंत्र व्यक्ती असल्याचेही ती दाखवून देते.[५५]

एकाच व्यक्तीत अनेक व्यक्तिमत्वे असू शकतात, व एकाच शरीरात त्यांची सूक्ष्म शरीरेही असू शकतात, असे म्हणणे शक्य असून ही गोष्ट मरणोत्तर अस्तित्व सिद्ध करीत नाही, असा याविषयी मुद्दाम संशयी दृष्टिकोण बाळगून युक्तिवाद करणे शक्य आहे. (मुद्दाम असे म्हणण्याचे कारण एकाच शरीरात, एकाच वेळी एकच व्यक्तिमत्व असू शकते. अशी सर्वसाधारण धारणा असून ही धारणा बदलण्यासाठी तसेच बलवत्तर कारण दाखविले पाहिजे. पण हे कारण या संशयावादी लोकांनी दाखवलेले नाही. हिस्टेरिया हे कारण समर्पक नसल्याचे वर वाल्टर प्रिन्सच्या संशोधनातून निष्पन्न होत असल्याचे म्हटलेच आहे.) पण हा युक्तिवाद फोल असल्याचे मेलेल्या व्यक्तिमत्वाचा संचार जिवंत व्यक्तीत झाल्याची अनेक उदाहरणे दाखवून देतात. नमुन्यादाखल पुढील प्रमाणीभूत उदाहरण देत आहे.

अमेरिकेतील इलिनॉय प्रांतातील वाटसेका शहरात मेरी रोफ नावाची मुलगी ५ जुलै १८६५ साली मेली. ती मरण्यापूर्वी केवळ चौदा महिने अगोदर म्हणजे १६ एप्रिल १८६४ रोजी त्याच शहरात ल्युरन्सी व्हेनुम नावाची मुलगी जन्मली होती. तिच्या तेराव्या वर्षी तिच्यात मेरी रोफने प्रवेश केला आणि ल्युरन्सी व्हेनुम नाहीशी झाली. आपण मेरी रोफ असल्याचे व आपले घर अमूक ठिकाणी असल्याचे ती सांगू लागली

आणि तेथे तिला नेल्यानंतर तेथील माणसांना (आई, वडील, लहान बहीण इत्यादींना) तिने त्यांची नावे घेऊन हाका मारल्या. इतकेच नव्हे तर मेरीच्या जीवनातील अगदी बारीकसारीक घटनासुद्धा तिने तपशीलवार सांगितल्या. आपण तेथेच राहणार असा तिने आग्रह धरला व मेरीने झाकून ठेवलेल्या व कोणालाही माहीत नसलेल्या वस्तूही तिने काढून दाखविल्या. तिच्या स्वभाव-वैशिष्ट्याची ओळख पटल्यामुळे 'ल्युरन्सी' ला मेरीच्या आईवडीलांनी 'मेरी' म्हणून आपल्या घरी ठेवून घेतले व त्याला ल्युरन्सीच्या आई वडिलांनीही संमती दिली. (यापूर्वी या दोन्ही कुटुंबांना एकमेकांची अजिबात माहिती नव्हती, हे येथे लक्षात ठेवले पाहिजे.) बरोबर तीन महिने दहा दिवसांनी एकदम 'मेरी' निघून गेली व ल्यूरन्सी परत आली आणि आपण कोठे आहोत हे तिला कळेना. तिला मेरीच्या आईवडिलांनी परत तिच्या (ल्युरन्सीच्या) आईवडिलांकडे पाठवून दिले.[५६]

## मरणोत्तर अस्तित्व आणि अतींद्रिय शक्ती

काही व्यक्ती माध्यम म्हणून जिवंत लोकांना त्यांच्या मृत नातेवाईकाकडून जो संदेश घेऊन येतात, तो वास्तविक मृत नातेवाईकांकडून आलेला नसून तो त्या माध्यमाच्याच दुय्यम व्यक्तिमत्वातून आलेला असतो व जी माहिती मृतात्म्याने दिलेली म्हणून सांमण्यात येते, ती वास्तविक मृतात्म्याने दिलली नसून त्या माध्यमानेच अतींद्रिय शक्तीने जिवंत व्यक्तींकडून (मृताच्या नातेवाईकाकडून) मिळवलेली असते, असा एक युक्तिवाद मरणोत्तर अस्तित्वाविरुद्ध करण्यात येतो. पण ही माहिती कधीकधी इतकी तपशीलवार (व मृताच्या नातेवाईकांना, इतकेच नव्हे तर पृथ्वीवरील कुठल्याही हयात व्यक्तिलाही माहीत नसलेली) असते की तिची उपपत्ती लावण्यासाठी माध्यमाच्या ठिकाणी अचाट अतींद्रिय शक्ती असल्याचे गृहीत धरावे लागते. (Super ESP hypothesis) मरणोत्तर अस्तित्व भावनात्मक कारणासाठी नाकारणारे माध्यमामध्ये ही अचाट शक्ती असल्याचे गृहीत धरतात. पण ही माहिती मृतात्म्याकडून आली, ही साधी व सरळ उपपत्ती नाकारतात, असे आढळून येते. (मरणोत्तर अस्तित्व हेच भावनात्मक कारणासाठी गृहीत धरण्यात येते, असे ते म्हणतात.) पण प्रत्यक्ष मृतात्म्याचा ज्यावेळी माध्यमात संचार होतो, त्यावेळी त्या मृतात्म्याच्या बोलण्याच्या लकबी, आवाज, भाषाशैली इत्यादीसुद्धा माध्यमातून प्रकट होतात, असे आढळून येते. यावर हे अचाट अतींद्रिय -शक्तीवाले म्हणतात. की, हे तो माध्यम नाटक करून मृतात्म्याची भूमिका वठवितो ! (निरनिराळ्या मृतात्म्यांच्या आवाजाची वा भाषाशैलीची नक्कल करणे त्यांची पूर्व माहिती नसताना शक्य आहे काय या प्रश्नाचा ते विचार करीत नाहीत.)[५७] कसेही करून मरणोत्तर अस्तित्व नाकारायचे हा अट्टाहास या युक्तिवादापाठीमागे आहे, हे इतके स्पष्ट आहे की याला विज्ञानवृत्तीला न शोभणारा

पूर्वग्रह म्हटले तर वावगे ठरू नये. पण ज्या गोष्टीची नक्कल करणे शक्य नाही, अशा गोष्टी -उदा. त्या माध्यमाला अवगत नसलेल्या भाषेत त्याने लिहिणे व बोलणे- जेव्हा तो माध्यम करून दाखवतो तेव्हा हा अचाट अतींद्रिय शक्तीचा सिद्धांत कोलमडून पडतो. अतींद्रिय शक्तीने माहीत नसलेल्या भाषेतील कांही शब्द वा वाक्ये यांत्रिकपणे बोलून दाखविणे शक्य आहे, असे समजले तरी माध्यम जेव्हा त्या भाषेत प्रश्न विचारले तर त्याना त्याच भाषेत उत्तरे देऊ शकतो, असे आढळून येते (Responsive Xenoglossy) तेव्हा मात्र मृतात्म्याच्या सिद्धांताखेरीज दुसरा पर्याय उरत नाही. अशा प्रकारचे एक उदाहरण येथे देत आहे.[५८]

१९३१ साली रोजमेरी नावाची ब्लॅकपूलमधील एक मुलगी तंद्रावस्थेमध्ये जाऊन कोणालाही न समजणाऱ्या एका भाषेत बोलू लागली. फ्रेडरिक वूड या एका संगीत कलेतील डॉक्टरने तिच्या भाषेतील शब्द-समूह (वा वाक्ये) आवाजाबरहुकूम लिहून घेतले व तो भाषातज्ज्ञांना दाखवल्यानंतर इजिप्शन भाषेतील ते शब्द असल्याचे माहीत झाले. जगात इजिप्शन भाषातज्ञ फार थोडे असून ती कशी बोलतात हे कोणालाही माहीत नाही. इजिप्शन भाषा जाणणाऱ्या होवार्ड हुल्मला ते शब्द समूह दाखवल्यानंतर ज्या गोष्टी कळल्या, त्यापैकी महत्वाची गोष्ट म्हणजे रोजमेरीच्या शरीरात संचारित झालेली व्यक्ती अमेन होतेप तिसरा याची टेलिका-व्हेन्शू नावाची ती बाबीलोनियन पत्नी होती. रोजमेरी ही टेलिका -व्हेन्शूची दासी होती. आणि म्हणून रोजमेरीच्या शरीरात तिने प्रवेश केला होता. हल्ली इजिप्शन भाषा बोलणारी जगात एकही व्यक्ती नाही. वाचणेसुद्धा इतके कष्टाचे असते की, प्रत्येक शब्दाचा अर्थ लावण्यासाठी बराच वेळ खर्च करावा लागतो. तरीसुद्धा हुल्मने वीस तास खर्च करून बारा प्रश्न तयार केले व ते रोजमेरीला विचारले, रोजमेरीने त्यांची उत्तरे साठ वाक्यात (वा शब्दसमूहात) दिली. यावरून रोजमेरी एक तर प्राचीन इजिप्तमध्ये जन्मली होती आणि प्रस्तुतचा तिचा पुर्नजन्म आहे असे मानले पाहिजे. किंवा रोजमेरीच्या शरीरात प्राचीन इजिप्तमधील एक मृतात्मा प्रवेश करून तिच्या तोंडून बोलत आहे, असे तरी मानले पाहिजे. दोन्ही दृष्टीने विचार केला तरी मरणोत्तर अस्तित्व मान्य करावे लागते. (कारण दोन्ही मध्ये मेल्यानंतर व पुन्हा जन्मण्यापूर्वी त्या व्यक्तीचे शरीरविरहित अस्तित्व गृहीत धरावे लागते.)[५९]

## मरणोत्तर अस्तित्व आणि भुते

मरणोत्तर अस्तित्व नाकारणारे भुते दिसत नाहीत असे म्हणत नाहीत. पण तो भास असतो असे त्यांचे म्हणणे असते. भास याचा अर्थ भ्रम असा केला तर हे खोटे आहे हे आता सिद्ध झाले आहे. इंग्लंडमध्ये अशा भासांची खानेसुमारी (Census of Hallucinations) घेण्यात आली तेव्हा हे भास म्हणजे एखाद्या व्यक्तीच्या मृत्यूची

अतींद्रिय पातळीवरील सूचना असल्याचे दिसून आले आहे. आणि म्हणून हे भास टेलिपथी या अतींद्रिय शक्तीमुळे दृश्य स्वरूप धारण केलेले मानसिक भूत असते, हे आता मान्य करण्यात आले आहे. पण नेहमीच असे ते असते का? कधी कधी एक भूत अनेक लोकांना दिसते. अशा वेळी टेलिपथीमुळे एकाला जे दिसते त्याचेच संक्रमण (वा संसर्ग) अनेकांना होत असते असा युक्तिवाद करण्यात येतो. पण हा युक्तिवाद खोटा ठरविणाऱ्या घटना आढळून आल्या आहेत. या घटना भूत वस्तुनिष्ठ असल्याचे दाखवून देतात. उदा. भुताचे प्रतिबिंब आरशात दिसणे, भुताची सावली भिंतीवर पडणे, निरनिराळ्या लोकांना त्या त्या ठिकाणच्या कोनातून एखाद्या व्यक्तीच्या शरीराचे वेगवेगळे भाग दिसावेत, तसे भुताच्या शरीराचे वेगवेगळ्या कोनातून वेगवेगळे भाग दिसणे इत्यादी.[६०] भुताचे स्वतंत्र अस्तित्व निर्णायकपणे सिद्ध करणारे एक उदाहरण येथे देत आहे.

अमेरिकेतील मिसूरी प्रांतातील सेंट जोसेफ या गावी एक व्यापारी एक हॉटेलात बसला असता आपल्या टेबलाजवळ दुसरी एक स्त्री बसल्याचे त्याला जाणवले. त्या व्यक्तीकडे त्याने निरखून पाहिले, तेव्हा तो चमकला. कारण नऊ वर्षापूर्वी मेलेली त्याची ती बहीण होती. नऊ वर्षापूर्वी ती जशी होती तशीच दिसत होती. मात्र तिच्या उजव्या गालावर पूर्वी न पाहिलेला, लाल रंगात एक ओरखडा त्याला दिसला. तो तिला पाहून एकदम उभा राहिला. इतक्यात ती नाहीशी झाली. या प्रसंगाने तो इतका अस्वस्थ झाला की, तो सरळ आपल्या गावी आला व आपल्या आईला घडलेली गोष्ट सांगितली. ते ऐकून ती सुन्न झाली. नंतर तिने त्याला सांगितले की, तिच्या प्रेताच्या गालावर तिच्या धांदरटपणामुळे ओरखडा निघाला होता. पण तिने ते कोणालाही सांगितले नव्हते व पावडरीने तो झाकला होता. ही गोष्ट आजपर्यंत तिने कोणालाही सांगितली नव्हती.[६१]

मरणोत्तर अस्तित्व नाकारणारे भुताच्या संदर्भात असा युक्तिवाद करतात की, भुते यांत्रिक स्वरूपात वावरत असल्याची दिसून येतात. म्हणजे त्यांना स्वतंत्र मन असल्याचे दिसून येत नाही. मरणापूर्वी एखादी व्यक्ती करीत असलेली गोष्ट मेल्यानंतर तिचे भूत करीत असते. मेल्यानंतर एखाद्या व्यक्तीचे व्यक्तीमत्व मागे राहात असेल तर त्याचे भूत सहेतुकपणे (Purposively) वागले पाहिजे. एखादी योजना आखणे व ती कार्यवाहीत आणणे अशा गोष्टी त्या भुताने केल्या तर ती व्यक्ती मेल्यानंतर (भुताच्या रूपात) अस्तित्वात आहे असे म्हणता येईल. सहेतुकपणे, योजनापूर्वक व स्वतंत्र इच्छा असल्याप्रमाणे वागणाऱ्या भुतांची अनेक उदाहरणे आहेत. येथे आपल्याकडील एक उदाहरण देत आहे.

मुंबईचे एक नेत्रतज्ञ डॉ. एस. एस. आजगावकर ( डी. ओ.) यांच्या पत्नीचे ७ जून १९५२ रोजी कॅन्सरने निधन झाले. त्या दिवशी वटपौर्णिमा होती. त्यांच्या पत्नीने

(ललिता आजगावकर) २५ वर्षे वटपौर्णिमेचे व्रत अखंडपणे चालवले होते. तिच्या मृत्यूवेळी वटपौर्णिमेचे पारणे सोडण्याचे राहून गेले व व्रतामध्ये खंड पडला आणि दुसऱ्या दिवशी रात्री तिचा भाऊ श्री. आर. जी. सामंत बी. ए. एल्. एल् . बी. हे एकटेच घरी असल्यावेळी त्यांच्यापुढे एकदम त्या प्रकट झाल्या. सामंत त्यांना पाहून अत्यंत आश्चर्यचकित झाले. गोंधळून प्रथम त्यांच्या तोंडून शब्द फुटला नाही. पण नंतर स्वत:ला सावरून त्यांनी तिचा हात धरून खाटेवर बसविले. तिने पारणे सोडण्यासाठी एक कप कॉफी करून द्यायला सांगितले. सामंतांनी एक कप कॉफी केली व आपल्या बहिणीपुढे धरली. तेव्हा ती म्हणाली, 'तू ती पी, म्हणजे मला पोचेल' सामंतांनी ती कॉफी प्याली आणि इतक्यात त्यांची बहीण अदृश्य झाली.

या घटनेत मृतात्म्याशी (भुताशी) बोलणे, त्याला स्पर्श करणे, याखेरीज त्या भुताने सहेतुकपणे वागणे या सर्व गोष्टी दिसून येत असल्यामुळे मरणोत्तर अस्तित्वाविषयी संशयाला कसलीच जागा उरत नाही. ही घटना डॉ. आजगावकर व सामंत (मुंबई हायकोर्टाचे वकील) यांनी **पुरुषार्थ** मासिकाच्या जून १९५३ च्या अंकात प्रसिद्ध केली आहे. या घटनेचा साक्षीदार फक्त सामंत हे एकटेच असल्यामुळे त्यांच्यावर कितपत विश्वास ठेवायचा असा प्रश्न काहीजण उपस्थित करतील. पण नंतर आणखी कांही घटना घडल्या असून त्यांचे अनेक साक्षीदार आहेत. पण अशाच प्रकारच्या (सहेतुक वागण्याच्या) घटनेची सत्यता कोर्टात सिद्ध झाली असल्यामुळे त्याचे उदाहरण देणे येथे आवश्यक वाटते.

अमेरिकेतील नार्थ कॅरोलिना प्रांतातील डेव्ही काउंटी येथील एक शेतकरी जेम्स एल्. चॅफिन याला चार मुले होती. १६ नोव्हेंबर रोजी त्याने एक मृत्यूपत्र करून आपली सर्व इस्टेट तिसरा मुलगा मार्शल याच्या नावाने केली व पत्नी व इतर तीन मुलांना कांहीच ठेवले नाही. या मृत्यूपत्रावर दोन साक्षीदारांच्या सह्या होत्या. १० जानेवारी १९१९ रोजी त्याने दुसरे मृत्युपत्र केले. (हे मृत्युपत्र बायबल मधील जेनेसिस प्रकरण वाचून आपण नव्याने करीत आहोत, असे त्याच्या प्रस्तावनेत त्याने म्हटले आहे.) पण या मृत्यूपत्रावर कोणत्याही साक्षीदाराची सही नव्हती, आणि या नवीन मृत्यूपत्राची माहिती त्याने कोणाला दिलीही नव्हती. ७ सप्टेंबर १९२१ रोजी जेम्स अपघाताने मेला. त्याच्या मृत्यूनंतर साडेतीन वर्षांनी, म्हणजे जून १९२५ च्या सुमारास जेम्स पिंकनी या त्याच्या दुसऱ्या मुलाच्या स्वप्नात तो येऊ लागला व जेम्सला आपल्या ओव्हरकोटच्या खिशात मृत्यूपत्र असल्याचे सांगू लागला. हा ओव्हरकोट थोरल्या भावाकडे होता. तो तपासल्यानंतर त्याच्या खिशात शिवून तयार केलेल्या दुसऱ्या खिशात एक कागद सापडला. त्यात 'माझ्या जुन्या बायबलमधील जेनेसिसचे २७ वे प्रकरण वाचा' असे

लिहिले होते. हे बायबल त्याच्या आईकडे (म्हणजे जेम्स चॅफिनच्या पत्नीकडे होते.) जेम्स पिंकनीने या खेपेस आपल्या बरोबर साक्षीदार घेतले व आपल्या आईच्या घरी आला. तेथे जुने बायबल सापडले. साक्षीदारानेच ते उघडले व जेनेसिसच्या २७ व्या प्रकरणात ते मृत्यूपत्र त्याला सापडले. पण त्यावर साक्षीदारांची सही नसल्यामुळे मार्शलने (त्याच्या मुलाने) त्याला आव्हान दिले व हे प्रकरण कोर्टात गेले. (या नव्या मृत्युपत्राने त्याने चारही मुलांमध्ये इस्टेटीची समान वाटणी केलेली होती.) कॅरॉलिना प्रांतातील कायद्यानुसार साक्षीदाराची सही नसली व हस्ताक्षर मृत्यूपत्र करणाऱ्याचे आहे, हे सिद्ध झाले तर मृत्यूपत्र कायदेशीर ठरते. तसे ते ठरले. मार्शलच्या मुलग्याला व पत्नीला ते हस्ताक्षर जेम्स चॅफिनचे असल्याचे पटले, आणि हे प्रकरण निकालात निघाले. (शिवाय हे हस्ताक्षर ओळखणारे दहा साक्षीदार होते.)[६२]

हे मृत्यूपत्र खरे असल्याबद्दल कॅनडाच्या अतींद्रिय विज्ञान संस्थेच्या (S. P. R.) एका सभासदाने एका खास वकीलामार्फत पुन्हा नंतर ते तपासून खात्री करून घेतली. याप्रकरणातील एक अनिश्चित गोष्ट म्हणजे जेम्स पिंकनीला त्याचे वडील भुताच्या रूपात भेटले की स्वप्नात भेटले हे तो सांगू शकत नाही. *स्वप्न पाहणारी व्यक्ती सूक्ष्म वा लिंग देहाने फिरत असल्याचे, म्हणजे भुताच्या रूपात दुसऱ्यांना अन्यत्र दिसली असल्याचे,* अनेकदा आढळून आले असल्यामुळे -म्हणजेच *स्वप्नातील जग व मरणोत्तर जग यांच्यात अतींद्रिय दृष्टीने काहीच फरक नसल्यामुळे*-तो सांगू शकत नसावा हे उघड आहे.[६३]

(मनुष्य दररोज झोपल्यानंतर मरतो व जागा होताच पुन्हा जिवंत होतो, हे डेव्हिड ह्यूम या तत्त्ववेत्त्याचे म्हणणे तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने कितीही मूर्खपणाचे वा अविश्वसनीय वाटले तरी अतींद्रिय विज्ञानाच्या दृष्टीने अशा रीतीने खरे ठरते. अर्थात झोपेत शरीर मरत नाही, हा लिंग देह 'मरतो' म्हणजे शरीर सोडून बाहेर जातो.)

[कोर्टात सिद्ध झालेल्या अनेक प्रकरणापैकी आपला खून नवऱ्याने कसा केला हे तपशीलवार सांगणाऱ्या मिसेस शू नावाच्या स्त्रीच्या भुताची अमेरिकेतील एक केस तिच्या खुनी नवऱ्याला आजन्म कारावासाची शिक्षा ठोठावण्याइतपत कोर्टाला कशी पुरावे निदर्शक आढळून आली याच्या माहितीसाठी पाहा: **In Search of the Dead** - J. Iverson (1992) ही केस अनेकांची ढोंगे उघड करणाऱ्या एका संशयखोर शास्त्रज्ञाने स्वत: तपासून खरी असल्याचे मान्य केले आहे. या केसमध्ये सामंतांच्या बहिणीप्रमाणे *मृत स्त्री भौतिक शरीरात अवतरली होती.*]

मेल्यानंतर माणसाचे व्यक्तिमत्व मागे उरते, याला अनेक पुरावे अतींद्रिय संशोधनातून उपलब्ध झाले असून खून झालेल्या व्यक्तीने खून झाल्यानंतर दुसऱ्याच्या

शरीरात प्रवेश करून खून कुणी केला, का केला, जखमा कुठे झाल्या इत्यादी माहिती दिल्याचे व पोलीसांच्या अन्वेषणातून या माहितीच्या आधारे गुन्हेगार पकडल्याचे निदान दिलेली माहिती बरोबर-असल्याचे-अनेकदा सिद्ध झाले आहे. (अशाप्रकारे गुन्हेगार पकडल्याचे, त्याच्याजवळील माल हस्तगत केल्याचे व त्याने गुन्हा कबुल केल्याचे अलीकडचे एक उदाहरण म्हणजे १९७७ च्या फेब्रुवारीमध्ये शिकॅगो येथे टेरेसिटा बासा या ४८ वर्षे वयाच्या बाईचा खून करणारा शॉवरी या मारेकऱ्याचे होय.[६४])

## मृताशी फोनवरून बोलणे

अलीकडे मृतात्म्याचे म्हणून सांगितले जाणारे आवाज टेपरेकॉर्डवर टेप करण्यात आले असून ज्यांनी ते टेप केले त्यांच्या नातेवाईकांचे ते असल्याचे व त्यांनी ओळखल्याचे सांगण्यात आले आहे. क्वचित टेप करणाऱ्यांना अवगत नसलेल्या भाषेतही असे आवाज टेप करण्यात आल्याचे सांगण्यात येते. अशा गोष्टींचा परामर्श घेणे येथे प्रकरण अगोदरच फार विस्तार पावले असल्यामुळे - शक्य नाही. याविषयीचे कॉन्स्टंटाइन रॉडिव्ह याचे **Break -through** हे पुस्तक प्रसिद्ध असून सुशी स्मिथ हिच्या **Voices of the Dead** या पुस्तकातही याविषयीची अलीकडील माहिती दिलेली आहे.[६५]

काहींनी मृतात्म्याशी फोनवर बोलल्याचीही उदाहरणे आहेत. काहींनी हे आवाज मृतात्म्याचे-मेलेल्या आपल्या नातेवाईकाचे-असल्याचे ओळखले आहे. विशेष म्हणजे तो दिवस मृताला महत्वाचा होता. (जन्म दिवस, मृत्यूदिन इत्यादी) अशा दिवशीच नेमके हे फोन कॉल्स येत असल्याचे आढळून आल्यामुळे ते मृतात्म्याचे कॉल्स असावेत या समजुतीला बळकटी मिळते. कधीकधीं फोनवर अनेक आवाज एकाच वेळी ऐकायला येतात. मरणोत्तर जगातील अनेक आत्मे संदेश पाठविण्यासाठी फोनवर एकदम दाटी करीत असावेत, असा तर्क करण्यात आला आहे.[६६]

## मृतात्म्यांचा निर्णायक भौतिक पुरावा

आतापर्यंत मृतात्म्याच्या मरणोत्तर अस्तित्वाची ग्वाही देणाऱ्या ज्या घटना सांगितल्या आहेत- उदा. मृत व्यक्ती भेटणे, ती अमूक आहे अशी ओळख पटणे, तिच्याशी संभाषण करणे, तिला स्पर्श करून ती घन (Solid) आहे हे कळणे इत्यादी - त्यावरून फार तर ज्याला ती मृत व्यक्ती भेटली, त्याला मरणोत्तर अस्तित्वाची खात्री पटेल. पण इतरांचे काय? ज्यांना कसलाही अनुभव नाही, अशा लोकांना मरणोत्तर अस्तित्वाची खात्री पटवून देणारा निर्णायक पुरावा देता येईल काय? कोर्टाने वा गुन्ह्यांचे अन्वेषण करणाऱ्या पोलिसांनीसुद्धा काही पुरावे मान्य करून त्याचे सत्यत्व प्रस्थापित

केले असल्यामुळे याविषयी संशय बाळगण्याचे कारण असू नये. कारण *व्यावहारिकदृष्ट्या सत्य प्रस्थापित करणाऱ्या कसोट्या वैज्ञानिकदृष्ट्या सत्य प्रस्थापित करणाऱ्या कसोट्यांहून वेगळ्या असू शकत नाहीत.* तथापि जोपर्यंत मृतात्म्यांचे फोटो मिळत नाहीत, तोपर्यंत वैयक्तिक अनुभव हे भास असण्याची अथवा संमोहनाचा प्रकार असण्याची शक्यता नाकारता येत नाही. अंगात संचार होऊन सांगितलेल्या घटनांवरून गुन्ह्याचा शोध लागला किंवा स्वप्नातील दृष्टांतावरून एखादे मृत्यूपत्र सापडले तर मरणोत्तर अस्तित्व सिद्ध होत नाही. अतींद्रिय शक्तीचे अस्तित्व फार तर सिद्ध होईल असा दृष्टिकोण स्वीकारणाऱ्याला अतींद्रिय विज्ञान कळेलेले नाही असे म्हणता येते. कारण अतींद्रिय म्हणजे इंद्रियांना अगम्य असलेले आणि फोटो हा इंद्रियगम्य वस्तूचाच मिळणे शक्य आहे. पण इंद्रियांना भूत दिसत असेल तर त्याचा फोटो का मिळू नये असा युक्तिवाद करणे शक्य आहे. याला उत्तर असे की, इंद्रियगम्य जगाला जे नियम लागू होतात ते अतींद्रिय जगाला लागू व्हावेत, असा आग्रह धरणे योग्य होणार नाही. *असे असले तरी मृत्यात्म्यांचे फोटो मिळाले आहेत.*[६७] पण या फोटोविषयी दोन दृष्टिकोण स्वीकारता येतात. एक म्हणजे हे फोटो बनावट आहेत. आणि दुसरा म्हणजे ते खरे असतील तर ते अतींद्रिय शक्तीने, ज्याला 'सायकोकायनेसिस' म्हणतात, ते निर्माण केले आहेत असे म्हणता येते. मृतात्म्याचे फाटोसुद्धा जर मरणोत्तर अस्तित्व सिद्ध करू शकत नसतील तर मग हे अस्तित्व कशानेच सिद्ध होणार नाही, असे काहीना वाटणे शक्य आहे. पण असे वाटण्याचे कारण नाही. मरणोत्तर अस्तित्व निर्णायक अशा भौतिक पुराव्यांनी सिद्ध करणे शक्य असून तसे पुरावे प्रत्यक्षात उपलब्धही आहेत.

वार्सा (पोलंड) येथील एक माध्यम फ्रॅनेक क्लुस्की हा शरीरधारी मृतात्मे बोलावणारा (Materializing Medium) म्हणून प्रसिद्ध आहे. त्याच्यावर फ्रान्समध्ये (पॅरीस येथे) नोबेल पारितोषिक विजेता शरीरशास्त्रज्ञ चार्लस रिचे व डॉ. जीली यांनी प्रयोग केले असून मृतात्म्यांच्या हातांचे मेणाचे साचे त्यांनी घेऊन ठेवले आहेत. हे साचे घेण्याची पद्धत अशी: मृतात्म्याला पातळ झालेल्या मेणात हात घालून बाहेर काढायला सांगायचे. ते बाहेर काढल्यानंतर मेण लगेच घट्ट होऊन हातावर त्याचा एक पातळ पापुद्रा तयार होतो. नंतर मृतात्मा अदृश्य होतो, व तो पापुद्रा तसाच राहतो व हाताचा मेणाचा हातमोजा (Glove) तयार होतो. जिवंत व्यक्तीचा असा हातमोजा तयार होऊ शकत नाही व रबराचे साधन वापरून बनावट हातमोजा अशा प्रकारे तयार करता येत नाही. जिवंत व्यक्ती मोज्यातून हात बाहेर काढताना तो साचा मोडतो व रबराचा बनावट केला तर हातावरील शिरा, सुरकुत्या इत्यादी त्यावर उमटत नाहीत. या मेणाच्या हातमोज्यावर हातावरील शिरा-सुरकुत्या इतक्या स्पष्ट उमटलेल्या आहेत की, हात

हातमोज्यात आपोआप अदृश्य (Dematerialise) झाला तरच त्या उमटणे शक्य आहे. ही गोष्ट मृतात्म्यालाच शक्य आहे. हे साचे पॅरिसमध्ये हल्लीही अस्तित्वात आहेत.[६८] मरणोत्तर अस्तित्व नाकारणारे या पुराव्याकडे पद्धतशीरपणे दुर्लक्ष करतात.याचे कारण ते निर्णायक आहेत हेच असावे. तसले साचे तयार करून दाखवून ते बनावट असल्याचे सिद्ध करणे आजपर्यंत कुणालाही शक्य झालेले नाही.

## विज्ञानाची 'सत्या' ची कसोटी

कोणत्याही गोष्टींची उपपत्ती लावणे एखाद्या सिद्धांतामुळे शक्य असेल तर त्यासाठी पुन्हा एखादा दुसरा सिद्धांत मांडण्याची जरूरी नाही, असा एक विज्ञानात नियम असून त्याला ओकॅमचे पाते (Occam's Razor) म्हणतात. (काटकसरीचे Parsimony तत्त्व असे त्याला दुसरे नाव आहे.) मरणोत्तर अस्तित्व ज्या गोष्टीमुळे सिद्ध होते, असे सांगण्यात येते, त्या गोष्टींची उपपत्ती अगोदरच विज्ञानात मान्यता पावलेल्या अतींद्रिय शक्तीच्या सहाय्याने लावता येत असल्यामुळे मरणोत्तर अस्तित्वाचा सिद्धांत फालतू ठरतो, असे मरणोत्तर अस्तित्वाच्या विरोधकांचे म्हणणे आहे. पण वर उल्लेख केलेल्या मेणाच्या साच्यांची उपपत्ती अतींद्रिय शक्तीच्या साहाय्याने लावता येत नाही. आणि मृतात्म्यांच्या फोटोची तरी कशी लावता येईल हा प्रश्न आहे. आणि फोटोची लावता येत असेल तर मेणांच्या साच्याची तरी का लावता येऊ नये? आणि तशी ती लावता येत असेल तर अतींद्रिय शक्तीचे सामर्थ्य इतके अचाट बनले की, त्या शक्तीला या जगात अशक्य असे काहीच ठरणार नाही. पण मग ही उपपत्ती 'उपपत्ती' राहील काय? नको असलेल्या किंवा आवडत नसलेल्या घटना गुंडाळून ठेवण्यासाठी उपयोगी पडणारी ती एक खुंटी बनेल ! त्यापेक्षा मृतात्म्यांची साधी व सरळ उपपत्ती स्वीकारणे हे शहाणपणाचे नाही काय? जगात कोणीही ज्या भाषेत बोलू शकत नाही, ती इजिप्शन भाषा एखादी स्त्री अतींद्रिय शक्तीने बोलू शकते असे मानण्यापेक्षा इजिप्शन भाषा जाणणारी-बोलणारी- मृत व्यक्ती त्या स्त्रीच्या तोंडून बोलत आहे, असे मानणे अधिक सयुक्तिक नाही काय? सामंतानी आपल्या अतींद्रिय शक्तीने आपल्या बहिणीचे भूत निर्माण केले असे समजण्यापेक्षा २५ वर्षे अखंडपणे वटपौर्णिमेचे व्रत चालवणाऱ्या ललिताबाईंनी वटपौर्णिमेच्या दिवशी मेल्यामुळे -पारणे न सोडता -पारणे सोडण्यासाठी भूत होऊन शरीर धारण करुन आल्या असे समजणे हे अधिक वस्तुनिष्ठपणाचे नाही काय? जेम्स पिंकनीने आपल्या अतींद्रिय शक्तीने वडिलांचे भूत निर्माण करून अज्ञात मृत्यूपत्राची माहिती मिळवली, असे समजण्यापेक्षा मृत वडिलांनीच त्यांना त्याची माहिती दिली असे समजणे अधिक सुसंगत नाही काय?

केंद्रात पृथ्वी स्थिर असून सूर्य तिच्याभोवती फिरतो, या टोलेमीच्या सिद्धांताने ग्रहणांचे अचूक भाकीत करता येते व सूर्याभोवती पृथ्वी फिरते या कोपर्निकसच्या सिद्धांतानेही ते करता येते. मग टोलेमीचा सिद्धांत सोडून कोपर्निकसचा सिद्धांत का स्वीकारण्यात आला? कारण तो इतर खगोलशास्त्रीय घटनाशी सुसंगत आहे म्हणून होय. अशा रीतीने सुसंगती ही वैज्ञानिक 'सत्या' ची कसोटी आहे. मरणोत्तर अस्तित्वाचा सिद्धांत जीवशास्त्रातील व मज्जाशास्त्रातील घटनांशी-जीव, मेंदू आणि मन हे यंत्र नसल्याच्या शोधांशी -सुसंगत आहे. (उलट यंत्रवादाशी विसंगत आहे) अतींद्रिय शास्त्रातील शोधाशीही तो सुसंगत आहे. अलीकडे काही शास्त्रज्ञांनी मृत्यूशय्येवरील माणसांच्या, तसेच मरून जिवंत झालेल्या माणसांच्या अनुभवांचे संकलन केले असून त्यांच्या निरीक्षणाशी व शोधाशीही मरणोत्तर अस्तित्वाचा सिद्धांत सुसंगत असल्याचे आढळून आले आहे.( स्थळाच्या अभावी त्यांचा परामर्ष घेणे येथे शक्य झालेले नाही.)[६१] अशा रीतीने सुसंगतीच्या निकषावर मरणोत्तर अस्तित्वाचा सिद्धांत विज्ञानात निरपवादपणे प्रस्थपित होतो. एखादी गोष्ट विज्ञानातील इतर गोष्टीशी सुसंगत असेल तर ती गोष्ट भौतिकदृष्ट्या अस्तित्वात आहे की नाही याचीसुद्धा फिकीर शास्त्रज्ञ करीत नाहीत असे आढळून येते. उदा. भौतिकशास्त्रातील वस्तुतरंग (Matter-Waves) यांचा विद्युत्‌चुंबकीय परिणाम दिसून येत नाही. तरी ते अस्तित्वात आहेत असे भौतिकशास्त्रज्ञ सांगतात.(अशा अदृश्य व अमूर्त तरंगांचा शोध- गणिताने -लावलेल्या डी ब्रोग्ली या शास्त्रज्ञाला त्याबद्दल नोबेल पारितोषिकही मिळाले आहे !) मृतात्म्याचे अस्तित्व यापेक्षा निश्चित जास्त वस्तुनिष्ठ व मूर्त आहे, असे म्हणता येते. तसे ते नसते तरी सुसंगतीच्या कसोटीवर त्याचे अस्तित्व वैज्ञानिकदृष्ट्या मान्य करणे शास्त्रज्ञांना भाग आहे. तसे मान्य न करणे हा त्यांचा वैज्ञानिक वंशवाद ठरेल !

## टिपा

१. मरणोत्तर अस्तित्वाची चर्चा पाश्चात्य देशात माध्यमांच्या संदर्भात जास्त करण्यात आलेली असून लेखनमर्यादेमुळे ती चर्चा येथे टाळली आहे. मरणोत्तर अस्तित्वाचे वैज्ञानिक दृष्टिकोणातून संशोधन करण्यासाठी इंग्लंडमध्ये स्थापन झालेल्या अतींद्रिय विज्ञान संघाचे (S. P. R.) संस्थापक शास्त्रज्ञ मृत्यू पावल्यानंतर माध्यमांच्या मार्फत त्यांनी आपले मरणोत्तर अस्तित्व सिद्ध करण्याचा प्रयत्न केल्याचे दिसून येते. त्यासाठी एक आगळे तंत्र त्यांनी अवलंबिले असून ते Cross Correspondence या नावाने प्रसिद्ध आहे. यात मायर्स हे प्रमुख होते. हॉजसन व गुर्नी यांनीही हा प्रयत्न केला. शास्त्रज्ञांनी Cross Correspondence चे प्रकरण खोलात जाऊन तपासले, तर त्यांची स्वत: मायर्सच मरणोत्तर जगातून हे संदेश पाठवत असल्याची खात्री पटल्याशिवाय राहणार नाही, इतके ते पुरावेनिदर्शक (Evidential) आहे. गार्डनर मर्फी

यांनी मरणोत्तर अस्तित्वाचे तीन निकष ठरविले आहेत. ते निकष म्हणजे स्मरण, व्यक्तिमत्व आणि सहेतुकता. या तिन्ही निकषांवर Cross Correspondence चा पुरावा उतरतो. वुइल्यम जेम्ससारख्या काही शास्त्रज्ञांनी अगोदर कोण मरेल त्याने आपले मरणोत्तर अस्तित्व दुसऱ्याला सिद्ध करून दाखवायचे असे आपापसात ठरविले व त्यासाठी काही सांकेतिक खुणाही ठरविल्या. या पद्धतीने जेम्स हिस्लॉपला अगोदर मेलेल्या वुइल्यम जेम्सने आपले मरणोत्तर अस्तित्व दाखवून दिले व हिस्लॉपला ते पटलेही. अतींद्रिय शक्ती खोटी म्हणून माध्यमावर लबाडीचा आरोप व हल्ला आपल्या हयातभर करणाऱ्या हुदिनी या जादुगारानेही आपल्या पत्नीशी असा एक करार केला होता व त्याच्या पत्नीला त्याचे मरणोत्तर अस्तित्व पटलेही होते.

२. मरणोत्तर अस्तित्व वैज्ञानिकदृष्ट्या सिद्ध करण्यासाठी केवळ भुतांचे फोटो किंवा मृतात्म्यांच्या हातापायांचे मेणाचे साचे मिळवून उपयोग नाही, तर ज्यांचे फोटो किंवा मेणाचे साचे घेण्यात आले असतील, त्या एकेकाळी जिवंत व्यक्ती होत्या (व नंतर मेल्या) हे सिद्ध केले पाहिजे, असे काहीजण म्हणतात. पण समजा हे सिद्ध करता आले नाही, तर ते फोटो किंवा मेणाचे साचे कोणत्या शक्तीमुळे मिळाले, हा आक्षेप घेणाऱ्यांना सांगावे लागेल. मानसिक शक्तीने हे घडून येते, असे म्हणायचे असेल तर कोणाच्या मानसिक शक्तीने -जिवंत व्यक्तीच्या की मेलेल्या- हे ठरविण्यास कोणतेच साधन वा निकष उपलब्ध नाही. काहीजण आपल्या ओळखीच्या मृत माणसाचा दुसऱ्या व्यक्तीत संचार झाल्यानंतर त्याच्या लकबीवरून व स्वभाववैशिष्ट्यावरून अमुकच ती व्यक्ती आहे, असे ओळखता येणे हाच मरणोत्तर अस्तित्वाचा निर्णायक पुरावा होय असे म्हणतात. पण हा पुरावा निर्णायक असला तरी त्या संबंधित व्यक्तिपुरताच तो मर्यादित राहतो. तो सार्वजनिक होऊ शकत नाही, ही त्यातील मुख्य उणीव आहे. (पाहा: **A Critical Examination of The Belief in Life After Death** - C. J. Ducasse 1961)

३. पुनर्जन्मासंबंधीच्या घटना हा मरणोत्तर अस्तित्व निरपवादपणे सिद्ध करणारा एक महत्वाचा पुरावा असला, तरी त्याचा येथे विचार न करण्याचे कारण तो एका स्वतंत्र ग्रंथाचा विषय आहे हे होय. तथापि, पुढील प्रकरण ५ मध्ये या विषयाचा संक्षेपाने विचार करू.



## संदर्भ टिपा

१. "Man's concern with life after death has been posterity's standby for the satisfaction of its curiosity about the life before death of people in past ages".- **Man's Concern with Life After Death** - Ed. Arnold Toynbee.

२. Plato's **Republic, कठोपनिषत्**

३. जेम्स किड नावाच्या एका अविवाहित व गरीबीत जीवन कंठणाऱ्या अमेरिकन खाण कामगाराने १९६४ साली मरणोत्तर आत्म्याचे अस्तित्व वैज्ञानिक पद्धतीने सिद्ध करण्यासाठी पाऊणेदोन लाख डॉलर मृत्यूपत्राने मागे ठेवले. आणि ही रक्कम कोणाला द्यावी, याविषयीचे प्रकरण कोर्टात उभे राहिले. मरणोत्तर आत्म्याचे अस्तित्व वैज्ञानिक पद्धतीने सिद्ध करता येते काय हा कोर्टापुढील प्रश्न होता आणि याविषयी गार्डनर मर्फीसारख्या अनेक प्रसिद्ध मानसशास्त्रज्ञांच्या साक्षी कोर्टापुढे झाल्यानंतर कोर्टाची खात्री पटली की, हा प्रश्न वैज्ञानिक पद्धतीने सोडविणे शक्य आहे. आणि ही रक्कम अमेरिकेच्या अतींद्रियविज्ञान संस्थेला (Society for Psychical Research वा संक्षिप्तात S. P. R.) कोर्टाने दिली. हे कोर्ट प्रकरण 'Great Soul Trial' (मरणोत्तर आत्म्याचा महान अभियोग) या नावाने प्रसिद्ध आहे.

४. "When We get down to the atomic level, the objective world of space and time does not exist"- Heisenberg. (भौतिकशास्त्रातील नोबेल पारितोषिक विजेता शास्त्रज्ञ.) **(Physics and Beyond)**

५. भौतिकवादी अतींद्रिय शक्तीचे अस्तित्व नाकारण्यासाठी तिची भौतिक विज्ञानाच्या दृष्टिकोणातून उपपत्ती देण्याचा प्रयत्न करतात. याच प्रेरणेतून मरणोत्तर अस्तित्व नाकारण्याचाही ते प्रयत्न करतात. (कारण अतींद्रिय शक्तीच्या अस्तित्वापेक्षाही मरणोत्तर अस्तित्व हे भौतवादाच्या मुळावरच घाव घालणारे ठरते.) त्यासाठी अतींद्रिय शक्तीचे अस्तित्व मान्य करण्यावाचून त्यांना गत्यंतर उरत नाही. फक्त ती शक्ती भौतिक आहे असा त्यांचा दावा असतो इतकेच. जो अशा रीतीने अतींद्रिय शक्तीचे अस्तित्व मान्य करतो तो भौतिकवाद राहात नाही, हे त्यांच्या लक्षात येत नाही.

६. The Metaphysics of Precognition -by-Bob Brier in S. Thankur's **Philospahy and Psychical Research** काहींनी कालाच्या उलट प्रवास करणाऱ्या फेनमॅन आकृतीतील विरोधी कणांनी (Anti-particles) भविष्यज्ञानाची उपपत्ती लावण्याचा प्रयत्न केला आहे.

७. हे आपण मागच्या प्रकरणात पाहिलेच आहे.

८. रोझॅलिंड हेवूड या अतींद्रिय सामर्थ्य असलेल्या विदुषीची व्हिव्हियन नावाच्या तिच्या मेलेल्या मित्राशी अतींद्रिय पातळीवर भेट झाली. आणि त्याने आपण मेल्यानंतर संपतो, ही आपली कल्पना चुकीची असल्याचे आपणाला आता समजले असल्याचे तिला सांगितले. यावर रोझॅलिंड त्याला म्हणाली, "तू मेल्यावर अस्तित्वात आहेस हे अतींद्रिय शक्तीमुळे मला पटले, तरी S. P. R. ने (अतिंद्रिय विज्ञान संस्थेने ) पुराव्याविषयी मला विचारले तर मी तिला काय सांगू?" यावर व्हिव्हियन म्हणाला, "मी तुला पुरावा देऊ शकत नाही. कारण मरणोत्तर अवस्थेविषयी तुमच्याकडे कल्पना नाहीत. मी फक्त काव्यात्मक प्रतिमा (Poetic Images) देऊ शकतो." आणि यानंतर रोझॅलिंडच्या अंत:चक्षूसमोर अनंत आकाशात दोन शुभ्र पंख फडफडत असल्याचे दृश्य तरळले. ('Illusion or what? by Rosalind Heywood, in Toynbee **op.cit.**) आत्म्याला आकाशात प्रतीक रूपाने विहार करणाऱ्या हंस पक्षाची उपमा

अनेक देशांच्या संस्कृतीत आढळते. आत्मा श्रेष्ठ बनल्यास त्याला 'परमहंस' म्हणतात. डी स्कॉट रोगो या संशोधकांनेही मरणोत्तर अवस्थेची त्रिमितीमध्ये विचार करणाऱ्या मानवाला कल्पना करता येणार नसल्याने प्रतिमांच्या (Images) साहाय्याने त्याची कल्पना शरीर सोडलेल्या व्यक्तीने (Discarnate) करून देण्याचा प्रयत्न केल्याचे एक उदाहरण दिले आहे. (NAD : Study of some unusual 'Other world' Experiences (1970) by, D. Scott Rogo in Rosalind Heywood **op. cit.**

९. **Body, Mind and Death** -Ed.Antony Flew. (See Ducasse)

१०. "The materialist standpoint today is a scientific position". Charles Sherington. **Man on his Nature.** या दृष्टिकोणाचा पुरस्कार प्रस्तुत लेखकानेही केलेला आहे. पाहा.: नवभारत मासिकाच्या फेब्रुवारी -१९६० च्या अंकातील 'यंत्र, व्हायरस व मनुष्य' हा लेख. तसेच नोव्हेंबर व डिसेंबर १९६३ च्या अंकातील 'जीवाची उत्पत्ती' भाग १ व २ हे लेख.

११. **Physical Foundation of Biology** - W. M. Elsasser

१२. **Personal Knowledge**- M. Polanyi

१३. **The Existence of Mind** -J. Beloff.

१४. **The Ghost in the Machine** -A. Koestler.

१५. **Self and Its Brain** -K. R. Popper and J. C. Eccles.

१६. **Purpose in a World of Chance**- W. H. Thorpe.

१७. बर्गसॉने मांडलेल्या Elan Vital या कल्पनेचा ज्युलियन हक्स्ले या जीवशास्त्रज्ञाने Elan Locomotif या कल्पनेने केलेला प्रतिवाद प्रसिद्ध आहे. (Elan Locomotif म्हणजे 'आगगाडीचा जीव')

१८. **Mathematical Challenges to the Neo-Darwinian Interpretation of Evolution** Ed. P. S. Moorhead and M.M. Kaplan.

१९. **The Intelligent Universe** -Fred Hoyle quoted by. L. Watson in **Supernature II.**

२०. एखादे माकड टाईपराइटरवर कितीही वर्षे बोट दाबत राहिले तरी योगायोगाने शेक्सपिअरचे एखादे नाटक तयार होण्याची जितकी शक्यता आहे, तेवढीच योगायोगाने जीव निर्माण होण्याची शक्यता आहे.

२१. **Galaxies, Nuclei and Quasars** -Fred Hoyle qutoed by L. Watson, **op. cit.** आईन्स्टाईननेही म्हटले आहे की, "(निसर्ग) इतकी श्रेष्ठ बुद्धिमत्ता प्रकट करतो की, त्याच्यापुढे तुलनेने मानवी बुद्दी व कृती क:पदार्थ ठरावी." **(The World as I see it)**

२२. **The Mysterious Universe** - J. Jeans

२३. **Evolutionary Biology** - D. J. Futuyama in L. Watson **Op.cit.**

२४. 'Computing Machinery and Intelligence' by A. M. Turing in **Minds and Machines** - A. R. Anderson.

२५. Prof . Ziff on Robots', 'Robots Incorporated' in Anderson **op.cit.**

२६. **Brocas Brain** -Carl Sagan. **Dragons of Eden** -C- Sagan. आता तर (IBM) च्या **'डीप ब्ल्यू'** या संगणकाने जागतिक बुद्धिबळ चँपियन गॅरी कॅस्परोव्ह याचा जगाचे संपूर्ण लक्ष वेधलेल्या न्यूयॉर्क येथील स्पर्धेत १२ मे १९९७ रोजी पराभव केला आहे. 'मानव विरूद्ध यंत्र' स्पर्धेतील मानवाचा पराभव असे याचे काहींनी सनसनाटी वर्णन केले असले तरी ब्रिटिश गणिताशास्त्रज्ञ रॉजर पेनरोज याने यापूर्वीच हे भविष्य वर्तविले होते व हा मानवाचा पराभव नसून यंत्राचाच कसा पराभव आहे. हे **Shadows of the Mind** या ग्रंथात दाखवून दिले आहे. पाहा P. 46

२७. 'Minds, Machines and Godel' in Anderson **op.cit** रॉजर पेनरोजनेही गोडेलच्या थेरमच्या आधारे **Emperor's New Mind** आणि **Shadows of the Mind** या दोन ग्रंथात मानवी जाणीव गणितात कशी बसू शकत नाही - म्हणजेच यंत्र (संगणक) कितीही अघटीत बुध्दमत्तेची कामे करु शकले तरी ते कसे जाणीवयुक्त होऊ शकत नाही, हे दाखवून दिले आहे. [**The Large, the Small and the Human Mind** (1997) या अलीकडील ग्रंथात तर स्टिफेन हॉकिंगसारख्या शास्त्रज्ञाचेही तोंड त्याने बिनतोड युक्तिवादाने बंद केले आहे.]

२८. मानवाला यंत्राचा पराभव करात येऊ नये, म्हणून अतींद्रिय शक्ती विरुद्ध एक संरक्षक कवच निर्माण करण्याची सूचना ट्यूरिंगने केली आहे. पण असले कवच अस्तित्वात नाही. असूच शकत नाही.

२९. **Languages of the Brain** - Karl Pribram.

३०. **The Holographic Paradigm** - Ed. Ken Wilber.

३१. **The Physical Basis of Mind** - Ed. P. Laslett quoted by A. Flew **op.cit.**

३२. **Ibid**

३३. तर्कशास्त्र हे पोकळीत कार्य करू शकत नाही. (तसे कार्य करणारे तर्कशास्त्र निरुपयोगी आहे. फार तर बौद्धिक कसरत म्हणून त्याचा उपयोग होईल.) त्याला शेवटी वास्तवतेचा आधार घ्यावाच लागतो. ही वास्तवता अर्थात विज्ञान पुरवते आणि म्हणून तत्त्वज्ञानाचाही अंतिम आधार विज्ञानच राहणार आहे.

३४. **Self and Its Brain** - K. R. Popper and J. C. Eccles.

३५. **Mystery of the Mind** - Wilder Penfield

३६. K. R. Popper and I. C. Eccles. **op.cit.**

३७. **W. Penfield op.cit.**

३८. **Beyond Telepathy** - A. Puharich.

३९. **Mind and Its Place in Nature** - C. D. Broad अलीकडे अणूच्या सूक्ष्म (Subatomic) जगात शक्तीच्या अविनाशित्वाचे तत्त्व काटेकोरपणे पाळले जात नाही, असे आढळून आले आहे.

४०. याला बळकटी आणणाऱ्या घटना म्हणजे ज्याला Psychosomatics म्हणून संबोधण्यात येते त्या शास्त्रातील घटना होत. मनाने रोग बरा करण्याचे सामर्थ्य हा आता विज्ञानमान्य विषय झाला आहे. या वैद्यकीय शास्त्रशाखेला Psychotherapy म्हणतात (पाहा. **Sense and Nonsense in Psychotherapy** - L. Chertok. या पुस्तकाचे दुसरे नाव. **The Challenge of Hypnosis** असे असून केवळ सूचनेने शरीरावर फोड (भाजलेले) निर्माण झाल्याच्या लेखकाच्या (व इतर प्रयोगकर्त्यांच्या) प्रयोगांची त्यात वर्णने आहेत. (मन बदलले तर शरीर बदलते याबद्दलच्या पुराव्यासाठी पुढील 'दुसऱ्या देहात प्रवेश' हा विभाग पाहा.)

**४१. भूमिरापोऽनलो वायु: खं मनो बुद्धिरेव च ।**
**अहंकार: इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा ।। भगवद्गीता ७.४**

४२. याला किर्लीयन फोटोयंत्र म्हणतात. या तंत्राने एखाद्या पानाचा निम्मा भाग कापून टाकला व त्याचा या तंत्राने फोटो घेतला तर वास्तविक अर्ध्या पानाचा फोटो यावयास पाहिजे. पण प्रत्यक्षात पूर्ण पान फोटोत उमटते ! याचाअर्थ कापून टाकलेल्या पानाचा प्राणदेह अदृश्य स्वरूपात असतो, असा होतो. (**The Probability of the Impossible** -T. Moss) या तंत्राने मानवी भावनांचे व मानसिक अवस्थेचेही फोटो काढणे शक्य झाले आहे. "Love, hate, fatigue, stomach-ache, sexual desire as faint as might be caused by a fleeting kiss, all (were) registered (by this technique)" Ademanko, (**The New Soviet Psychic Discoveries** - H. Gris, and W. Dick.) डॉ. वॅटर्स याने उंदीर, कोंबड्याची पिले व बेडूक हे प्राणी मेल्यानंतर काहीतरी धुक्यासारखे वर जात असल्याचे फोटो मिळवले आहेत. (**The Invisible World** H. Carrington) डॉ. व्हॅन झेल्स्ट याने हॉलंडमध्ये व डॉ. डंकन मॅक्डुगल याने इंग्लंडमध्ये मरत असलेल्या रूग्णांना सूक्ष्म वजनकाट्यावर ठेवून पडलेल्या फरकावरून या प्राणशरीराचे वजन २ ³/७ औंस असल्याचे निश्चित केले आहे. या क्षेत्रात चाकोरी सोडून संशोधन करणारे-आणि आपल्या सहकाऱ्यांचा रोष ओढवून घेणारे-शास्त्रज्ञ म्हणजे हॅरोल्ड बर्र, झेंट ग्योर्गी, (नोबेल पारितोषिक विजेता) रॉबर्ट बेकर, डुब्रोव्ह इत्यादी होत. या प्राणशरीराला 'अंगुष्टमात्र: पुरूष:' असे उपनिषदांनी म्हटले असून १९३५ साली पुनर्जन्म प्रकरणी गाजलेल्या शांतीदेवीनेही पूर्वजन्मी आपण बाळंतपणात मेल्यानंतर 'आंगठ्याएवढे' होतो असे स्पष्ट म्हटले असून पाश्चात्यांनीही "My body was the size of my thumb" असे म्हटले आहे. पाहा, **In Search of the Dead** - J. Iverson (P. 74)

४३. 'The Consciousness of Lost Limbs' by William James in L. Watson, **Biology of Death.** संमोहनानेही या अदृश्य अवयवांचे अस्तित्व सिद्ध करता येते. अदृश्य प्राणशरीराचेही अस्तित्व संमोहनाने सिद्ध करता येते. जार्ल फालर या शास्त्रज्ञाने तसे सिद्ध केले आहे. (**The Probability of the Impossible** -T. Moss)

४४. हृदयबंद पडले तरी मनुष्य मरत नाही. पण मेंदूला केवळ पाच मिनिटे प्राणवायू मिळाला नाही तरी तो मरतो. हे मेंदूच्या विद्युतलहरी बंद झाल्यामुळे (ई. ई. जी. यंत्राच्या सहाय्याने) कळते. ३ नोव्हेंबर ६७ रोजी व्हिएटनाममधील एका इस्पितळातील जखमी सैनिक या पद्धतीने (ही पद्धत मृत्यूची निर्णायक कसोटी मानली जाते.) डॉक्टर लोकांनी मेल्याचे जाहीर केले. पण तब्बल चार तासांनी तो स्मशानात जिवंत झाला हल्ली तो लष्करी निवृत्ती वेतन घेत आहे. **Toynbee, op.cit.**

४५. **The Secret Life of plants** - P. Tompkins and C. Bird

४६. **The Psychic Power of Animals** - B. Schul.

४७. **Biology of Death** - L.Watson.

४८. S. P. R. Journal Vol. 39. No. 692 quoted by C. D. Broad in **Lectures in Psychical Research.**

४९. हॉर्नेल हार्ट या संशोधकाला २७ टक्के ड्यूक युनिव्हर्सिटीमधील विद्यार्थ्यांना हा अनुभव आल्याचे व चार्लस् टार्ट या मानसशास्त्रज्ञाला मारिजुआना सेवन करणाऱ्यापैकी ४४ टक्के लोकांना हा अनुभव आल्याचे आढळून आले आहे. **Out of Body Experiences** - A Handbook - J. L. Mitchell.

५०. S. P. R. Proceedings. Vol. 7 in C. D. Broad **op.cit.**

५१. **Possession and Exorcism** - Oesterreich.

५२. **The Psychic in the House** -W. F. Prince.

५३. T. Moss. **op.cit.**

५४. **The Personallity of Man** - G. N. M. Tyrrell.

५५. जॉन्स हॉपकिन्स युनिव्हर्सिटी व न्यूयॉर्क सायकॉलॉजिक इन्स्टिट्यूट येथे आयलिन गॅरेटच्या केलेल्या मानसिक तपासणीवरून हे गाईड मिसेस गॅरेटहून वेगळ्या व्यक्ती असल्याचे आढळून आले आहे. मृत व्यक्तीला मरणापूर्वी एखादा रोग झालेला असेल तर त्याची लक्षणे संचाराच्या वेळी माध्यमात दिसून येतात असेही आढळून आले आहे.

५६. **Watseka Wonder** - E. W. Stevenson - आयान स्टिव्हेन्सन यांने भारतातील असलेच एक प्रकरण आपल्या **Twenty Cases Suggestive of Reincarnation** या ग्रंथात दिलेले आहे. जसबीर जाट या नावाचा हा मुलगा देवीने मेल्यानंतर त्याच्या शरीरात शोभाराम या ब्राम्हण तरूणाने प्रवेश केल्याचे या उदाहरणात दिसून येते. असेच एक प्रकरण पुढील ५ व्या प्रकरणात दिलेले आहे.

५७. मृतात्म्याला मरताना झालेल्या रोगाची लक्षणे संचार अवस्थेत माध्यमाच्या शरीरात कशी दिसतात याची उपपत्ती या अतींद्रिय शक्तीने कशी लावणार?

५८. **Ancient Egypt Speaks** -A- J. H. Hulme and F. Wood in Watson, **op.cit.**

५९. लॉरा एडमंड्स ही माध्यम तंद्रावस्थेत ग्रीक व स्पॅनिश भाषेत बोलत असे. अमेरिकेतील लिली डेल या शहरात विवेकानंदांचे गुरूबंधू स्वामी अभेदानंद कीलर नावाच्या पाटीवर लिहिणाऱ्या माध्यमाकडे गेले असता, एकाच वेळी संस्कृत, ग्रीक, बंगाली आणि इंग्लिश अशा चार भाषांत मृत व्यक्तींनी पाटीवर लिहिल्याची घटना घडली असून त्या माध्यमाला ग्रीक, संस्कृत आणि बंगाली मुळीच येत नव्हते, इतकेच नव्हे तर लिली डेल शहरातही बंगाली व संस्कृत जाणणारा कोणी नव्हता असे अभेदानंदांनी म्हटले आहे. जोगेन (योगानंद) या आपल्या मृत गुरुबंधूचे बंगाली हस्ताक्षर आपण ओळखल्याचे अभेदानंदांनी म्हटले असून दुसऱ्या माध्यमांकडे ते गेल्यावेळी जोगेनने आपल्याबरोबर ग्रीक मृत व्यक्तीला आणले असल्याचे व त्याने ग्रीकमध्ये त्या पाटीवर लिहिल्याचे त्यांना दुसऱ्या एका मृतात्म्याकडून कळल्याचे त्यांनी म्हटले आहे. - **(Life Beyond Death** -Swami Abhedananda) एखादी व्यक्ती तिला न येणारी भाषा तंद्रावस्थेत बोलत असेल, तर तिच्यात प्रवेश केलेला एखादा मृतात्मा ती बोलत आहे, असे मानण्यातील एक अडचण अशी सांगण्यात येते की, कोणतीही भाषा बोलण्यासाठी ती भाषा प्रथम शिकावी लागते. त्यासाठी शारीरिक कौशल्य- स्नायूंचे एकसूत्रीकरण-संपादन करणे आवश्यक असून हे सरावानेच शक्य आहे. ज्या शरीराने (ती भाषा बोलण्याच्या सरावाचे) हे कार्य केलेले नाही, त्या शरीरामध्ये प्रवेश करणाऱ्याला ती भाषा बोलणे अशक्य आहे. तात्पर्य, एखाद्या व्यक्तीला न येणारी भाषा तिच्यात प्रवेश करणाऱ्या मृतात्म्याला बोलता येणार नाही. हा युक्तिवाद बरोबर असेल तर रोजमेरी इजिप्शन भाषा चोरून शिकली व तंद्रावस्थेचे ढोंग करून बोलली असे मानावे लागते. पण यातील अडचण अशी की इजिप्शन भाषा कशी बोलतात, हे जगात कोणालाही माहीत नाही आणि याचे कारण त्या भाषेतील स्वर कोणते व ते कोठे वापरायचे हे कोणालाही माहीत नाही हे आहे. उलट ***रोजमेरीकडूनच इजिप्टॉलॉजिस्टना प्रथम स्वरांची माहिती झाली.*** ही वास्तुस्थिती असून ती लक्षात घेता रोजमेरीच्या तोंडून बोलणारी व्यक्ती इजिप्शन भाषा बोलणारी होती, असे मानणे भाग आहे. ***ही गोष्ट शरीर हे यंत्र नाही, ते पाहिजे तसे आत्म्याला वळवून व बदलून घेता येण्यासारखे लवचिक साधन आहे,*** हे सिद्ध करते. (न बदलणारे यंत्र व त्याचा बदलणारा चालक हा दृष्टीकोण चुकीचा असल्याचे, म्हणजे चालकाबरोबर यंत्र बदलत असल्याचे सिद्ध करणारा हा आणखी एक पुरावा.)

६०. **Letures in Psychical Research** -C-D-Broad.

६१. **Afterlife** -C.Wilson

६२. C. D. Broad **op.cit.**

६३. एकाच्या स्वप्नात दिसलेली व्यक्ती जागे असलेल्या दुसऱ्या व्यक्तीला दिसल्याचे उदाहरण याच प्रकरणात ६३ पृष्ठावर दिले आहे, ते पाहावे. लिंग-देह क्वचीत् असा दृश्य होऊ शकतो.

६४. **Voice from the Grave** -Carol and Mereado in D. Scott Rogo **Life After Death.**

६५. जॉर्ज व ओ नील यांनी स्पिरिकॉम नावाचे एक यंत्र तयार केले असल्याचा या मशीनमार्फत मृतात्म्याशी संभाषण करणे शक्य असल्याचा व या पद्धतीने १९६७ साली मेलेल्या जॉर्ज म्यूएलर या भौतिकशास्त्राज्ञाशी आपण संपर्क साधल्याचा दावा केला आहे.

६६. D. Scott Rogo **op.cit.**

६७. अनाहूतपणे मिळणाऱ्या मृतात्म्यांच्या फोटोंना 'एक्स्ट्रा' म्हणतात. असे एक्स्ट्रा मिळाल्याची अनेक उदाहरणे असून या क्षेत्रात जपानच्या फुकराई या शास्त्रज्ञाने बरीच कामगिरी केली आहे. वुइल्यम क्रुक्स या भौतिकशास्त्रज्ञाने फ्लॉरेन्स कुक या माध्यमाद्वारा दृश्य स्वरूप धारण करणाऱ्या केटी किंग या मृतात्म्यांचे अनेक फोटो काढले असून एकात केटी किंग, फ्लॉरेन्स कुक व स्वतः क्रुक्स असल्याचे दिसत असल्यामुळे फ्लॉरेन्स कूक व केटी किंग या भिन्न व्यक्ती असल्याचे स्पष्ट होते. (केटी किंगचे केसही कापून ठेवलेले आहेत.) ११ फेब्रुवारी १९८३ च्या 'श्री' साप्ताहिकातही अरुण ताम्हणकरांनी मृतात्म्यांचे फोटो काढल्याचा फोटोसह दावा केला आहे.

६८. **My Psychic Adventures** - J. Malcolm Bird. Scientific American या वैज्ञानिक नियतकालिकातर्फे संशोधन करणारा शास्त्रज्ञ.

६९. **At the Hour of Death** - K. Osis and E. Haraldsson. **On Death and Dying** - E. Kubbler-Ross. **Life After Life** - R. moody. **Reflections on Life After Life** - R. Moody. **Recollections of Death** - M. Sabom. **Life at Death** - K. Ring. **विज्ञान आणि चमत्कार** या ग्रंथातील १० वे प्रकरण खास याच विषयावर आहे.



५



# पुनर्जन्म

## (अ) विज्ञानाच्या दृष्टिकोणातून पुनर्जन्म सिद्धांत

**पुनर्जन्म सांगणारा गणेश चुरी**

चिंचणी, दि. ९ - मानवास पुनर्जन्म असतो की नसतो हा वादाचा मुद्दा आहे. परंतु डहाणू तालुक्यातील वासगाव येथील भिकाजी चुरी नावाच्या सात वर्षाच्या मुलाने मात्र आपल्या गतजन्मीच्या आठवणी सांगून सर्वांना आश्चर्याचा धक्का दिला आहे.

गणेश चुरी हा लहानपणी सारखा रडत असायचा. त्याचे रडणे थांबावे म्हणून त्याच्या आईवडीलांनी औषधोपचार केले. परंतु त्याचे रडणे काही थांबत नसे. सात वर्षांचा होताच 'वाढवण गावी मला जायचे आहे तेथे माझे घर आहे.' असे त्याने आईवडिलांना सांगितले.

आईवडिलांनी गणेशला वाढवण गावी नेले व तो कोठे जातो हे पाहण्यासाठी त्याचा हात सोडून दिला. तेव्हा गणेश सरळ कै. रामचंद्र सरडू दळवी यांच्या घरी गेला आणि एका महिलेकडे पाहून रडू लागला व 'भावनाऽऽ' 'भावनाऽऽ' म्हणून हाक मारू लागला व रडत रडत त्या महिलेच्या छायाचित्राकडे पाहत सांगू लागला, "मी तुमचा हरिश्चंद्र आहे. चौदा वर्षापूर्वी नारळी पोर्णिमेच्या दिवशी मी समुद्रात आंघोळीला गेलो होतो तेथे मी नारळ फोडला. या नारळाचे तीन तुकडे झाले सुमुद्रातून बाहेर आल्यावर मी तलावात पोहायला गेलो तिसरी उडी मारताच मी वर आलोच नाही."

पुढची आठवण सांगताना गणेश म्हणाला, "मी मरण पावताच माझी बायको दुसरे लग्न करून गेली." एक महिला त्याच्याकडे गेली असता "हीच माझी गतजन्माची बायको आहे," असे त्याने सांगितले. पूर्वजन्मीच्या सर्व नातेवाईकांनाही त्याने नावाने हाका मारल्या .

गणेशला पाहण्यासाठी अनेक लोक वासगावमध्ये येत आहेत.

बेळगावच्या दै. **'तरुण भारत'** च्या १० फेब्रुवारी १९८६ च्या अंकात वरील बातमी प्रसिद्ध झाली असून ती जशीच्या तशी येथे दिली आहे.

'इंडियन एक्स्प्रेस' च्या २६ नोव्हेंबर १९८३ च्या अंकात डॉ. सतवंत पासरिचा या बेंगलोरमधील 'नॅशनल इन्स्टिट्यूट ऑफ मेंटल हेल्थ अँड न्यूरो सायन्सेस' या संस्थेच्या संशोधकबाईनी संशोधिलेल्या पुढील दोन व्यक्तींची माहिती आली आहे.

## रंजना गुप्ता आणि मनदीप कौर यांची पुनर्जन्मकथा

रंजना गुप्ता हिचा जन्म १९ सप्टेंबर १९६९ रोजी जयपूरनजीकच्या एका खेड्यातील मध्यमवर्गीय कुटुंबात झाला. ती तीन वर्षांची झाली तेव्हा '३५० कि. मी. अंतरावरील कोटा या गावची मी कल्पना आहे' असे म्हणू लागली व वडील जवाहिरे होते, असे सांगू लागली. तिच्या म्हणण्याप्रमाणे शोध घेतला असता कल्पना आठ वर्षांची असताना तिला तिच्या चुलत भावाने बाल्कनीतून खाली ढकलून दिल्यामुळे पडली होती व मरण पावली असे आढळून आले. या जन्मात त्या वेळी तिच्या डोक्याला झालेल्या जखमेची खूणही आढळून आली. हा मृत्यू २८ एप्रिल १९६९ रोजी झाला होता. रंजनाने मागच्या जन्माविषयीच्या खाणाखुणा सांगणारी २१ विधाने केली होती. त्यापैकी १९ विधाने जन्म-मृत्यूविषयीचे दाखले व इतर कागदोपत्रांच्या आधारे तपासून पाहिली असता बरोबर आढळून आली. फक्त दोनच विधानांविषयी निश्चित माहिती मिळू शकली नाही.

मनदीप कौरला आपल्या आईच्या चिथावणीने तिच्या सायकल दुरूस्त करणाऱ्या नवऱ्याने २ जून १९६१ रोजी चाकू भोसकून ठार केले होते. चार वर्षांनी तिच्या दिल्लीतील घरापासून ५०० कि. मी. अंतरावरील खेड्यातील वैश्यांच्या कुटुंबात तिचा जन्म झाला व तिला पुष्पा हे नाव ठेवण्यात आले. ती अठरा महिन्यांची असताना आपल्या घराच्या दिशेने बोट करून सारखे काहीतरी म्हणत असे. पण ते कळत नसे. ती थोडी मोठी झाल्यावर आपण मनदीप कौर असल्याचे सांगू लागली व चाकू पाहताच घाबरू लागली. तिचे वय ३ वर्षांचे असले तरी शीख धर्माची तिला बरीच माहिती असल्याचे दिसून येऊ लागले. डॉ. पासरिचाबाईना या मुलीच्या पुनर्जन्माची कथा-संशोधनाअंती सत्य असल्याचे आढळून आले.

पुढील प्रकरणही पासरिचाबाईनी संशोधिले आहे.

## मालती शंकर हिच्या पुनर्जन्माची कहाणी

नवी दिल्ली येथे राहणारी मालती शंकर ही २ वर्षांची मुलगी 'मी चामोहची आहे' असे आईवडिलांना म्हणू लागली. पण त्यांनी तिच्या बोलण्याकडे लक्ष दिले नाही. 'माझे पिता विड्याची पाने विकत असतात. मी एके दिवशी महादेवाच्या मंदिरात गेले होते. महादेवाला स्नान घालण्यासाठी मंदिराच्या आवारात गेले आणि विहिरीतून

पाणी काढू लागले. माझा तोल गेला व विहिरीत पडून मी बुडून मेले. त्या मुलीने चामोह खेड्यातील आपल्या घराचे वर्णन केले . आता मात्र त्या मुलीचे आईबाप चिंतेत पडले. मुलीच्या डोक्यावर परिणाम झाला आहे, असे वाटून त्यांनी डॉक्टरांकडून त्या मुलीवर उपचार करविले. पण काही उपयोग झाला नाही. मात्र विहीर पाहताच ती मुलगी फार घाबरत असे.

एके दिवशी चामोह खेड्यात सावकारी करणारा एक माणूस सायकलीवरून तिच्या घरासमोरून जात होता. यावेळी तिचे वय तीन-साडेतीन वर्षांचे असावे. त्या माणसाला पाहून त्या मुलीने त्याला अडवून 'काका' म्हटले, तो माणूस खाली उतरला व 'मुली, मी तुला ओळखत नाही,' असे म्हणाला. मुलगी म्हणाली, ''काका, मी तुमची पुतणी -कृष्णा आहे.' तो सावकार म्हणाला, ''होय , कृष्णा नावाची माझी पुतणी होती. ती बऱ्याच वर्षांपूर्वी मरण पावली आहे.''

''मीच ती कृष्णा,'' मुलगी म्हणाली.

तो सावकार आश्चर्याने थक्क झाला. तो त्या मुलीच्या घरात गेला. तिच्या आईबापांना भेटला. मुलीकडून सविस्तर हकीकत ऐकून तो म्हणाला, ''खरोखरच ही कृष्णा आहे. तिचा पुनर्जन्म झाला आहे.'' त्यानंतर मात्र मालती शंकरच्या आईवडिलांनी तिच्या प्रकरणाकडे गंभीरतेने लक्ष दिले. डॉ. सतवंत पासरिचांना दिल्लीत ते भेटले. पासरिचाबाईंनी तिची सर्व विधाने टेपरेकॉर्ड केली व तिला व मुलीच्या आईवडिलांना घेऊन त्या चामोह खेड्यात गेल्या. त्या सावकाराच्या घरी जाताच त्या मुलीने आईबापांचा हात झटकून आत धूम ठोकली. घरातल्या सर्वांना एकेकांना नावाने हाक मारून तिने ओळखले. आश्चर्याची गोष्ट म्हणजे त्यापैकी तिने एकालाही यापूर्वी कधी पाहिले नव्हते. पासरिचा तीन दिवस त्या खेड्यात राहिल्या. दिल्लीत टेप केलेली तिची सर्व विधाने खरी ठरली.

## मृत शिवाचा मृत सुमित्रेत पुनर्जन्म

आता '**इंडियन एक्सप्रेस**' च्या २७ ऑक्टोबर १९८५ च्या अंकातील पुढील बातमी वाचा: '**मृत शिवाचा मृत सुमित्रेत पुनर्जन्म**'

श्री. जगदीश ठाकूर नावाच्या गृहस्थाची २२ वर्षे वयाची सुमित्रा नावाची पत्नी १९ मे १९८५ रोजी फरूकाबाद जिल्ह्यातील छिब्रामाऊ तालुक्यातील शरीफपूर या खेड्यात दीर्घ आजारानंतर मरण पावली. तिचे दहन करण्यासाठी तिला स्मशानाकडे नेत असता तिच्यात हालचाल दिसू लागली व तब्बल पाऊण तासाने ती परत जिवंत झाली व मी 'शिवा' आहे, असे म्हणू लागली. तिने अवतीभोवती आश्चर्यचकित होऊन पाहिले.

चौकशीअंती तिला खरा प्रकार कळला. पण मी 'सुमित्रा' नसून 'शिवा' आहे असे ती म्हणू लागली. तिने आपल्या सासरच्या लोकांची माहिती दिली. माझे वडिल रामसिया त्रिपाठी असून ते इटावा येथील शिवनारायण कॉलेजमध्ये शिक्षक आहेत. 'माझ्या वडिलांकडे मला घेऊन चला,' असा तिने आग्रह धरला. सर्व लोक विड्.मुढ झाले. तिकडे दिबियापूर या शिवाच्या सासरमध्ये तिचा मृतदेह रेल्वेखाली सापडला होता. सासरच्या लोकांनी शिवाने आत्महत्या केली असे सांगण्यास सुरूवात केली होती. त्यांना संशयाने पकडण्यास आले आहे. शिवाच्या वडिलांना शरीफपूरची माहिती मिळताच ते धावून आले त्यांना पाहताच शिवा त्यांच्या गळ्यात पडून रडू लागली आणि नणंदेने मला मारले, असे सांगितले. पण इत:पर अधिक तपशील ती सांगू शकली नाही. तिला इटाव्याला नेले, तेव्हा माहेरच्या सर्व लोकांना तिने ओळखले. ती सासरला जाण्यास नाखुश तर आहेच पण आपल्या दोन मुलांना घेऊन यावे, असा तिचा आग्रह आहे. सुमित्रेच्या ११ महिन्याच्या मुलाचाही सांभाळ करण्यास ती तयार आहे. सुमित्रा व शिवा यांची वये मृत्यूसमयी अनुक्रमे २२ व २३ वर्षे होती. पण सुमित्रा निरक्षर होती. तर शिवा शिक्षित होती. आता 'सुमित्रा' लिहू शकते व तिचे हस्ताक्षर शिवाच्या हस्ताक्षराशी तंतोतंत जुळत असल्याचे तिची कसून तपासणी करणारे काँग्रेस आयचे भुतपूर्व माहिती खात्याचे मंत्री सत्यदेव त्रिपाठी सांगतात.

## पुनर्जन्म-कल्पनेची सार्वत्रिकता

वरील वृत्तपत्रांतून प्रसिद्ध झालेल्या बातम्या नमुन्यादाखल म्हणून जशाच्या तशा योग्य तो संक्षेप करून दिल्या आहेत. त्यावरून भारतात पुनर्जन्माची प्रकरणे किती मुबलक प्रमाणात आढळून येतात याची वाचकांना कल्पना येईल.[१] याचा अर्थ भारताबाहेर पुर्नजन्माची प्रकरणे आढळून येत नाहीत असा कोणी करू नये. जगात सर्व देशांत पुनर्जन्माची प्रकरणे आढळतात. त्यांचे प्रमाण देशपरत्वे व संस्कृतीपरत्वे कमी जास्त आढळून येते इतकेच. पाश्चात्य ख्रिश्चन देशांत व मध्यपूर्वेतील इस्लाम राष्ट्रांतही पुनर्जन्माची प्रकरणे बऱ्याच प्रमाणात आढळून आली आहेत. काही धर्म (उदा. ख्रिश्चन व इस्लाम) हल्ली पुनर्जन्म मानत नसले तरी त्या धर्माचे संस्थापक -उदा. येशू व महंमद -पुनर्जन्म मानत होते. इतकेच नव्हे, तर बायबल व कुराणातही पुनर्जन्माचे उल्लेख आढळून येतात. हिंदू, बौद्ध व जैन हे धर्म मात्र अगदी प्राचीन काळापासून पुनर्जन्म मानत आले असून पुनर्जन्माच्या कल्पनेची सांगड या धर्माशी कायमची घालण्यात आली आहे. असे असले तरी पुनर्जन्माची कल्पना मान्य नसलेला समाज या पृथ्वीतलावर शोधूनही सापडणार नाही ही वस्तुस्थिती आहे. अगदी मागासलेल्या आफ्रिका व पोलिनेशिया खंडातील प्राथमिक अवस्थेतील समाजातही पुनर्जन्माची कल्पना आढळून येते. जगातील सर्व प्राचीन व अप्राचीन थोर विचारवंतही पुनर्जन्म मानणारे आढळून येतात. पुनर्जन्माची

कल्पना किती खोलवर व विस्तृत प्रमाणात पसरलेली आहे हे ज्यांना जाणून घ्यायचे आहे त्यांनी जोसेफ हेड व एस.एल्. क्रॅन्स्टन संपादित **'Reincarnation -an East-West Anthology'** हा ग्रंथ पाहावा.

## पुनर्जन्माचा शास्त्रीय कसोट्यांखाली अभ्यास

पुनर्जन्माची कल्पना इतकी प्राचीन आणि सर्वात्रिक असली तरी तिचा शास्त्रीय कसोट्यांखाली अभ्यास अगदी अलीकडे सुरू झाला आहे. १९२७ साली बरेलीहून के. के. एन. सहाय यांचे **'Reincarnation : Verified Cases of Rebirth After Death'** हे पुनर्जन्मावर प्रसिद्ध झालेले इंग्रजीतील पहिले पुस्तक होय. त्यानंतर गुप्ता, शर्मा आणि माथूर यांचे दिल्लीच्या इंटरनॅशनल आर्यन लीगतर्फे प्रकाशित झालेले **'An Inquiry into the Case of Shanti Devi'** हे १९३६ सालचे पुस्तक जगभर गाजले व त्याने शांतीदेवीला आंतरराष्ट्रीय कीर्ती मिळवून दिली. पाश्चात्य पुनर्जन्मावरील कोणत्याही महत्वाच्या ग्रंथात या ग्रंथाचा व शांतीदेवीचा हटकून उल्लेख आढळतो. किंबहुना शांतीदेवीचा उल्लेख केल्याखेरीज पुनर्जन्माविषयीची कोणत्याही पाश्चात्य लेखकाची चर्चाच पूर्ण होत नाही असे आढळून येते.

शांतीदेवीचे प्रकरण जगात इतके गाजले की पुनर्जन्मावर विश्वास नसलेला स्टूअर लोन्नरस्ट्रॅड हा गृहस्थ स्वीडनहून मुद्दाम या प्रकरणातील बनवेगिरी उघड करण्यासाठी भारतात आला, आणि जेव्हा त्याने या प्रकरणाचे स्वत: प्रत्यक्ष संशोधन केले, तेव्हा त्याला आपल्या संशोधनाचा निष्कर्ष पुढीलप्रमाणे लिहून ठेवावा लागला, "This is the only fully explained and proven case of Reincarnation there has been." (पूर्णपणे स्पष्टीकरण मिळालेले व सिद्ध झालेले हे पुनर्जन्माचे एकमेव प्रकरण होय.) असली प्रकरणे यानंतर ही अनेक आढळून आली असली तरी त्यावेळी स्टुअरचे हे म्हणणे अगदी बरोबर होते असे म्हटले पाहिजे. जगात गाजलेल्या या प्रकरणाची वाचकांना माहिती असणे आवश्यक आहे असे वाटल्यावरून ती येथे थोडक्यात देत आहे.

## शांतीदेवीचे गाजलेले प्रकरण

डिसेंबर ११, १९२६ रोजी दिल्ली येथील बाबू रंगबहादूर माथूर यांच्या कुटुंबात शांतीदेवी हिचा जन्म झाला. वयाच्या चौथ्या वर्षानंतर ती आपला नवरा व मुले मथुरेत असून आपल्याला मथुरेला घेऊन चला असे म्हणू लागली. प्रथम तिच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करण्यात आले. पण जेव्हा आपल्या मथुरेतील पूर्वजन्माच्या अनेक घटना ती वरचेवर सांगू लागली तेव्हा तिचे वडील चिंतेत पडले. ती आपला नवरा गोरा आहे, त्याच्या डाव्या गालावर एक मोठी चामखीळ आहे, तो वाचण्यासाठी चष्मा वापरतो,

त्याचे मथुरेत द्वारकाधीशच्या देवळासमोर एक दुकान आहे इत्यादी माहिती सांगत असे. आपला मृत्यू शस्त्रक्रियेने बाळंतपण केल्यानंतर झाल्याचेही ती सांगत असे. सिझेरियन शस्त्रक्रियेविषयीचे तिचे वर्णन ऐकून डॉक्टरही आश्चर्यचकित झाले. नवऱ्याचे नाव विचारले तर ती लाजत असे. हिंदू स्त्री आपल्या नवऱ्याचे नाव घेत नसते याच एका कारणास्तव ती त्याचे नाव सांगत नसे. पण त्या भागातील एक शिक्षक बाबू किशनचंद यांनी 'तू नवऱ्याचे नाव सांगितलेस तर तुला मथुरेला अवश्य घेऊन जाऊ' असे सांगताच ती त्यांच्या कानात हळूच 'पंडित केदारनाथ चौबे' असे कुजबुजली. मग त्यांनी मथुरेला केदारनाथला पत्र लिहिले व सर्व हकीकत कळवली. केदारनाथाने तिने सांगितलेल्या बऱ्याच गोष्टी बरोबर असल्याचे पत्राने कळविले व दिल्लीतील आपले एक नातेवाईक कांजीमल यांची व तिची भेट घडवून आणावी असे सुचविले. कांजीमलची भेट घडवून आणली तेव्हा शांतीदेवीने तो आपला नवऱ्याचा चुलतभाऊ असल्याचे ओळखले व त्याला मथुरेतील आपल्या घराचे वर्णन करून सांगितले. त्या घरात आपण १५० रूपये पुरून ठेवल्याचे व ते पुरून ठेवलेली जागाही सांगितली. ''तुला रेल्वे स्टेशनात सोडले तर घराकडे बरोबर जाशील काय?'' असे त्याने तिला विचारतो तिने ''अवश्य जाईन'' असे उत्तर दिले. तिच्या बोलण्यावरून कांजीमलची तिचा पुनर्जन्म झाल्याची इतकी खात्री पटली की स्वतः तो मथुरेला गेला व केदारनाथला नोव्हेंबर १२, १९३५ रोजी दिल्लीला घेऊन आला. कांजीमलने शांतीची मुद्दाम दिशाभूल करण्यासाठी, ''हा तुझ्या नवऱ्याचा थोरला भाऊ'' अशी तिला त्याची ओळख करून दिली. तेव्हा ती म्हणाली, ''तुला मी सांगितले नव्हते का माझे पती गोरे आहेत व त्यांच्या डाव्या गालावर मोठी चामखीळ आहे म्हणून?''

नंतर तिने आपल्या आईला जेवण तयार करण्यास सांगितले. आपल्या नवऱ्याला बटाट्याचे पराठे व भोपळ्याची भाजी आवडते, तेव्हा तेच कर असे तिने जेव्हा आपल्या आईला सांगितले तेव्हा केदारनाथ चाटच पडला. कारण त्याचे आवडीचे पदार्थ तेच होते. केदारनाथने, ''आमची खात्री पटविण्यासाठी एखादी ओळखीची खूण सांगशील काय?'' असे तिला विचारले, तेव्हा तिने '' घराच्या परसात एक विहीर असून तेथेच मी दररोज आंघोळ करीत असे.'' असे सांगितले तेव्हा त्याने ते खरे असल्याचे मान्य केले.

केदारनाथने आपल्याबरोबर तिच्या मुलाला व दुसऱ्या बायकोलाही आणले होते. मुलाला पाहताच तिच्या भावना उचंबळून आल्या. त्याला मिठी मारून ती रडली. तिने आपली खेळणी धावत जाऊन आणली व मुलाला दिली. (आता मुलगा तिच्यापेक्षा एका वर्षाने मोठा झाला होता.)

जेवण झाल्यानंतर केदारनाथच्या दुसऱ्या बायकोकडे बोट करून तिने विचारले,

''तुम्ही हे दुसरे लग्न का केले? आपले काय ठरले होते?'' या प्रश्नाला त्याच्याजवळ उत्तर नव्हते !

केदारनाथची शांतीदेवीची सर्व वागणूक पाहून ती आपली पुर्वीची 'पत्नी' लुगरी असल्याची तेथील वास्तव्यात खात्री पटली. तथापि, एके दिवशी त्याने रात्री झोपण्यापूर्वी शांतीची एकांतात भेट घेण्याची इच्छा व्यक्त केली. त्याप्रमाणे त्या दोघांची एकांतात भेट घडवून आणण्यात आली. भेटीनंतर केदारनाथने शांतीदेवी ही आपली पूर्वीची पत्नी लुगरीच असल्याचा पूर्ण निर्वाळा दिला. नोव्हेंबर १५,१९३५ रोजी केदारनाथ मथुरेस परत जाण्यास निघाला तेव्हा तिने मथुरेस येण्याचा हट्ट धरला. पण तिच्या वडिलांनी त्याला परवानगी दिली नाही.

ही बातमी वृत्तपत्रातून लगेच देशभर पसरली. महात्मा गांधींनी याविषयात इतका रस घेतला की त्यांनी शांतीदेवीला आपल्या आश्रमात खास बोलावून तिची भेट घेतली. नंतर त्यांच्या सल्ल्यानुसार प्रमुख पुढारी, लोकसभेचे सदस्य, वकील, पत्रकार इत्यादी पंधरा लोकांची कमिटी स्थापण्यात आली. या कमिटीने दिल्लीतील शांतीदेवीच्या वडिलांचे मन तिला मथुरेला आपल्याबरोबर पाठविण्यासाठी वळविले. अशा रीतीने ही सर्व मंडळी नोव्हेंबर २४, १९३५ रोजी रेल्वेने मथुरेला गेली. पुढील सर्व तपशील न सांगता एवढे सांगितले तरी पुरे आहे की तिने घराचा रस्ता बरोबर दाखवला आणि घरातील सर्व लोकांनाही तिने बरोबर ओळखले. 'जाजरू' (संडास ) कोठे आहे, हेही तिने बरोबर दाखवले. ज्या जागेत तिने पैसे पुरून ठेवले होते, ती जागाही दाखविली. पण तेथे पैसे नव्हते. केदारनाथने आपण ते काढून घेतल्याचे मान्य केले. शांतीदेवी चौबे कुटुंबात केदारनाथची बायको म्हणून होती याचे जे अनेक पुरावे आढळले त्यापैकी एक म्हणजे चौबे कुटुंब पराठ्याला 'कटोरा' म्हणत असे हे तिने बरोबर सांगितले. (असा शब्दप्रयोग इतर कुठेही आढळत नाही.) शांतीचे माहेरही मथुराच असून मथुरेतील तिच्या आईवडिलांच्या घरी जेव्हा तिला नेण्यात आले तेव्हा त्यांनाही तिने बरोबर ओळखले. आईला पाहताच ती तिच्या गळ्यात पडली व दोघीही रडू लागल्या. या भावनाप्रधान प्रसंगाने इतरांच्याही डोळ्यात पाणी आले. (आपला पूर्वजन्म सर्वांना आठवत नाही हे एक मोठेच भाग्य होय, असे या संदर्भात कमिटीने लिहून ठेवले आहे.) विशेष म्हणजे शांतीने शेजारच्या बायकांना पैसे उसने दिल्याचे सांगितले आणि त्या बायकांनीही ते मान्य केले.

शांतीदेवी ही आपली पूर्वीची पत्नी लुगरी आहे अशी केदारनाथची खात्री तिची एकांतात भेट झाल्यानंतर पूर्ण पटल्याचे वर म्हटले आहे. या भेटीत केदारनाथने तिला विचारले, 'तुला सांधेवाईचे दुखणे होते व तुला उठताही येत नव्हते. मग तू गरोदर

कशी झालीस?' तेव्हा तिने आपल्याशी त्याने कसा संभोग केला याचे वर्णन करून त्याला सांगितले. अशा रीतीने उरलासुरला संशयही नाहीसा होण्यास हा पुरावा कारणीभूत ठरला!

प्रस्तुत लेखकाचे एक स्नेही व ब्यावर (राजस्थान) येथील पुनर्जन्म संशोधक प्रा. कीर्तिस्वरूप रावत यांनी शांतीदेवीची २३ डिसेंबर १९८७ रोजी भेट घेऊन " हे खरे काय" असे विचारले तेव्हा तिने "हे खरे आहे"असे सांगितले. २७ डिसेंबर १९८७ रोजी शांतीदेवीचे निधन झाले.

यानंतर पुनर्जन्मावर जगभर गाजलेले पाश्चात्य लेखकाचे पुस्तक म्हणजे मोरी बर्न्स्टाइनचे **The Search for Bridey Murphy** हे होय, जुन्या काळच्या आयर्लंडमधील व्यक्तीचा पुनर्जन्म झाल्याचे संमोहन पद्धतीने सिद्ध करणारे हे पुस्तक बरेच वादग्रस्त ठरले. त्यावर खूप टीकाही करण्यात आली. पण ती सर्व अनाठायी असल्याचे तितक्याच समर्थपणे बर्न्स्टाइनखेरीज इतर संशोधकांनीही नंतर पुराव्यानिशी दाखवून दिले आहे. (विशेषत: ड्युकॅसे यांनी. पाहा, The case of "The Search for Birdey Murphy"- **The Belief in Life After Death.**)

क्षेत्रीय संशोधनांच्या दृष्टीने पाश्चात्यांपैकी ज्यांचे भारताकडे लक्ष वळले त्या आयन स्टिव्हन्सन यांनीच पुनर्जन्माच्या खऱ्या शास्त्रीय संशोधनाची मुहूर्तमेढ रोवली असे म्हणता येईल. व्हर्जिनिया युनिव्हर्सिटीच्या या मानसोपचारतज्ज्ञाने आपले सर्व जीवन या क्षेत्राच्या संशोधनासाठी वाहून घेतले आहे व पुनर्जन्म प्रकरणांच्या शोधात सर्व पृथ्वी पालथी घातली आहे. ते १९६१ साली प्रथम भारतात आले व १९६६ साली **'Twenty Cases Suggestive of Reincarnation.'** हा पुनर्जन्म प्रकरणावर खास ग्रंथ लिहिला. नंतर पुढील काही वर्षात **'Cases of Reincarnation Type'** या मथळ्याची भारत, श्रीलंका, थायलंड , लेबॅनॉन, टर्की व ब्रह्मदेश या देशातील पुनर्जन्म प्रकरणांवर ग्रंथमालिकाच प्रसिद्ध केली.

## स्टिव्हन्सननी पुनर्जन्मावर संशोधन का केले ?

बी. बी. सी. वर भाषण करताना स्टिव्हन्सन एकदा म्हणाले, "माझे अमेरिकन व्यवसायबंधू मला म्हणतात, " तू पुनर्जन्मावर व्यर्थ संशोधन करीत आहेस. कारण सर्वांना माहीत आहे की, पुनर्जन्म असंभाव्य आहे." याउलट भारतात गेले की लोक मला म्हणतात, " तुम्ही पुनर्जन्मावर निष्कारण का शक्ती खर्च करीत आहात? कारण पुनर्जन्म आहे ही वादातीत गोष्ट आहे." मग मी पुनर्जन्मावर का संशोधन करीत आहे बरे? मानवी व्यक्तिमत्वाविषयीच्या प्रचलित शास्त्रीय कल्पना अपुऱ्या आहेत हे मला दिवसेंदिवस अधिक तीव्रतेने जाणवू लागले. जीवशास्त्रीयदृष्ट्या अनुवंश व भौतिक परिसर हेच काही मानवी

व्यक्तिमत्वाची पूर्ण उकल करू शकणारे घटक नाहीत, असे मला वाटू लागले. खाणीतून आणखी बरेच धातू खणून काढणे शक्य आहे. रूढ कल्पनांच्या पलीकडील अतीत-सामान्यरूपी खाणीतून आणखी धातू हस्तगत करण्याचा खाणकामाचा प्रयत्न का करू नये? लहान मुले जेव्हा त्यांच्या वयाला न शोभणारे काही बोलू लागतात तेव्हा ते गंभीरपणे ऐकले पाहिजे व त्याचा शास्त्रीय शोध केला पाहिजे असे वाटून मी हे संशोधन आरंभिले.''

स्टिव्हन्सननी आतापर्यंत २५०० पुनर्जन्म प्रकरणांचा अभ्यास केला आहे ही सर्व प्रकरणे शंभर टक्के सत्य आहेत असे ते म्हणत नाहीत. यापैकी नव्वद टक्के प्रकरणांत अचूकता आढळून येते. उरलेली दहा टक्के प्रकरणे अपुऱ्या वा सदोष माहितीमुळे संशयास्पद प्रकरणे म्हणून सोडून देता येतील, असे त्यांना वाटते. बहुतेक प्रकरणांत २ ते ६ वर्षे वयाच्या मुलांना उत्स्फूर्तपणे पूर्वजन्माच्या स्मृती होत असल्याचे आढळून आले आहे. नंतर ८ ते १० व्या वर्षापर्यंत या स्मृती हळूहळू कमी होत नाहीशा होतात. (हा काळ थोडा कमी-जास्त असू शकतो.) बहुतेक प्रकरणांत पूर्वजन्मांच्या व्यक्तीच्या कुटुंबाचा आणि त्या व्यक्तीच्या या जन्मातील कुटुंबाचा कांही संबंध नसतो किंवा त्यांना एकमेकांची माहितीही नसते. तरीही ते मूल पूर्वजन्मातील व्यक्तींच्या कुटुंबाची व घराची अचूक माहिती सांगते. त्या कुटुंबातील व्यक्तींना ते ओळखते. नावाने हाक मारते. त्यांच्याविषयी इतरांना माहीत नसलेल्या खाजगी गोष्टींची माहिती देते. घरातील वस्तूंची माहिती सांगते. त्या कुटुंबातील एखादी व्यक्ती मध्यंतरी मेली असेल तर तिचा फोटो ओळखते. त्या मुलात कांही वेळा जन्मतःच एखादे कौशल्यही आढळून येते. श्रीलंकेतील एका मुलाला नारळाच्या झावळीपासून छप्पर तयार करण्याची कला जन्मतःच अवगत होती. पण ते मूल ज्या कुटुंबात जन्मले होते त्या कुटुंबाला याविषयी काही माहीत नव्हते. त्यांच्या घरावर गॅल्व्हनाइज्ड पत्रे होते. नारळाच्या झावळीपासून छप्पर तयार करण्याचा प्रश्नच नव्हता.

स्टिव्हन्सनना असे आढळून आले की, पूर्वजन्म आठवणाऱ्या सुमारे पन्नास टक्के मुलांना पूर्वजन्मात ज्या घटनेने मृत्यू आला होता, त्या घटनेशी संबंधित शस्त्रे व परिस्थितीची भयंकर भीती वाटत होती. लेबॅनॉनमधील एका मुलाला पूर्वजन्मात कारच्या अपघातात मृत्यू आला होता. कार पाहताच तो अतिशय घाबरायचा. भारतातील एका मुलाला धोबी अगर न्हावी दिसला की अतिशय भीती वाटायची पूर्वजन्मात त्याचा धोबी व न्हावी या दोघांनी मिळून खून केल्याचे आढळून आले .

पूर्वजन्मातील आवडीनिवडीही नंतरच्या जन्मात आढळून येतात. श्रीलंकेत बौद्ध कुटुंबात जन्मलेल्या एका मुलाला ब्रेडलोणी पाहिजे असे. हॉटेलात सराईतपणे तो काटे चमचे वापरायचा. पूर्वजन्मात तो इंग्लंडमध्ये जन्मला असावा याविषयीची भरपूर परिस्थितीजन्य माहिती मिळाली.

श्रीलंकेत एकाच बीजापासून जन्मलेल्या जुळ्या मुलांचा (Identical Twins)

अभ्यास करण्याची स्टिव्हन्सनना संधी मिळाली. त्यांच्या रक्ताची आधुनिक तंत्राने तपासणी करून ते एकाच बीजापासून जन्मल्याची स्टिव्हन्सननी खात्री करून घेतली. अशा जुळ्या भावांत त्यांच्या स्वभावात विलक्षण साम्य आढळून येते. पण हा ***अनुवंशशास्त्राचा नियम या दोन मुलांच्या बाबतीत आढळून आला नाही.*** त्या दोघांच्या स्वभावात जमीन अस्मानचा फरक होता. त्यापैकी एकाला ५० कि. मी. अंतरावरील एका गावातील व्यक्तीच्या जन्माची आठवण होत होती. त्या जन्मात तो शांत स्वभावाचा होता व या जन्मात तसाच शांत स्वभावाचा होता. तो नेहमी पुस्तकात डोके खुपसून बसे. याच्या उलट त्याच्या जुळ्या भावाला पूर्वजन्मातील ज्या व्यक्तीची आठवण होत होती त्याचा सर्व इतिहास रक्तरंजित होता. तो मुलगा या जन्मातही बंडखोर पणेच वागत होता. पूर्वीप्रमाणेच या जन्मातही तो बंदूक, बॉम्ब यासारख्या शस्त्रांची भाषा करी. अनोळखी लोक दिसले की लपून बसे. त्याच्या जुळ्या भावाचा स्वभाव थेट याच्या उलट. येथे अनुवंशशास्त्र निष्प्रभ ठरलेले आढळून येते. निदान ते शास्त्र परिपूर्ण नाही असे म्हणावे लागते.

## पुनर्जन्म सिद्धांताविरुद्ध शास्त्रीय आक्षेप

स्टिव्हन्सननी केलेल्या पुनर्जन्मविषयक संशोधनाविरुद्ध टीकाकारांनी व संशयवाद्यांनी काही आक्षेप घेतले आहेत, त्यांचाही विचार केला पाहिजे. या सर्व आक्षेपांचा विचार स्टिव्हन्सननी शास्त्रीयदृष्ट्याच केला असून त्यापैकी काही आक्षेप ते मान्य करतात. पण ते आक्षेप पुनर्जन्म खोटे ठरवत नाहीत असे ते म्हणतात. त्या आक्षेपांचा व त्यांना स्टिव्हन्सननी दिलेल्या उत्तरांचा हा थोडक्यात परामर्श:

**फसवणूक :-** पहिला आक्षेप फसवणुकीचा. या पाश्चात्यांच्या आक्षेपात पाश्चात्य देशांच्या संदर्भात तथ्य आहे यात शंका नाही. कारण अशी खोटी प्रकरणे प्रसिद्ध करून पुस्तके खपवण्याचा व पैसे व प्रसिद्धी मिळविण्याचा उद्योग पाश्चात्य देशांत शक्य आहे व तेथे कुणालाही असा मोह होणेही स्वाभाविक आहे. पण स्टिव्हन्सन आपल्या अनुभवाच्या आधारे म्हणतात की, भारतात अशी फसवणूक खेड्यातील लोकांत असंभाव्य आहे. (बहुतेक पुनर्जन्माची प्रकरणे भारतातील खेड्यांतच आढळून येतात.) उलट, अशी प्रकरणे दडपण्याचाच खेडूत प्रयत्न करतात असे आढळून येते. कारण भारतीयांची -विशेषत: खेडुतांची अशी एक अंधकल्पना आहे की, ज्या मुलाला पूर्वीचा जन्म आठवतो ते अल्पायुषी ठरते. त्यामुळे एखादे मूल पूर्वजन्माची भाषा करू लागले तर त्याला त्यापासून परावृत्त करण्यात येते वा गप्प बसवण्यात येते, असे स्टिव्हन्सनना आढळून आले आहे. शिवाय २-४ वर्षांच्या मुलांना पूर्वजन्माविषयी शिक्षण देणे अशक्य आहे आणि समजा कोणी दिले तरी संशोधनात ते बिंग बाहेर पडायला वेळ लागत नाही.

**अतिशयोक्ती :-** मुलाला आठवणाऱ्या गोष्टीत त्याचे नातेवाईक, शेजारी व

संबंधित व्यक्ती स्वत:च्या माहितीची भर घालून ती माहिती त्या मुलानेच सांगितली असा त्यानी दावा केल्याचाही प्रकार घडू शकतो. हे त्या लोकांनी फसवणुकीच्या उद्देशाने वा मुद्दाम केलेले नसते, तर अभावितपणे घडलेले असते. पण ही शक्यता नेहमीच जमेस धरून कोणत्याही संशोधकाला संशोधन करायचे असल्याने असा संभव जेथे असतो तेथे विशेष काळजी घेऊन संशोधक आपले कार्य करतो. स्टिव्हन्सननी दहा टक्के प्रकरणे रद्दबातल ठरविली आहेत, ती अशाच कारणास्तव, हे लक्षात ठेवले पाहिजे.

**सामान्य पण दडलेल्या स्मृती** (Cryptomnesia) : कांहीजणांनी असा आक्षेप घेतला आहे की, या पूर्वजन्माच्या स्मृतीच नव्हेत, तर सर्वसामान्य मार्गाने मिळालेली पण स्मृतीत लपलेली ती माहिती असते. याला स्टिव्हन्सन यांचे उत्तर असे की, पूर्वजन्माच्या स्मृती सामान्यत: २ ते ५ वर्षे वयाच्या मुलांना होत असतात. इतक्या लहान वयाच्या मुलांना कित्येक मैल अंतरावरील अज्ञात कुटुंबाची माहिती सामान्य मार्गाने मिळणे अशक्य आहे. ही शक्यता मोठ्या माणसाबाबत आहे हे मान्य करता येईल. पण स्टिव्हन्सनी संशोधिलेली सर्व प्रकरणे अगदी लहान वयाच्या मुलांची आहेत. हा आक्षेप त्यांच्या प्रकरणांना लागू होत नाहीच. पण मोठ्या व्यक्तींच्या बाबतीतसुद्धा असा प्रकार घडल्याचे एकही उदाहरण कोणाला ज्ञात नाही. म्हणून हा आक्षेप पुस्तकी वा फोल आहे.

**अतींद्रिय शक्तीने ज्ञान** : ज्या प्रकरणात कित्येक मैल अंतरावरील अनोळखी गावातील अनोळखी कुटुंबातील व्यक्तिविषयी एखादे मूल बोलू लागते, तेव्हा त्या प्रकरणात त्या व्यक्तिविषयीची ती माहिती त्या मुलाला अतींद्रिय शक्तीने मिळत असली पाहिजे, असा तर्क काही टीकाकारांनी लढविला आहे. पुनर्जन्माच्या सिद्धांतापेक्षा अतींद्रिय शक्तीचे अस्तित्व मान्य करणे कमी धोकादायक आहे असा पवित्रा या लोकांनी घेतलेला दिसतो. याला स्टिव्हन्सन यांचे उत्तर असे की, अतींद्रिय शक्तीने त्या मुलाला माहिती मिळाली असेल तर ***एखाद्या विशिष्ट व्यक्तीचीच माहिती त्याला का मिळावी?*** शिवाय अतींद्रिय शक्ती असलेल्या त्या मुलाची ती शक्ती इतर क्षेत्रातही प्रकट व्हायला पाहिजे. अतींद्रिय शक्तीने त्या मुलाला इतर अनेक गोष्टी कळायला पाहिजेत. पण असे काही आढळून येत नाही. एरवी ते मूल इतर मुलांप्रमाणे सामान्यच असते. तसेच ८ ते १० व्या वर्षाच्या सुमारास त्या मुलाची ती अतींद्रिय शक्ती नाहीशी का व्हावी यालाही समर्पक कारण नाही. मूल वाढेल तशा पूर्वजन्माच्या स्मृती धूसर होणे हे मात्र स्वाभाविक आहे. शिवाय पूर्वजन्मातील संबंधित व्यक्तीचा ज्या घराशी, व्यक्तींशी व वस्तूंशी संबंध आला होता त्या घराची, व्यक्तींची व वस्तूंची इतकी तपशीलवार माहिती त्या मुलात आढळून येते, की केवळ अतींद्रिय शक्तीनेच ती सर्व माहिती मिळण्याचे काहीच कारण

पुनर्जन्माशिवाय संभवत नाही. यातील सर्वात मोठी अडचण अशी की, पूर्वजन्मातील व्यक्तीच्या घरात नंतर काही बदल झाला असेल- ते घर दुरूस्त केले असेल - तर त्या मुलाला ते ओळखता येत नाही असे आढळून येते. अतींद्रिय शक्तीने घराची माहिती मिळत असती तर असे होण्याचे काहीच कारण नाही. त्या घरातील माणसांत काही मोठा बदल झाला असेल तरी असेच घडून येते. (पुनर्जन्म फार दिवसांनी झाला असेल तर असे घडण्याची शक्यता असते.) अतींद्रिय शक्तीविषयीची आणखी एक अडचण अशी की, त्या मुलाला पूर्वजन्मातील संबंधित व्यक्तींच्या जवळच्या नातेवाईकाशी वाटत असलेला जिव्हाळा, आपुलकीची भावना व त्यांच्याशी त्याचे सलगीचे व हक्काचे वागणे. अशा वागणुकीची व भावनेची उपपत्ती अतींद्रिय शक्तीने लागू शकत नाही.

**आनुवंशिक स्मृती :** आनुवंशिक स्मृती ही एक केवळ शक्यता म्हणून स्टिव्हन्सननी तिचा विचार केला आहे. पण जीव व अनुवंशशास्त्राच्या दृष्टीने अशी स्मृती शक्य नाही. शक्य असती तर ती एकाच कुटुंबात शक्य आहे. पुनर्जन्मात तर आनुवंशिकदृष्ट्या संबंध नसलेल्या कुटुबांचा संबंध येतो.

**झपाटणे वा परकाया प्रवेश :** एखाद्या मृत व्यक्तीचा आत्मा जिवंत व्यक्तीला झपाटू शकतो. वास्तविक याला पुनर्जन्म म्हणता येत नाही. पण झपाटणारा आत्मा त्या व्यक्तीला नंतर सोडून गेला पाहिजे. याला परकायाप्रवेशही म्हणतात. पण तो आत्मा त्या झपाटलेल्या व्यक्तीत कायमचाच घर करून राहिला तर ? मग या प्रकरणाला पुनर्जन्म का म्हणू नये हे कळत नाही. वर २२ वर्षे वयाच्या, आजाराने मेलेल्या निरक्षर सुमित्रेच्या शरीरात खून झालेल्या २३ वर्षे वयाच्या सुशिक्षीत शिवाने प्रवेश मिळवला असल्याच्या प्रकरणाची माहिती दिली आहे. पुनर्जन्माची असली प्रकरणे तुरळक व अपवादात्मक असली तरी ती घडू शकतात. खुद्द स्टिव्हन्सननाही जसबीर नावाच्या मुलात असले प्रकरण आढळून आले आहे. (त्यांचा **Twenty Cases** हा ग्रंथ पाहा) पण अशी प्रकरणे सामान्य पद्धतीने - जन्माने- होणाऱ्या पुनर्जन्म सिद्धांताला बाधा आणीत नाहीत. निसर्गाला वैविध्य आवडते हेच यावरून सिद्ध होते.[२]

## पुनर्जन्माची इतर कांही लक्षणे

**लिंगांतर :** मागच्या जन्मात आपण स्त्री असल्याचे काही मुलांनी सांगितल्याची प्रकरणे बरीच आढळून आली आहेत. (काही मुलांना भिन्नलिंगी पोशाख करणे आवडते ते याच कारणामुळे) अशी लिंगांतराची पुनर्जन्म प्रकरणे संस्कृतिपरत्वे व देशपरत्वे भिन्न प्रमाणात आढळून येतात. तुर्कस्तान, सीरिया व लेबॅनॉन  या देशांतील २२० पुनर्जन्म प्रकरणांत एकही लिंगांतराचे प्रकरण स्टिव्हन्सनना आढळून आले नाही. अलास्का प्रांतात २ प्रकरणे व वायव्य कॅनडातील कुचिन जमातीत ५० टक्के लिंगांतराची प्रकरणे अनुक्रमे डी लागूना व

स्लोबोडिन या संशोधकांना आढळून आली आहेत. खुद्द स्टिव्हन्सन यांना ब्रम्हदेश व थायलंड येथील २५० पुनर्जन्म प्रकरणात २० टक्के लिंगांतराची प्रकरणे आढळून आली आहेत. इतर देशांत लिंगातरांचे प्रमाण त्यांना ५ टक्के आढळून आले आहे.

**अपघाती मृत्यू आणि पुनर्जन्म :** पुनर्जन्म प्रकरणात अपघाताने व शस्त्रास्त्रांनी मृत्यू आल्याचे प्रमाण नेहमीच जास्त आढळून येते. अशा अनैसर्गिक मृत्यूचे प्रमाण श्रीलंकेत ३८ टक्के आणि लेबॅनॉन व सीरियामध्ये ७८ टक्के स्टिव्हन्सन यांना आढळून आले आहे. भारतात हे प्रमाण ४० टक्के असल्याचे आढळून येते.

**भाकिते व सूचक स्वप्ने :** काही समाजात एखादी व्यक्ती पुढील जन्माचे भाकीत करते. (असे एक प्रकरण कृष्णानंदांनी आपल्या **'True Experiences'** या ग्रंथात पृ. २९८ ते ३११ यावर दिले आहे.) स्टिव्हन्सन यांनी व त्यांच्या सहकारी डॉ. मिल्स यांना भाकीत करून जन्मल्याची व त्याचा पुरावा सार्वजनिकरीत्या दिल्याची उत्तर अमेरिकेतील इंडियन जमातीत अनेक प्रकरणे आढळून आली आहेत. अलास्कामधील वुइल्यम जॉर्जचे प्रकरण **'Twenty Cases'** मध्ये स्टिव्हन्सननी दिले असून शरीरावरील खुणांचेही त्यात भाकीत आहे. काही वेळा एखादी व्यक्ती संबंधितांच्या स्वप्नात येऊन आपण जन्म घेत असल्याचे सांगते (अशी तीनचार उदाहरणे प्रस्तुत लेखकाला संबंधित व्यक्तींची स्वानुभवावर आधारित व लेखकाने त्याची शहानिशा केलेली अशी माहीत आहेत.) उत्तर अमेरिका, ब्रम्हदेश व मध्य तुर्कस्थानमधील अलेवी जमातीत अशी पुनर्जन्मसूचक स्वप्नांची उदाहरणे भरपूर प्रमाणात स्टिव्हन्सनना आढळली आहेत. एस्किमो समाजात पुनर्जन्म झालेल्या व्यक्ती मातृवंशाकडून संबंधित असल्याचे अनेकदा आढळून आले आहे.मृत्यूपूर्वी आपण जशी भावना करू तसा पुढील जन्म घडतो अशी कित्येक समाजात कल्पना रूढ आहे. (**यं यं वापि स्मरन् भावं त्यजत्यन्ते कलेवरम् । तं तमेवैति कौन्तेय सदा तद्भावभावित: ।।** हा गीतेतील यासंबंधीचा श्लोक प्रसिद्धच आहे.) हिंदू व बौद्ध संस्कृतीतही भावनेनुसार जन्म घडण्याची कल्पना जास्त रूढ आहे. प्रत्यक्षात असे घडू शकत असल्याचे आढळून आले असून त्याला स्टिव्हन्सननी 'Self Fulfilling Prophesy' म्हटले आहे. त्याला पुनर्जन्माचा नियम (Law) म्हणावे काय हा प्रश्न आहे. इतर प्राण्यांच्या जातीतही प्रसंगोपात्त जन्म घडू शकतो अशीही हिंदूंची आणि बौद्धांची कल्पना आहे. जड भरताला हरणाच्या पाडसांवरील अतिरिक्त प्रेमामुळे पुढील जन्म हरणाचा घ्यावा लागल्याची भागवतातील कथा प्रसिद्ध आहे. फरीदाबादच्या 'रिइनकार्नेशन रिसर्च फौंडेशन' च्या News Letter मध्ये, एका एम एल् एच्या मुलीच्या मृत्युनंतर 'सरिता' नावाच्या मुलीच्या रूपात पुनर्जन्म झाल्याची व तिला मधल्या काळात आपण पोपटाच्या योनीत जन्मल्याचे आठवत असल्याची माहिती दिली आहे. कीर्तिस्वरूप

रावत या राजस्थानच्या पुनर्जन्म संशोधकांना लक्ष्मी हांजा नावाच्या मुलीला मागच्या जन्मात आपण मोराच्या योनीत जन्मल्याची आठवण होत असल्याचे एक प्रकरण मिळाले आहे. अशा आठवणींची शहानिशा करणे अर्थात कठीण आहे. पण पुढील एक प्रकरण मनोरंजक आहे. २९ जून १९९६ च्या 'इंडियन एक्स्प्रेस' या इंग्रजी दैनिकाने IANS ची ही बातमी दिली आहे. (भूतानच्या 'क्यूएन्सल' या दैनिकानेही ती दिली आहे.) भूतानमधील 'पेमा' नावाचा बैलासारखे डोके असलेला एक मुलगा रडताना बैलाच्या गोठ्यात नेले तर ताबडतोब रडायचा थांबत असे. गवत खाण्याकडेही त्याचा ओढा दिसत असे. पुढे तीन वर्षांचा झाल्यानंतर तो शेजारच्या घरचे माझे आणखी बरेच शेत नांगरायचे काम राहिले आहे असे म्हणू लागला; तसेच बोलण्यापेक्षा बैलासारखे हंबरणे, हातांनी बैलाप्रमाणे जमीन उकरणे हे तो अधिक पसंत करीत असे. शेजारच्या घरात पूर्वी खरोखरच एक बैल मेला होता आणि म्हणून त्याचे 'उवाला' हेच नाव त्याला देण्यात आले. नंतर गळ्यात घंटी बांधण्याचाही त्याने आग्रह धरला व ती कायम गळ्यात घालून बैलासारखे चार पायावर चाले. पुढे त्याला शाळेला घातल्यानंतर १० वर्षांनंतर हा प्रकार हळू हळू कमी झाला. मनुष्य इतर जातीत जन्मल्याची असली प्रकरणे विशेष आढळत नसल्यामुळे त्याचे शास्त्रीय संशोधन होऊ शकलेले नाही. (आणि आढळली तरी ते कोणत्या कसोट्यांखाली करायचे हा प्रश्नच आहे.)

**जन्मखुणा :** शरीरावर जन्मत:च आढळून येणाऱ्या खुणा पुनर्जन्म कल्पनेला बळकटी आणणारा एक सज्जड पुरावा आहे. शरीरावरील जन्मखूण त्या मुलाच्या कथित मागच्या जन्मातील व्यक्तीला अनैसर्गिकरीत्या (उदा. शस्त्राने) आलेल्या मृत्यूमुळे शरीरावर त्याच ठिकाणी जखम झाल्याचे सिद्ध झाले (आणि असे अनेक प्रकरणात सिद्ध झाले आहे.) तर तो पुनर्जन्माचा एक बिनतोड पुरावा म्हणावा लागतो. अशा खुणा अनुवंशाने निर्माण होत नाहीत. उदा. जन्मत:च एकच कान तुटलेला असणे, एकाच हाताची बोटे तुटलेली असणे इत्यादी. ज्या अतींद्रिय घटकाचा (जीवात्म्याचा) पुनर्जन्माच्या स्मृती जागवण्यामध्ये सक्रिय सहभाग असतो, तोच घटक (जीवात्मा) या 'शारीरिक स्मृती' (खुणा) 'जागवण्या'त (निर्माण करण्यात) सुद्धा सक्रियपणे सहभागी असतो असे मानता येते - नव्हे असे मानणेच अधिक संयुक्तिक आहे. (अगदी अलीकडे म्हणजे १९९७ साली स्टिव्हन्सन यांनी **'Reincarnation and Biology'** या मथळ्याचे भाग १ व २ हे प्रचंड ग्रंथ प्रसिद्ध केले असून त्यात जन्मखुणांची प्रकरणे फोटोसह प्रसिद्ध केली आहेत. पुनर्जन्म सिद्धांतावर या ग्रंथात त्यांनी 'भरतवाक्य' म्हटले आहे. कारण या सर्व खुणा पुनर्जन्म निर्विवादपणे सिद्ध करतात.)

**दोन जन्मातील अंतर :** दोन जन्मातील अंतर निश्चित असल्याचे आढळून येत नाही. हा जन्म तात्काळही होऊ शकेल किंवा काही दिवसांनी किंवा कित्येक शेकडो वर्षांनीसुद्धा होऊ शकेल.

**दोन जन्मांमधली अवस्था :-** मृत्यूनंतर पुढील जन्म होईपर्यंत त्या मृताची काय अवस्था असते याविषयीची माहिती पुनर्जन्म संशोधनातून फारशी उपलब्ध झालेली नाही. तथापि, संमोहन पद्धतीने पुनर्जन्माच्या आठवणी जागवण्याच्या पद्धतीचा अवलंब करून जोएल व्हिटन या डॉक्टरने **'Life Between Life'** (1986) या ग्रंथात या मधल्या अवस्थेवर बराच शास्त्रीय प्रकाश टाकला आहे. त्यामुळे भारतीय कर्मसिद्धांताला बळकटी मिळत असल्याचे दिसून येते. किंबहुना अर्धेअधिक पुस्तक त्यावरच असून Karmic Case Studies असेच या विभागाला नाव देण्यात आले आहे. एडगर केयसीनंतर कर्मसिद्धांताला शास्त्रीय आधार मिळवून देणारा हाच ग्रंथकार होय.

## समारोप

पुनर्जन्मावर स्टिव्हन्सननी संशोधनास प्रारंभ केला त्या वेळी शास्त्रज्ञांत आढळून येणारी पुनर्जन्मविषयक अविश्वासाची दृष्टी आता तितक्या प्रमाणात आढळून येत नाही. १९६९ सालच्या गॅलप मतनोंदणीनुसार २० टक्के अमेरिकन आणि २६ टक्के कॅनेडियन लोक पुनर्जन्मावर विश्वास ठेवत होते.(ही टक्केवारी कमी जास्त प्रमाणात युरोपातही आढळून आली.) ही परिस्थिती ५ टक्यांनी सुधारली असल्याचे १९९० च्या गॅलप पोलमध्ये आढळून आले आहे. हल्ली काही शास्त्रज्ञांनी व्यक्तिमत्वातील दोष, गंड, इ. नाहीसे करण्यासाठी संमोहनद्वारा पुनर्जन्माची स्मृती जागविण्याची नवीन उपचारपद्धती सुरू केली आहे. पीटर रॅम्स्टमटर या ऑस्ट्रेलियन मानसशास्त्रज्ञाला या क्षेत्रात कांही विलक्षण अनुभव आले आहेत. तो म्हणतो, "The whole question of reincarnation is really opening up after a long dark age, but I predict within 20 years it will be totally accepted as a scientific fact." संमोहन पद्धतीने पुनर्जन्माची सत्यता सिद्ध करण्यात हेलेन वॅम्बॅच या बाईंचा सिंहाचा वाटा असून त्या बाई शेकडो लोकांवर सामूहिकरीत्या एकाच वेळी संमोहन करून पुनर्जन्माच्या स्मृती जागवत असतात. त्यांचा या विषयावर **'Reliving Past Lives'** हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. यापुढे पुनर्जन्माचे शास्त्रीय संशोधन कसे करावे याविषयी मार्गदर्शन करणारे पुस्तक अलाहाबादचे डॉक्टर जमुनाप्रसाद यांनी लिहिले असून त्याचे नाव आहे. **'New Dimensions In Reincarnation Research.'**

## टिपा :

काही ठरावीक मुलांनाच आपला पूर्वीचा जन्म का आठवावा? असा एक प्रश्न उद्‌भवतो. याचे एक संभाव्य उत्तर पुनर्जन्म संशोधनात सापडते. ते असे की ज्यांचा मृत्यू मागच्या जन्मात शस्त्राने, अपघात वा अशाच आगंतुक कारणामुळे आकस्मिकपणे

झालेला आहे अशाच व्यक्तींना पूर्वजन्म आठवतो असे सामान्यपणे आढळून येते. पूर्वजन्माच्या या स्मृतीचे हे एक वैशिष्ट्य असून ते व्यास महर्षींना माहीत होते असे दिसते. कारण ते म्हणतात,

**ये मृता: सहसा मर्त्या जायन्ते सहसा पुन: ।**
**तेषां पौराणिकोऽभ्यास: क्वचित् कालं हि तिष्ठति ।।**
**तस्माज्जातिस्मरा लोके जायन्ते बोधसंयुता: ।**
**तेषां विवर्धतां संज्ञा स्वप्नवत् प्रणश्यति ।।**

**– महाभारत, अनुशासन १४५.**

**अर्थ :** जे जबरीने (सहसा) किंवा आकस्मिकपणे मरतात व जे जबरीने वा आकस्मिकपणे पुन्हा जन्माला येतात, त्यांचा पूर्वजन्माचा अभ्यास वा संस्कार थोडा वेळ टिकून राहतो. त्यामुळे पूर्वजन्माच्या स्मृती नंतरच्या जन्मात अशा व्यक्तींना येत राहतात व ते त्या आठवणी काही काळ सांगत असतात. पण वय वाढेल तसे त्या स्मृती स्वप्नाप्रमाणे नष्ट होतात. (ते त्या हळू हळू विसरतात.)

पुढे व्यासमहर्षि हेही सांगायला विसरत नाहीत की,

**परलोकस्य चास्तित्वे मूढानां कारणं त्विदम् ।।**

**अर्थ** - जे लोक परलोकाचे अस्तित्व मानत नाहीत अशा मूर्ख (मूढ) लोकांचा पुनर्जन्मावर विश्वास बसण्यास अशा घटना कारणीभूत होतात.

पूर्वजन्माच्या आठवणी सांगणारी लहान मुले ( २-४ वर्षांची) नसती तर हे नास्तिक लोक पुनर्जन्म व परलोक मानले नसते असे यावरून ठरते. पण पूर्वजन्माच्या स्मृती सांगणारी मुले असूनही व त्यांच्या स्मृती खोट्या नाहीत हे वस्तुनिष्ठ वैज्ञानिक निकषांवर सिद्ध होऊनही पुनर्जन्म नाकारणरे हल्ली लोक आहेत याला काय म्हणावे? (किंवा अशा लोकांना व्यासमुनी काय म्हणाले असते?) अशा लोकांना 'बुद्धिवादी' असे संबोधण्यात येत असून अशा एका बुद्धिवाद्याने माझ्या वरील लेखाला उत्तर देणारा लेख 'अंधश्रद्धा निर्मूलन वार्तापत्रा'त प्रसिद्ध करून तो अंक मला पोस्टाने पाठवला आहे. त्या लेखाला पुराव्यानिशी पुढील उपप्रकरणात प्रत्युत्तर देण्यात येत आहे.

## (ब) पुनर्जन्म सिद्धांतावरील एका बुद्धिवादी टीकेला वैज्ञानिक प्रत्युत्तर

महाराष्ट्रात 'अंधश्रद्धा निर्मूलन समिती' या नावाने एक संघटना स्थापून आपल्या विशिष्ट मतप्रणालीचा राजकीय थाटात काही लोक प्रचार करीत असतात हे आता सर्वांना माहीत झाले आहे. कुणालाही कुठल्याही मतप्रणालीचा प्रचार करण्याचे पूर्ण स्वातंत्र्य

आपल्या राज्यघटनेने दिलेले आहे. तेव्हा या लोकांच्या या संघटनेला व त्यांच्या स्वत:च्या मतप्रणालीच्या प्रचाराला कुणाचाही विरोध असण्याचे कारण नाही. पण हे लोक आपल्या राजकीय मतप्रणालीचा प्रचार विज्ञानाच्या नावाखाली करतात, व तेही खोट्या बक्षिसाचे आव्हान देऊन, हे आक्षेपार्ह आहे. त्यांची राजकीय वा इतर मते कांहीही असोत. पण पुनर्जन्म किंवा तादृश अतींद्रिय घटना अशक्य असल्याचे आपले मत त्यांनी खोट्या बक्षिसाचे आव्हान व विज्ञानाचा बुरखा घेऊन करावे हे आक्षेपार्ह आहे. 'खोट्या बक्षिसाचे आव्हान' म्हणण्याचे कारण हे त्यांचे बक्षिसाचे आव्हान खऱ्या विज्ञानवृत्तीतून दिलेले नाही. उदा. एखाद्या अतींद्रिय शक्ती असलेल्या व्यक्तीने आपण करून दाखवत असलेल्या अतींद्रिय घटनेची (तथाकथित चमत्काराची) शास्त्रीय तपासणी त्यांच्या स्वत:च्या अटीखाली आणि वैज्ञानिक निकषाखाली करण्याचे आमंत्रण त्यांना दिले असता त्यांनी ते वैज्ञानिकाला शोभणाऱ्या विनम्र व सत्यशोधकाच्या भावनेने स्वीकारले असते, तर त्यांचे हे आव्हान कोणीही समजू शकले असते. पण असे आमंत्रण जणू काही त्या व्यक्तीने आपल्याला दिलेलेच नाही अशा आविर्भावात तिची अतींद्रिय शक्ती न तपासताच तिच्यावर फसवणुकीचा त्यांनी आरोप करावा, याला काय म्हणावे?आणि हेच सर्वात आक्षेपार्ह व चीड आणणारे आहे. या लोकांची ही दुटप्पी वागणूक अनुराधा देशमुख या महाराष्ट्रातील प्रसिद्ध व्यक्तीच्या विभूती चमत्काराच्या प्रकरणामध्ये प्रस्तुत लेखकाने यापूर्वी साधार उघड करून दाखविली असून, या लोकांचा असला दुटप्पी व्यवहार चव्हाट्यावर आणण्याचा प्रयत्न करणे हा सुद्धा एखाद्याच्या शक्तीचा आणि वेळेचा कसा अपव्यय आहे, हे त्यांचे ज्योतिषशास्त्राविषयीचे आव्हान एका मातब्बर ज्योतिषाने स्वीकारले असता, त्यांनी कित्येक दिवस घोळ घालून शेवटी रणांगणातून आयत्या वेळी कसा पळ काढला, हे तपशीलवार सांगणाऱ्या आणखी एका लेखातून स्पष्ट केले आहे.[३] असे असताना दुटप्पीपणा आणि खोटेपणा यात निर्ढावलेल्या या लोकांचा (पुनर्जन्म प्रकरणातील) असलाच दुटप्पीपणा व खोटेपणा चव्हाट्यावर आणण्याचा प्रयत्न मला येथे पुन्हा करावा लागत आहे. तो करण्यापूर्वी तो का करावा लागत आहे हे सांगितले पाहिजे.

**पुनर्जन्म सिद्धांताविषयीचे स्टिव्हन्सन यांचे शास्त्रीय आव्हान**

माझा पुनर्जन्मावरील लेख (प्रकरण ५ ) **'अक्कडई'** च्या १९९६ सालच्या दिवाळी अंकात प्रथम प्रसिद्ध झाला. त्या लेखात आयन स्टिव्हन्सन या पुनर्जन्म संशोधकाच्या **'Twenty Cases Suggestive of Reincarnation'** या ग्रंथाचा मी उल्लेख केला असून पुनर्जन्म सिद्धांत शास्त्रीय पायावर प्रस्थापित करण्याचे श्रेय मी त्या लेखात त्यांनाच प्रामुख्याने दिले आहे. स्टिव्हन्सन हे जागतिक कीर्तीचे पुनर्जन्म सिद्धांताचे

शास्त्रीय संशोधक असून त्यांनी सुमारे २५०० पुनर्जन्म प्रकरणांचा जगभर फिरून अत्यंत कसोशीने शास्त्रीय निकषांखाली अभ्यास केला आहे. कांही निवडक प्रकरणांचा अभ्यास करताना त्यांनी त्या त्या देशातील संबंधित कुटुंबांना अनेकदा भेटी देऊन त्या प्रकरणांचा शास्त्रीय दृष्टीने पाठपुरावाही केला आहे (Follow -up study). त्यांचे संशोधन अशा प्रकरणांचा शास्त्रीय निकषांखाली कसा अभ्यास करावा याचा वस्तुपाठच आहे असे म्हणता येईल. त्यांच्या या शास्त्रीय संशोधनात कसलीही उणीव आजतागायत कोणाही मान्यवर शास्त्रज्ञाने दाखवून दिलेली नाही. The Journal of Nervous and Mental Diseases या गंभीर वैज्ञानिक संशोधन लेख प्रसिद्ध करणाऱ्या मातब्बर नियतकालिकाने स्टिव्हन्सनचा पुनर्जन्मावरील लेख प्रसिद्ध करून पुनर्जन्म संशोधन हे शुद्ध वैज्ञानिक असल्याचे मान्य केले आहे. ( मे १९७७ चा अंक) डॉ. हॅरोल्ड लायेफ् यांनी त्याच नियतकालिकांत स्टिव्हन्सनना विसाव्या शतकातील गॅलिलिओ म्हटले आहे! त्यामुळे पुनर्जन्म सिद्धांत खोटा म्हणणाऱ्यांना त्यांचे संशोधन हे एक मोठे आव्हान ठरले आहे. या आव्हानाला बुद्धिवादी तोंड देऊ शकत नाहीत, असे होऊ नये म्हणून (कारण तसे झाले तर बुद्धिवादी तत्त्वज्ञान निकालात निघते !) पाश्चात्य बुद्धिवादी व नास्तिकवादी पुढे सरसावले व त्यांनी सामान्य लोकांचा- जे स्टिव्हन्सन यांचे संशोधनात्मक ग्रंथ वाचू शकत नाहीत -बुद्धिभेद करण्यास प्रारंभ केला. या बुद्धिवाद्यांनी खोट्या युक्तिवादाच्या व विधानांच्या आधारे आपली मतप्रणाली दामटण्यासाठी कांही नियतकालिके चालवली आहेत व कांही ग्रंथही लिहिले आहेत. पाश्चात्य बुद्धिवाद्यांमध्ये मार्टिन गार्डनर, जेम्स रँडी व पॉल कुर्ट्झ हे प्रमुख आहेत. पैकी गार्डनर हा विज्ञान विषयावरील लेखक आहे, रँडी हा जादूगार आहे, व कुर्ट्झ हा मानसशास्त्रज्ञ आहे. त्यांनी अमेरिकेत अतींद्रिय घटनांचे शास्त्रीय संशोधनाने सत्यत्व प्रस्थापित करणाऱ्या शास्त्रज्ञांचा 'भांडाफोड' (Debunking) करण्यासाठी एक कमिटी स्थापली असून तिचे नाव C S I C O P (कमिटी फॉर दि इन्व्हेस्टिगेशन ऑफ दि क्लेम्स ऑफ दि पॅरानॉर्मल) असे ठेवले आहे. या कमिटीचा उद्योग अतींद्रिय दावे खोटे ठरविण्यासाठी बिनदिक्कतपणे खोटे लिहिणे व खोटे युक्तिवाद करणे याशिवाय दुसरा कांही नसतो. शास्त्रीयतेच्या बुरख्याखाली हे सर्व केले जाते हा या कमिटीचा विशेष आहे. त्यासाठी वाममार्गाचासुद्धा बिनदिक्कतपणे अवलंब केला जातो. याविषयी गार्डनरचेच उदाहरण देता येईल. गार्डनर यानी अतींद्रिय शक्तीचे अस्तित्व शास्त्रीय पद्धतीने (स्टॅटिस्टिक्सच्या आधारे) सिद्ध करणाऱ्या डॉ. मिलान रिझल या प्रसिद्ध संशोधकाला "तुम्ही (स्टेपनेक या अतींद्रिय शक्तीच्या व्यक्तीवर केलेल्या प्रयोगात) फसवणूक होती असे सांगणार एक लेख लिहा. त्यामध्ये तुम्हाला आंतरराष्ट्रीय प्रसिद्धी मिळेल व भरपूर मानधनही मिळेल" असे आश्वासन देणारे पत्र लिहिले. डॉ. रिझल

सुदैवाने या प्रलोभनाला बळी पडले नाहीत. (सुदैवाने म्हणण्याचे कारण या पद्धतीने कीर्ती व पैसा मिळवणारे लोक याच क्षेत्रात पूर्वी होऊन गेले आहेत!) उलट त्यांनी 'जर्नल ऑफ पॅरासायकॉलॉजी' या नियतकालिकेच्या सप्टेंबर १९९० च्या अंकात गार्डनर यांच्या या व इतर कृष्णकृत्यावर एक लेख लिहून प्रकाश टाकला. पण गार्डनरना त्याची ना खंत, ना शरम! उलट ''आपले ( डॉ. रिझल यांना या विषयी आपण लिहिलेले) पत्र खाजगी असून ते जर छापले तर कोर्टात दावा लावीन'' अशी त्या जर्नलच्या संपादकांना गार्डनरनी धमकी दिली! विज्ञानाच्या नावाखाली वैज्ञानिक सत्यालाच बळी देण्यास कटिबध्द झालेल्यांना नैतिकतेची यत्किंचही तमा नसावी यात आश्चर्य कसले?

अशा बुद्धिवाद्यांच्या कंपूपैकी लिओनार्ड एंजल नावाचे एक लेखक असून त्यांनी स्टिव्हन्सन यांच्या पुनर्जन्म दाव्याचा (व पुनर्जन्माचा) कसा 'भांडाफोड' केला आहे हे 'दाखवून' देणारा एक लेख महाराष्ट्र अंधश्रद्धानिर्मूलन समितीतर्फे सांगलीहून प्रसिद्ध होणाऱ्या 'अंधश्रद्धानिर्मूलन वार्तापत्रांच्या जानेवारी १९९७ च्या अंकात' त्याचे संपादक डॉ. प्रदीप पाटील यांनी लिहिला व तो अंक माझ्या पत्त्यावर पाठवला . शास्त्रीय दखल घेण्याची योग्यता नसतानाही त्या लेखाची मी येथे एवढ्याचसाठी दखल घेत आहे की वाचकांना पाश्चात्य बुद्धिवाद्यांच्या खोटेपणाचा नमुना पाहावयास मिळावा. मी त्या लेखाची दखल घेत असल्याचे पत्र रजिस्टर्ड ए. डी. करून २४ जानेवारी १९९७ रोजी संपादक पाटील यांना पाठविले असून ते खाली जसेच्या तसे देत आहे.

प्राचार्य अद्वयानंद गळतगे<br>
भोज (बेळगांव) कर्नाटक<br>
२४ जानेवारी, १९९७

डॉ. प्रदीप पाटील, संपादक,<br>
अंधश्रद्धानिर्मूलन वार्तापत्र, सांगली यांना,<br>
स. न.

**'अबकडई'** १९९६ च्या दिवाळी वार्षिकातील माझा 'पुनर्जन्मा' वरील लेख वाचून त्याला उत्तर म्हणून आपण आपला 'वार्तापत्रा'चा जानेवारीचा अंक मला पाठविलेला दिसतो. 'अंधश्रद्धानिर्मूलन' याचा अर्थ 'असत्य गोष्टीवरील श्रध्दांचे निर्मूलन' असा असेल तर मी ही अंधश्रद्धानिर्मूलनवादीच आहे आणि पुनर्जन्माविषयीचे सत्य पुढे यावे या उद्देशानेच मी तो लेख लिहिला आहे. त्या लेखाला उत्तर म्हणून आपण त्याच उद्देशाने आपल्या वार्तापत्रात लेख लिहिला असेल तर चांगलीच गोष्ट आहे. पण मग त्या लेखाला त्याच उद्देशाने प्रत्युत्तर देणे जरूर आहे. कारण आपला लेख पूर्णपणे सत्याचा विपर्यास करणारा आहे. ते कसे हे थोडक्या शब्दात सांगणे शक्य नाही. त्यासाठी सविस्तर

लेख लिहिणे भाग असून तो आपण आपल्या 'वार्तापत्रा'त कसलीही काटछाट न करता छापायला तयार आहात काय? असाल तर कृपया कळवावे. लेखाला शब्दमर्यादा असणारच. पण पुनर्जन्माची स्टिव्हन्सन यांनी संशोधिलेली जी केस लिओनार्ड एंजल यांनी टीकेसाठी निवडली आहे, ती इतकीमोठी आहे की (मूळ स्टिव्हन्सनांच्या ग्रंथाची ५० पृष्ठे तिने व्यापली आहेत.) त्या टीकेला छोट्या लेखाने उत्तर देणे शक्य नाही. तरीही माझा लेख 'वार्तापत्रा' मधील आपल्या मूळ टीकालेखाच्या लांबीची मर्यादा ओलांडणार नाही याची हमी देतो. माझ्या लेखात सत्यनिष्ठा, संयम व प्रतिपक्षाबद्दल आदर या गोष्टी कटाक्षाने पाळल्या जातील याची खात्री बाळगावी. आपण माझा लेख छापायला तयार नसाल तर आपला (व आपल्या समितीचा) उद्देश सत्यशोधन हा नसून दुसराच कांही आहे असे मानायला मी मोकळा असेन. कळावे,

आपला उत्तराभिलाषी,

**अद्वयानंद गळतगे**

**माहितीसाठी प्रती,**

१) श्री. चंद्रकांत खोत, संपादक **'अबकडई'** दिवाळी वार्षिक, मुंबई.

२) डॉ. नरेंद्र दाभोळकर, कार्याध्यक्ष, अंधश्रध्दानिर्मूलन समिती, सातारा.

माझ्या पत्राला उत्तर आले नाही हे सांगायला नको. ते येण्याची अपेक्षा नव्हतीच. खोटे लिहिण्याचे ब्रीद बाळगणारे आपला खोटेपणा उघड करणारा लेख कसा बरे छापतील?

आपल्या लेखाच्या प्रारंभी 'वार्तापत्रा' च्या संपादकांनी ठळक अक्षरात पुढील माहिती दिली आहे.

"**अबकडई** या दिवाळी अंकाने यावर्षी पुनर्जन्माचा समर्थन करणारा 'पुनर्जन्म विशेषांक' काढलाआहे. त्यातील दखल घेण्याजोगे ३ लेख जे आहेत त्यांचा फोलपणा या लेखातून होईल. संपूर्ण अंकात ज्या इयन स्टिव्हन्सन यांच्या 'ट्वेंटी केसेस ऑफ दि इनकार्नेशन' या पुस्तकाचा उदो उदो केला आहे त्याच पुस्तकाचा व पुनर्जन्माचा पुनर्जन्म दाव्याचा लिओनार्ड एंजल यांनी केलेला हा भांडाफोड."

वरील अवतरणात स्टिव्हन्सन यांच्या पुस्तकाच्या नावामध्ये जी चूक संपादकांनी केली आहे, ती वैज्ञानिकदृष्ट्या अक्षम्य आहे. पण विज्ञानाचे कातडे पांघरलेल्यांच्या बाबतीत त्याचे आश्चर्य वाटायला नको. आशीच चूक लेखात टाकलेल्या चौकटीतही आढळून येते. त्यात "स्टिव्हन्सन यांचे प्रयोगातील" असे शब्द आहेत. स्टिव्हन्सन यांनी पुनर्जन्माविषयी संशोधन केले आहे, प्रयोग नाही. असे असताना 'प्रयोग'

केले हा संपादकांचा शोध अजबच म्हटला पाहिजे! (पुनर्जन्मात 'प्रयोग' कसा शक्य आहे?) स्टिव्हन्सन यांच्या पुस्तकातील ज्या प्रकरणाचा एंजल यांनी 'भांडाफोड' केल्याचा दावा संपादक करतात, त्या प्रकरणाची सत्य माहिती वाचकांना असणे आवश्यक असल्यामुळे ती थोडक्यात प्रथम खाली देत आहे.

**इमद एलवार याची पुनर्जन्म कथा**

मध्यपूर्वेतील लेबॅनॉन या देशातील कोर्नेल या गावी एलवार नावाच्या कुटुंबात १९५८ साली इमद नावाचा एक मुलगा जन्मला. तो दीड वर्षाचा झाल्यावर आपण खिबी नावाच्या (२५ कि. मी. अंतरावरील) एका खेड्यात बौहामजी नावाच्या कुटुंबात पूर्वजन्मी होतो असे सांगू लागला. तो जमीला नावाच्या बाईची वरचेवर आठवण काढीत असे व तिचे नाव घेत असे. इतरही अनेक लोकांची नावे तो सांगत असे. एका ट्रकच्या अपघाताविषयीही तो बोलत असे. अशा प्रकारे व्यक्ती व घटना याविषयीची इमद या मुलाने केलेली ७३ विधाने स्टिव्हन्सन यांनी आपल्या पुस्तकातील या प्रकरणांच्या तक्त्यात दिली आहेत. तीही सर्व विधाने त्याने एखाद्या प्रौढ माणसाने करावीत तशी जाणूनबूजून केलेली नाहीत, तर उत्स्फूर्तपणे केली आहेत. या ७३ विधानांपैकी जी विधाने मोघम स्वरूपात केली होती, त्याविषयी त्याच्या पालकांनी स्वत:चा कांही तर्क लढविला, आणि येथेच घोटाळा झाला. कारण त्यामुळे स्टिव्हन्सन यांची दिशाभूल झाली. स्टिव्हन्सन यांच्या या प्रारंभिक दिशाभुलीमुळेच हे प्रकरण 'पुनर्जन्मा' चा 'भांडाफोड' करण्यासाठी एंजल यांच्या उपयोगी पडले आहे ! कारण स्टिव्हन्सन यांनी पालकांनी केलेल्या (व स्वत: पालकांच्या झालेल्या) या दिशाभुलीमुळे चुकीच्या मार्गाने संशोधनास सुरूवात केली. पण ही चूक त्यांच्या लक्षात यायला फार वेळ लागला नाही. कारण इमदने सांगितलेल्या नावाची सर्व माणसे खरोखरच अस्तित्वात होती व त्याने सांगितलेल्या सर्व घटनाही प्रत्यक्षात घडल्या होत्या, हे स्टिव्हन्सनना खिबी या गावी गेल्यानंतर तपासाअंती आढळून आले. फक्त ***त्या व्यक्तींच्या व घटनांचा परस्परसंबंध कसा जुळवायचा हे इमदच्या कांही मोघम विधानामुळे त्याच्या पालकांना कळले नव्हते, किंवा जमले नव्हते.*** पण त्यामुळे एक गोष्ट नि:संशयपणे सिद्ध झाली ती ही की इमदच्या पालकांनी हे प्रकरण बनवून सांगितले नव्हते. ***ते प्रामाणिक असल्याचे त्यांच्या चुकाच सिद्ध करीत होत्या.*** दुसरी एक गोष्ट या चुकांमुळे सिद्ध झाली - आणि अनेकांच्या साक्षीतून आणि परिस्थितीजन्य पुराव्यावरूनही ही गोष्ट सिद्ध झाली आहे- ती म्हणजे खिबी या गावी इमदचे पालक यापूर्वी कधीच गेले नव्हते व बौहामजी या (इमदच्या पूर्वजन्माच्या) कुटुंबाचीही कसलीच पूर्वमाहिती त्यांना नव्हती. अशा रीतीने इमदच्या पुनर्जन्म प्रकरणाची सत्यता त्याच्या पालकांनी केलेल्या चुकांमुळेच निर्विवादपणे सिद्ध झाली आहे. कधीकधी

चुकाच कशा पथ्यावर पडतात याचे हे एक उत्तम उदाहरण आहे. (एंजल यांनी इमदच्या पालकांच्या चुकांमुळे स्टिव्हन्सन यांच्या झालेल्या प्राथमिक दिशाभुलीचा विपर्यास केला असला तरी ***इमदने सांगितलेल्या खिबी गावातील व्यक्तींची माहिती व तेथील घटना त्याला कशा कळाल्या या मुलभूत प्रश्नाकडे मात्र त्यांनी जाणूनबुजून पूर्णपणे दुर्लक्ष केले आहे,*** हे लक्षात ठेवण्यासारखे आहे.)

आता एंजल यांनी ज्या ६ मुद्याखाली या प्रकरणांचा 'भांडाफोड' केल्याचा संपादक दावा करतात, त्या ६ मुद्यांचा यथाक्रम विचार करू. (ही टीका एंजलची असल्यामुळे संपादकाऐवजी एंजल यांचाच येथून पुढे नामोल्लेख करण्यात येईल.)

**मुद्दा क्रं. १:** ''तपासणीपूर्वी आठवणी कशा जमा केल्या त्याची पद्धती सांगण्यात आलेली नाही. ५७ आठवणी.... नोंदवण्याची पद्धत दिली नाही.''

उत्तर :- ***ही पद्धत स्टिव्हन्सनने आपल्या उपर्युक्त ग्रंथाच्या २७५ पृष्ठावर स्पष्ट शब्दात दिली आहे.*** ते म्हणतात. ''१६ मार्च १९६४ रोजी संध्याकाळी माझ्या पहिल्याभेटीतील मुलाखतीत इमदच्या पालकांनी सांगितलेली म्हणून जी माहिती दिली ती मी लेखी नोंद करून घेतली''(पृ.२७५) या नोंदी कशा व कोणत्या भाषेत केल्या, त्यासाठी कुणाकुणाची, केव्हा व कशी मदत घेतली याविषयाचा सर्व तपशील स्टिव्हन्सनने नोंदवला आहे. (पृ. २७५) यावरून एंजल किती खोटे लिहितात याची वाचकांना कल्पना येईल. (येथे ५७ आठवणींचाच उल्लेख केला आहे. १६ ओळखीच्या विधानांचा उेल्लख नाही. वास्तविक इमदची एकूण ७३ विधाने आहेत.)

पुढे एंजलनी पालकाकडून मिळालेली माहिती म्हणून जी ३ विधाने केलेली आहेत ती अशी : (१) इमद हा पूर्वजन्मी 'महमूद' होता. (२) त्याला जमीला नावाची बायको होती, व (३) तो ट्रकच्या अपघातात मेला. ही माहिती पालकांकडून कशी मिळाली? स्टिव्हन्सन यांनी हे सांगितलेले असतानाही ती गोष्ट एंजलनी वाचकांपासून लपवून ठेवली आहे. ती माहिती अशी : स्टिव्हन्सन म्हणतात, ''मला असे आढळून आले की इमदने ट्रकचा अपघात पूर्वजन्मात स्वतःला झाला असल्याचे कधीच म्हटले नव्हते. ट्रकचा अपघात कसा झाला याचे 'आँखो देखा'वर्णन फक्त त्याने केले होते,'' (पृ.२७७) इमदने आपणच महमूद होतो असेही कधीच म्हटले नव्हते. (पृ. ३१९) ''आपल्याला जमीला नावाची बायको असल्याचेही इमदने कधीच म्हटले नव्हते. फक्त तो जमीला या बाईचे नाव घेत असे. (पृ. २७७) *अशा रीतीने वरील तीनही विधानें खोटी आहेत हे माहीत असूनही एंजलनी ती बुद्धिपुरःसर केली आहेत* हे स्पष्ट आहे. वास्तविक इमद (पूर्वजन्मातील इब्राहिम) अविवाहित होता व जमीला ही त्याची 'बाई' (Mistress) होती. इमदच्या पालकांनी ती त्याची बायको असावी असा तर्क केला होता. तसेच मी

महमूद होतो असेही इमदने कधीच म्हटले नव्हते. पालकांचा तसा 'समज' झाला होतो. आणि स्वत: पालकांनी असे आपण समजलो असे मान्य केल्याचे स्टिव्हन्सन यांनी स्पष्ट म्हटले आहे. (पृ.३१५) तेव्हा एंजल यांची पुढील विधाने कशी निखालस खोटी व बुद्धिपुर:सर दिशाभूल करण्यासाठी केली आहेत हे वाचकांना कळून येईल. "इमदने सांगितल्यानुसार महमूद बौहामजी नावाचा इसम किंवा त्याची जमीला नावाची बायको नसतानाही आठवणींच्या कोष्टकात सान्या गोष्टी ठासून भरल्या आहेत. आणि तो 'निर्विवाद पुरावा असे सुरूवातीस म्हटले आहे." ही विधाने एंजलने कशी ठोकून दिली आहेत हे आता वाचकांच्या लक्षात येईल.

**मुद्दा क्र. २ :** "महमूद असे नाव इमदने घेतले. स्टिव्हन्सन स्वत:च असे लिहितात की महमूद बौहामजी हे इब्राहिमचे काका होते. पण हे ते केव्हा म्हणतात? तर जेव्हा ख्रिबी या गावी चौकशी केल्यावर तसे आढळते तेव्हा !"

**उत्तर :** महमूद हे नाव इमदने घेतले. पण मी महमूद होतो असे तो कधीच म्हणाला नाही. ही वस्तुस्थिती एंजल वाचकांपासून का लपवून ठेवतात? आणि *महमूद बौहामजी हा त्याचा (पूर्वजन्मातील) काका होता की कोण होता हे इमदने सांगितलेले नसल्यामुळे* तो त्याचा पुर्वजन्मातील काका असल्याचे प्रत्यक्ष ख्रिबीला गेल्यावरच स्टिव्हन्सन यांना कळाले व तसे लिहिले यात स्टिव्हन्सन यांनी काय चूक केली ?

**टीका :** "पण इमदचे पालक म्हणत होते की पूर्वजन्मी इमद हा महमूदच होता, असे त्याच्या बोलण्यावरून समजले."

**उत्तर :** 'समजले' म्हणजे तसा त्यांचा 'समज' झाला. कारण इमदने मीच महमूद होतो असे कधीच म्हटले नव्हते, हे स्वत: पालकांनीच स्टिव्हन्सनजवळ नंतर मान्य केले आहे. (पृ. ३१५)

**टीका :** " इमदच्या म्हणण्याप्रमाणे महमूद हा अपघाताने मेला. ट्रक त्याच्या पाय आणि छातीवरून गेला, पण ख्रिबीला गेल्यावर तसे कांही घडले नव्हते हे लक्षात आल्यावर स्टिव्हन्सनने त्याचा अर्थ वेगळाच काढून लिहिला."

**उत्तर :** इमदने ट्रकचा अपघात स्वत:ला किंवा महमूदला झाला असे कधीच म्हटले नव्हते. तो फक्त ट्रक अपघात झाल्याचे सांगत असे. आणि ते खरे होते. सय्यद बौहामजी या इसमाला प्रत्यक्षात ट्रक अपघात झाला होता. आणि इब्राहिमला (पूर्वजन्मातील इमदच्या व्यक्तिमत्वाला) हे माहीत होते. तो अपघात इमदलाच झाला असावा असा पालकांचा 'समज' झाला (पृ. २७७) *इमदने न केलेल्या विधानाचा पालकांच्या गैरसमजाचा फायदा घेऊन येथे स्वत: एंजल वेगळा अर्थ काढीत आहेत. स्टिव्हन्सन नव्हे.*

**मुद्दा क्र. ३ :** "इमद म्हणतो, त्याचे नाव बौहामजी होते व तो ख्रिबी या गावी

रहात असे. पण या गोष्टीची स्टिव्हन्सन यांनी शहानिशा कधी व कशी केली? गावातील लोकांना भेटून, पूर्वीच्या 'महमूद' च्या मित्रांना भेटून की इमद यांच्या पैकी सान्यांना भेटल्यानंतर ? तो म्हणतो म्हणून त्या गावचा असेल 'संशोधन' कुचकामी असते. बौहामजी या आडनावाबद्दलही असेच म्हणता येईल''.

**उत्तर :** एखादा मुलगा आपण पूर्वजन्मात कोण होतो, कोणत्या गावात होतो हे तो *सांगण्यापूर्वी* कसे कळेल? हे एंजल सांगू शकतील काय? 'असले' ('कुचकामी नसलेले') संशोधन कसे करावे हे त्यांनी का सांगितले नाही? याचे उत्तर उघड आहे.

**मुद्दा क्र. ४ :** ''इमदच्या पूर्वायुष्यातील घरात २ विहिरी होत्या. एक भरलेली व एक कोरडी. याचा अर्थ स्टिव्हन्सन यांनी स्वत:च्या पद्धतीने काढून हास्यास्पद अर्थ दिला आहे. ते लिहितात, 'त्या घरात २ हंडे होते.' म्हणजे ५ वर्षाच्या मुलाला विहीर व भांडे यातील फरक कळत नाही?''

**उत्तर :** येथे एजंलनी स्टिव्हन्सन यांच्या मूळ वाक्याचा विपर्यास केला आहे. स्टिव्हन्सन यांचे प्रत्यक्ष वाक्य असे आहे. ''द्राक्षारस साठविण्यासाठी जमिनीत ३ काँक्रीटचे खळगे (Concavities) किंवा हौद (Vats) होते.'' (पृ. २९३) जमिनीत असलेल्या काँक्रिटच्या खड्ड्यांना किंवा खळग्यांना 'हंडे' किंवा 'भांडे' म्हणतात काय? हंडे किंवा भांडे काँक्रिटचे असतात काय? (संपादक पाटील यांना मराठीतील हंडा व भांडे यातील फरकसुद्धा कळत नाही ही गोष्ट दोन्ही शब्द ते एकाच दमात वापरतात यावरून स्पष्ट आहे !) जमिनीतील खळग्यांना ते पावसाळ्यात पाण्याने भरत असल्यामुळे दीड-दोन वर्षांच्या मुलाने 'विहीर' म्हटले तर काय बिघडले ? (५ वर्षाच्या नव्हे.)

**मुद्दा क्र. ५ :** ''इब्राहिम बौंहामजीच्या भावाची- हफीजची भेट स्टिव्हन्सन यांनी घेतली आणि हफीजने जे जे सांगितले ते सर्व इमदच्या म्हणण्याशी विसंगती दाखवणारे निघाले. उदा. इमद म्हणे मी अपघातात मेलो. पण हफीजने सांगितले इब्राहिम हा मणक्याच्या टी. बी. ने मेला. असे २८ मुद्दे विसंगतीचे आढळले आहेत. आता बोला !''

**उत्तर :** इमदने ट्रकच्या अपघातात मेलो असे कधीच म्हटलेले नाही. तो पालकांचा चुकीचा समज होता, हे वर सांगितलेच आहे. *अशा रीतीने एंजल विसंगतीचे उदाहरण म्हणून जो मुद्दा मांडतात तोच बुद्धिपुरसर धादांत खोटा मुद्दा मांडतात. तेव्हा इतर ( न सांगितलले) २८ मुद्दे खोटे आहेत हे वेगळे सांगण्याची जरूर नाही.* संपादक पाटील म्हणतात. ''आता बोला !'' आम्ही म्हणतो, '' हे २८ मुद्दे बोला !'' त्यांनाही उत्तर देऊ . पण ते बोलणार नाहीत. कारण ते अस्तित्वातच नाहीत !)

**मुद्दा क्र. ६ :** ''बौहामजी हे नाव इमदने पूर्वी ऐकले होते काय? एजंल यांनी स्वतंत्र छाननी केली तेव्हा त्याचे उत्तर मिळाले (होय !)''

**उत्तर :** 'स्वतंत्र छाननी' हा धूर्त व कावेबाज शब्दप्रयोग आहे. याचा अर्थ

'खोटा आरोप' असा आहे. इमदचे वडील एकदा ख्रिबीला गेले होते.(बौहामाजीच्या अंत्यसंस्कारासाठी) पण ते ख्रिबीला केव्हा गेले होते? तर १९६३ साली ! पण इमद त्याच्या ३ वर्षापूर्वीपासून म्हणजे १९६० सालापासून 'बौहामाजी' हे नाव घेत होता ! *त्यावेळी त्यांच्या पालकांना बौहामजी हे नाव माहीतही नव्हते.* आणि स्टिव्हन्सनना हे स्वत: पालकांनीच सांगितले आहे. (इस्लाम धर्मात अनोळखी लोकांच्या सुद्धा अंत्यसंस्काराला आमंत्रणावरून जाण्याची प्रथा आहे.)

**टीका :** ''नावातील सुरुवातीची नावे 'महमूद' 'अमीन' 'सैद' इत्यादी सर्वसामान्य (Common) नावे आहेत काय? होय.''

**उत्तर :** हीच कांही सर्वसामान्य नावे नाहीत. इतरही अनेक सर्वसामान्य नावे आहेत. ती नावे इमदने का घेतली नाहीत, हीच का घेतली, याचे एंजलजवळ काय उत्तर आहे ?

**टीका :** ''गावातून विहिरी असणे सर्वसामान्य आहे काय? (होय)''

**उत्तर :** इमद सांगत होता घरातील विशिष्ट विहिरीबद्दल. गावातील नेहमीच्या विहीरीबद्दल नव्हे.(एंजल वाचकांची कशी जाताजाता दिशाभूल करतात पाहा!)

**टीका :** '' गॅरेज, बागा खेड्यात असणे सर्वसामान्य आहे काय? (होय)''

**उत्तर :** कुठल्याही खेड्यात गॅरेज, बागा असणे सर्वसामान्य नाही. बौहामजी हे श्रीमंत कुटुंब होते. ट्रक, कार, बस, बाळगत होते. म्हणून या गोष्टी त्यांच्याकडे होत्या.

**टीका :** ''अशा गोष्टी वरून जे सर्वसामान्य पणे सर्वत्र आढळणारे मुद्दे आहेत, त्या आधारे निष्कर्षाची मांडणी करून दावे करणे कितपत योग्य आहे?''

**उत्तर :** हे सर्वसामान्य मुद्दे नाहीत, हे वरील विवेचनावरून स्पष्ट आहे. तेव्हा त्यावरून निष्कर्ष काढलेले नसून इमदने सांगितलेल्या ५७ आठवणी व १६ ओळखी अशा ७३ विधानावरून ख्रिबी या गावी जाऊन त्यांची शहानिशा केल्यानंतर प्रत्यक्ष जे आढळले त्यावरून स्टिव्हन्सनने इमदच्या पुनर्जन्माचा निष्कर्ष काढला आहे. ५७ आठवणीपैकी ५१ आठवणी बरोबर आढळून आल्या. (चुकलेल्या ६ आठवणीपैकी ३ आठवणी का चुकल्या याची स्टिव्हन्सनने समर्पक उपपत्ती दिली आहे. याशिवाय मोठी सुशिक्षित माणसेसुद्धा विसरतात, चुकीचे आठवतात, हे सर्वसामान्य आहे.) पूर्वजन्मातील ५१ आठवणी इमदने बरोबर कशा सांगितल्या याची एंजलजवळ उपपत्ती आहे काय? ख्रिबी गावच्या दोन माणसांना इमदने आपल्याच गावातील रस्त्यात बरोबर ओळखले. (त्यापैकी एक त्याचा पूर्वजन्मातील मित्र होता.) हे कसे? पूर्व जन्मातील अशा १६ गोष्टी इमदने बरोबर ओळखल्या आहेत त्या कशा याचे उत्तर एंजल देऊ शकतात काय? (या सर्व गोष्टींचा उल्लेख एंजल पद्धतशीरपणे टाळतात!) इब्राहिमने (इमदच्या पूर्वजन्मातील

व्यक्तीमत्वाने) मरण्यापूर्वी काय म्हटले (त्याचे मृत्यूशय्येवरील शेवटचे शब्द काय होते) हे इमदने सांगितले, ते कसे? इब्राहिम शिकार करीत होता, त्याच्याजवळ एक बंदूक व एक रायफल होती. हे सर्व इमदने बरोबर सांगितले, हे कसे? रायफल जवळ बाळगणे हा लेबनॉनमध्ये गुन्हा होता. म्हणून तो ती एका गुप्त ठिकाणी लपवून ठेवत असे. ती जागा इब्राहीम व त्याची आई याखेरीज इतर कोणालाही माहीत नव्हती. इमदने ती दुसऱ्या मजल्यावर जाऊन बरोबर दाखवली. हे कसे ? अशा १६ ओळखी आहेत ! आणि ५१ आठवणी आहेत ! त्या सर्वांची माहिती येथे देणे शक्य नाही. ते मुळातूनच वाचले पाहिजे. यांची उपपत्ती फक्त पुनर्जन्म सिद्धांतानेच लावणे शक्य आहे. एंजलजवळ याची दुसरी कोणती उपपत्ती आहे की जिच्या आधारे स्टिव्हन्सन यांची पुनर्जन्माची उपपत्ती खोटी म्हणता येईल? यात खरोखर कुणाचे भांडे फुटते हे कळण्यासाठी वाचकांनी मूळ प्रकरणच वाचावे; नव्हे स्टिव्हन्सन यांचा २० प्रकरणाचा मूळ ग्रंथच वाचावा. संपादक पाटील म्हणतात, ''इमद एलवार याची ही हालत. तर मग इतर १९ प्रकरणांबाबत बोलावयासच नको.'' (खरे आहे. बोलले तर १९ वेळा भांडे फुटते ! किंवा हंडा फुटतो म्हणा हवे तर!)

## टीप

स्टिव्हन्सन यांचे पुनर्जन्म संशोधनावरील ग्रंथ फार मोठे आणि सहज उपलब्ध होण्यासारखे नाहीत. उपलब्ध झाले तरी ते वाचण्याची तसदी सहसा कोणी घेत नाहीत. हे माहीत असल्यामुळेच बुद्धिवादी लोक या प्रकरणांविषयी व सिद्धांता विषयी धडधडीत खोटे लिहिण्याचे धाडस करीत असतात. म्हणूनच हे ग्रंथ मुळातच वाचण्याची वाचकांना वर शिफारस केली आहे. त्यामुळे हे लोक खोटे लिहिण्यामध्ये किती निर्ढावलेले आहेत याची त्यांना कल्पना येईल.

## संदर्भ टिपा :

१. अशी प्रकरणे वृत्तपत्रातून वरचेवर प्रसिध्द होत असतात. अगदी अलीकडे 'कोलंबिया शटल' यानाच्या स्फोटात मरण पावलेली कल्पना चावला हिचा भारतात पुनर्जन्म झाल्याचे वृत्तपत्रातून प्रसिध्द झाले आहे. [**संयुक्त कर्नाटक**-कन्नड दैनिक - ११ जुलै २००७]

२. एका १४ वर्षे वयाच्या मुलग्यात एका अमेरिकन शास्त्रज्ञाचा आत्मा प्रवेश करून फाडफाड इंग्रजीतून अमेरिकन उच्चारासह कसा बोलतो हे 'इंडिया टी. व्ही.' चॅनेलवर प्रेक्षकांना नुकतेच पाहावयास मिळाले.

३. **विज्ञान आणि अंधश्रध्दानिर्मूलन**- प्राचार्य अद्वयानंद गळतगे, प्रकरण २ व ३.



६

# खरे विज्ञान आणि खोटे विज्ञान

## बुद्धिवादाच्या विज्ञानाच्या दृष्टिकोणातून परामर्श

हा मथळा वाचून कोणालाही खोटे विज्ञान कसे असू शकेल, असा प्रश्न पडेल. जे सत्याच्या कसोटीला उतरते, ते विज्ञान होय. हे जर खरे असेल, तर खोटे विज्ञान असणेच शक्य नाही, असे म्हणता येते. पण विज्ञानाच्या नावाखाली असत्य प्रचार करण्याचा काहीजण प्रयत्न करतात, असा आरोप असून अशा प्रयत्नाला मिथ्याविज्ञान (Pseudo-Science) म्हणता येते, असे कांही लोकांचे प्रतिपादन आहे.

या बाबतीत अनेक प्रश्न निर्माण होतात. उदा. हा विज्ञानाच्या नावाखाली असत्य प्रचार करण्याचा प्रयत्न कोण करतात? ते तो का करतात? असा प्रयत्न ते करतात असा त्यांच्यावर कोण आरोप करतात? ते का करतात? या आरोपात कांही तथ्यांश आहे काय?मिथ्याविज्ञान नेमके कशाला म्हणावे ? असे विज्ञान खरोखरच अस्तित्वात आहे काय ? ते कसे निर्माण होते? त्याचा प्रचार व प्रसार कसा होतो व का होतो? त्याला पायबंद घालता येतो काय? येत असेल तर तो का घालण्यात येत नाही? इत्यादी इत्यादी.

मिथ्याविज्ञान कशाला म्हणावे हा सर्वात महत्त्वाचा प्रश्न आहे. पण त्या प्रश्नाचे उत्तर मिथ्याविज्ञानाचा कोण कोणावर आरोप करतात, याचा विचार केला तर आपोआप मिळते! पण हा विचार करण्यासाठी विज्ञानाचा खरा अर्थ निश्चित करण्याची गरज आहे. ***कारण हा आरोप खुद्द वैज्ञानिकच इतर कांही वैज्ञानिकांवर करतात असे आढळून येते!*** त्यामुळे विज्ञानातील 'मिथ्यात्व' ओळखणे, हे काळे व गोरे यातील एखाद्याची निवड करण्याइतके सोपे नाही हे स्पष्ट होते. पण मग विज्ञानाच्या खऱ्या अर्थाविषयी तरी शास्त्रज्ञांमध्ये एकमत आहे काय? ते असेल तरच याविषयी कांही चर्चा करणे शक्य आहे, नाहीतर नाही हे उघड आहे.

वरवर विज्ञानाच्या खऱ्या अर्थाविषयी शास्त्रज्ञानांमध्ये एकमत असल्याचे दिसून येते. पण ते वरवरच! खोलवर जाऊन विचार केला, तर असे आढळून येते की, ***विज्ञानाच्या नावाखाली कांही शास्त्रज्ञ जो (खोटेपणाचा) इतर शास्त्रज्ञांवर आरोप***

*करतात, तो मुळात तात्त्विक मतभिन्नतेतून निर्माण झाला आहे. विज्ञानाच्या खऱ्या अर्थाचा त्याच्याशी कांही संबंध नाही.* हे एका उदाहरणाने स्पष्ट करता येते.

## विज्ञानापासून समाजाचे कसे संरक्षण करायचे?

पॉल फेयराबेंड या कॅलिफोर्निया युनिव्हर्सिटीच्या तत्वज्ञानाच्या प्राध्यापकाने How to defend society against science ? (विज्ञानापासून समाजाचे कसे संरक्षण करायचे ?) या मथळ्याचा एक लेख लिहिला आहे.[१] हा मथळा वाचून कोणालाही विज्ञानापासून समाजाचे संरक्षण करण्याची एखाद्याला खरोखरच गरज वाटावी, हे पाहून आश्चर्य वाटल्यावाचून राहणार नाही. पण या प्राध्यापकाने अशी गरज वाचकांना साधार व समर्थपणे पटवून दिली आहे. लेखकाचे असे प्रतिपादन आहे की, एके काळी जुन्या अंधश्रद्धांतून विज्ञानाने समाजाला मुक्त केले असले, तरी हल्ली समाजातील त्या जुन्या अंधश्रद्धांची जागा विज्ञानाने घेतली असून ती समाजाची नवी अंधश्रद्धा बनली आहे. आणि जुन्या अंधश्रद्धाप्रमाणेच समाजावर हल्ली त्याची जुलूम-जबरदस्ती सुरू झाली आहे. विज्ञान हा समाजाचा नवा हुकूमशहा बनला असून हा हुकूमशहा कसल्याही टीकेच्या पलीकडचा आहे, असा विचार विचारवंतात रूढ झाला आहे. उदा. क्रोपोटकिन, इब्सेन, लेव्ही-स्ट्रॉस, मार्क्स, एंगल्स इत्यादी विचारवंतांनी सर्व तऱ्हेच्या विचारप्रणालीवर जोरदार टीका केली आहे. पण विज्ञानावर टीका करण्याचे मात्र त्यांनी कटाक्षाने टाळले आहे. याचा अर्थ असा होतो की, मुक्तपणे विचार करणाऱ्या, सर्व बंधने झुगारून देणाऱ्या, वरील विचारवंतांना विज्ञानाचे बंधन झुगारण्याची इच्छा नाही. विज्ञानाच्या दावणीला स्वत:ला बांधून घ्यायला ते स्वखुषीने तयार आहेत. विज्ञानाने निर्माण केलेली ही वैचारिक गुलामगिरी आहे, असे फेयराबेंडचे मत असून ही वैज्ञानिक 'सत्या' ची विचारवंतावरची हुकूमशाही हाणून पाडली पाहिजे, असे तो म्हणतो. हुकूमशाही -मग ती 'सत्या' ची असेना का -वाईट असल्याने ती हाणून पाडण्यासाठी 'असत्या' ची मदत होत असेल, तर तीही घ्यावयास हरकत नाही, असे त्याचे म्हणणे आहे. हे विधान सकृतदर्शनी विलक्षण वाटले, तरी त्याचे त्याने केलेले समर्थन तर्कशुद्ध आहे. त्याचे म्हणणे असे आहे की, मानवी प्रगतीसाठी अनेक विचारांची गरज आहे. प्रगतीला हातभार लावणाऱ्या या अनेक विचारांपैकी सत्य हा एक विचार आहे. पण सत्याची -म्हणजे एका विचाराची- हुकूमशाही सुरू झाली तर इतर विचारांची गळचेपी होते व त्यामुळे विचारस्वातंत्र्यच संपुष्टात येते. विचारस्वातंत्र्य नष्ट झाले की प्रगतीलाच खीळ बसते. एकाद्या विचारासाठी विचारस्वातंत्र्यच नष्ट करावे व प्रगती खुंटवावी असे कोणी म्हणणार नाही. सत्य हा एक विचार आहे, हेच तुम्हाला मान्य नसेल तर गोष्ट वेगळी. पण हे जर एकदा तुम्ही मान्य

केले, तर फेयराबेंडचे म्हणणे चुकीचे आहे, हे सिद्ध करणे कठीण आहे.

आपले म्हणणे वाचकांच्या गळी उतरविण्यासाठी फेयराबेंडने एक ऐतिहासिक उदाहरण दिले आहे. (येथे त्यामध्ये मांडणीच्या दृष्टीने थोडा फरक करून व थोडी अधिक भर घालून ते देत आहे.) टोलेमी आण अरिस्टॉटल हे दोघे पाश्चात्य जगात सर्वात मोठे व प्रसिद्ध शास्त्रज्ञ व विचारवंत होऊन गेले. शास्त्रीय खगोलशास्त्राचा पाया या दोघांच्या विचारावर घातला गेला आहे. त्यांचे शास्त्रीय सिद्धांत सत्य म्हणून जवळजवळ दोन हजार वर्षे पाश्चात्य जगावर सत्ता गाजवत होते. त्यांना आव्हान देण्याचे धाडस स्वप्नातही कोणाला झाले नाही. पण केपलर व कोपर्निकस यांनी त्यांच्या विचारांना आव्हान दिले, व नवे खगोलशास्त्र प्रस्थापित केले. पण खरोखर हे खलोगशास्त्र नवे होते काय? मुळीच नाही. ते जुनेच खलोगशास्त्र होते. आणि तेही 'असत्य' होते. ज्यांना बुरसटलेले, गूढ विचार करणारे वेडे म्हणून हिणविण्यात आले होते व ज्यांचे विचार कालबाह्य ठरविण्यात आले होते त्या पायथॅगोरस व त्याचा शिष्य फिलोलाओस यांच्या विचारातून या दोघांनी आपले विचार घेतले होते! अशा रीतीने प्रस्थापित खगोलशास्त्रात उलटापालट झाली ती जुन्या, कालबाह्य व वेडसर विचारांच्या पुनरुज्जीवनामुळे होय. हे जुने, अशास्त्रीय ठरलेले व विज्ञानातून हद्दपार झालेले विचार नव्याने शास्त्रीय विचार म्हणून पुढे आले व मान्यता पावले, ते कशामुळे? 'सत्या' ची हुकूमशाही हाणून पाडण्याच्या -एकाच विचाराची मक्तेदारी नष्ट करण्याच्या- प्रवृत्तीमुळे होय आणि हे विचार ज्यावेळी त्यांनी मांडले त्यावेळी ते प्रस्थापित सत्य म्हणून मांडले नव्हते, तर केवळ त्या कल्पना म्हणूनच मांडण्यात आल्या होत्या. म्हणजे प्रस्थापितांच्या दृष्टीने ती 'असत्ये'च होती, वेड्या कल्पनाच होत्या. सत्याची हुकूमशाही नष्ट करण्यासाठी वेड्या कल्पनांची, 'असत्या' ची आवश्यकता असते ती अशी! प्रगतीसाठी वैचारिक स्वातंत्र्याची का गरज असते हे यावरून स्पष्ट होते. दोन हजार वर्षे सत्ता गाजवणाऱ्या विज्ञानाची ही कथा. मग अवघ्या दोन - तीनशे वर्षांचा इतिहास असलेल्या आधुनिक विज्ञानाची काय मातब्बरी ? म्हणून आधुनिक विज्ञानाने सत्य सापडल्याच्या गमजा करू नयेत, वैचारिक हूकूमशाही चालवू नये, असे फेयराबेंड सुचवितो.

यावरून फेयराबेंडला खरे म्हणजे विज्ञानापासून समाजाचे संरक्षण करावयाचे नसून विज्ञानाच्या नावाखाली चालणाऱ्या वैचारिक हुकूमशाहीपासून समाजाचे संरक्षण करावयाचे आहे, हे स्पष्ट होते. मग 'विज्ञानापासून समाजाचे कसे संरक्षण करायचे?' असा मथळा आपल्या लेखाला त्याने का दिला आहे? असा मथळा देण्याचे कारण असे की वैचारिक हुकूमशाही हा विज्ञानाचा अंगभूत गुण आहे असे तो समजतो.असे तो का समजतो? कारण विज्ञान ही एक विचारप्रणाली आहे असे तो समजतो. कोणतीही

विचारप्रणाली ही ताठर, असहिष्णू व न बदलणारी असल्याने तिच्यात हुकूमशाहीची प्रवृत्ती अंगभूत असते, व विज्ञान ही एक विचारप्रणाली असेल, तर तिच्यातही ती असली पाहिजे हे मान्य केले पाहिजे. पण विज्ञान ही विचारप्रणाली आहे काय?

## विज्ञान हा आधुनिक युगाचा धर्म

फेयराबेंड विज्ञान ही एक विचारप्रणारी आहे असे म्हणतो.[२] हे आपले म्हणणे विज्ञानाची तुलना प्रस्थापित धर्माशी करून पटवून देण्याचा त्याने प्रयत्न केला आहे. युरोपातील प्रस्थापित धर्म म्हणजे ख्रिश्चन धर्म होय. या प्रस्थापित ख्रिश्चन धर्माविरूद्ध काहीही बोलणे हे पाखंड समजले जात असे, व तसे बोलणाऱ्यांचा अनन्वित छळ करण्यात येत असे. धर्माची गूढ रहस्ये फक्त पुरोहित वर्गच जाणतो अशी समजूत होती, व त्यांचा शब्द प्रमाण मानला जावा असा दंडक होता. त्यांना समाजात व राजदरबारी आदर व मान दिला जात असे. हल्ली विज्ञानाची नेमकी हीच स्थिती आहे. क्रोपोटकिनसारखे मुक्तपणे विचार करणारे विचारवंतसुद्धा विज्ञानाविरुद्ध बोलत नाहीत, हे वर सांगितलेच आहे. विज्ञानाविरुद्ध बोलणे, हे हल्ली पाखंड व अंधश्रद्धेचे लक्षण समजले जाते. फेयराबेंड म्हणतो की, असे बोलणाऱ्यांचा पूर्वीप्रमाणे शरीरिक छळ होत नसला तरी वैज्ञानिक पाखंड्यांना हल्लीही वैज्ञानिक व वैचारिक क्षेत्रातून बहिष्कृत ठरवून त्यांचा मानसिक छळ करण्यात येतो.[३] विज्ञानाचा एक नवा पुरोहित वर्ग तयार झाला असून वैज्ञानिक रहस्ये तोच जाणतो, असा समज निर्माण करण्यात आला आहे. वैज्ञानिकांचा शब्दच हल्ली प्रमाण मानला जातो व त्यांना समाजात व शासनाच्या दरबारात आदर दिला जातो. याच कारणासाठी पूर्वी धर्माची जशी राज्यशासनापासून फारकत केली पाहिजे असा आग्रह धरला जात असे, तसे फेयराबेंडने विज्ञानाची राज्यशासनापासून फारकत केली पाहिजे, असा आग्रह धरला आहे. थोडक्यात, विज्ञान हा आधुनिक समाजाचा प्रस्थापित धर्म बनला असून त्या प्रस्थापित धर्माविरूद्ध बोलणे, हे पाखंडच नव्हे तर पाप ठरले आहे.

फेयराबेंडचे हे विज्ञानविषयीचे म्हणणे बहुतांशी खरे आहे हे मान्य केले पाहिजे. 'बहुतांशी खरे' असे म्हणण्याचे कारण खुद्द वैज्ञानिकांनीच विज्ञानाविषयीची ही सामाजिक प्रतिमा निर्माण करण्यास हातभार लावला आहे. पण विज्ञानाविषयीच्या ज्या कल्पनेतून ही विज्ञानाविषयी कल्पना तयार झाली आहे ती– विज्ञान ही एक विचारप्रणाली आहे ही– कल्पना मुळातच चुकीची आहे . विज्ञान ही एक विचारप्रणाली किंवा मतप्रणाली नाही. विज्ञान हा एक अखंड शोध आहे. विचारप्रणाली ही बंदिस्त व मर्यादित असते. विज्ञान हे मुक्त व अमर्याद आहे. विचारप्रणाली अमुक एखादी गोष्टच सत्य आहे असे प्रतिपादते. विज्ञान तसे प्रतिपादन कधीच करत नाही. विज्ञानाचा सत्याचा शोध सतत चालू असतो.

तो कधीच संपत नाही. ज्या दिवशी तो संपतो, त्या दिवशी विज्ञान ही एक विचारप्रणाली बनते. विचारप्रणाली न बदलणारी असते, विज्ञान सतत बदलत असते. म्हणून विज्ञान हे कधीच प्रस्थापित सत्य (Orthodoxy) बनू शकत नाही. ज्याचा जन्मच प्रस्थापित सत्य हाणून पाडण्यासाठी झाला आहे, ते स्वत:च प्रस्थापित सत्य कसे बनेल? ज्या दिवशी विज्ञान प्रस्थापित सत्य बनेल, त्या दिवशी त्याची मृत्यूघंटा वाजेल. विज्ञान हे नेहमीच पाखंडी असते.

मग विज्ञान ही एक विचारप्रणाली आहे, अशी विज्ञानाविषयी चुकीची कल्पना कशी निर्माण झाली ? हा एक ऐतिहासिक अपघात आहे. युरोपातील प्रस्थापित धर्माविरुद्ध-धार्मिक 'सत्या' विरुद्ध व सत्तेविरुद्ध -विज्ञानाने लढा दिला. या ऐतिहासिक लढ्यात धर्माची पिछेहाट झाली व विज्ञानाची सरशी झाली. त्यामुळे धर्म ही विज्ञानाविरोधी आणि अंधश्रद्धा पोसणारी शक्ती आहे व विज्ञान ही धर्म व अंधश्रद्धा या दोन्ही विरुद्ध लढणारी शक्ती आहे, अशी समजूत निर्माण झाली.[४] अशा रीतीने धर्म व अंधश्रद्धा यांचे एकीकडे समीकरण तयार झाले तर दुसरीकडे विज्ञान व बुद्धिवाद यांचे त्याला विरोधी समीकरण तयार झाले. त्यामुळे विज्ञान व धर्म यांच्यात इतिहासप्रसिद्ध भांडण जुंपले आणि या दोहोंमध्ये भांडण असण्याचे वा त्यांचा परस्पराशी विरोध असण्याचे कारण नाही, हे पटवून देण्यासाठी बऱ्याच पाश्चात्य विचारवंतांचा वेळ व शक्ती नंतरच्या काळात खर्ची पडली. याचा परिणाम म्हणून विज्ञान व धर्म या दोन्ही विचारप्रणालीच आहेत, अशी चुकीची कल्पना प्रसृत झाली, आणि तीच विज्ञानवृत्तीला मारक ठरली आहे. कारण त्यामुळे विज्ञान व बुद्धिवादाचे समीकरण एका ऐतिहासिक कारणांमुळे निर्माण झाले आहे, ते अपघाती आहे. - याचाच बहुतेकांना विसर पडला.

विज्ञान ही धर्मविरोधी व बुद्धिवादाशी सुसंगत विचारप्रणाली आहे, या चुकीच्या कल्पनेमुळे जो परिणाम झाला, तो म्हणजे वर उल्लेख केल्याप्रमाणे *विज्ञानाचे नव्या प्रस्थापित धर्मात रूपांतर झाले!* विज्ञानाच्या नावाखाली नव्या अंधश्रद्धा निर्माण झाल्या. या अंधश्रध्दांचा पाठपुरावा करणारा नवा पुरोहित वर्ग निर्माण झाला. *या नव्या विज्ञानाच्या नावाखालच्या प्रस्थापित धर्माविरूद्ध बोलणे पाखंड ठरले. मग ते बोलणे विज्ञानाच्या तत्त्वांना धरून का असेना.*

हे नवे पाखंडच खोटे विज्ञान (Pseudoscience) म्हणून हल्ली ओळखण्यात येते! व त्याविरुद्ध तथाकथित प्रस्थापित (वैज्ञानिक) सत्याचा पाठपुरावा करणारा पुरोहितवर्ग (याला Establishment म्हणतात. ) लढायला सिद्ध झाला आहे.

विज्ञानाच्या खऱ्या अर्थाबद्दल शास्त्रज्ञामध्ये जे मतैक्य आहे , ते वरवरचे आहे आणि वैज्ञानिकांचा एक वर्ग दुसऱ्या वर्गावर जो खोट्या विज्ञानाचा आरोप करतो, तो तात्त्विक मतभिन्नतेमुळे होय, खऱ्या वैज्ञानिक दृष्टिकोणाचा त्याच्याशी कांही संबंध नाही,

असे मी प्रारंभी का म्हटले आहे, हे आता वाचकांच्या लक्षात येईल.

थोडक्यात, खऱ्या व खोट्या विज्ञानामधील हा लढा म्हणजे नव्या रंगभूमीवरील जुनेच नाटक असून यातील पात्रेही जुनीच आहेत. फक्त ती नव्या वेषांत रंगमंचावर आली आहेत इतकेच!

हे नवे वेष कोणते?

प्रस्थापित धर्माची जागा विज्ञानाच्या नावाखाली बुद्धिवाद (Rationalism) नावाच्या नव्या विचारप्रणालीने घेतली आहे, आणि या विचारप्रणालीला आव्हान देणाऱ्या नव्या पाखंडाला परामानसशास्त्र असे नाव प्राप्त झाले आहे. दुसऱ्या शब्दात बुद्धिवादाचा पाठपुरावा करणारे विज्ञान हेच खरे विज्ञान अशी भूमिका घेण्यात आली असून परामानसशास्त्र हे बुद्धिवादाशी विसंगत असल्याने खोटे शास्त्र आहे, असा दावा ही भूमिका घेणाऱ्यांकडून करण्यात आला आहे.

येथे परामानसशास्त्र खोटे विज्ञान आहे, या दाव्यात कितपत तथ्य आहे, याचा विचार करावयाचा नाही. त्याचा स्वतंत्रपणे विचार केला आहे,[५] हा दावा टिकण्यासारखा नाही, हे कोणाही सुबुद्ध व नि:पक्ष निरीक्षकाला मान्य करावे लागेल, हे तेथे दाखवून दिले आहे. येथे परामानसशास्त्राविरुद्ध ज्या एका तथाकथित वैज्ञानिक भूमिकेतून आक्षेप घेण्यात येतो, त्या वैज्ञानिक भूमिकेचा -जिचा त्या प्रकरणात विस्ताराने विचार करता आलेला नाही-थोड्या विस्ताराने परामर्श घ्यावयाचा आहे.

## विज्ञान व बुद्धिवाद यांची वांझोटी सोयरीक

परामानसशास्त्र हे शास्त्र नाही, (किंवा खोटे शास्त्र आहे) हा आक्षेप केवळ वैज्ञानिक दृष्टिकोणातूनच घेणे शक्य आहे  हे उघड आहे. कारण परामानसशास्त्र हे शास्त्र आहे की नाही, हे शास्त्रीय कसोटीवरच ठरवता येणे शक्य आहे. मग बुद्धिवादाचा पाठपुरावा करणारे विज्ञान हेच खरे विज्ञान व परामानसशास्त्र हे बुद्धिवादाशी विसंगत असल्याने ते खोटे शास्त्र होय,अशी भूमिका बुद्धिवाद्यांकडून कशी घेण्यात येते?ही भूमिका बुद्धिवाद ही एक विचारप्रणाली असेल व विज्ञान ही विचारप्रणाली नसेल तर घेता येणार नाही हे उघड आहे. कारण विज्ञान कोणत्याही मतप्रणालीचा पाठपुरावा करत नाही. अर्थात विज्ञानाचे निष्कर्ष एखाद्या विचारप्रणालीचा पाठपुरावा करणे, एखाद्या विचार प्रणालीला ते अनुकूल ठरणे, शक्य आहे. पण या अर्थाने विज्ञान बुद्धिवादाचा पाठपुरावा करते, असे बुद्धिवाद्यांचे म्हणणे नाही. वैज्ञानिक निष्कर्षांच्या दृष्टीने नव्हे, तर वैज्ञानिक पद्धतीच्याआणि उद्दिष्टाच्या दृष्टीने विज्ञान बुध्दिवादी आहे, असे या लोकांचे म्हणणे आहे. हे म्हणणे कितपत बरोबर आहे?

बुद्धिवाद्यांचे म्हणणे असे की, तर्कशास्त्र व गणित ही विज्ञानाची साधने असून त्यांच्या सहाय्याने विश्व समजून घेण्याचा विज्ञानाने आजपर्यंत प्रयत्न केला आहे व करत आहे. या साधनांनी भौतिक विश्व समजण्यास व त्यावर नियंत्रण ठेवण्यास बरीच मदत झालेली असल्याने (विश्व समजून घेण्याच्या व नियंत्रणाखाली आणण्याच्या या प्रयत्नालाच वैज्ञानिक प्रगती म्हटली जाते.) या साधनांना एक प्रकारचे वैज्ञानिक पावित्र्य व असामान्य महत्व प्राप्त झाले आहे, हे खरे आहे. पण ही साधने भौतिक विश्व समजण्यास खरोखर सहाय्यभूत ठरली आहेत किंवा ठरतात, हे खरे आहे काय? असेल तर जीवशास्त्रातील व मानसशास्त्रातील घटना भौतिक विश्वात समाविष्ट होत नाहीत, असे मानावे लागते. कारण या क्षेत्रातील घटना तर्कशास्त्र व गणित यांच्या सहाय्याने समजण्यास कसलेच सहाय्य झालेले नाही.

तर्कशास्त्र व गणित ही साधने आपल्या परीने भौतिकशास्त्रालाच नव्हे तर जीव व मानसशास्त्र धरून सर्व शास्त्रशाखांमध्ये उपयुक्त व आवश्यक आहेत, नाहीत असे नाही. पण हीच केवळ विज्ञानाची अमोघ साधने आहेत किंवा या साधनानी जे समजते तेच वैज्ञानिक सत्य होय, असा हेकेखोरपणा बुद्धिवादी लोक वैज्ञानिक पातळीवर धरू शकणार नाहीत, हे आवर्जून सांगितल पाहिजे. हा हेकेखोरपणाच आहे, हे वैज्ञानिक दृष्टीने समजून घेणे महत्वाचे आहे. त्यासाठी खुद्द भौतिकशास्त्राचेच उदाहरण घेता येईल.

ज्या भौतिकशास्त्रात या साधनामुळे इतकी प्रगती होऊ शकली, त्या भौतिकशास्त्रात ही साधने खुद्द भौतिक सत्य समजण्याससुध्दा कसलीच मदत करू शकत नाहीत असे दिसून येते. नाहीतर क्वॉंटम सिद्धांताच्या बाबतीत वैज्ञानिकामध्ये इतका मतभेद निर्माण झाला नसता! गणित आणि तर्कशास्त्र यांचा क्वॉंटम सिद्धांतातील तथ्य समजून घेण्यास मुळीच उपयोग होत नसल्याचे उलट त्यांची अडचण होत असल्याचे किंबहुना भाषेचासुद्धा उपयोग होत नसल्याचे आढळून आले आहे! (गणित ही विज्ञानाची भाषाच आहे.) याबाबतीत नील्स बोहर आणि आईन्स्टाईन यांच्यामधील तीव्र मतभेद प्रसिद्ध आहे.[६] भौतिक विश्व गणित व तर्कशास्त्र यांच्या सहाय्याने समजणे शक्य आहे, हे खरे असेल तर या साधनांचा वापर करून ते समजावयास पाहिजे. त्याविषयी निदान वाद वा मतभेद तरी निर्माण होऊ नये, असेच कोणहीही म्हणेल. पण प्रत्यक्षात याच्या उलट परिस्थिती आढळून येते. हा वाद क्वॉंटम सिद्धांतामध्ये कोणते तर्कशास्त्र वा गणित वापरायचे किंवा ते गणित बरोबर आहे काय याविषयी नाही हे लक्षात ठेवले पाहिजे. ते गणित कसे वापरायचे याविषयी वाद आहे. क्वॉंटम गणित कसे वापरायचे हाच जेथे वाद आहे तेथे, ते गणित (वा तर्कशास्त्र) वापरून काय समजणार? किंवा जे समजेल ते सत्य आहे हे कसे ठरविणार?[७]

आईन्स्टाईन हा ईश्वरावर श्रद्धा ठेवणारा व अतींद्रिय शक्तीचे अस्तित्व मानणारा असला, तरी भौतिकशास्त्रात कट्टर बुद्धिवादी होता. त्याचा भौतिक विश्वात कार्यकारणभाव (Causality) अबाधित असल्याबद्दल अढळ विश्वास होता. त्याचे या संदर्भातील "ईश्वर विश्वाशी जुगार खेळत नाही." (God does not play dice with the world) हे विधान प्रसिध्द आहे. क्वॉंटम सिद्धांत हा तर्कातीत व सूक्ष्म जगात कार्यकारणाभाव गैरलागू असल्याचे सूचित करणारा असल्यामुळे क्वॉंटम सिद्धांताला आईन्स्टाईनचा सतत विरोध होता. भौतिकशास्त्रातून कार्यकारणाभावाचे उच्चाटन करणाऱ्या या क्वॉंटम सिद्धांतामुळे आइन्स्टाईन इतका अस्वस्थ झाला होता व बोहरच्या विचारांना या मुद्यावर त्याचा इतका विरोध होता की त्याने त्यासाठी गुप्त घटकांचे (Hidden Variable) एक खास गृहीतकृत्य मांडले होते. पोडोल्स्की व रोझेन या शास्त्रज्ञांबरोबर मांडलेल्या या गृहीतकृत्याला 'ईपीआर पॅरॉडॉक्स' म्हणतात. जे. एस. बेल या शास्त्रज्ञाने हे गृहीतकृत्य तपासण्यासाठी क्वॉंटमविषयक एक प्रमेय मांडले व त्याचा पडताळा पाहण्यासाठी एक प्रयोग सूचित करून या पेचप्रसंगातून सुटका व पुढील संशोधनाचा मार्ग खुला केला. हा प्रयोग १९८२ साली पॅरीस येथे ॲस्पेक्ट या शास्त्रज्ञाने प्रत्यक्षात करून क्वॉंटम सिद्धांत बरोबर असल्याचे दाखवून दिले आहे.[८] क्वॉंटम सिध्दांतातील मूळ गृहीतकृत्य अशा रीतीने या प्रयोगाने बरोबर ठरल्यामुळे भौतिकशास्त्रात एक नवा पेचप्रसंग निर्माण झाला आहे. कारण या सिद्धांतामुळे भौतिकविश्वात प्रकाशापेक्षा जास्त वेगाने माहितीची देवाणघेवाण होते असे दिसून येते. उलट आईन्स्टाईनच्या सापेक्षतावादाच्या सिद्धांतानुसार भौतिकविश्वात प्रकाशापेक्षा जास्त वेग असू शकत नाही.[९] हा पेचप्रसंग सोडविण्यासाठी परंपरागत तर्कशास्त्र व गणित (म्हणजे बुद्धिवाद) निरुपयोगी असून जिला अंत:प्रज्ञा (Insight) किंवा सृजनशील प्रज्ञा (Creative Intelligence) म्हणतात व जी कला व अध्यात्म या क्षेत्रातही प्रभावीपणे कार्य करते व म्हणून जी सर्वंकष आहे, अशा अंत:प्रज्ञेची कास धरणे अगत्याचे आहे, असा दृष्टिकोण डेव्हिड बोहम या (आईन्स्टाईनइतकीच कार्यकारणभावावर श्रद्धा असलेल्या व आईन्स्टाईनबरोबर काम केलेल्या) भौतिकशास्त्रज्ञाने मांडला आहे.[१०] अशा रीतीने विज्ञानाशी बुद्धिवादाची ऐतिहासिक कारणाने - अपघाताने - लागलेली सोयरीक भौतिक प्रगतीच्या दृष्टीने उपयुक्त ठरली असली, तरी सृजनशीलतेच्या (मूलभूत संशोधनाच्या) दृष्टीने वांझ ठरली आहे!

ज्या भौतिकशास्त्राचे तर्कशास्त्र व गणित हे मूलाधार समजण्यात येतात त्या भौतिकशास्त्रातसुद्धा सत्य समजण्यास बुद्धिवादाऐवजी अंत:प्रज्ञेला शरण गेले पाहिजे, असे जेथे शास्त्रज्ञांना वाटते, तेथे जीव व मानसशास्त्रासारख्या तर्क व गणित यांना

ओलांडणाऱ्या (दाद न देणाऱ्या) शास्त्रशाखांविषयी काय बोलावे? पण कोणतीही विज्ञानाची शाखा असली तरी विज्ञानात जी प्रगती होते, ती निरीक्षण आणि प्रयोग यावर, म्हणजे वास्तवावर (facts) आधारून होत असते. वास्तवे प्रस्थापित झाल्यानंतरच सिद्धांत रचना (Theory-Building) सुरू होते.[११] पण हे सिद्धांत वास्तवापासून तार्किक अपरिहार्यतेने (Logical Necessity) निघत नाहीत, तर अंत:प्रज्ञेतून ते स्फुरतात हे लक्षात ठेवले पाहिजे. उदा. न्यूटनला झाडावरून फळ खाली पडताना (किंवा अशीच एखादी नित्य घडणारी घटना पाहताना) गुरुत्वाकर्षणाचा सिद्धांत सुचला. आर्किमिडीजला आंघोळीसाठी पाण्याच्या टबमध्ये उतरताच विशिष्ट गुरुत्वाचा सिद्धांत सुचला. केक्यूल या शास्त्रज्ञाला तर बेंझीन रेणूचे रासायनिक रचनासूत्र स्वप्नात दिसले![१२] हे सिद्धांत या शास्त्रज्ञांनी गणिताच्या भाषेत सर्वांना समजण्यासाठी नंतर सूत्रबद्ध केले.[१३] सत्य प्रथम अंत:प्रज्ञेला कळते, तर्क व पायरी पायरीने जाणाऱ्या गणिती बुध्दीला नाही, हे यावरून स्पष्ट आहे. तर्कशास्त्र वा गणित हे सत्य बुध्दीला सुलभरीतीने समजावून देण्यासाठी शास्त्रज्ञांना उपयोगी पडणारे एक साधन आहे. सत्याचा आणि तर्काचा वा गणिताचा तसा प्रत्यक्ष संबंध नाही, हे यावरून स्पष्ट होईल. म्हणून बर्ट्रांड रसेलने (आणि रसेल कट्टर बुद्धिवादी आहे हे लक्षात ठेवले पाहिजे) गणिताची व्याख्या अशी केली आहे, ''गणित हा असा विषय आहे की ज्यामध्ये आपण कशाविषयी बोलतो हे आपणाला कधीच माहीत होत नाही. आणि ज्या विषयी बोलतो, ते खरे आहे की नाही हेही आपणाला माहीत नसते.'' (Mathematics may be defined as the subject in which we never know what we are talking about, nor whether what we are saying is true.)[१४] गणित (किंवा तर्कशास्त्र) ही विश्व बुद्धीला समजण्यासाठी तयार केलेली एक चौकट आहे. या चौकटीत जे बसते, ते खरे आहे की नाही हे गणिती बुद्धीला कधीच माहीत होत नाही. माहीत करून घेण्याचा प्रयत्नही निष्फळ ठरतो, हे खुद्द आईन्स्टाईननेच सांगितले आहे. आईन्स्टाईन म्हणतो, "As far as the laws of mathematics refer to reality they are not certain; and as far as they are certain they do not refer to reality," (गणिताचे नियम जितक्या प्रमाणात सत्याशी संबंधित असतील तितक्या प्रमाणात ते अनिश्चित असतात, आणि जितक्या प्रमाणात ते निश्चित असतील तितक्या प्रमाणात ते सत्याशी संबंधित नसतात.) म्हणजे *गणितचे नियम सत्याशी निश्चितपणे संबंधित नाहीत* असे ठरते. दुसऱ्या शब्दांत गणिताच्या (वा तर्काच्या) सहाय्याने सत्य निश्चितपणे कळत नाही असे म्हणावे लागते. सत्य समजण्यासाठी गणित व तर्कावर भिस्त ठेवणाऱ्या बुद्धिवादाने विज्ञानाशी लावलेली सोयरीक अशा रीतीने वांझोटी ठरली आहे !

## बुद्धिवाद व क्वॉटम सिद्धांत

क्वॉटम सिद्धांतामुळे विज्ञानाविषयीची मुलभूत गृहीतकृत्ये उखडून निघत असल्यामुळे ही(बुद्धिवादी) गृहीतकृत्ये वाचविण्यासाठी वैज्ञानिकांनी फार प्रयत्न केले आहेत. क्वॉटम सिद्धांत हा अपुरा सिद्धांत आहे, तो विश्वाविषयीचा संपूर्ण सिद्धांत होऊ शकत नाही, असा दृष्टीकोन स्वीकारून आईनस्टाईन -पोडोलसकी- रोझेन यांनी तो पूर्ण करण्याचा जो प्रयत्न केला तो अपयशी ठरला असल्याने त्या सिद्धांतातील अपुरेपणा अन्य तऱ्हेने पूर्ण करण्याचा प्रयत्न नंतर इतर शास्त्रज्ञांनी केला असून **Quantum Theory and Beyond** या टेड बॅस्टिन यांनी संपादित केलेल्या ग्रंथात त्यांचे हे प्रयत्न निबंधरूपात प्रसिद्ध झाले आहेत. पण हे सर्व प्रयत्न जुजबी असून त्यातील फोलपणा सी.टी. के. चारी यांनी **Quantum Physics and Parapsychology** या लॉरा ओटेरी यांनी संपादित केलेल्या ग्रंथातील एका निबंधात साधार दाखवून दिले आहे. (याला अपवाद फक्त डेव्हिड बोहम यांचा असून त्यांचा दृष्टिकोण स्वीकारला तर परमानसशास्त्राला बळकटीच मिळते असे आढळून येते. चारी यांच्या परामानसिक घटनांना Information Theory मध्ये बसवण्याच्या प्रयत्नामुळे निर्माण होणाऱ्या अडचणी बोहमच्या सिद्धांताने टाळता येतात. अशा रीतीने विज्ञानाची भाषा गणित असली तरी (गॅलिलीओने निसर्ग गणिताच्या भाषेत लिहिला आहे असे म्हटले आहे.) या भाषेत विश्व समजणे अशक्य आहे, असे त्या भाषेनेच दाखवून दिलेले असल्यामुळे विज्ञानाचा आधार बुद्धिवाद होऊ शकत नाही, अशा निष्कर्षाप्रत येणे भाग आहे. या विषयी नोबेल पारितोषिक विजेता शास्त्रज्ञ ई. पी. विग्नेर याने म्हटले आहे की गणिताच्या भाषेत जे विश्व समजते, तो संपूर्ण विश्वाचा एक नगण्य भाग आहे तेव्हा या नगण्य भागाच्या आधारे संपूर्ण विश्वाविषयी निष्कर्ष काढणे मूर्खपणाचे ठरते; हे वेगळे सांगण्याची गरज नाही. पण भौतिकशास्त्रज्ञ नेमके असाच प्रयत्न करीत आहेत. असे करणे तेव्हा समर्थनीय ठरले असते, की जेव्हा गणिताच्या भाषेत -अन्य भाषेत नाही- विश्व का लिहिले गेले आहे हे आपणाला माहीत झाले असते. पण हे आपणाला माहीत नाही. (The Unreasonable Effectiveness of Mathematics in Natural Sciences, **Symmetries and Reflections-** E. P. Wigner 1979) विज्ञानातील दोन प्रसिद्ध सिद्धांत म्हणजे क्वॉटम सिद्धांत आणि सापेक्षता सिद्धांत. पण या दोन सिद्धांतांना एकत्र बांधण्यात शास्त्रज्ञांना यश आलेले नाही. आणि यात आश्चर्य नाही. क्वॉटम सिद्धांत बुद्धिवादात बसत नाही. परंपरागत तर्कशास्त्राहून वेगळे तर्कशास्त्र त्यासाठी अवलंबावे लागते, हेच त्याचे कारण आहे. हे तर्कशास्त्र 'क्वॉटम तर्कशास्त्र' म्हणूनच प्रसिद्ध आहे. (हा शब्दप्रयोग प्रसिद्ध गणितज्ज्ञ फॉन न्यूमन याने रूढ केला आहे.) आणि ते परामानसशास्त्रीय तर्कशास्त्राशी जवळीक साधू पाहते असे दिसून आले आहे.

तात्त्विक पातळीवरसुद्धा परंपरागत तर्कशास्त्र कोणत्याही निश्चित निष्कर्षाला बुद्धीला पोचवू शकत नाही, हे **Undecidable** या एम्. डेव्हीस संपादित (१९६४) ग्रंथात गोडेलने दाखवून दिले आहे. गोडेलचा थेरम बुद्धिवादाच्या मर्यादा दाखवून देणारा असून गणितावर संपूर्ण भिस्त ठेवलेल्या विसाव्या शतकातील एक थोर गणितज्ज्ञ हिल्बर्ट याला Unified Field Theory (विश्वाविषयीचा एकसंध सिद्धांत) मांडण्यामध्ये यश न येण्याचे हेच कारण आहे. (आईन्स्टाईनने ही असा प्रयत्न केला होता. पण त्यालाही यश आलेले नाही.) (**The Physicist's Conception of Nature** - Ed. J. Mehra 1973.)

## वास्तवे (Facts) निर्बुद्ध की वास्तवे नाकारणारे निर्बुद्ध?

परामानसशास्त्र बुद्धिवादाशी विसंगत आहे, या सदराखाली परामानसशास्त्राला वैज्ञानिक दर्जा नाकारायचा झाल्यास भौतिकशास्त्रालासुद्धा वैज्ञानिक दर्जा नाकारावा लागेल, हे वरील विवेचनावरून स्पष्ट होईल. तर्कशास्त्र व गणित ही बुद्धिवादाची साधने भौतिक पातळीवर सत्य जाणण्यास जेथे सहाय्यभूत ठरत नाहीत, तेथे परामानसशास्त्राचा जेथे घनिष्ठ संबंध येतो, त्या मानसिक पातळीवर ते सत्य समजण्यास ती कशी सहाय्यभूत ठरतील बरे? म्हणून परामानसशास्त्राला सैद्धांतिक पातळीवर म्हणजे -परामानसशास्त्रातील वास्तवे (Facts) खरी असली, तरी त्या वास्तवांना बौद्धिक म्हणजे गणितीय वा तार्किक-सिद्धांतामध्ये (चौकटीमध्ये ) बसवता येत नाही किंवा आलेले नाही, या सदराखाली, वैज्ञानिक दर्जा नाकारणे समंजसपणाचे ठरत नसल्यामुळे परामानसशास्त्रातील वास्तवेच नाकारण्याचे आडमुठे धोरण बुद्धिवाद्यांनी अवलंबिले आहे ! ही वास्तवेच नाकारण्याची भूमिका अवैज्ञानिक असली तरी तिला आडमुठे अशासाठी म्हटले आहे की, ज्या कारणासाठी ही वास्तवे बुद्धिवादी नाकारतात ते कारण वास्तविक त्यांनाच लागू होते! हे बुद्धिवादी कोणत्या कारणासाठी ही वास्तवे नाकारतात? ती निर्बुद्ध (Irrational) आहेत या कारणासाठी! जणू वास्तवे एखाद्या कारणासाठी नाकारता येतात! व जणू वास्तवे निर्बुद्ध असू शकतात!

वास्तवे निर्बुद्ध आहेत म्हणून ती नाकारणे हेच निर्बुद्धपणाचे ठरत असल्यामुळे ती वास्तवेच नाहीत- परामानसशास्त्रातील घटना खऱ्या नाहीत- अशी भूमिका बुद्धिवाद्यांनी स्वीकारली आहे. [अतींद्रिय घटना नाकारणे व त्या खोट्या (म्हणजे घडत नाहीत) म्हणणे यातील फरक असा की पाहिल्यात घडणाऱ्या घटना खऱ्या असल्या तरी त्या 'निर्बुद्ध' नसून त्यांची 'सुबुद्ध' (Normal) उपपत्ती देता येते असा दावा केला जातो, तर दुसऱ्यात त्या घटनाच घडत नाहीत अशी भूमिका स्वीकारली जाते.] पण ही भूमिकाही तात्त्विकदृष्ट्या निर्बुद्धच आहे ! मानवाच्या प्रारंभापासून आजतागायत, म्हणजे मानवाच्या

हजारो वर्षांच्या इतिहासात अगणित अतींद्रिय घटना घडल्याचे (व हल्लीही सतत घडत असल्याचे) जे दाखले आहेत, ते सर्व खोटे आहेत, अशी भूमिका केवळ तात्त्विक पातळीवरच घेणे शक्य असून या तात्त्विक भूमिकेला संशयवाद (Scepticism) म्हणतात. (तात्त्विक अशासाठी की, ***त्या घटना खोट्या असल्याचे व्यावहारिकदृष्ट्या - Practcally- सिद्ध करणेच अशक्य आहे.)*** तथापि अतींद्रिय घटना घडणे अशक्य आहे, अशी तात्त्विक संशयवादी भूमिका प्रामाणिकपणे घ्यावयाची झाल्यास ती केवळ अतींद्रिय घटनांच्या बाबतीतच कशी घेऊन चालेल ? ती सर्वच घटनांच्या बाबतीत घ्यावी लागेल. म्हणजे संशयावाद हा बुद्धिवाद्यांचे जीवनाकडे पाहण्याचे एक तत्त्वज्ञान बनते. पण हे तत्त्वज्ञान व्यावहारिक पातळीवर शतप्रतिशत प्रामाणिकपणे जगायचे झाल्यास अन्नसुद्धा खाणे वर्ज्य करावे लागेल ! कारण खाल्लेले अन्न पोटात विष बनणार नाही, याची तर्कशुद्ध सिद्धता (Logical Proof) कोणालाही देता येत नाही. अन्न खायचे असेल तर ते विष बनणार नाही, या श्रद्धेनेच खाल्ले पाहिजे. ही श्रद्धा ९९.९ टक्के खरी ठरण्याचा संभव असला, तरी ती शेवटी श्रद्धाच आहे, हे लक्षात ठेवले पाहिजे. ती कधीही तर्कशुद्ध सिद्धता होऊ शकत नाही. अशा रीतीने शतप्रतिशत प्रामाणिक संशयवाद (किंवा शून्य प्रतिशत श्रद्धाळूपणा) आत्मघातकी ठरत असल्यामुळे शतप्रतिशत प्रामाणिक संशयवादी कोणीच असू शकत नाही.[१५]

शतप्रतिशत संशयवाद बाळगणे कधीच व्यवहार्य ठरत नाही, हे मान्य असेल तर हा संशयवाद कोणत्या गोष्टींविषयी व किती प्रमाणात बाळगावा, हे व्यावहारिक निकषावर, म्हणजे अनुभवाने ठरवावे लागेल, हेही मान्य करावे लागेल. अतींद्रिय घटनाविषयी शतप्रतिशत संशयवाद व इतर घटनाविषयी शून्य प्रतिशत संशयवाद (शतप्रतिशत श्रध्दाळूपणा) चालणार नाही. याला संशयवाद म्हणत नाहीत. पण अतींद्रिय घटनाविषयी बुद्धिवाद्यांनी नेमकी हीच (शतप्रतिशत संशयवादी) भूमिका स्वीकारलेली आहे. अतींद्रिय घटनाविषयीची बुद्धिवाद्यांची भूमिका प्रामाणिक नाही, हे यावरून स्पष्ट आहे. ते सुसंगत संशयवादी नाहीत (किंवा भोंदू संशयवादी आहेत) असे यावरून ठरते. आपली अतींद्रिय घटनाविषयीची भूमिका प्रामाणिक आहे, (भोंदू नाही) असा दावा त्यांना करावयाचा झाल्यास अतींद्रिय घटना ह्या व्यावहारिक पातळीवर अनुभवाला कधीच येत नाहीत, असे प्रतिपादन त्यांना करावे लागले. पण असे प्रतिपादन ते कधीच करू शकणार नाहीत. कारण अतींद्रिय घटना अनुभवाला येतात की नाही हे अनुभवानेच ठरवावे लागणार आहे, आणि हे केवळ बुद्धिवाद्यांच्या अनुभवाने ठरवता येणार नाही. कारण बुद्धिवाद हा कांही स्वयंसिद्ध तात्त्विक सिद्धांत नाही. तो अनुभवाच्या निकषावरच खरा की खोटा हे ठरवावे लागणार आहे. म्हणून अतींद्रिय घटनांविषयीचा बुद्धिवाद्यांचा

शतप्रतिशत, तात्त्विक पातळीवरचा (अनुभव निरपेक्ष) संशयावाद हा बुद्धिवादी एक तर अप्रामाणिक किंवा निर्बुद्ध असल्याचे दाखवून देतो.

अतींद्रिय घटनाविषयी शतप्रतिशत संशयवाद बाळगणारे लोक समाजात एक टक्कातरी आहेत की नाहीत याची शंकाच आहे. या घटना खऱ्या मानणारे लोक मात्र बहुसंख्य आहेत, यात तिळमात्र शंका नाही. अशारीतीने अतींद्रिय घटनांच्या खरेपणाविषयी मूठभर लोक प्रामाणिक ठरण्यासाठी बहुसंख्य लोक अप्रामाणिक आहेत, असे गृहीत धरावे लागते. अर्थात मूठभर लोकांचे मत बरोबर असणे व बहुसंख्य लोकांचे मत चुकीचे असणे तत्त्वत: शक्य आहे. पण हे कोणत्या क्षेत्रात? ज्या क्षेत्रात खास अभ्यास व बुद्धिमत्ता लागते अशा क्षेत्रात. पण अतींद्रिय घटना हा खास अभ्यासाचा विषय नसून अनुभवाचा विषय असल्यामुळे असे म्हणण्याची सोय नाही. कारण अनुभव निर्बुद्धालाही (अडाण्यालाही) येऊ शकतो. आणि अतींद्रिय अनुभव केवळ निर्बुद्धानाच आलेले नाहीत, तर जे बुद्धिमान आहेत व ज्यांची निरीक्षण शक्ती तीक्ष्ण आहे अशा तज्ञ व शास्त्रज्ञ लोकांनाही ते आलेले आहेत, ही वास्तुस्थिती आहे. अशा लोकांवर अप्रामाणिकपणाचा आरोप केवळ निर्बुद्ध बुद्धिवादीच करतील. असा आरोप करणे निर्बुद्धपणाचे ठरते हे जाणून बुद्धिवाद्यांनी अतींद्रिय घटनांचे सत्यत्व नाकारण्यासाठी अनेक क्लृप्त्यांची योजना केली आहे. या क्लृप्त्या म्हणजे योगायोग, भ्रम आणि फसवणूक होत. यापैकी फसवणुकीवर बुद्धिवाद्यांची सर्वात जास्त भिस्त असल्यामुळे तिचाच प्रामुख्याने येथे विचार करण्याचे ठरविले आहे. (योगायोग व भ्रम यांचा निकाल सांख्यकीय शास्त्राच्या - Statistics च्या - आधारे ऱ्हाईन प्रभृतींनी लावला असल्याचे तिसऱ्या प्रकरणात आपण पाहिलेच आहे.)

## बुद्धिवाद्यांची 'प्रामाणिक' भोंदूगिरी

फसवणुकीचे दोन प्रकार आहेत. एक प्रामाणिक व दुसरे अप्रामाणिक. प्रामाणिक फसवणुकीला जादू किंवा हातचलाखी म्हणतात. बुद्धिवाद्यांचे म्हणणे असे की, अतींद्रिय घटना खऱ्या असल्याचा भ्रम अप्रामाणिक फसवणुकीने निर्माण करण्यात येतो व अशा प्रकारच्या घटना आपणही प्रामाणिक फसवणुकीने (जादूने) करून दाखवू शकतो व त्या खऱ्या अतींद्रिय घटना नसल्याचे सिद्ध करू शकतो.

येथे दोन प्रश्न निर्माण होतात. एक, सर्व अतींद्रिय घटना प्रामाणिक फसवणुकीने- जादूने-घडवून आणता येतात काय? दुसरे, एखादी अतींद्रिय घटना जादूने (फसवणूकीने) घडवून आणता येते म्हणून ती नेहमी फसवणुकीनेच घडवून आणली

जाते असे समजणे युक्त होईल काय?

या दोन्ही प्रश्नांना स्पष्ट नकारार्थी उत्तरे आहेत. पण अतींद्रिय घटना खोट्या असल्याचे सिद्ध करण्यासाठी बुद्धिवादी मात्र या दोन्ही प्रश्नांची उत्तरे स्पष्ट होकारार्थी असल्याचे गृहीत धरतात; आणि हीच त्यांची समाजाची खरी फसवणूक आहे. म्हणजे खोट्या फसवणूकीच्या -जादूच्या-नावाखाली हे लोक समाजाची खरी फसवणूक करीत असतात, असे दिसून येते. हे कसे हे सोदाहरण दाखवून देता येईल . त्यामुळे हे बुद्धिवादी एकतर अप्रामाणिक किंवा अंधश्रध्द आहेत, आणि दोन्हीही नसतील तर निर्बुद्ध आहेत असे ठरते.

ज्या घटना फसवणुकीने (जादूने) घडवून आणणे शक्य नाही व ज्यांच्या बाबतीत योगायोग व भ्रम ही कारणेही देता येत नाहीत, अशा घटनांचा नंतर विचार करू. जादू किंवा फसवणूकीने ज्या अतींद्रिय घटना घडवून आणून त्या अतींद्रिय नसल्याचे आपण सिद्ध केले असल्याचा दावा हे बुद्धिवादी करतात, त्या घटनांचा प्रथम विचार करू. ऐतिहासिकदृष्ट्या विचार करता या घटनांमध्ये माध्यमे मृतात्माद्वारा -ज्या घटना (उदा. टेबल अधांतरी आपोआप उचलणे इत्यादी) घडवून आणतात, ज्या बहुधा अंधारातच ती करीत असतात, अशा घटनांचा प्रामुख्याने समावेश होतो. यामध्ये शतप्रतिशत फसवणूक असून या खऱ्या असल्याचे सिद्ध करणाऱ्यास दहा हजार डॉलर्स देण्याचे हॅरी हुदिनी या जगप्रसिद्ध जादूगाराने जाहीर केले होते व स्वत: तो स्टेजवर या घटना कशा फसवणुकीने घडवून आणल्या जातात याचे प्रात्यक्षिक करून दाखवत असे. हे बक्षिस कोणीही जिंकलेले नाही यास्तव त्या घटना खोट्या आहेत, खऱ्या अतींद्रिय घटना नव्हेत, असे या लोकांचे म्हणणे आहे.

या संदर्भात एक महत्वाची गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे. जादूगार ज्या गोष्टी हातचलाखीने (फसवणुकीने) करतो, त्या आपल्या अटीखाली करतो; म्हणजे तो नियंत्रित प्रयोग नसतो. याउलट अतींद्रिय सामर्थ्याचा दावा करणाऱ्या व्यक्तीवर शास्त्रज्ञ जे प्रयोग करतात, ते त्या व्यक्तीच्या अटीखाली करीत नाहीत, तर आपल्या अटीखाली करतात. म्हणजे तो प्रयोग नियंत्रित असतो. अर्थात नियंत्रित प्रयोगातही प्रयोगकर्त्या शास्त्रज्ञांची फसवणूक होणे शक्य आहे. पण हे ज्या त्या प्रयोगाच्या संदर्भातील नियंत्रण परिस्थितीवर व प्रयोगकर्त्यांच्या चाणाक्षपणावर अवलंबून असते. या बाबतीत इतर लोकांपेक्षा शास्त्रज्ञच जास्त लीलया फसवले जाऊ शकतात, असे बुद्धिवाद्यांचे म्हणणे असले तरी हे म्हणणे सर्वच शास्त्रज्ञांच्या बाबतीत सरसकट खरे म्हणून स्वीकारता येत नाही. तसे पाहिले तर शास्त्रज्ञच काय, जादूगारसुद्धा- तोही कसलेला -फसवला जाऊ शकतो. म्हणजे एखादी

जादू एखादा जादूगार कसा करतो हे इतर जादूगाराना माहीत नसते. ती त्याच्याकडून त्याला शिकून घ्यावी लागते. (एखादी महत्वाची जादू जबर किंमतीला विकलीही जाते!) उदा. पूर्ण प्रकाशात हुदिनी स्टेजवरून हत्ती अदृश्य करीत असे. पण ही जादू तो कसा करतो, हे शास्त्रज्ञांनाच काय इतर जादूगारांनाही माहीत नव्हते. (नाहीतर ही जादू इतर जादूगारही करू शकले असते. भारतातील प्रसिद्ध जादूगार के. लाल हा स्टेजवरून सिंह अदृश्य करतो. इतकेच नव्हे तर त्याचे इतर प्राण्यात रूपांतरही करतो.) येथे महत्वाचा मुद्दा असा की, जादू नियंत्रित परिस्थितीत नसते. म्हणून ती जादू असते (त्याचे इंगित-खोटेपणा -इतरांना कळत नाही.) या उलट शास्त्रज्ञांचे प्रयोग नेहमी नियंत्रित परिस्थितीत करण्यात येतात. म्हणून ती जादू नसते. जादूगार अतींद्रिय घटना हातचलाखीने घडवून आणू शकतो व म्हणून त्या खोट्या असतात, या दाव्यामध्ये या महत्वाच्या मुद्यांकडे नेहमी दुर्लक्ष करण्यात येत असते.

सर्व शास्त्रज्ञ हे भोळे व सहज फसवले जाऊ शकत असल्यामुळे कोणत्याही अतींद्रिय सामर्थ्याचा दावा करणाऱ्या व्यक्तीचा प्रयोग शास्त्रज्ञांच्या उपस्थितीत व नियंत्रणाखाली होऊन उपयोग नाही, तो खरा म्हणून स्वीकारता येत नाही, त्या प्रयोगाच्या वेळी एखादा जादूगार हजर होता काय हा प्रश्न महत्वाचा आहे, कारण तो हजर असेल तरच तो प्रयोग स्वीकारता येतो, तीच त्या प्रयोगाच्या खरेपणाची कसोटी आहे, असा जो कांही बुद्धिवादी युक्तिवाद करतात त्यातील फोलपणा जादूगारही फसवले जाऊ शकतात, या वस्तुस्थितीवरून स्पष्ट होईल . हा युक्तिवाद बरोबर म्हणून स्वीकारला तर हुदिनीसारखा जगप्रसिद्ध व कसलेला जादूगार हजर असूनही मार्जेरी (क्रॅंडन) या स्त्रीमाध्यमाने कांही अतींद्रिय प्रकार करून दाखवले व ते ती कसे करू शकली, हे हुदिनीला शोधून काढता आले नाही, या वस्तुस्थितीचा काय अर्थ करायचा? ती हे प्रकार फसवणुकीने करणे शक्य आहे, हे हुदिनीला नंतर सप्रयोग दाखवता आले, तरी तो त्याच एक तर्क होता.[१६] मार्जेरीला तसे करताना त्याला पकडता आले नाही ही वस्तुस्थिती जादूगाराची ( आणि तीही हुदिनीसारख्या कसलेल्य जगप्रसिद्ध जादूगाराची) उपस्थिती ही अतींद्रिय शक्ती खोटी ठरविण्यासाठी पुरेशी असल्याचा बुद्धिवाद्यांचा युक्तिवाद फोल ठरविते. याच अर्थ मार्जेरी करून दाखवत असलेल्या घटना अतींद्रिय प्रकारात मोडतात असा होतो, असे येथे सूचित करावयाचे नाही. मार्जेरीचे दोन्ही हात व पाय हुदिनी व त्याच्या सहकाऱ्यांनी व शास्त्रज्ञांनी दाबून धरले असतानासुध्दा कांही अतींद्रिय घटना घडल्या असल्या तरी हा प्रयोग पूर्णपणे नियंत्रित नव्हता, कारण तो अंधारात करण्यात आला होता, असेच म्हणावे लागते. अंधारातसुद्धा नियंत्रित प्रयोग करता येतो. नाही असे नाही. आणि युसापिया

पॅलाडिनो या इटालियन खेडूत स्त्रीवर अशा प्रकारचे अनेक प्रयोग अनेक शास्त्रज्ञांनी केले ही आहेत. यापैकी काही प्रयोग पूर्ण प्रकाशात व शास्त्रीय उपकरणांच्या सहाय्याने केले आहेत. उदा. इलेक्ट्रोस्कोप डिस्चार्ज करणे, स्पर्श न करता वजन काट्यावर सात किलोपर्यंतच्या वजनाची नोंद करणे इत्यादी प्रयोग पीअर क्यूरी, मादाम क्यूरी, बर्गसाँ यांनी व पॅरिसच्या 'इन्स्टिट्यूट ऑफ जनरल सायकॉलॉजी' या संस्थेतर्फे केले व करण्यात आले आहेत. तेही एक दोन बैठकांमध्ये नव्हे, तर ४३ बैठकांमध्ये व तीन वर्षांच्या कालावधीमध्ये, पूर्ण प्रकाशात, पॅलाडिनोचे हातपाय घट्ट धरलेल्या अवस्थेत टेबल आपोआप अधांतरी अनेकदा उचलले गेल्याचे, एक टेबल चालत आल्याचे, गिटार हे वाद्य आपोआप वाजत असल्याचे इत्यादी आढळून आले आहे. हे प्रयोग ११ बैठकांमध्ये घडून आल्याचे वर्णन ऑनरेबल एवरार्ड फील्डिंग, बॅगॅली व हेरेवर्ड कॅरिंग्टन या संशोधकांनी आपल्या पॅलाडिनोवरील २६० पानांच्या विस्तृत इतिवृत्तामध्ये नोंदले आहे.[१७]

दुसरी महत्वाची गोष्ट या संदर्भात लक्षात ठेवली पाहिजे, ती ही की, एखादी माध्यम फसवणूक करते, म्हणून सर्वच माध्यमे फसवणूक करतात असे ठरत नाही. इतकेच नव्हे तर एखादी माध्यम फसवणूक करताना आढळली (किंवा तशी पकडली गेली) तर ती नेहमीच फसवणूक करते असेही ठरत नाही. याविषयी पॅलाडिनोचेच उदाहरण बोलके आहे. मार्जेरी हीआपण कधीच फसवणूक करीत नाही असा नेहमी दावा करीत असली तरी एकदा कपट करताना ती पकडली गेली. या उलट पॅलाडिनो हिने फसवणुकीचा आरोप कधीच नाकारला नाही. कधी कधी आपण फसवणूक करतो हे ती मान्य करीत असे, इतकेच नव्हे तर माझे हात पकडा, नाहीतर मी फसवणूक करीन, असा शास्त्रज्ञांना एका प्रयोगाच्यावेळी ओरडून तिने इशारा दिला असल्याचा उल्लेख प्रा. एन्सिको मार्सेली या मज्जाशास्त्रज्ञाने आपल्या सुमारे एक हजार पृष्ठांच्या ग्रंथात केला आहे.[१८] ते काही असले तरी वर म्हटल्याप्रमाणे पॅलाडिनोवर झालेल्या अनेक नियंत्रित प्रयोगांत तिचे अतींद्रिय सामर्थ्य निरपवादपणे सिद्ध झाले आहे. आपल्या हातून खऱ्या अतींद्रिय घटना जेव्हा घडत नाहीत असे लक्षात येते, तेव्हा प्रयोगकर्त्याची निराशा होऊ नये म्हणून कपटाचा आश्रय करण्याचा एखाद्या माध्यमाला मोह होणे मनुष्य स्वभावाला धरून असून या गोष्टीचा बुद्धिवादी नेहमी बाऊ करीत असले तरी त्यामुळे या माध्यमांचे शास्त्रज्ञांच्या नियंत्रित प्रयोगात निरपवादपणे सिद्ध झालेले अतींद्रिय सामर्थ्य खोटे ठरत नाही, किंवा त्याला बाधा येत नाही.[१९]

शास्त्रज्ञांची सहज फसवणूक होऊ शकते, म्हणून कोणत्याही अतींद्रिय सामर्थ्यांचे अस्तित्व सिद्ध करण्यासाठी आयोजित केलेल्या प्रयोगात शास्त्रज्ञ हजर असून उपयोगाचे नाही, एखाद्या जादूगाराच्या उपस्थितीची जरूरी आहे, तो उपस्थित नसेल तर तो प्रयोग विश्वासार्ह म्हणून स्वीकारता येत नाही, असे प्रतिपादन करण्यामध्ये बुद्धिवाद्यांना

शास्त्रज्ञ हे भोळे असतात, हेच केवळ सूचित करावयाचे नसून, असे प्रयोग करण्यासाठी आवश्यक असलेले गुण त्यांच्यात नसतात व इच्छा किंवा प्रामाणिकपणाही नसतो असेही सूचित करावयाचे असते. म्हणजे अतींद्रिय शक्तीसंबंधीचे सर्व प्रयोग यशस्वी ठरावेत, अतींद्रिय शक्तीचे अस्तित्व सिद्ध व्हावे अशी सुप्त इच्छा असल्यामुळे शास्त्रज्ञांच्या हातून लबाडी करण्याचा प्रयत्न नकळत होणे संभवनीय असते, असेही त्यांना सूचित करावयाचे असते.

अशा युक्तिवादात अतींद्रिय क्षेत्रातील लबाडी केवळ जादूगारालाच कळणे शक्य आहे, शास्त्रज्ञाला ती कळणार नाही, कारण लबाडी हुडकणे हे शास्त्रज्ञाचे काम नव्हे, असे जे सूचित केले आहे, ते सपशेल खोटे असल्याचे अनेक उदाहरणांनी दाखवून देता येईल. वर जगप्रसिद्ध जादूगार हुदिनी याला मार्जेरीची लबाडी उघड करण्यात अपयश आल्याचे सांगितलेच आहे. ही लबाडी जादूगार नसलेल्या लोकांनी हुडकून काढली आहे. मृतात्म्याकरवी पाटीवर लिहिण्याचे कार्य करण्याबाबत प्रसिद्ध असलेल्या हेन्री स्लेड या पुरुष माध्यमाची अतींद्रिय शक्ती खरी असल्याची प्रमाणपत्रे अनेक जादूगारांनी दिलेली असतानाही पेनसिल्व्हानिया युनिव्हर्सिटीने नेमलेल्या शास्त्रज्ञांच्या सीबर्ट कमिशनने त्याचे खरे बिंग बाहेर पाडले व तो फसवणुकीने हे करीत असतो हे सिद्ध केले. खुद्द मॅगडुगल या अतींद्रिय शक्तीचे अस्तित्व मानणाऱ्या मानसशास्त्रज्ञाने फ्रेडरिक क्रॅंडॉक या भुते अंधारात दाखवणाऱ्या माध्यमाचे बिंग बाहेर काढले. (त्यावेळी या प्रयोगासाठी हजर असलेल्या लोकांनी त्या 'भुता'ला चांगलाच चोप दिला!) स्वतः जे. बी. ऱ्हाईन या प्रसिद्ध अतींद्रिय वैज्ञानिकाने आपल्याच प्रयोगशाळेत प्रयोग करताना एका शास्त्रज्ञाने केलेली लबाडी उघडकीस आल्यानंतर त्याला तेथून हाकलून दिले आहे, ही गोष्ट अतींद्रिय शक्तीविषयीचे प्रयोग यशस्वी ठरावेत या सुप्त इच्छेमुळे लबाडी करण्याची प्रवृत्ती अतींद्रिय शास्त्रज्ञात असते, ही बुद्धिवाद्यांची समजूत किंवा प्रतिपादन कसे धादांत खोटे आहे हे सिद्ध करते.[२०] लबाडी करण्याची प्रवृत्ती शास्त्रज्ञापेक्षा जादूगारातच जास्त असते, कारण त्यांचा तो धंदाच आहे; आणि हे आपण सोदाहरण पुढे पाहणारच आहोत. येथे शास्त्रज्ञ अतींद्रिय सामर्थ्याचा दावा करणाऱ्याकडून सहज फसवले जातात हा बुद्धिवाद्यांचा यक्तिवाद कसा फोल आहे एवढेच दाखवून द्यावयाचे आहे. या सामर्थ्याची परीक्षा शास्त्रज्ञांनी किती कसोशीने घेतली आहे, याची कल्पना वाचकांना यावयाची झाल्यास या संबंधीचे साहित्य त्यांनी मुळातून वाचावयास हवे. वुइल्यम क्रूक्स, चार्लस् रिचे , हाजसन, ऑलिवर लॉज, हेरेवर्ड कॅरिंग्टन इत्यादी शास्त्रज्ञांनी अनेक नियंत्रीत परिस्थितीत माध्यमांची काटेकोर तपासणी करून त्यांच्या अतींद्रिय सामर्थ्याचे अस्तित्व निरपवादपणे सिद्ध केले आहे. पाइपर या अमेरिकन स्त्रीमाध्यमावर गुप्तहेरांची पाळत ठेवून आपल्या हस्तकाकरवी ती लोकांची माहिती मिळवत नाही, याची खात्री करून घेण्यात आली

होती. खोट्या नावाने किंवा बदली व्यक्ती (Proxy) म्हणून तिच्यासमोर माणसे बसवली तरी ती त्यांची अगदी अचूक माहिती देत असे. शेवटी जो देश तिने पूर्वी कधी पाहिलेला नव्हता अशा इंग्लंडमध्ये तिला नेण्यात आले व तेथील व्यक्तींची माहिती तिला विचारण्यात आली, प्रत्येक वेळला तिने ती बरोबर दिली. इंग्लंडमध्ये असताना तिला अमेरिकेहून येणारी सर्व पत्रे -अर्थात तिच्या परवानगीने -फोडून पाहून मगच तिला देण्यात येत असत. तसेच तेथे कोणत्याही व्यक्तीचा तिच्याशी संपर्क येणार नाही, याची काळजी घेण्यात आली होती. इतक्या कडक नियंत्रणाखाली कुठल्याही जादूगाराला अशा शक्तीचे फसवणुकीने प्रदर्शन करणे अशक्य आहे.

हुदिनीने टेलिपथी (परचित्तज्ञान) शक्तीचे एकदा प्रदर्शन केले होते. पण त्यावेळी हस्तक व आधुनिक विज्ञानतंत्र हे दोन्हीही त्याने वापरले होते. (म्हणजे तो प्रयोग नियंत्रित नव्हता.) याची कबुली त्याचा जादूगार -चरीत्रकार- मिलबोर्न क्रिस्तोफर याने दिला आहे.[२१]

## बुद्धिवाद्यांची अप्रामाणिक भोंदुगिरी

जादूगार स्वत: निवडलेल्या परिस्थितीत प्रयोग करीत असल्याने तो प्रेक्षकांना (यात शास्त्रज्ञही आले) सहज फसवू शकतो. याउलट अतींद्रिय शक्तीचे प्रदर्शन करणाऱ्यांना नियंत्रित परिस्थितीत प्रयोग करावे लागत असल्याने अशाप्रकारची फसवणूक करणे अतिशय कठीण आहे. ते अशक्य करणे यातच त्यांची परीक्षा घेणाऱ्या शास्त्रज्ञांचे कौशल्य असते. पण त्यांची कशीही परीक्षा घेतली तरी ते शास्त्रज्ञांना फसवतात, कारण तत्त्वत: अतींद्रिय शक्ती अस्तित्वातच नाही, अशी भूमिका काही बुद्धिवादी घेतात. त्यांची तशी प्रामाणिक समजूत असेल तर या गोष्टीचा निकाल स्वत: जादूगारांनाच अशा व्यक्तींची परीक्षा घ्यायला लावून लावता येतो, व त्यांच्या प्रामाणिकपणाचा कस पाहता येतो. या कसाला स्वत: हुदिनी हा उतरला नाही, हे आपण मार्जेरीच्या उदाहरणात वर पाहिलेच असल्याने हे बुद्धिवादी अप्रामाणिक असल्याचा निष्कर्ष काढावा लागतो. हुदिनीचा अप्रमाणिकपणा अतींद्रिय शक्तीचे अस्तित्व अमान्य करण्यापुरता, म्हणजे केवळ अकरणात्मक (Negative) नाही, तर तो करणात्मक (Positive) ही आहे, हे येथे लक्षात ठेवले पाहिजे. कारण त्याने मर्जेरी फसवणूक करते, हे सिद्ध करण्यासाठी गुप्तपणे घडीची फूटपट्टी तिच्या पायाखालच्या गादीखाली कॉलिन्स या आपल्या सुतारकाम करणाऱ्या हस्तकाकरवी लपवली होती, आणि हे कॉलिन्स यानेच नंतर बऱ्याच वर्षांनी मान्य केले आहे.[२२] अतींद्रिय शक्ती अस्तित्वात नसल्याचे सिध्द करण्याचा आणि त्यासाठी माध्यमाविरूद्ध आघाडी उघडून हयातभर लढत राहण्याचा विडा उचललेल्या माणसाकडून हे अपेक्षितच आहे! लबाडी व फसवणूक हे ज्यांच्या अर्थोत्पादनाचे साधन

आहे त्यांना या गोष्टीचा अवलंब करण्यात का दिक्कत वाटावी? करमणूक म्हणून का होईना समाजाची फसवणूक करणे हा धंदा म्हणून स्वीकारला तरी त्यातही प्रामाणिकपणा असावा लागतो. पण तोही हुदिनीजवळ नाही अशा आरोपाखाली जर्मनीमध्ये हुदिनीवर कोर्टात खटला भरण्यात आला होता, हेही लक्षणीय आहे. माध्यमाविरुद्ध आघाडी उघडण्यात अतींद्रिय शक्ती खोटी असल्याबद्दलची खात्री किंवा सत्यनिष्ठा नव्हती, तर माध्यमे जादूवर पोट भरणाऱ्यांच्या आर्थिक हितसंबंधाना धक्का पोचवतील, ही भीती होती. हुदिनीला आपल्या आर्थिक हितसंबंधाबद्दल इतकी चिंता वाटात होती की त्या हितापुढे सामाजिक सभ्यता पाळण्याचे प्राथमिक कर्तव्य ही तो बिनदिक्कत झुगारून देत असे. याबद्दलचे उदाहरण म्हणून, त्याचे नाव - तेही थोडे बदलून -एका उत्पादकाने आपला माल खपविण्यासाठी वापरले म्हणून त्या दुकानातील हंडी-झुंबरे, खुर्च्या यांची हुदिनीने मोडतोड केली व शिव्या दिल्या म्हणून त्याच्यावर कंपनीने कोर्टात खटला भरला, त्याचे देता येईल. फसवणे हा धंदा म्हणून स्वीकारलेल्या जादूगाराकडून सत्यानिष्ठा अपेक्षित नसली तरी निदान सभ्यतेची अपेक्षा करणे अनाठायी ठरेल काय?

अप्रामाणिक भोंदूगिरी करणाऱ्यांचे उदाहरण म्हणून हुदिनीला निवडण्याचे कारण तो जगप्रसिद्ध असून तो अतींद्रिय शक्ती अस्तित्वात नाही असे म्हणतो, त्या अर्थी ती खरीच अस्तित्वात नसली पाहिजे, अशी बुद्धिवादाबद्दल सहानुभुती असलेल्या जादूप्रेमी लोकांची समजूत होणे शक्य आहे, हेच आहे. पण हुदिनी ही फार वर्षापुर्वी होऊन गेलेली एक वादग्रस्त व्यक्ती असल्याने आपण अलीकडची उदाहरणे चर्चेसाठी घेणे उचित ठरेल. अलीकडील उदाहरणे घेतली तरी आपल्या निष्कर्षात फरक पडत नाही, हे मात्र अगोदरच नमूद केले पाहिजे. प्रामाणिक फसवणुकीने पोट भरणाऱ्या लोकांनी स्वतःच्या नियंत्रित परिस्थितीत अतींद्रिय शक्ती प्रदर्शित करणाऱ्यांची तपासणी केली तरी ते आपल्या धंद्याला मारक ठरणाऱ्या अतींद्रिय शक्तीचे अस्तित्व मान्य करीत नसल्याचे दिसून येते. यात त्यांचा अप्रामाणिकपणाच दिसून येतो. सत्यनिष्ठा नाही. लेखनाचा विस्तार होणार असला तरी अनेक उदाहरणांनी हे सविस्तरपणे दाखवून देणे अगत्याचे आहे.

येथे बुद्धिवादी व जादूगार यांचा एकत्र विचार केलेला पाहून काही वाचकांना आश्चर्य वाटेल. पण अतींद्रिय शक्तीचे असित्व बुद्धिवादाला मान्य नसल्यामुळे बुद्धिवाद्यांनी अन्य कारणासाठी ही शक्ती नाकारणाऱ्या जादूगारांशी हातमिळवणी केल्याचे दिसून येते. किंबहुना बरेच बुद्धिवादी आपण हौशी जादूगार असल्याचाही दावा करतात किंवा अतींद्रिय शक्तीचे अस्तित्व दाखवणाऱ्या चमत्कारांचे खोटेपण सिद्ध करण्यासाठी स्वतः जादूचा अवलंब करतात, असे ही दिसून येते. याचे उदाहरण म्हणून पाश्चात्य देशातील 'सायन्टिफिक अमेरिकन' चा स्तंभलेखक मार्टिन गार्डनर व पौर्वात्य देशातील श्रीलंकेचे अब्राहम कोवूर

यांचे देता येईल. या दोघांनी अलीकडील प्रसिद्ध जादूगार 'अमेझिंग रँडी' याची अतींद्रिय शक्ती आपल्या जादूने खोटी ठरविणारा म्हणून सारखीच भलावण केली आहे, व आपण स्वत:ही हातचलाखी विद्येत निष्णात असल्याचा दावा केला आहे. मात्र हातचलाखी विद्येबरोबर 'बुद्धिचलाखी' विद्याही त्यांनी आत्मसात केली आहे हेही तितकेच खरे आहे! आणि त्यांच्या हातचलाखीप्रमाणेच त्यांच्या बुद्धिचलाखीतील चलाखपणाही कसा खोटा आहे हे उघड करून दाखवणे आवश्यक आहे.

## यूरी गेलर व टेड सिरिओस

इस्राईलचा यूरी गेलर व अमेरिकेचा टेड सिरिओस यांनी अतींद्रिय क्षेत्रात इतिहास घडविला असून अतींद्रिय शक्ती नाकारणाऱ्या बुद्धिवादी जादूगारांच्या तोंडचे पाणीच त्यांनी पळवले आहे. हे दोघेही हातचलाखी करतात असे म्हणून त्यांना खोटे ठरविण्याच्या, निदान त्यांना वादग्रस्त ठरविण्याच्या त्यांच्या प्रयत्नांना दोघेही पुरून उरले आहेत. तथापि, बुद्धिवादी लोकांनी बुद्धिवादी दृष्टिकोनातून मांडलेल्या युक्तिवादांची व त्यांच्या आकर्षक भाषाशैलीची भुरळ वाचकांवर अशी पडते की, गेलर आणि टेड हे दोघेही खरोखरच लफंगे आहेत अशीच त्यांची खात्री पटते व अशा व्यक्तीवर शास्त्रज्ञांनी आपला वेळ निष्कारण खर्ची घालू नये असे त्यांना वाटू लागते. त्यांची अतींद्रिय शक्ती इतकी असंभाव्य व अविश्वसनीय गोष्टी करणारी आहे की अशा गोष्टींवर विश्वास ठेवणे हे आपल्या शास्त्रीय इभ्रतीला धक्का पोचविणारे आहे असे त्यांच्यावर प्रयोग करणाऱ्या खुद्द शास्त्रज्ञांनासुद्धा वाटू लागते व ते आपल्या नंतरच्या लिखाणात त्यांचा उल्लेख टाळण्याचा प्रयत्न करतात असे आढळून येते. याबाबतीत बुद्धिवादी जादूगारांच्या हस्तलाघवाप्रमाणे त्यांचे बुद्धिलाघवही कौतुकास्पद आहे यात शंका नाही. पण वस्तुस्थितीपुढे युक्तिवाद व बुद्धिलाघव फिके पडतात. सुदैवाने आपली शास्त्रीय इभ्रत जपण्यासाठी वस्तुस्थिती नाकारण्याचा अप्रमाणिकपणा एक अपवाद वगळता कोणाही शास्त्रज्ञाने केलेला नाही.[२३] याविषयीची वस्तुस्थिती समजून घेण्यापूर्वी व या दोघांच्या अतींद्रिय शक्तीची ओळख करून घेण्यापूर्वी बुद्धिवाद्यांचे युक्तिवाद काय आहेत हे प्रथम समजून घेणे अगत्याचे आहे. कारण त्यामुळे खरी वस्तुस्थिती समजून घेणे अधिक सुलभ होणार आहे. बुद्धिवादी पुढील युक्तिवाद करीत असतात.

१) गेलर व टेड अतींद्रिय शक्तीने जे करण्याचा दावा करतात ते आपण हातचलाखीने करून दाखवू शकतो. म्हणून गेलर व टेड हेही हातचलाखीच करीत असतात असे सिद्ध होते.

२) जादूगारांच्या उपस्थितीत आपले सामर्थ्य त्यांना प्रकट करता आलेले

नाही. कित्येकदा ते त्यांच्या उपस्थितीत प्रयोग करण्याचेच नाकारतात. यावरून तेही जादूगारच आहेत हे सिद्ध होते.

३) शास्त्रज्ञांचे लक्ष विचलित करण्यासाठी ते गोंधळ माजवणे, बडबडणे, लहरीपणाने वागणे अशा गोष्टी करतात व लक्ष विचलित करण्यात अपयश आले तर अतींद्रिय शक्ती ही चकविणारी आहे हा नेहमीचा युक्तिवाद करून मोकळे होतात. तशी त्यांना सोय आहे आणि अशी अनेक अपयशे त्यांना आली असून त्यावेळी त्यांनी हाच युक्तिवाद केला आहे.

पहिला युक्तिवाद दिशाभूल करणारा आहे. दुसरा खोटा आहे. तिसऱ्याविषयी अधिक स्पष्टीकरणाची आवश्यकता आहे. या तिन्ही युक्तिवादांचा परामर्श घेण्यापूर्वी गेलर व टेड यांच्या अतींद्रिय शक्तीची ओळख करून घेणे अगत्याचे आहे. प्रथम टेड घेऊ.

टेड सिरिओस हा शिकॅगो येथील हॉटिलमध्ये लिफ्टवर काम करणारा एक नोकर होता. तो संमोहनाला अत्यंत योग्य असल्याचे आढळून आल्यानंतर त्या अवस्थेत त्याच्याकडून भूमीगत द्रव्य हुडकण्याचे प्रयत्न करण्यात आले. अशाच प्रयोगात तो कॅमेऱ्याच्या सहाय्याने माहीत नसलेल्या दूरस्थ वस्तूंची आणि दृश्यांची छायाचित्रे फिल्मवर उमटवू शकत असल्याचे निदर्शनास आले. याला Thoughtography - विचारचित्रग्रहण - असे नाव देण्यात आले आहे. कॅमेऱ्याचे तोंड एखाद्या भिंतीवर किंवा आपल्याच चेहऱ्यावर तो रोखतो व बटन दाबतो. पोलॅरॉइड कॅमेऱ्यामध्ये जाग्यावरच ताबडतोब डेव्हलपिंगची सोय असल्यामुळे (म्हणजे अंधाऱ्या खोलीची जरूरी नसल्यामुळे) फसवणुकीचा संशय घेण्यास जागा उरत नाही. शिवाय टेड स्वत:चा कॅमेरा वापरत नसून प्रयोगकर्त्यांचा कॅमेरा (त्यांनीच घातलेल्या नव्या कोऱ्या फिल्मसह) वापरतो, त्यामुळेही संशय घेण्याचे कारण उरत नाही. (वाटल्यास त्या फिल्मवर स्वत:ची ओळखणीची खूण प्रयोगकर्ते करून ठेवू शकतात. म्हणजे ती मध्येच बदलल्याची तक्रार करण्यासही जागा उरत नाही.) अशा परिस्थितीत वेगवेगळ्या अनोळखी दृश्यांची छायाचित्रे फिल्मवर कशी उमटतात, हा प्रश्न आहे. हा अतींद्रिय शक्तीचाच परिणाम आहे असे स्वाभाविक उपपत्तीच्या अभावी मानणे भाग आहे. पण बुद्धिवादी यात लबाडी असून आपण ती हुडकून काढली आहे असा दावा करतात. त्यांच्या या दाव्याचा विचार करण्यापूर्वी अतींद्रिय शक्ती खोटी ठरविण्यासाठी ते स्वत:च ज्या लबाड क्लृप्त्यांचा वापर नेहमी करत असतात त्यांचा प्रथम विचार केला पाहिजे. त्यांच्या या लबाड क्लृप्त्या अशा :

१) एखादे धडधडीत खोटे विधान करणे व ते सतत करीत राहणे. वेळी अवेळी त्याचा, जणू आपणाला एक दुर्मिळ सत्य सापडले आहे अशा थाटात, संदर्भ देत राहणे.

२) अतींद्रिय शक्तींच्या संदर्भात नव -नवी चुकीची विधाने करून वाचकांची सतत दिशाभूल करीत राहणे.

३) अतींद्रिय शक्तीचा दावा करणाऱ्याचे एखादे अपयश पकडून त्याचाच सतत गाजावाजा करीत राहणे. यशाची असंख्य उदाहरणे असली तरी त्याकडे संपूर्ण दुर्लक्ष करणे.

४) स्वत:च्या अनुभवातून व प्रयोगातून एखाद्या व्यक्तीमध्ये अतींद्रिय शक्ती असल्याची ज्यांची खात्री पटली आहे- मग ते कोणीही असोत -अशा व्यक्तींची, त्यांच्या त्या क्षेत्रातील प्रामाणिक व नि:पक्ष प्रयत्नांची माहिती न मिळविता त्यांना सरसकट भोळे म्हणून संबोधणे किंवा - ते शास्त्रज्ञ नसतील तर- त्यांना भोंदू म्हणणे. याच्या उलट ज्यांनी त्या व्यक्तीवर प्रयोग न करताच तिची शक्ती खोटी असल्याचे जाहीर केले आहे, अशा व्यक्तींची सत्यशोधक म्हणून गौरव करणे, तीच विज्ञानाची खरी सेवा म्हणून सांगत सुटणे.

५) आपण सांगू तेथे व त्याकाळी प्रयोग केला नाही म्हणून त्या व्यक्तीमध्ये अतींद्रिय शक्ती नाही असे जाहीर करणे.

६) जी व्यक्ती आपल्यात अतींद्रिय शक्ती असल्याचा दावा करते, तिची खासगी कुलंगडी बाहेर काढून तिची बदनामी करणे आणि अशा रीतीने ती खोटी फसवी व्यक्ती आहे असे सूचित करणे .

७) अतींद्रिय शक्तीवर अनुभव व प्रयोग याद्वारा ज्यांचा विश्वास बसला आहे, अशा संशोधकावर त्यांच्या प्रयत्नातील उणीवा दाखवून टीका करण्याऐवजी त्यांची सवंग भाषेत टर उडविणे.

वरील सर्व विधाने खरी असल्याचे पुढे साधार सिद्ध करून दाखवण्यात येईलच, पण आश्चर्य म्हणजे स्वत: बुद्धिवादीच ती खरी असल्याचे आपण होऊन अप्रत्यक्षपणे मान्य करीत असल्याचे आढळून येतात. उदा. ज्याला अमेरिकन बुद्धिवाद्यांचा मेरूमणी म्हणता येईल त्या मार्टिन गार्डनर या लोखकाने आपल्या **In the Name of Science** या ग्रंथांत म्हटले आहे की, ''अतींद्रिय मानसिक शक्ती अस्तित्वात असणेही शक्य नाही असा एक प्रचंड बुद्धिहीन पूर्वग्रह अमेरिकन मानसशास्त्रज्ञात आढळून येतो. माझ्यातही तो कांही प्रमाणात आहे. तो पुढील लेख वाचताना वाचकांनी अवश्य हिशेबात धरावा.''[२४] आपला हा प्रचंड बुद्धिहीन पूर्वग्रह (Enormous Irrational Prejudice) वाचकांच्या माथी विज्ञानाच्या नावाखाली (In the Name of Science) मारण्याचा गार्डनरचा प्रयत्न स्तुत्य नाही असे कोण म्हणेल? स्तुत्य नाही तो अतींद्रिय शक्तीचा खरे-खोटेपणा पूर्वग्रह बाजूला सारून काटेकोर विज्ञानाच्या निकषावर तपासण्याचा प्रयत्न ! विज्ञानाची सेवा कोण कशी करीत आहे हे यावरून वाचकांच्या लक्षात येईल.

वरील सात अनुक्रमांकातील विधानाबरोबर पुढील एक विधान या संदर्भात वाचकांनी लक्षात ठेवणे आवश्यक आहे हे विधान असे : *टेड सिरिओस आणि यूरी गेलर हे आपले अतींद्रिय सामर्थ्य प्रकट करीत असताना कपटांचा आश्रय करीत असल्याचे एकदाही कोणाला आढळलेले नाहीत, किंवा तसे कोणी सिद्धही केलेले नाही.* या विधानाला कोणत्याही जादूगाराने किंवा बुद्धिवाद्याने कधीहीआव्हान दिलेले नाही हेही या संदर्भात लक्षात ठेवणे आवश्यक आहे.

आता परत टेड सिरिओसकड वळू.

टेडची लबाडी आपण हुडकून काढल्याचा दावा आयसेन्ड्राथ आणि रीनॉल्डस या दोन छायाचित्रकार जादूगारांनी **Popular Photography** च्या ऑक्टोबर १९६७ च्या अंकात केला असून याच गोष्टीचा बुद्धिवादी नेहमी गवगवा करीत असतात. कॅमेऱ्याच्या भिंगापुढे अगोदर काढलेले पारदर्शक चित्र ज्यावर बसविले आहे असे दुसरे भिंग धरले तर टेड उमटवतो तशी चित्रे कॅमेऱ्याच्या फिल्मवर उमटविता येतात, असे या लोकांचे म्हणणे आहे. टेड अतींद्रिय शक्तीने फोटो काढताना 'गिस्मो' हे नाव दिलेली जी कागदी नळी वापरतो तिच्यात हे दुसरे पारदर्शक चित्रयुक्त भिंग लपवलेले असते असे त्यांचे म्हणणे आहे. या संदर्भात ज्या गोष्टीकडे हे लोक मुद्दाम दुर्लक्ष करतात, त्या प्रथम सांगितल्या पाहिजेत. त्यामुळे त्यांचा हा दावा कसा पोकळ आहे हे आपोआप सिद्ध होते.

१) एक इंच व्यासाची व एक इंच लांबीची काळ्या कागदाची एक पोकळ (आरपार पाहता येणारी) नळी कॅमेऱ्याच्या भिंगापुढे टेड फोटो काढताना धरत असतो.(या नळीला 'गिस्मो' हे नाव देण्यात आले आहे.) अशा नळीत काहीच लपवता येत नाही. *अशी नळी वापरून कोणाही जादूगाराने फोटो काढून दाखविलेले नाही.* अशा नळीत सर्वांच्या नजरा चुकवून वर उल्लेख केलेले पारदर्शक चित्रयुक्त भिंग टेड चोरून घालतो, असे समजले तरी असे चित्र उमटविण्यासाठी २०० वॅटचा बल्ब वापरावा लागतो असे प्रयोगाअंती आढळून आले आहे. पण टेड चित्रे उमटविताना कसलाच बल्ब कधीच वापरत नाही ही वस्तुस्थिती आहे.

*२) 'गिस्मो' न वापरता टेडने बरीच वर्षे अतींद्रिय छायाचित्रे काढली आहेत.* ही वस्तुस्थिती असून ती कोणालाही नजरेआड करता येणार नाही.

३) टेडच्या हातात कॅमेरा व 'गिस्मो' न देता स्वतः प्रयोगकर्त्यांनी आपल्या हातात ती दोन्ही धरून फोटो काढले तरी फोटो निघाले आहेत. अशा प्रयोगात संगनमत गृहीत धरावे लागेल. पण टेडवर इतक्या संशोधकांनी प्रयोग केल आहेत की त्या सर्वांनी

टेडशी व परस्परांशी संगनमत केले, असे म्हणणे हास्यास्पद ठरेल.

४) पारदर्शक चित्राचे भिंग (ते टेड चोरून वापरतो असे गृहीत धरले तर) एकाच फोटोसाठी फारतर वापरता येईल, *पण एकाच बैठकीतील प्रयोगात २० ते ५० पर्यंत छायाचित्रे त्याने काढल्याची उदाहरणे आहेत.* पण सर्वात महत्वाची गोष्ट म्हणजे *प्रयोगकर्त्यांनी प्रयोगापूर्वी आकस्मिकपणे निवडलेल्या 'लक्ष्या' बरहुकूम (Target)* टेडने अनेकदा छायाचित्रे उमटविली असून त्यामुळे पारदर्शक चित्रांच्या भिंगाची ही कल्पनाच असंबद्ध ठरते.

५) टेडने आपला 'गिस्मो' तपासून पाहण्यास कोणालाही कधी विरोध केलेला नाही. ( याला एकच अपवाद जेव्हा टेडने थोडी जास्त 'घेतली' होती त्यावेळचा असून त्याचाच टेडचे टीकाकार जास्त बाऊ करतात. आणि त्याच्या इतर असंख्य यशस्वी प्रयोगाकडे दुर्लक्ष करतात. टेड आपल्या वयाच्या १६ व्या वर्षापासून 'पीत' होता.)

६) मार्टिन गार्डनर म्हणतो की टेड आपल्या तळ हातात लपवलेले गुप्त साधन (Gimmick) आपल्या 'गिस्मो' मध्ये सर्वांच्या नजरा चुकवून सहज घालू शकतो व काढू ही शकतो.[२५] मार्जेरीवर प्रयोग करणाऱ्या हुदिनीला ती कशी लबाडी करीत होती याविषयी तर्क करण्याच जितका अधिकार होता, तितकाही *टेडवर प्रयोग न करता तर्क करणाऱ्या* गार्डनरला त्याची लबाडी सांगण्याचा अधिकार नाही. ३५ पेक्षा ही जास्त प्रशिक्षित संशोधकांना टेडवर प्रयोग करताना जे 'गुप्त साधन' आढळले नाही, किंवा ज्याचा नुसता संशयसुद्धा आला नाही, त्याचा *टेडवर प्रयोग न करणाऱ्या* गार्डनरला 'शोध' लागावा याला निश्चित 'अर्थ' आहे. जे. जी. प्रॅट या मुरब्बी व प्रामाणिक म्हणून प्रसिद्ध असलेल्या परामानसशास्त्रज्ञाने टेडवर अनेक प्रयोग केले असून, स्टिव्हन्सन या तितक्याच मुरब्बी परामानसशास्त्रज्ञाचे या कामी त्याने सहाय्य घेतले आहे. हे दोघेही आपल्या टेडवरील शोध निबंधात म्हणतात, "सुमारे आठशे प्रयोग आम्ही टेडवर केले, पण एकदाही 'गिस्मो' च्यासंबंधात त्याने प्रयोगापूर्वी किंवा प्रयोगानंतर संशयास्पद हालचाल केल्याचे आम्हाला दिसून आले नाही."[२६] आणि तरीही त्यांना कित्येक 'अनैसर्गिक' छायाचित्रे मिळाली. प्रॅटने आपल्या **ESP Research Today** या ग्रंथात म्हटले आहे की हजारो प्रयोगात कोणाही निरीक्षकाला टेडने क्लृप्ती वापरल्याचे एकदाही आढळून आलेले नाही. एखादीही त्याची कृती अडखळत केल्याची (Clumsy Action) दिसून आली असती, तर त्याचे बिंग बाहेर पडले असते.[२७]

७) टेड हा आपल्या तळहातात कोणालाही कळणार नाही अशा रीतीने 'गुप्त साधन' लपवतो असा आकाशवाणी व दूरदर्शन या माध्यमातून टेडवर आरोप करणाऱ्या

जादूगारांना टेडवर अनेक वर्षे प्रयोग केलेल्या ज्यूल आयसेनबड या मानसशास्त्रज्ञाने **Popular Photography** च्या नोव्हेंबर १९६७ च्या अंकातून अशा प्रकारे 'गुप्त साधन' वापरून टेड प्रमाणे शेकडे -हजारो नव्हे, तर फक्त कांही फोटो काढून दाखवावेत असे आव्हान केले होते. पण ते काणाही जादूगाराने स्वीकारले नाही. ज्याचा बुद्धिवादी लोक अतींद्रिय शक्तीवाल्यांची बिंगे बाहेर फोडणारा म्हणून नेहमी उदोउदो करतात त्या 'अमेझिंग रँडी' ने सुद्धा हे आव्हान न स्वीकारता रणांगणातून काही तरी निमित्त शोधून पळ काढला आहे, ही गोष्ट या लोकांचा आरोप बिनबुडाचा आहे, केवळ लोकांचा बुद्धिभेद करण्यासाठी तो करण्यात येतो हे सिद्ध करते.[२८]

८) टेडने संपूर्ण अंधारातही छायाचित्रे फिल्मवर उमटवली आहेत. शिवाय शेकडो वेळा फिल्म्स एक्स्पोज न करता (प्रकाश न पाडता) पांढरे (प्रकाश पाडल्याप्रमाणे) केले आहेत व एक्स्पोज केलेले फिल्मस् काळे केले आहेत. *ही गोष्ट हातचलाखीने करण्याचा दावा कोणाही जादूगाराने केलेला नाही हे लक्षात ठेवले पाहिजे. कारण असे करणे अशक्य आहे.* ही गोष्ट टेडचे अतींद्रिय सामर्थ्य निर्विवादपणे सिद्ध करते.

टेडचे विचारचित्रग्रहणाचे हे अतींद्रिय सामर्थ्य कांही वर्षांनी एकदम नाहीसे झाल्याचे आढळून आले असून अतींद्रिय शक्तीच्या संशोधकांना अशाप्रकारे अनेक व्यक्तींची अतींद्रिय शक्ती कमी किंवा अचानक नाहीशीही झाल्याची आढळून आली आहे. पण आपण टेडचे गुपित फोडल्यामुळेच टेडला आपला उद्योग बंद करावा लागला असा अपप्रचार त्याचे जादूगार टीकाकार करीत असतात. या बाबतीतील त्यांचा प्रचार कसा धादांत खोटा असतो, हे पुढील उदाहरणावरून वाचकांना स्पष्ट होईल.

## लेडी वंडर - मनातले विचार ओळखणारी घोडी

फोंडा नावाच्या एका स्त्रीच्या मालकीच्या घोडीमध्ये इंग्रजी अक्षरे व आकडे असलेल्या ठोकळ्यांना नाकाने स्पर्श करून लोकांनी विचारलेल्या प्रश्नांची (त्यांच्याच मनातील) उत्तरे देण्याचे सामर्थ्य होते. श्रीलंकेचे प्रसिद्ध बुद्धिवादी अब्राहम कोवूर यांनी **Begone Godmen** या आपल्या पुस्तकात स्कार्न नावाच्या जादूगाराच्या **The Amazing World** या पुस्तकातील उतारा देऊन स्कार्नने त्या घोडीचे व तिच्या मालकिणीचे बिंग बाहेर पाडल्याचे म्हटले आहे. फोंडा आपल्या हातातील चाबूक हालवून घोडीला खुणा करीत असल्याचे स्कार्नच्या लक्षात आल्यानंतर त्याने ही गोष्ट जाहीर केली व त्याबरोबर या घोडीचा मनातील विचार ओळखण्याचा हा प्रकार बंद पडला असे कोवूर म्हणतात. या घोडीची परीक्षा मॅक्डुगल व ऱ्हाईन या प्रसिद्ध शास्त्रज्ञांनी घेतली असून त्यांनासुद्धा यातील रहस्य कळाले नाही, तेही फसले असे कोवूरनी म्हटले आहे.

फोंडा बाईच्या ज्या खुणा घोडीला कळत होत्या त्या ऱ्हाईनसारख्या शास्त्रज्ञाला कळाल्या नाहीत, असे सुचविण्यामध्ये ऱ्हाईनच्या बुद्धिमत्तेचा अधिक्षेप आहे की त्या घोडीच्या असामान्य बुद्धिमत्तेचे कौतुक आहे, की यात कोवूरांचा भाबडेपणा आहे हे सांगणे कठीण आहे. खरी गोष्ट अर्थातच वेगळी आहे. खरी गोष्ट कोवूर व स्कार्न हे दोघेही अत्यंत धूर्त आहेत ही आहे. आपली पुस्तके अजिबात अभ्यास नसलेले, अत्यंत सामान्य बुद्धिमत्तेचे लोक वाचतात हे त्यांना माहीत आहे. (अशाच वाचकांसाठी तर ती लिहिलेली असतात!) अशा लोकांची आपण सहज दिशाभूल करू शकतो याची त्यांना पूर्ण खात्री आहे. म्हणून ते असली धादांत खोटी विधाने करू धजतात व खपवूही शकतात. खरी गोष्ट अशी आहे :

चाबकाने खुणा करणे बाजूलाच राहिले, प्रश्न विचारणाऱ्यांच्या शरीराच्या नकळत होणाऱ्या हालचालीसुद्धा त्या घोडीला कळत असाव्यात असा संशय आल्यावरून त्या संशयनिरसणासाठी व *त्या घोडीची मालकीण फोंडा हिला ती त्या घोडीला दिसणार नाही,* अशा रीतीने पडद्यामागे बसवूनही प्रयोग करण्यात आले आहेत. तरीही ती घोडी प्रश्नांची बरोबर उत्तरे देत असल्याचे आढळून आले आहे. नंतर या घोडीची ही शक्ती नाहीशी झाली. ही शक्ती प्रकट होताना व ती नाहीशी झाल्यावर घोडीच्या वागणुकीत जो फरक पडल्याचे आढळून आला आहे, तो ही शक्ती प्रकट होताना व नाहीशी झाल्यावर पडणाऱ्या मानवाच्या वर्तणुकीतील फरकाशी जुळणारा असल्याचा आढळून आला आहे. या संबंधीचे आपले शोध ऱ्हाईनने "An investigation of a mind-reading horse" 'या पहिल्या निबंधात व नंतर "Second Report on `Lady,' the mind-reading horse" या आपल्या दुसऱ्या निबंधात प्रकट केले असून हे दोन्ही निबंध **Journal of Abnormal and Social Psychology** च्या १९१९ च्या २३ व २४ या क्रमांकाच्या अंकात प्रसिद्ध झाले आहेत.[२९] हे जर्नल तज्ज्ञ लोकांसाठी असून सामान्य वाचक ते कधी वाचत नाहीत. त्यामुळे अशा वाचकांची दिशाभूल करणे या बुद्धिवाद्यांना सोईचे झाले आहे. दु:ख होते ते या लोकांच्या अप्रामाणिकपणाचे नाही, तर ते करीत असलेल्या असत्य प्रचाराचे व तेही विज्ञानाच्या नावाखाली तो करतात याचे.

अशा रीतीने या घोडीप्रमाणेच टेड सिरिओसचे या लोकांनी गुपित बाहेर पाडले हेच जेथे खोटे आहे, ( जेथे काही गुपित आहे हेच मुळात धादांत खोटे आहे) तेथे ते बाहेर पाडल्यामुळे तो प्रकार बंद झाला, या म्हणण्याच्या खऱ्या खोट्याचाही प्रश्न उद्भवत नाही, हे सांगणे नको.

## यूरी गेलर विरूद्ध बुद्धिवादी जादूगार

टेड सिरिओसनंतर आता आपण यूरी गेलरकडे वळू. यूरी गेलर हे इतके मोठे प्रकरण आहे की एक स्वतंत्र लेखही त्यासाठी पुरणार नाही. येथे यूरीविरूद्ध आघाडी उघडून तो अतींद्रिय शक्तीच्या नावाखाली जादू (हातचलाखी) करणारा भोंदू आहे हे दाखवून देण्याचे प्रयत्न करणाऱ्या व स्वतःच भोंदूगिरी करणाऱ्या बुद्धिवाद्यांचाच फक्त विचार करावयाचा आहे. पण हे करण्यापूर्वी यूरीच्या अतींद्रिय शक्तीची व त्याविषयी वैज्ञानिकांनी केलेल्या संशोधनाची अगदी थोडक्यात माहिती दिली पाहिजे.

यूरीने हस्तस्पर्शाने व क्वचित हस्तस्पर्श न करता काटे-चमचे , किल्ल्या इत्यादी वाकविणे , बंद पडलेली घड्याळे केवळ स्पर्शाने व क्वचित् स्पर्श न करता सुरू करणे, *दुसऱ्यांच्या मनातील विचार (चित्रे वा शब्द) कागदावर उतरविणे, कॉम्प्यूटरमध्ये अनाकलनीय बदल घडवून आणणे, बियांना हस्तस्पर्शाने थोड्याच अवधीत अंकुर फुटण्यास लावणे,* इत्यादी सामर्थ्य आपल्यात असल्याचे अनेक नियंत्रित प्रयोगात, अनेक शास्त्रज्ञांपुढे, अनेक देशात व अनेक वेळा दाखवून दिले असून त्याचे प्रयोग दूरदर्शनवरही अनेक वेळा दाखवण्यात आले आहेत. त्याची चलच्चित्रेही घेण्यात आली आहेत. यूरीचे आकाशवाणीवर व दूरदर्शनवर कार्यक्रम होताना ते प्रयोग ऐकणाऱ्यांच्या व पाहणाऱ्यांच्या घरीही बंद पडलेले घड्याळ सुरू होणे, चमचे इत्यादी वाकणे असे प्रकारही घडले आहेत. त्याची वृत्तपत्रासाठी मुलाखत घेणाऱ्या वार्ताहरांच्या *खिशांतील किल्याही आपोआप वाकड्या झाल्याच्या* त्यांना नंतर आढळून आल्या आहेत. १९७२ मध्ये पश्चिम जर्मनीमध्ये विजेवर चालणारा जिना थांबविणे, केबल-कार हवेत मध्येच थांबविणे अशा घटनांच्या नोंदीही त्याच्या नावावर करण्यात आल्या आहेत. एक इंडियन रोप-ट्रिक सोडली तर अतींद्रिय क्षेत्रात आतापर्यंत नमूद केलेल्या सर्व गोष्टी त्याने केल्याचे ॲलन व्हॉन या त्याचा काळजीपूर्वक अभ्यास केलेल्या लेखकाने म्हटले आहे.[३०]

ॲंड्रीजा पुहारिच या एम.डी. असलेल्या डॉक्टरने प्रथम त्याला अमेरिकेत आणले. अपोलो १४ या अंतराळ यानातून चंद्रावर गेलेल्या एडगर मिचेल यानेही यूरीला पुढे आणण्यास मदत केली आहे. या दोघांच्या साहाय्याने युरोप अमेरिकेत यूरीवर अनेक शास्त्रज्ञांनी प्रयोग केले आहेत. अमेरिकेतील ओहिओ प्रांतातील केंट स्टेट युनिव्हर्सिटीच्या भौतिकशास्त्रविभागाचे चेअरमन डॉ. विल्बर फ्रँकलिन याने प्रथम यूरीवर १९७२ साली प्रयोग केले. त्याच वर्षी कॅलिफोर्नियातील स्टॅनफोर्ड रिसर्च इन्स्टिट्यूटमध्ये लेझर भौतिकशास्त्रज्ञ हॅरॉल्ड पुथॉप आणि रसेल टार्ग या दोघांनी त्याच्यावर सर्वात जास्त कसोशीने आणि विस्ताराने प्रयोग केले. १९७३ साली मेरीलँड येथील नॅव्हल सरफेस वेपन्स सेंटर येथे काम करणाऱ्या अमेरीकेच्या नेव्ही रिसर्चचा भौतशास्त्रज्ञ एल्डन बायर्ड याने त्याच्यावर

निटिनॉल नावाच्या एका दुर्मिळ व संरक्षण क्षेत्रातील साधनामध्ये वापरण्यात येणाऱ्या धातूवर तो किती परिणाम करू शकतो हे पाहण्यासाठी प्रयोग केले, आणि आपले यशस्वी प्रयोग एका शोधनिबंधात अमेरिकेच्या संरक्षण खात्याच्या संमतीने प्रसिद्ध केले. टोरोंटो युनिव्हर्सिटीच्या गणित विभागाचा प्रमुख प्रा. ए. आर. जी. ओवेन, केंटुकी युनिव्हर्सिटीचा भौतिकशास्त्रविभागाचा प्रमुख प्रा. जॉन. बी. हॅस्टेड, लंडनच्याच किंग्ज कॉलेजचा प्रा. जॉन जी. टेलर, कॅलिफोर्नियाच्या लॉरेन्स लिव्हरमोर लॅबोरेटरीच्या संशोधन विभागाचा भौतिकशास्त्रज्ञ रोनॉल्ड हॉक् यांनीही यूरीवर १९७४ साली यशस्वी प्रयोग केले असून त्याचे अतींद्रिय सामर्थ्य निर्विवादपणे सिद्ध झाल्याचे मान्य केले आहे. (या शास्त्रज्ञांपैकी फक्त जॉन जी. टेलर या किंग्ज कॉलेजच्या प्राध्यापकाने आपले म्हणणे मागे घेतले असून त्याचे कारण टीप क्र. २३ मध्ये दिल आहे.) याशिवाय बॉन युनिव्हर्सिटीचा डॉ. वॉल्टर ए. फ्रँक, हिएन्नाचा प्रा. हेल्मेट हॉफ्मन, फ्रान्समधील सुरेन हॉस्पिटलचा डॉ. अल्बर्ट ड्यूक्रो, पॅरिसचा प्रा. चार्लस् क्रूसार्ड, म्यूनिचचा (मॅक्स प्लँक इन्स्टिट्यूट) डॉ. फ्लायबर्ट कार्गर, अमेरिकेच्या 'नासा' चा शास्त्रज्ञ वर्नर फॉन ब्रॉउन इत्यादी अनेक तज्ज्ञांनी (त्यापैकी काहीनी त्याच्यावर काटेकोर नियंत्रित प्रयोग करून) यूरीच्या अतींद्रिय सामर्थ्याच्या खरेपणाची स्वत: खात्री करून घेतली आहे. या सर्व प्रयोगावर आधारित अशी माहिती संकलित करून त्यांचे इतिवृत्त **Geller Papers** नावाने चार्लस पॅनाटी या वैज्ञानिक लेखकाने प्रसिद्ध केले असून त्या ३०० पृष्ठांच्या पुस्तकाला 'Scientific Observations on the Paranormal Powers of Uri Geller' 'यूरी गेलरच्या अतींद्रिय सामर्थ्याविषयीचे वैज्ञानिक निरीक्षण' असा पोटमथळा दिला आहे.

गेलरची भौतिक उपस्थिती नसतानासुद्धा केवळ त्याच्या माध्यमातून अनेक अनाकलनीय भौतिक घटना घडत असल्याच्या आढळून आल्या असून त्याला 'गेलर परिणाम' (Geller Effect) असे नाव देण्यात आले आहे. अशा १३७ घटनांचा प्रत्यक्ष अभ्यास करून दक्षिण अफ्रिकेतील जोहान्सबर्ग जनरल हॉस्पिटलचा भूतपूर्व रेडियॉलॉजिस्ट डॉ. इ.ॲलन प्राइस योन एक प्रदिर्घ इतिवृत्त तयार केले असून 'गेलर परिणाम' खरा असल्याचा त्यावरून निष्कर्ष काढला आहे.

यूरी गेलरवर संशोधन करून लिहिले गेलेले निबंध आंतर-राष्ट्रीय कीर्तीच्या **Nature, New Scientist, Science News, Science Digest, Physics Today, Popular Photography** इत्यादी मासिकांत प्रसिद्ध झाले आहेत. याशिवाय इतरही अनेक मासिकांतून त्यांच्याविषयी लेख प्रसिद्ध झाले असून खास त्याच्यावरच एक डझन पुस्तके लिहिली गेली आहेत. त्याच्याविषयी सविस्तर उल्लेख किती पुस्तकांतून व वृत्तपत्रांतून आले आहेत याची तर गणतीच नाही. त्याचे प्रत्यक्ष संबंध अनेक देशांचे

ज्येष्ठ सहकारी अधिकारी, मंत्री, पंतप्रधान, राष्ट्राध्यक्ष यांच्याशीही आले असून काहीजणापुढे त्याने आपले प्रयोगही केले आहेत. Daily Mail ने आपल्या वाचकांची मतगणती घेतली तेव्हा ९३ टक्के लोकांनी यूरीचे अतींद्रिय सामर्थ्य खरे असल्याचे आपले मत दिले आहे.

असे असले तरी यूरी आंतरराष्ट्रीय क्षेत्रात चमकण्यापूर्वीच खुद्द त्याच्या देशातच- इस्त्रायलमध्येच - त्याच्याविरूद्ध काही लोकांनी आघाडी उघडल्याचे आढळून येते. यात जादूगारांचा अर्थातच सिंहाचा वाटा आहे, हे पुढील गोष्टीवरून स्पष्ट होईल.

युरीने सार्वजनिक प्रयोग करण्यास सुरुवात केल्याच्या केवळ काही महिन्यातच इस्त्रायलच्या 'हाओलम हाझे' या साप्ताहिकाने आपल्या २० ऑक्टोबर, १९७३ च्या अंकात खालील मथळा मुखपृष्ठावर छापून एक निनावी लेख छापला.

''यूरी गेलर - एक भोंदू : मनातील ओळखणाऱ्या लफंग्याचे जादूगार बिंग बाहेर पाडतात.''

या लेखात आयटन आयलोन नावाच्या जादूगाराने इस्त्रायलमधील सर्व जादूगारांनी यूरीला संपविण्यासाठी शिकार मोहीम (Witch -Hunt) अघडून एकत्र आल्याचे जाहीर केल्याचे म्हटले आहे. याची कारणेही देण्यात आली आहेत. यापैकी एक कारण *'यूरी इस्त्रायलच्या जादूगारांचे उत्पन्न बुडवीत असल्यामुळे ते त्याच्या विरोधात उभे राहिले आहेत.'* असे देण्यात आले असून दोन आठवड्यात त्याने आपले सोंग टाकून आपणही जादूगार असल्याचे मान्य करावे, नाहीतर आम्ही त्याचे बिंग बाहेर पाडू असा निर्वाणीचा इशाराही देण्यात आला आहे. पण हा (या शिकारीतील) फुसका बार ठरला. नंतर या साप्ताहिकाच्या १४ मार्च, १९७३ च्या अंकात यूरीला बदनाम करण्यासाठी यूरीचा सोफिया लॉरेन या प्रसिद्ध नटीबरोबर प्रसिद्ध झालेल्या एका फोटोच्या आधारे त्या साप्ताहिकाचा संपादक एली टॅव्होर याने यूरी बनवेगिरी करणारा म्हणून सिद्ध झाल्याचे जाहीर केले. पण हा फोटो बनावट होता, हे तो तयार करणारा रॅनी हर्थ याने स्वत:च २० डिसेंबर, १९८५ रोजी स्वखुषीने केलेल्या एका जाहीर निवेदनात मान्य केले आहे.[३१]

या नंतर दोनच आठवड्यांनी या साप्ताहिकाने यूरी रसायन वापरून काटे-चमचे वाकवितो हा त्यावेळी जादूगारात लोकप्रिय असलेला यूरीच्या चमत्कारापाठीमागचा सिद्धांत जाहीर केला व अशा रीतीने यूरीचे 'बिंग' बाहेर पाडले. पण स्वत: जेम्स (अमेझिंग) रँडी या जादूगाराने कोणतेही रसायन त्वचेला धोकादायक असून त्याचा जादूसाठी कोणीही उपयोग करू नये असा इशारा दिला होता. ज्या रसायनाने धातू मऊ होऊन वाकतो त्याने त्वचा सुरक्षित राहील काय? ही साधी गोष्ट या 'बिंग' वाल्यांना न कळाल्यामुळे त्यांनी स्वत:चे हसे करून घेतले.

शेवटी या साप्ताहिकाने यूरीला कायमचा संपविण्याच्या उघड उद्देशाने आपल्या २० फेब्रुवारी, १९७४ च्या अंकात यूरीविरूद्ध बऱ्याच काल्पनिक गोष्टींनी युक्त असा एक प्रदीर्घ लेख छापला. तो जणू इस्त्रायलच्या अकॅडेमी ऑफ सायन्सने लिहिलेला अधिकृत लेख आहे, अशा थाटात जेम्स रँडी या जादूगाराने आपल्या यूरीविरूद्ध लिहिलेल्या **The Magic of Uri Geller** या पुस्तकात इंग्रजीत भाषांतर करून उद्धृत केला आहे. यात यूरीच्या आईवडिलांनी दिलेली मुलाखत आहे, यूरीचा मित्र शिपी याची बहीण हन्ना श्ट्रँग हिने दिलेली खोटी निवेदने आहेत, यूरीचा मित्र शिपी हा प्रेक्षकात बसून खुणा करून यूरीला माहिती देतो असे खोटेच म्हटले आहे. वास्तविक यूरीला शिपी भेटण्यापूर्वीपासून यूरीचे अतींद्रिय सामर्थ्य त्याची आई, दाई, सवंगडी, शिक्षक, यांच्या साक्षीने सिद्ध झालेले आहे. (तशी निवेदने काहींनी स्वेच्छेने जाहीररीत्या दिली आहेत.) हा लेख वस्तुस्थितीवर आधारलेला नसल्याबद्दल त्या साप्ताहिकाचा संपादक एली टव्होर याने स्वतःच नंतर (१९८४ साली) मान्य केले.[३२]

या साप्ताहिकाचा मालक व प्रकाशक अवनेरी यानेही यूरीचे अतींद्रिय सामर्थ्य खरे असल्याचे आपणाला स्वानुभवाने पटल्याचे नंतर म्हटले आहे.[३३] या साप्ताहिकाच्या याच खोट्या गोष्टींनी भरलेल्या लेखाचा यूरीविरुद्ध लिहिणारे व बोलणारे सर्व टीकाकार नंतरच्या काळात सतत उल्लेख करीत आले असून त्याच्या खरेपणाची कोणीही कधी साधी चौकशीही केलेली नाही ! मग खात्री करून घेण्याचे बाजूलाच राहिले. **Nature** सारख्या आंतरराष्ट्रीय कीर्तीच्या मातब्बर मासिकात प्रसिद्ध झालेल्या यूरीवरील वैज्ञानिकांच्या निष्कर्षावर व प्रयोगावर विश्वास न ठेवता इस्त्रायलमधील एका अप्रसिद्ध साप्ताहिकातील *एका अनामिकाने लिहिलेल्या आधारहीन* लेखावर विश्वास ठेवून रँडिसारखे जे यूरीविरूद्ध अपप्रचार करतात त्यांच्या अंतस्थ हेतूविषयी अधिक लिहिण्याची काही जरूरी आहे असे वाटत नाही.

जादूगारांचा धंदा फसवणूक व लबाडी करून त्यावर पोट भरणे हा असल्याने त्यांना असे खोट्याचे समर्थन करण्यामध्ये काहीच वाटत नाही, हे खरे असले तरी त्यांची व त्यांच्या पुस्तकांची भलावण बुद्धिवाद्यांनी विज्ञानाच्या नावावर करावी याचे कोणालाही आश्चर्य वाटेल. त्यामुळे या बुद्धिवादाचा विज्ञानवाद कितपत प्रामाणिक आहे याविषयी संशय निर्माण झाला तर तो वावगा म्हणता येणार नाही. असा संशय ज्यांच्याविषयी साधार निर्माण झालेला आहे असे कांही मोजके लोक असून ते आपले खरे स्वरूप फार दिवस लपवू शकलेले नाहीत. अमेरिकेतील या लोकांनी 'सायकॉप' CSICOP- (Committee for the Scientific Investigaation of Claims of the Paranormal = अतींद्रिय शक्तीच्या दाव्याचे वैज्ञानिक संशोधन करणारी समिती) या नावाची समिती स्थापन केली असून त्या समितीचे खरे स्वरूप वैज्ञानिक संशोधनाऐवजी दुसरेच काही

आहे, हे आता लपून राहिलेले नाही. ही सायकॉप समिती American Humanist Association चे अपत्य असून त्याचे **The Humanist** नावाचे मुखपत्र प्रसिद्ध होत असते. या मुखपत्राचा उद्देश मार्क्सवादी भौतिकवादाचा उघड-उघड प्रचार करणे हा असून अतींद्रिय संशोधनातून- गूढवादातून -हिटलर व मुसोलिनी यांचा नाझीवाद व फॅसीवाद उदयाला आले आहेत व येतात असा त्यांच्या संस्थापक विचारवंतांचा दावा आहे ![३४] या मुखपत्राने उघडपणे सर्व धर्मावर हल्ला केला असून जे. बी. ऱ्हाईन या शास्त्रज्ञाच्या ड्यूक युनिव्हर्सिटीतील परामानशास्त्र विभागाचा उल्लेख 'वांशिकवादाची अतिवैज्ञानिक संस्था' असा केला आहे.[३५] मानवतावादाच्या नावाखाली मार्क्सवादी तत्त्वज्ञानाचा राजकीय थाटात प्रचार व प्रसार करणाऱ्या या लोकांकडून वैज्ञानिक सत्याच्या पुरस्काराची अपेक्षा करणे व्यर्थ आहे हे स्पष्ट आहे. या संघटनेची चाल ओळखून काहींनी 'सायकॉप' मधून आपले अंग काढून घेतले असून त्यामध्ये एरिक जे. डिंगवाल, रिचर्ड कॅम्मन, डेनिस रॉलिन्स, मार्सेली टुझी या प्रमुख, क्रियाशील व प्रभावी सभासदांचा समावेश होतो.

या वैज्ञानिक लोकांचा दृष्टिकोण कितपत वैज्ञानिक आहे याचे प्रत्यंतर स्टॅनफोर्ड रिसर्च इन्सिट्यूट (संक्षिप्तात SRI) येथे लेसर शास्त्रज्ञ हॅरॉल्ड पुथॉप व रसेल टार्ग यांच्या युरीवरील प्रयोगांचा अभ्यास न करता किंवा त्याकडे दुर्लक्ष करून त्यांची खोटे शास्त्रज्ञ म्हणून त्यांनी जी वासलात लावली आहे त्यावरून येईल. अशी वासलात त्यांनी कशाच्या आधारावर लावली? तर एकाने बऱ्याच वर्षांपूर्वी सायन्टॉलॉजीचे प्रशिक्षण घेतले होते म्हणून व दुसऱ्याचे वडील ज्योतिषशास्त्रावरील पुस्तके विकत होते म्हणून ![३६]

या लोकांनी रँडीच्या **Film-Flam** नावाच्या पुस्तकाचीही भलावण केली आहे. या पुस्तकात रँडीने पुथॉप व टार्ग या शास्त्रज्ञांनी SRI (स्टॅनफोर्ड रिसर्च इन्स्टिटयूट) मध्ये १९७२ साली युरीवर प्रयोग करून Experiments With Uri Geller नावाच्या त्या प्रयोगावर आधारित जो चित्रपट (व्हीडिओ फिल्म) तयार केला आहे, त्यात त्या फिल्मचा फोटोग्राफर झेवस प्रेसमन याला न कळवता त्या दोघांनी बऱ्याच दुरुस्त्या केल्या आहेत, काही बाबतीत प्रेसमननेही संगनमत केले आहे, इत्यादी आरोप केले आहेत. हे आरोप बिनबुडाचे आहेत, मला न कळवता त्यांनी कसल्याही दुरुस्त्या केलेल्या नाहीत, असे प्रेसमनने लगेच एक जाहीर निवेदन काढले. नंतर पुन्हा दुसरे एक निवेदन काढले. या पुस्तकाची दुसरी आवृत्ती १९८२ साली प्रसिद्ध झाली! तरी या दोन्ही जाहीर निवेदनांचा त्यात रँडीने उल्लेखही केलेला नाही !

## यूरीविरुद्ध अमेरिकेत शिकार-मोहीम (Witch-Hunt)

एखाद्या आपणाला न आवडणाऱ्या किंवा नको असलेल्या गोष्टीविरूद्ध सत्य

असत्याचा विचार न करता किंवा न्याय-अन्याय याची तमा न बाळगता आघाडी उघडून तिला नेस्तनाबूत करणे याला इंग्रजीत Witch-Hunt (शिकार मोहीम) म्हणतात. (यूरोप-अमेरिकेत अनेक स्त्री पुरूषांना ते चेटूक करतात या सदराखाली सत्यस्थिती न जाणाता अशा प्रकारे जिवंत जाळण्यात आले आहे.) यूरीविरुद्धच्या या बुद्धिवाद्यांच्या मोहिमेला हेच नाव शोभते. १९७० साली इस्त्रायलमध्ये आयटन आयालोन व इतर जादूगारांनी 'हाओलम हाझे' या साप्ताहिकाच्या मदतीने यूरीविरुद्ध अशी शिकार मोहीम उघडली होती, हे वर सांगितलेच आहे. १९७२ साली यूरीने अमेरिकेत पाऊल ठेवताच जेम्स रँडी व त्याच्या सहकाऱ्यांनी 'टाईम' मासिकाच्या सहकार्याने अशीच शिकार-मोहीम उघडल्याचे आढळून येते. SRI येते पुथॉप व टार्ग यांनी यूरीवरील आपल्या प्रयोगाविषयीचे शास्त्रीय संशोधन प्रसिद्ध करण्यापूर्वीच त्याला सुरुंग लावण्यासाठी त्याविषयी अमेरिकेच्या संरक्षण विभागातर्फे रे हायमन या मानसशास्त्रज्ञाने तयार केलेले एक इतिवृत्त हायमनची परवानगी न घेता हस्तगत करून, तसेच पुथॉप व टार्ग यांचे एक खासगी पत्रही हस्तगत करून, त्याचा अनधिकृत वापर करून, लिओन जॅरॉफ याने 'टाईम' मासिकाच्या १२ मार्च १९७३ च्या अंकात यूरीविरुद्ध तो खोटा आहे, असा निष्कर्ष काढणारा-The Magician and the Think - tank हा लेख लिहिला. यूरीचे प्रयोग पाहणे बाजूलाच राहिले, *त्याची प्रत्यक्ष भेट होण्यापूर्वीच तो खोटा आहे असा निष्कर्ष काढणे,* हे कोणत्या वैज्ञानिक दृष्टिकोणात बसते? (यूरीला भेटण्यापूर्वीच जॅरॉफ्ने तो खोटा असल्याबद्दल पैज लावली होती, असे 'टाईम' चा वार्ताहर व **The Search for Superman** (1976) या ग्रंथाचा लेखक जॉन विल्हेल्म याने म्हटले आहे.) जेम्स रँडी, मार्टिन गार्डनर व लिओन जॅरॉफ् या (अतींद्रिय शक्तीविरुद्ध 'प्रचंड बुद्धिहीन पूर्वग्रह' असलेल्या) लोकांची यूरीविरुद्ध एक साखळी तयार झाली होती, असे विल्हेल्म या 'टाईम' च्या वार्ताहराने म्हटले आहे. अमेरिकेतील यूरी विरुद्धच्या शिकार-मोहिमेचे हे तिघेच जनक होते व ही मोहीम यशस्वी करण्यासाठी ते वाटेल ती खालची पातळी गाठायला तयार होते, याचे प्रत्यंतर रँडीच्या 'प्रोजेक्ट अल्फा' वरून कोणालाही येईल. या प्रोजेक्टचा उद्देश परामानसशास्त्रीय संशोधन करणाऱ्या शास्त्रज्ञांच्या प्रयोगशाळेत स्वत:चे हस्तक घुसवून आपण अतींद्रिय घटना घडवू शकत असल्याचे खोटेच भासवून हातचलाखीने त्यांना फसविणे व 'हे परामानसशास्त्रज्ञ किती भोळे आहेत! यूरी सारखा चलाख जादूगार त्यांना अशा रीतीने सहज फसवू शकतो !' हे जगाला दाखवून देणे हा होता. आणि प्रत्यक्षात रँडीने अशा प्रकारे दोघा जादूगारांमार्फत जेम्स मॅक्डॉनेल याने पुरवलेल्या भांडवलावर चाललेल्या परामानसशास्त्रीय संशोधन कार्यक्रमाचा फज्जा उडविला. त्याला प्रत्युत्तर म्हणून *डेनिस स्टिलिंग्ज याने स्वत: रँडीला व जॅरॉफ्ला 'आर्कॅयूस प्रोजेक्ट' च्या नावाखाली फसविले*

*आणि जगाला दाखवून दिले की जगाला फसवणाऱ्या या जादूगारांनाही फसविणे किती सोपे आहे !* अशा गोष्टीतून काय निष्पन्न होते? कोणालाही फसवता येते हेच! पण सबंध जगाला जरी फसवता आले तरी त्यावरून जग हे फसवणुकीवर चालले आहे, असे सिद्ध होत नाही, कारण निसर्ग कोणालाही फसवत नाही, *आणि तो कोणालाही फसवत नाही, हे फसवणुकीने सिद्ध होत नाही, तर निसर्गाचे पूर्वग्रह दोषविरहित दृष्टिकोनातून संशोधन करूनच ते सिद्ध होणार आहे.* निसर्ग फसवत नाही, याचा अर्थ निसर्गात चमत्कार नाहीत, असा करूनही किंवा असे अगोदर ठरवूनही ते सिद्ध होणार नाही. अगोदरच एखादी गोष्ट गृहीत धरणे हे वैज्ञानिक संशोधन वृत्तीला मुळीच धरून नाही. पण या उपर्युक्त जादूगारांनी असे ठामपणे गृहीत धरले असल्याचे स्पष्ट दिसून येते. नाहीतर ते यूरीची तपासणी करण्यापूर्वी, किंबहुना त्याला भेटण्यापुर्वीही तो खोटा आहे असे ठरविले नसते, किंवा त्याच्यावर दोघा शास्त्रज्ञांनी केलेल्या प्रयोगांना व त्यावरून काढलेल्या अनुकूल निष्कर्षांना सुरुंग लावण्यासाठी यूरी खोटा असल्याचा स्वत:चा निराधार निष्कर्ष काढणारा लेख घाईने प्रसिद्ध केला नसता.

अतींद्रिय सामर्थ्याचा दावा करणाऱ्याची परीक्षा शास्त्रज्ञांनी घेऊन उपयोगाचे नाही, जादूगारांनीच त्याची परीक्षा घेतली पाहिजे, कारण त्यांनाच फसवणुकीच्या सर्व क्लृप्त्या माहीत असतात, असे नेहमी बुद्धिवाद्यांकडून सांगितले जाते. *रँडीने यूरीचे प्रयोग पाहिले आहेत. तरीही तो कोठे व कशी फसवणूक (हातचलाखी) करतो हे रँडीला सांगता आलेले नाही.* यूरी एक अत्यंत हुशार जादूगार असून सुरेख पद्धत अवलंबतो असे मोघम विधान करून तो मोकळा होतो.[३७] मार्टिन गार्डनर म्हणतो की, यूरी काटे-चमचे वाकविण्यासाठी, बंद पडलेली घड्याळे सुरू करण्यासाठी किंवा होकायंत्राची सुई हालवण्यासाठी एखादे गुप्त साधन (लोहचुंबक ) तळहातात, डोक्यातील केसात किंवा तोंडात निश्चितपणे लपवीत असतो. बॉब मॅकिल्स्टर या न्यूयॉर्कच्या जादूगाराने म्हणे घड्याळाचे काटे हालवून वेळ बदलताना यूरीच्या तळहातात एकदा लोहचुंबक पाहिले आहे.[३८] अशी मोघम विधाने केवळ लोकांचा बुद्धिभेद करण्यासाठीच हे बुद्धिवादी करीत असतात. डोक्यातील केसात लपवलेले लोहचुंबक असेल तर डोके होकायंत्राजवळ न्यावे लागेल. पण डोके होकायंत्राजवळ न नेता यूरीने होकायंत्राची सुई हालवून दाखविली आहे, त्याची उपपत्ती हे 'गुप्त साधन'वाले कशी लावणार आहेत? आपल्या तोंडात खोटे दात व त्यात गुप्त साधन बसवून त्याद्वारा टेलिपथीचे (मनातील विचार ओळखण्याचे) प्रयोग शिपीच्या सहाय्याने यूरी करतो, असा आरोप झाल्यावरून न्यूयॉर्कमध्ये यूरीचे दात दंतवैद्याकडून एकदा तपासण्यात आले. पण स्वाभाविक दाताशिवाय काहीच आढळले नाही. यूरी तळहातात लोहचुंबक लपवतो, असा हे लोक आरोप करतात. तो ते कसे

लपवितो हा प्रश्न बाजूला ठेवला, तरी गणकयंत्राच्या पडद्यावरील हालणारे चित्र त्यामुळे कसे थांबविता येते हे सांगण्याचे हे लोक सोयीस्करपणे टाळतात. किंवा तसे स्वत:करून दाखवत नाहीत. बियांना अल्पावधीत अंकुर फुटण्यास लावणे, हे कोणते 'गुप्त साधन' वापरून शक्य आहे, हेही सांगण्याचे ते टाळतात.

*यूरीची लिऑन लेस्ली, विल्यम कॉक्स, अॅब डिक्सन आणि आर्टर झोर्का या चार जादूगारांनी आपल्याच अटीखाली परीक्षा घेतली असून त्या सर्वांनी यूरी हातचलाखीने काही करीत नाही, हे मोकळेपणाने मान्य केले आहे.* हे जादूगार सामान्य जादूगार नाहीत. विल्यम कॉक्स हा अमेरिकन जादूगार संघाचा चाळीस वर्षाचा अनुभव असलेला असोशिएट सभासद आहे. झोर्काला Magician of the Year (हा किताब आहे) निवडण्यात आले आहे. लेस्ली डेन्मार्कच्या नॅशनल म्युझियमचा 'जादू' या विषयावरील सल्लागार आहे. या जादूगारांनी यूरीची परीक्षा घेतली, तेव्हा शिपी (ज्याच्यावर तो यूरीला गुप्तपणे मदत करतो असा आरोप आहे) यूरीजवळ नव्हता हे लक्षात ठेवले पाहिजे. डिक्सन या जादूगाराने यूरीचे प्रयोग पाहून खूश होवून यूरीला पत्र लिहिले आणि त्याच्यावरील भावी नियंत्रित प्रयोगात त्याच्याशी सहकार्य करण्याचे आश्वासन दिले. यूरीला विरोध करणारे प्रसिद्धी मिळविण्यासाठीच तो करतात, याची आपणाला आता खात्री झाल्याचेही त्याने त्या पत्रात म्हटले आहे. यूरीला विरोध करून वादळ निर्माण करणे हे आपल्या फायद्याचे आहे, त्यामुळे आपली पुस्तके भरपूर खपतात, हे रँडीने पूर्ण ओळखले आहे आणि म्हणूनच यूरीविरुद्ध आघाडी उघडली आहे, असे याविषयी झोर्का या जादूगाराने म्हटले आहे.[३९] खोटे लिहिल्याशिवाय वाद निर्माण होत नाही. रँडी किती खोटे लिहितो, हे दाखवून देण्यासाठी झोर्काने उपर्युक्त चार जादूगारांच्या यूरीवरील प्रयोगाविषयी रँडीने जे निवेदन केले आहे, यातील एकोणीस ओळीत नऊ खोट्या गोष्टी (Errors of Fact) लिहिल्या असल्याचे म्हटले आहे. स्वत: रँडीनेच १ जुलै १९८२ च्या PM Magazine च्या दूरदर्शनावरील कार्यक्रमात आपण खोटे बोलणारे आणि फसवणारे आहोत, किंबहुना नाटक करणारे एक पात्र आहोत आणि मनोरंजन करणे हे आपले ध्येय आहे, अशी स्वत:ची ओळख करून दिली आहे.[४०] रँडीच्या जादूप्रमाणेच त्याची पुस्तकेही केवळ करमणुकीसाठी (आणि रँडीच्या फायद्यासाठी) आहेत, वैज्ञानिक सत्य-प्रस्थापन करण्यासाठी नाहीत, हे यावरून स्पष्ट आहे.

यूरीची चार जादूगारांनी परीक्षा घेतल्याचे प्रसिद्ध होऊन चार वर्षे उलटल्यानंतरही (**Geller Papers** मध्ये या चार जादूगारांचे निबंधही प्रसिद्ध झाले होते) **The Time** ने यूरीची अजून कोणत्याही जादूगाराने तपासणी केलेली नसल्याचे एक पत्र छापले. याला काय म्हणावे? पण यूरी अशा असत्य प्रचाराला आणि त्याला संपविण्याचा विडा

उचललेल्या लोकांनाही पुरून उरला आहे. याचे कारण यूरी भोंदू नाही हेच आहे आणि यूरी भोंदू नाही, खरा आहे हे सिद्ध करण्यासाठी यूरीचे प्रयोगच पाहिले पाहिजेत असे नाही. पुढील गोष्टीवरूनही हे सिद्ध होऊ शकते. या गोष्टी अशा :

१) दहा वर्षापूर्वी यूरी खोटा आहे असे म्हणून ज्यांनी त्याच्याविरुद्ध मोहीम उघडली होती, त्यांनी दहावर्षानंतर यूरी परत इस्रायलमध्ये आल्यानंतर त्याचे प्रयोग प्रत्यक्ष पाहून तो खरा असल्याचे व आपली दिशाभूल झाल्याचे प्रांजळपणे मान्य केले. (यात जादूगारही होते.)

२) कोणत्याही जादूगाराला यूरी फसवणूक करतो हे सिद्ध करता आलेले नाही. तो प्रेक्षकांचे लक्ष विचलित करतो असा मोघम आरोप करण्यापलीकडे यूरीविरुद्ध त्यांच्याजवळ कसलाच पुरावा नाही. (कांही चमत्कारामध्ये तर -उदा. गणकयंत्रात बदल करणे, मनातील विचार ओळखणे इत्यादी - लक्ष विचलित करण्याचा प्रश्नही उपस्थित होत नाही.)

३) त्याची कसोशीने तपासणी करणाऱ्या सर्व वैज्ञानिकांच्या परीक्षेला तो उतरला आहे.

४) यूरी करीत असलेले चमत्कार इतर लोकही, किंबहुना लहान मुलेही करू शकत असल्याचे आढळून आले आहे.(आणि लेस्ली या जादूगाराच्या मुलाने यूरीप्रमाणे जेव्हा चमचे वाकवून दाखवले, इतकेच नव्हे तर गायगर काऊंटरमध्येसुद्धा जेव्हा बदल करून दाखवले तेव्हा त्याचा यूरी विषयीचा उरलासुरला संशयही नाहीसा झाला.)

५) यूरी जे चमत्कार करतो ते करण्यास कोणालाही शिकता येते. (आणि जॅक हाउक, थेल्मा मॉस आणि एल्डन बायर्ड यांनी ते कसे करता येतात हे सप्रयोग दाखवून दिले आहे. अशा रीतीने यूरी खरा की खोटा याचा कोणालाही स्वत:च पडताळा पाहता येतो. मात्र त्यासाठी काही लोकांचा समूह असणे आवश्यक असून त्याला PK पार्टी हे नाव देण्यात आले आहे. अशा अनेक पार्ट्या घेऊन काटे चमचे तर आपले विद्यार्थी वाकवतातच, पण बियाना अंकुरसुद्धा फुटावयास लावतात असे हाउक या अभियंत्याने दाखवून दिले आहे.)

६) भानामती जर खरी असेल तर यूरी खरा ठरतो आणि भानामती हा प्रकार खरा असल्याचे अनेक शास्त्रज्ञांनी पुराव्यानिशी सिद्ध केले आहे.[४१] (यूरीच्या सान्निध्यामुळेही भानामती सदृश घटना घडल्या आहेत.)

वरील अप्रत्यक्ष पुराव्याशिवाय स्वत: यूरीच्या प्रयोगाचे प्रत्यक्ष पुरावे आहेत ते वेगळेच. हे सर्व पुरावे यूरी खरा असल्याचे दाखवून देतात. या पुराव्याच्या एकदशांश क्वचित एकशतांश पुरावेसुद्धा विज्ञानात स्वीकारले जातात आणि त्यावर आधारलेला

सिद्धांत खरा म्हणून मान्यता पावतो. (उदा. आईन्स्टाईनच्या प्रसिद्ध सामान्य सापेक्षता सिद्धांताला हाताच्या बोटावर मोजण्याइतकेसुध्दा पुरावे उपलब्ध नाहीत.[४२]) अतींद्रिय क्षेत्रात कितीही सज्जड पुरावे उपलब्ध असले तरी त्या घटना खऱ्या म्हणून स्वीकारल्या जात नाहीत. *उलट त्या खोट्या ठरविण्यासाठी खोटेपणाचाही अवलंब केला जातो!* आश्चर्य म्हणजे विज्ञान-मासिकाकडूनही हे कधी कधी केले जाते. उदाहरणार्थ : **New Scientist** च्या २० नोव्हेंबर १९७४ च्या अंकात ब्रेंडन ओरिगन याने लिहिले आहे की, त्या मासिकाच्या १७ ऑक्टोबरच्या अंकात यूरी गेलरवर जो लेख प्रसिद्ध झाला आहे, त्यामध्ये बेचाळीस चुकीची विधाने करण्यात आली आहेत. *या बेचाळीस चुकीच्या विधानांपैकी सतरा धादांत खोटी विधाने (Blatant Errors of Fact) आहेत, आणि बाकीची निराधार व वस्तुस्थितीची विपर्यास करणारी आहेत.* खास विज्ञान विषयाला वाहिलेल्या मासिकाची ही कथा ! मग इतर गल्लाभरू मासिकाविषयी बोलायलाच नको. उदाहरणार्थ, **Readers Digest** ने **Mysteries of the Unexplained** नावाचे पुस्तक प्रसिद्ध केले असून त्यात 'यूरीचे चमत्कार लबाडीचे आहेत, हे आता बहुतेक प्रस्थापित झाले आहे.' असे विधान केल्याचे आढळते. हे विधान जादूगारांना प्रमाण मानून केलेले असून त्याला आधार मिलबोर्न ख्रिस्टोफर या जादूगाराचा 'यूरी तळहातात लोहचुंबक लपवतो' हा बिनबुडाचा आरोप आहे. शास्त्रज्ञांनी यूरीवर चिकित्सक प्रयोग करून काढलेले निष्कर्ष प्रमाण मानण्याऐवजी फसवणूक व खोटे बोलणे हा ज्यांचा धंदा आहे, अशा जादूगारांचे यूरीचे प्रयोग न पाहता बनवलेले मत प्रमाण मानून असे लेख व पुस्तके विज्ञानाच्या नावाखाली लिहिली जावीत, याचे कोणालाही आश्चर्य वाटेल आणि दु:खही होईल. विज्ञानात आघाडीवर असलेल्या पाश्चात्य देशांची ही कथा, तर मग आपल्याकडे काय परिस्थिती असेल याची कल्पनाच केलेली बरी! नमुन्यादाखल काही उदाहरणे देतो.

## अंधश्रद्धा निर्मूलनवादी आणि सत्यशोधन

महाराष्ट्रातील लोणावळ्याच्या 'रेस्ट न्यू वे' मध्ये झालेल्या एका चर्चेत अंधश्रद्धा निर्मूलन समितीच्या दोन प्रतिनिधींनी (जे अतींद्रिय शक्ती अस्तित्वात नाही, फसवणुकीने तिचा आभास निर्माण करण्यात येतो, असे मानतात.) पुढील दोन विधाने केल्याचे प्रसिद्ध झाले आहे. (ही विधाने टेप करण्यात आली आहेत.)

१) डॉ. वाल्टर हेस हा शास्त्रज्ञ माणसाचे मन इंजेक्शन देऊन कायमचे बदलतो.

२) वरील शोधासाठीच हेस याला नोबेल पारितोषिक मिळाले आहे. ही दोन्ही विधाने धादांत खोटी असून 'स्वायत्त मज्जासंस्थेच्या मध्यविभाग व अंतस्थ केंद्रे यांच्यातील

कार्यकारी संबंध' याविषयीचे प्रयोगात्मक संशोधन केल्याबद्दल हेसला नोबेल पारितोषिक मिळाले आहे. आपली विधाने खरी असल्याचे साधार सिद्ध करून दाखवल्यास एक लाख रूपयांचे बक्षिस देण्याचे 'रेस्ट न्यू वे' चे कार्यकारी सचिव श्री. पुरोहित यांनी दै. 'तरुण भारत' मधून ही विधाने करणाऱ्या डॉ. नरेंद्र दाभोळकरांना जाहीर अभिवचन दिले होते. पण परिणाम एवढाच झाला की (पुरोहितांच्या शब्दांत) 'सतत खोटे सांगून दाभोळकरांनी स्वत:चाच अपमान करून' घेतला.[४३]

डॉ. हेस हा स्वित्झरलंडचा- म्हणजे फार दूरचा – शास्त्रज्ञ म्हणून त्याच्याविषयी काहीही लिहिले तरी खपेल, अशा कल्पनेने ती विधाने त्यांनी केली असावीत, असे म्हणावे तर आपल्याच देशातील पण दुसऱ्या राज्यातील वैज्ञानिक संशोधनाविषयीही हे लोक बेधडक खोटी विधाने करतात असे आढळून येते. उदा. १९८६ च्या ऑगस्टमध्ये साताऱ्यास योजण्यात आलेल्या सौ. शरयू सहस्रबुद्धे (सांगली ) यांच्या भाषणाचे वेळी अंधश्रद्धानिर्मूलन समितीने काढलेल्या पत्रकात पुढील दोन विधाने आहेत. ''पुनर्जन्म ही गोष्ट विज्ञानाने पूर्णत: नाशाबीत झालेली आहे... राजस्थान विद्यापीठाने संशोधन करूनही हाच निष्कर्ष काढला आहे,'' यापैकी पहिले विधान या लोकांचे अज्ञान प्रकट करते किंवा ते जाणूनबुजून खोटे लिहितात असे तरी दाखवून देते. दुसऱ्या विधानाची खात्री करून घ्यावी म्हणून पुण्याचे परामानशास्त्रज्ञ प्रा. व. वि. अकोलकर यांनी राजस्थानचे पुनर्जन्मविषयक संशोधक प्रा. कीर्तिस्वरूप रावत यांना व्यक्तिगत पत्र लिहून यासंबंधी विचारणा केली. त्यांनी अकोलकरांना १३-१२-८६ रोजी लिहिलेल्या पत्रात म्हटले आहे "So far as research done by Rajasthan University is concerned, it is entirely wrong to say that it had ever concluded that re-incarnation is disproved. Anybody making such a statement is either a knave or a fool." म्हणजे असे विधान करणारा एक तर लुच्चा (बदमाष) किंवा मूर्ख असला पाहिजे असे रावत यांनी म्हटले आहे.

कदाचित राजस्थान हे परकीय-लांबचे -राज्य समजून त्याविषयी काहीही लिहिले तरी खपेल, अशा कल्पनेने त्यांनी असे लिहिले असावे असे म्हणावे तर आपल्याच राज्यातील प्रसिद्ध व्यक्तीबद्दलसुद्धा हे लोक धडधडीत खोटी विधाने करतात असे आढळून येते. उदा. 'शोध भानामतीचा' या आपल्या पुस्तकात त्याचे लेखक व अंधश्रद्धा निर्मूलन समितीचे कार्यकर्ते श्री. श्याम मानव पृष्ठ १२ वर लिहितात. ''काही दिवसानंतर 'श्री' साप्ताहिकात डॉ. वर्तकांचा एक लेख छापून आला... त्या लेखात डॉ. वर्तकांनी लिहिलं होतं, डॉ. अब्राहम कोवूर खोटे बोलतात. भूत या जगात नसतं असं सांगतात. पण प्रत्यक्षात ते स्वत:च फार मोठे मांत्रिक आहेत. त्यांना केवळ १०० भुतं वश आहेत. त्या मानाने डॉ. वर्तक कमी प्रतीचे मंत्रिक आहेत. त्यांनी केवळ ५० भुतं

वश केली असल्यामुळं त्यांना डॉ. कोवूरांना धडा शिकवता आला नाही. डॉ. वर्तकांनी आपली ५० भुतं डॉ. कोवूरांवर पाठवली होती. पण १०० भुतांचे स्वामी असणाऱ्या डॉ. कोवूरांवर काहीच परिणाम झाला नाही. ती आपलं काम न करताच परत आली. या पद्धतीचा काहीसा तो लेख होता."

याविषयी खात्री करून घ्यावी म्हणून मी डॉ. प. वि. वर्तकांना यासंबंधी पत्र लिहून विचारणा केली. त्यांनी मला लिहिलेल्या ४-७-१९८८ च्या पत्रात म्हटले आहे. "मी ठामपणे सत्यप्रतिज्ञेवर सांगतो की 'शोध भानामतीचा' या पुस्तकात श्याम मानव लिहितात, तसा लेख मी 'श्री' साप्ताहिकात किंवा अन्यत्र कोठेही केव्हाही लिहिलेला नाही. अश प्रकारचा उल्लेखही माझ्यासंबंधी 'श्री' साप्ताहिकात नाही, हेही मी निश्चितपणे सांगतो. मीच तसा लेख 'श्री' मध्ये लिहिलेला आहे असे मानव लिहितात. मी तसा लेख लिहिलेला नाही, हे पुन्हा एकदा सांगतो. हे सांगणे - लिहिणेही विचारपूर्वक केलेले आहे. आपण या माझ्या विधानांचा योग्य तो उपयोग करून घ्यावा."[४४]

कदाचित संबंध नसलेल्या अपरिचित व्यक्तीबद्दल खोटे लिहिले तर खपेल या कल्पनेतून असे लिहिलेले असावे, असे म्हणावे तर जिच्याशी आपला संबंध आला आहे, अशा व्यक्तीबद्दलही विपर्यस्त विधाने करण्यास हे लोक मागेपुढे पहात नाहीत असे दिसून येते. उदा. १९८३ साली हस्तस्पर्शाने वस्तू गोड करण्याच्या सामर्थ्याबद्दल प्रसिद्ध झालेल्या भानुदास गायकवाड नावाच्या व्यक्तीची प्रा. व. वि. अकोलकर यांनी नियंत्रित परिस्थितीत तपासणी करून हा प्रकार खरा असल्याचे जाहीर केल्यानंतर अंधश्रद्धा निर्मूलन समितीच्या डॉ. दाभोळकरांनी आपण होऊन अकोलकरांना पत्र लिहून पुण्यात त्यांची मुद्दाम भेट घेतली व संयुक्तरीत्या सत्याशोधन करू या असे त्यांना सुचविले. दिल्लीच्या श्रीराम रिसर्च इन्स्टिट्यूटकडे दुसऱ्यांच्या सॅंपलवर न विसंबता स्वत: घेतलेले (भानुदासाच्या हाताचे) पाण्याचे सॅंपल पाठविण्याचेही अकोलकरांच्या घरी ठरले. याला पुरावा त्यांचे १७ मे १९८३ चे अकोलकरांना लिहिलेले पत्र आणि २३ मे रोजी अकोलकरांच्या घरी बेडेकरांच्या उपस्थितीत झालेली भेट, असे असताना आपल्या 'भ्रम आणि निरास' नावाच्या पुस्तकात (आपण प्रथम अकोलकरांना पत्र लिहिले हे लपवून) अकोलकरांचेच प्रथम आपणाला पत्र आले असे सुचविणारे वाक्य लिहिले आहे. (पृ.१०२) आणि स्वत: यातून अंग काढून घेऊन अकोलकरांनीच यातून अंग काढून घेतले असेही लिहिले आहे. (पृ. १०३) अकोलकरांनी काही दाभोळकरांना भेटीस बोलावले नव्हते. असे असताना त्यांच्या घरी आपण होऊन जाऊन त्यांना संयुक्तरीत्या सत्यशोधन करूया असे आश्वासन देऊन नंतर कोणा तिऱ्हाईताने पाठवलेल्या (कोणत्या संस्थेस हे सांगितलेले नाही) पाण्याच्या सॅंपलमध्ये सॅकरीन सापडले म्हणून

आता मला त्याची (संयुक्त सत्यशोधनाची) गरज नाही (पृ. १३) असे म्हणणे ही कुठली नीती ? असे प्रा. अकोलकरांनी यासंबंधी मला लिहिलेल्या सविस्तर पत्रात विचारले आहे. भानुदासाच्या हाताच्या पाण्याच्या सँपलमध्ये सॅकरीन आढळले,असे दाभोळकर म्हणतात. हे विधान धादांत खोटे असावे असा संशय निर्माण करणारी गोष्ट म्हणजे श्रीराम रिसर्च इन्स्टिट्यूटला पाण्याचे सँपल पाठविताना करावयाच्या ''पत्रव्यवहारात पूर्वीच्या analysis बाबत कोणत्याच संदर्भात उल्लेख करू नये'' असे २ जून ८३ च्या अकोलकरांना लिहिलेल्या पत्रात दाभोळकर आवर्जून लिहितात. यावर अकोलकरांचा प्रश्न असा की, पूर्वी सँपल दिल्लीस तपासले होते असे दाभोळकर प्रसिद्ध करतात, तर मग त्याबाबतचा पत्रात उल्लेख का करू नये? कारण हे सँपल तपासलेच नसावे हेच असावे! *भानुदासाच्या हातच्या पाण्याच्या सँपलमध्ये सॅकरीन आहे, (व म्हणून त्यात हातचलाखी आहे) हे सिद्ध होण्यासाठी ज्यांनी त्याची नियंत्रित परिस्थितीत तपासणी केली व हा प्रकार हातचलाखीचा नसल्याचा निष्कर्ष काढला, त्यांनी घेतलेल्या नियंत्रित परिस्थितीतील सँपलमध्ये सॅकरीन असल्याचे दाखवून द्यावे लागेल.* **तसेच कोणत्या संस्थेला वा व्यक्तीला हे सॅकरीन आढळले, त्या संस्थेचे वा व्यक्तीचे नाव जाहीर करावयास नको काय?** केवळ दाभोळकर म्हणतात म्हणून त्यात सॅकरीन आहे असे ठरत नाही. या प्रकरणाचा दाभोळकर एकतर्फी निकाल लावतात, यावरून यात पाणी मुरते असेच कोणीही म्हणेल. शिवाय हे लोक खरे बोलण्याबद्दल प्रसिद्ध नाहीत हे यांच्या इतिहासावरून दिसून येते - नव्हे , खोटे बोलणे हाच यांचा इतिहास आहे.

अशा रीतीने आपण प्रथम पत्र लिहून अकोलकरांचे प्रथम पत्र आले असे सुचविणे, संयुक्तपणे सत्यशोधन करू या असे अकोलकरांना आश्वासन देऊन त्याची मला गरज नाही असे नंतर म्हणणे व अशा रीतीने स्वत: अंग काढून घेऊन अकोलकरांनीच अंग काढून घेतले असे जाहीर करणे, कोणत्या संस्थेने सॅकरीन आढळल्याचे सिद्ध केले हे न सांगताच असा रिपोर्ट आला असे म्हणून व तो अधिकृत मानून प्रकरण निकालात काढणे, पुन्हा सँपल पाठवताना पूर्वीच्या analysis चा उल्लेख करू नये, असे सुचविणे या सर्व गोष्टी 'खोटे सुचविणे आणि खरे लपविणे' (Suggestio Falsi and Suppressio Veri) याप्रकारात मोडतात, हे कोणालाही सहज कळण्यासारखे आहे. *सत्याला सामोरे जाण्यास हे लोक भितात,* ही गोष्ट सौ. अनुराधाबाईंच्या विभूती चमत्काराच्या प्रकरणानेही सिद्ध झाली आहे. 'सौ. अनुराधाबाईंच्या विभूती-चमत्कारामुळे अंधश्रध्दा निर्मूलनवादाची इतिश्री' या माझ्या 'पैलतीर'च्या १९८८ च्या दिवाळी अंकात प्रसिध्द झालेल्या लेखासंबंधी ''पैलतीर'' चे संपादक प्रा. कृष्णा गुरव यांनी दाभोळकरांशी पत्रव्यवहार करून या लेखावर आपले म्हणणे कळवावे असे १५-११-१९८८ रोजी जे रजिस्टर्ड ए.

डी. पत्र लिहिले होते, *त्याला आजतागायत उत्तर नाही,* यावरूनही हेच सिद्ध होते. या लोकांना सत्यशोधन करायचे नाही, ही गोष्ट ज्या अनुराधाबाई जाहीर प्रयोग करण्यास पुढे येत नाहीत, असे नेहमी त्यांच्यावर दाभोळकर आरोप करतात, त्या अनुराधाबाईंनी त्यांना खासगी दूताकरवी मसलेचौधरीला आपला जाहीर विभूति चमत्कार *आपल्याच अटीखाली* पाहण्यास लेखी आमंत्रण दिले असतानाही ते गेले नाहीत, यावरून सिद्ध होतेच, पण त्या अनुराधाबाई स्वत: दाभोळकरांच्या घरासमोरील सप्रे यांच्या 'संदीप' बंगल्यात आर. एस. इनामदार यांच्या विनंतीवरून दि. ३१-१२-१९८८ रोजी हा विभूतिचमत्कार करून दाखवत असताना तो पाहण्यास या डॉ. दाभोळकरांचे पेशंट गेले, पण ते स्वत: गेले नाहीत, यावरूनही हे सिद्ध होते. अमुक चमत्कार अशक्य आहे असे जी व्यक्ती मानते व तो चमत्कार करून दाखवण्याचे आव्हान देते, ती व्यक्ती हे पाहण्यास सुद्धा जात नाही, त्या व्यक्तीला अंधश्रद्धानिर्मूलनाचे कार्य करण्याचा काय अधिकार आहे? अशी व्यक्ती दिल्लीला पाण्याचे सँपल पाठवून सत्यशोधन करण्याची तसदी घेईल यावर कोण विश्वास ठेवील ?

अशा रीतीने मस्तिष्कशास्त्रासारखा महत्वाच्या शास्त्रशाखेत (इंजेक्शन देऊन मन बदलण्यासारखे) न लागलले शोध लागले आहेत, इतकेच नव्हे तर त्याबद्दल एका शास्त्रज्ञाला नोबेल पारितोषिक मिळाले आहे असे खोटेच ठोकून देणे, जे शाबित झालेले आहे.( उदा. पुनर्जन्म) ते झालेले नाही असे म्हणणे व तसे एका युनिव्हर्सिटीने सिद्ध केले आहे असे खोटेच सांगणे, एखाद्या प्रसिद्ध व्यक्तीने अमुक लेख लिहिला आहे असे तो लिहिलेला नसताना म्हणणे, व त्या व्यक्तीने (तिने न लिहिलेल्या लेखात) अमुक विधाने (भुते वश करण्यासारखी गंभीर स्वरूपाची) केली आहेत असे ठोकून देणे, एखाद्या प्रसिद्ध व्यक्तीला संयुक्तपणे सत्यशोधन करू या असे आपण होऊन तिच्या घरी जाऊन आश्वासन देणे व नंतर आपणच अंग काढून घेऊन त्या व्यक्तीनेच अंग काढून घेतले असे जाहीर करणे - अशा गोष्टी जे लोक करू शकतात त्यांच्या बुद्धिवादाचा व विज्ञानवादाचा दर्जा काय असेल याची कोणालाही कल्पना करता येण्यासारखी आहे. महाराष्ट्रातील या लोकांचे या बाबतीतील वर्तन व वर दिलेले टेड सिरिओस आणि यूरी गेलरविषयी पाश्चात्य देशात आढळून येत असलेले काही लोकांचे वर्तन 'बुद्धिवाद' हा देशांच्या सीमा जाणत नाही, सर्व जगातील बुद्धिवाद्यांची जातकुळी एकच आहे, हे सिद्ध करते. हातचलाखी व बुद्धिचलाखी हे या लोकांचे नैपुण्यक्षेत्र (Specialisation) असून या हस्तलाघवाने व बुद्धिलाघवाने लोकांचे मनोरंजन करणे हा त्यांचा स्वेच्छेने स्वीकारलेला धंदा व छंद आहे, वैज्ञानिक सत्य शोधणे हा त्यांचा प्रांत नव्हे, हेही यावरून स्पष्ट होते. म्हणून सत्यप्रेमी, जिज्ञासू तसेच विज्ञानपद्धतीवर विश्वास असणाऱ्या चिकित्सक वाचकांनी या लोकांची

पुस्तके वैज्ञानिक सत्य जाणण्यासाठी वाचू नयेत, असे म्हणावे लागते. या लोकांची कोणतीही विधाने विश्वासार्ह नसतात हे अनेकदा सिद्ध झालेले असले तरी *त्यांची पुस्तके वाचणारा वाचकवर्ग सामान्य बुद्धिमत्तेचा -विशेष अभ्यास व स्वतंत्र विचारशक्ती नसलेला* असल्यामुळे ती विधाने खरी म्हणून खपतात याचेच दु:ख होते. त्यामुळे गैरसमज दूर करणे हा एक खास उद्योग होऊन बसला आहे. त्यामुळे या अतींद्रिय शक्तीचे स्वरूप समजून घेण्याचा प्रयत्न करण्याऐवजी तिचे अस्तित्व सिद्ध करण्यातच परामानसशास्त्रज्ञांची शक्ती व वेळ खर्ची पडत आहेत.

## अतींद्रिय शक्तिप्रदर्शनाच्या अपयशाची मीमांसा

या शक्तीचे अस्तित्व नाकारण्यासाठी या शक्तीच्या प्रदर्शनातील एका अडचणीचा पूर्वग्रहदूषित (म्हणून अशास्त्रीय) दृष्टिकोण बाळगणारे हे बुद्धिवादी नेहमी फायदा उठवत असल्याचे आढळून येतात. ही अडचण म्हणजे अतींद्रिय शक्तीची निसर्गदत्त देणगी असलेल्या लोकांच्या हातून नेहमीच हटकून अतींद्रिय शक्तीचे प्रदर्शन केवळ मनाच्या माध्यमातून होते हे आहे. आणि मन हे कोणत्याही नियमात कधीच बसत नाही ही वास्तुस्थिती आहे. (येथे 'कोणत्याही नियमात' याचा अर्थ कोणत्याही व्यक्तीच्या बंधनात असा करावयाचा आहे. मन हे स्वतंत्र व स्वयंभू 'तत्त्व' असून त्याचे स्वत:चे 'स्वतंत्र' नियम आहेत. ते अतींद्रिय स्तरावर कार्य करतात.) ज्याप्रमाणे एखाद्या व्यक्तीला 'तू अमक्या व्यक्तीच्या प्रेमात अमक्या वेळी पड' अशी आज्ञा करणे प्रेमाचे मानसशास्त्र समजत नसल्याचे लक्षण आहे, त्याप्रमाणे एखाद्या अतींद्रिय शक्ती प्राप्त झालेल्या व्यक्तीला तिचे प्रदर्शन हुकूमाने कर असे सांगणे हे अतींद्रिय (परा) मानसशास्त्र समजत नसल्याचे लक्षण आहे. जसे एखाद्या व्यक्तीवरील प्रेम केवळ खुल्या वातावरणातच स्वयंस्फूर्तीनेच प्रकट होणे शक्य आहे, त्याप्रमाणे ही शक्तिही खुल्या वातावरणातच स्वयंस्फूर्तीनेच प्रकट होणे शक्य आहे. (म्हणूनच स्वयंस्फूर्तीने - spontaneous - घडणारे भानामतीसारखे प्रकार नजरेत भरण्याइतके व्यापक व जास्त परिणामकारक असतात.) [४५] दडपणाखाली ही शक्ती अदृश्य होते, व प्रकटली तरी हिणकस ठरते असा अनुभव आहे. (याला Shyness Effect- या शक्तीचा लाजाळूपणा -असे संबोधले जाते.) विरोधी विचारांच्या व्यक्तींच्या सान्निध्यांत, संशयवाद्यांच्या उपस्थितीत ती अनेकदा अदृश्य होण्याचे हेच कारण आहे. तसेच प्रयोगकर्त्यांच्या या अतींद्रियशक्तीच्या अस्तित्वावर विश्वास आहे की नाही, असेल तर किती आहे, यावरही पुष्कळदा प्रयुक्ताचे अतींद्रियशक्तीचे प्रदर्शन अवलंबून असल्याचे अनेक संशोधकांना याविषयी खास योजलेल्या प्रयोगावरून आढळून आले आहे. [४६] म्हणून या शक्तीच्या प्रदर्शनासाठी अनुकूल वातावरण निर्माण करण्याची आवश्यकता असते. ही शक्ती खोटी आहे, यात फसवणूक आहे असे आव्हान देऊन

तिची परीक्षा घेतली तर ती हमखास अदृश्य होते असे आढळून येते. ही गोष्ट माहीत असल्यामुळेच बुद्धिवादी व संशयवादी तिला आव्हान देतात व बक्षीस जाहीर करतात. उदा. आयर्विंग बिशप हा बंद लखोट्यातील वस्तू ओळखण्यासाठी प्रसिद्ध होता. अशा असंख्य बंद लखोट्यातील लिखाण, आकडे इत्यादी त्याने ओळखले होते. पण हे थोतांड आहे, असे लॅबावचेरे याने जाहीर केले व बिशपला आव्हान दिले की, "बँक ऑफ इंग्लंडचा एक मोठ्या रकमेचा चेक मी बंद लखोट्यात घातलेला असून तो किती आकड्याचा आहे हे ओळखून ती रक्कम बक्षीस म्हणून बिशपने घ्यावी" बिशपने अनेकदा प्रयत्न केला, पण त्याला तो आकडा ओळखता आला नाही. बक्षीस नसलेले इतर चेक यापूर्वी व या नंतरही त्याने अगणित वेळा ओळखले, पण लॅबॉवचेरेचा चेक मात्र त्याला कधीच ओळखता आला नाही. टी. जे. हडसन या लेखकाने **The Law of Psychic Phenomena** या आपल्या ग्रंथात Effects of Adverse Suggestion (विरोधी सूचनेचे परिणाम) या नावाचे एक खास प्रकरण यासाठी लिहिले असून त्यात असली उदाहरणे दिली आहेत. प्रयोगाच्या वेळी हजर असलेल्या प्रेक्षकांच्या (विरोधी) विचारांचा संसर्ग अतींद्रिय शक्तीचे प्रदर्शन करणाऱ्यांना नेहमी त्रासदायक ठरत असतो, आणि त्यामुळे नेमके काय घडून येणार आहे हे कोणालाच सांगता येणार नाही. अनिश्चितता हाच मग या शक्तिप्रदर्शनाचा नियम बनतो. अनिश्चितता हा नियम कसा होऊ शकेल असा प्रश्न काहीना पडेल. पण उत्क्रांतीची प्रक्रिया पहिली तर हाच कसा नियम बनला आहे हे कळते. उदा. भौतशास्त्र, जीवशास्त्र, मानसशास्त्र (मानसोपचारशास्त्र) आणि परामानसशास्त्र अशा चढत्या भाजणीने जड आणि जीव जगतात वैविध्यशीलता (Variability) व त्या प्रमाणात अनिश्चितता वाढत गेल्याचे आढळून येत असून उत्क्रांतीच्या वरच्या टप्प्यात अशा प्रकारची अनिश्चितता असणे हाच एक निसर्गनियम आहे असे त्यावरून ठरते.* ठराविक कार्याचा ठराविक परिणाम (Law of Uniformity) हा भौतिकशास्त्रातील नियम असून तो जीवशास्त्रात थोडा बदलतो, (उदा. आनुवंशिक बदल Genetic Variability) मानसशास्त्रात तो जास्त बदलतो. (उदा. मानसिक वैविध्यशीलता- Mental Variability) तर परमानसशास्त्रात तो संपूर्ण बदलतो व

---

* सूक्ष्म भौतशास्त्रात (Sub-atomic physics) सुध्दा अनिश्चितता असून ती 'हायजेनबर्गचे अनिश्चिततेचे तत्त्व' (Heisenberg's Uncertainty Principle) या नावाने प्रसिध्द आहे. पण स्थूल भौतशास्त्रात त्या अनिश्चिततेचे निश्चिततेमध्ये (Law मध्ये) रूपांतर झाले असून ते कसे झाले याचे कोडे भौतशास्त्रज्ञांना आजतागायत सुटलेले नाही. **विज्ञान आणि चमत्कार** पाहा.

अनिश्चितता असणे (Unpredictability) हाच एक तेथे नियम बनतो. म्हणूनच परामानसशास्त्रात भौतिकशास्त्राप्रमाणे पुनरावर्ती (Repeatable) प्रयोग अशक्य ठरतात.* जेथे काही भौतिक नियम नाही हाच नियम आहे, तेथे -म्हणजे अभौतिक क्षेत्रात- कसला पुनरावर्ती प्रयोग करणार? एखाद्या वेड्याशी सुसंवाद साधणे एकवेळ शक्य होईल, पण अतींद्रिय शक्तीशी सुसंवाद साधणे कठीण आहे, असे एका संशोधकाने याच कारणासाठी म्हटलेले आहे.[४७]

अशाही परिस्थितीत काही अतींद्रिय शक्तीची निसर्गदत्त देणगी असलेल्या व्यक्ती या शक्तीचे प्रदर्शन हुकुमाने करतात हे एक मोठेच आश्चर्य असून मन जसे अभ्यासाने ताब्यात ठेवणे शक्य आहे (**अभ्यासेन तु कौंतेय वैराग्येन च गृह्यते ।** *गीता* ६/३५.) तसे ही शक्तीही अभ्यासाने व निसर्गदत्त देणगीमुळे काही अंशी ताब्यात ठेवता येते असे त्यावरून ठरते. अशा रीतीने हुकुमाने न चुकता अतींद्रिय शक्तीचे (उदा. दूरस्थ वस्तुज्ञानाचे) प्रदर्शन एडगर केयसी करीत असे. परकीय आत्म्याचा (वा देवतेचा) सहभाग (कायाप्रवेश) असेल तरीही हे शक्तिप्रदर्शन न चुकता करता येत असावे, असे अनुराधाबाई देशमुखांच्या विभूतीचमत्कारावरून दिसून येते. कारण त्यांचा हा चमत्कार कधीही चुकलेला अगर अपयशी ठरलेला नाही. (सत्य साईबाबांच्या चमत्कारांबद्दलही असेच म्हणता येईल.)

अतींद्रिय शक्तीच्या प्रदर्शनाच्या अपयशापाठीमागील जी कारणमीमांसा वर दिली आहे ती समजावून न घेता अशा अपयशाच्या आधारे ती शक्ती खोटी म्हणून तिचे अस्तित्वच नाकारणे, कसे अवैज्ञानिकपणाचे आहे हे यावरून वाचकांच्या लक्षात येईल. हेही पुरेसे नाही असे वाटून की काय अतींद्रिय शक्तीची देणगी असलेल्यांची व तिचे संशोधन करणाऱ्यांची टर उडविणे हाही एक धंदा ही शक्ती नाकारण्याच्या प्रयत्नातील एक भाग म्हणून तिचे विरोधक करीत असतात. या बाबतीत मार्टिन गार्डनर ('सायंटिफिक अमेरिकन' मासिकाचा स्तंभ लेखक) याचा हात धरणारा कोणी नाही. त्याने अतींद्रिय शक्तीवर चटकन विश्वास ठेवणे हा एक रोग आहे असे म्हणून त्याला शीघ्र अतींद्रिय -वीर्यपतन रोग (Premature Psi Ejaculation) असे नाव दिले आहे! अतींद्रिय शक्तीवरील विश्वासाचे

---

* वास्तविक सूक्ष्म (अणु) भौतशास्त्रातसुध्दा ते अशक्यच आहेत. या विषयी प्रसिध्द ब्रिटिश अणुभौतशास्त्रज्ञ P. A. M. Dirac म्हणतो, " When an observation is made on any atomic system that has been prepared in a given way and is thus in a given state, the result will not in general be determinate, i. e. if the experiment is repeated serveral times under identical condtions several different results may be obtained." P. A. M. Dirac quoted in **New Background of Science**- J. Jeans.

वीर्यस्खलनाशी तुलनेच्या दृष्टीने काही साम्य नसताना ते कल्पिणे ही गोष्ट निव्वळ टवाळखोरी वृत्ती दर्शविते. हुदिनी या जादूगाराचा गुप्त संदेश (जो त्याने मृत्यूपूर्वी फक्त आपल्या बायकोलाच सांगून ठेवला होता व ज्याचा मरणोत्तर आत्म्याचे अस्तित्व सिद्ध करण्यासाठी उपयोग व्हावा हा उद्देश होता) तो गुप्त संदेश -हुदिनीच्या आत्म्याकडून त्याच्या पत्नीला बरोबर सांगणारा आर्थर फोर्ड हा माध्यम समलिंगी संबंध करणारा होता असा त्याच्यावर आरोप करणे, साध्या चाकूने शस्त्रक्रिया करून हजारो रुग्णांना बरे करण्याबद्दल प्रसिद्ध असणारा ब्राझिलचा खेडुत ऑरिगो 'पीत' होता असा उल्लेख करणे, त्याचे चरित्र लिहिणाऱ्या फुलरने एका तरुण स्त्रीशी दुसरे लग्न केल्याचे सांगणे- अशा सारख्या गोष्टी -ज्यांचा अतींद्रिय शक्ती खरी की खोटी याबाबतच्या संशोधनाशी काही संबंध नाही- लिहिण्यामध्ये लेखकाचा हेतू शुद्ध नाही हे स्पष्ट आहे. अशा अश्लाघ्य प्रयत्नाने -म्हणजे बदनामी करून -एखाद्या व्यक्तीची अतींद्रिय शक्ती खोटी ठरवू पाहणे -याला दुसरे कोणतेही नाव देता येईल पण- याला वैज्ञानिक दृष्टी म्हणता येणार नाही हे स्पष्ट आहे. अतींद्रिय विषयावरील पुस्तकांचे परीक्षण करण्याचे काम मार्टिन गार्डनसारख्या धंदेवाईक टवाळखोराला Scientific American हे मासिक देत असल्यामुळे या विषयाचा धसका या मासिकाने घेतला आहे असे ठरते, असे जे. बी. ऱ्हाईन या प्रसिद्ध परामानसशास्त्रज्ञाने याच कारणासाठी म्हटले आहे. एखाद्या व्यक्तीच्या लैंगिक वर्तनाचा तिचा अतींद्रिय शक्तीवरील विश्वासाशी किंवा ती शक्ती खरी की खोटी या प्रश्नाशी काहीही संबंध नसताना तो (लैंगिक संबंध) सूचित करणे हे सत्यशोधन तर नव्हेच, पण तो अश्लाघ्य चारित्र्यहननाचा प्रयत्न आहे. अशा फालतू गोष्टी आणून एखादे सत्य प्रस्थापित होत असेल तर छ. शिवाजी महाराजांनी अनेक स्त्रियांशी लग्ने केली, या 'पुराव्या' च्या आधारे ते शूर नव्हते, हे 'सत्य' प्रस्थापित करता येईल ! एड मॉरेल हा तुरुंगातील एक कैदी (गुन्हेगार) होता. पण स्वत:चा देह सोडून फिरण्याचे त्याचे सामर्थ्य पुराव्यानिशी सिद्ध झाले आहे.[४८] तो गुन्हेगार होता *म्हणून* त्याचे हे सामर्थ्य खोटे ठरते, असे कोणी म्हणणार नाही.

## फसवणुकीच्या पलीकडे

कोणतीही अतींद्रिय घटना फसवणुकीने घडवून आणता येते, म्हणून एकही अतींद्रिय घटना खरी असू शकत नाही, असे काही म्हणता येत नाही, हे खरे असले तरी हे सिद्ध करण्यातील अडचण खरी आहे. दुसऱ्याच्या मनातील विचार ओळखण्यासारख्या-टेलिपथीच्या-प्रयोगातसुद्धा फसवणूक होऊ शकते-संगनमताचा आरोप होऊ शकतो. संगनमताच्या आरोपामुळे कोणतीही अतींद्रिय घटना खरी म्हणून सिद्ध होऊ शकत नाही. म्हणून दुसऱ्यांना अशा घटनांचे सत्यत्व सिद्ध करून दाखवण्यापेक्षा

स्वत: त्यांचा खरेखोटेपणा तपासून खात्री करून घेणे हाच सर्वात खात्रीचा व शास्त्रशुद्ध मार्ग दिसतो. *पण काहीजण स्वत:ची सुद्धा फसवणूक करतात* असे आढळून येते! अशा लोकात जसे बुद्धिवादी आहेत, तसे अतींद्रियवादीही आहेत. ही फसवणूक जाणूनबुजून होत नसल्यामुळे तिच्यापासून बचाव करणे कठीण असते. कधी कधी मनानेच स्वत:च्या बचावासाठी निर्माण केलेली ती फळी असते, आणि त्यामुळे ती भेदणे कठीण होऊन बसते. अशा मानसिक बचाव यंत्रणेचे बळी कमकुवत मनाचे लोकच ठरतात असे नसून मोठमोठे विचारवंत व शास्त्रज्ञही ठरू शकतात. शास्त्रज्ञही त्याचे बळी ठरतात, ही गोष्ट वैज्ञानिक पद्धतीचेसुद्धा या यंत्रणेपुढे काही चालत नाही हे सिद्ध करते. म्हणजे मोठमोठ्या शास्त्रज्ञात व विचारवंतामध्ये सुध्दा एखादा मानसिक कमकुवतपणा असतो, असे त्यावरून ठरते. हा कमकुवतपणा असणे हे दोषार्ह नसून तो आपल्यात आहे हे ओळखणे पण मान्य न करणे हे दोषार्ह आहे. ज्यांना तो (कमकुवतपणा) ओळखता येत नाही त्यांच्या विषयी अर्थात कोणीच काही करू शकत नाही. कारण तो एक प्रकारचा बौद्धिक वेडेपणा असतो. हे एका उदाहरणाने स्पष्ट करता येईल.

ज्या अतींद्रिय घटनेत फसवणूक, योगायोग वा भ्रम ही कारणे देता येत नाहीत, अशी घटना म्हणजे स्वप्नाची प्रचीती होय. अनेकांना भविष्यसूचक स्वप्ने पडतात किंवा स्वप्ने खरी ठरल्याचा अनेकांना अनुभव येतो. पण कार्ल सॅगन या प्रसिद्ध विज्ञान लेखकाने आपल्या **Broca's Brain** या ग्रंथात आपले एक स्वप्न खोटे ठरले असे सांगून अशा घटनांची वासलात 'थोतांड' म्हणून लावली आहे. हीच माहिती **Sceptical Inquirer** Vol. X. No. 3. 1986 मध्ये जशीच्या तशी पुनर्मुद्रित केली आहे. माणसाचे मन किती वैविध्यशील (Variable) आहे हे उत्क्रांतीचा व जीवशास्त्राचा अभ्यास न केलेल्या सामान्य बुध्दीच्या माणसालासुद्धा कळण्यासारखे आहे. कार्ल सॅगन हा तर शास्त्रज्ञ आहे. पण आपणाला जो अनुभव येत नाही, तो कोणालाही येणे शक्य नाही असा सामान्य निष्कर्ष (Generalisation) काढण्याचा बौद्धिक वेडेपणा तो करतो ते केवळ एकाच गृहीतकृत्याच्या आधारे. हे गृहीतकृत्य म्हणजे मन हे ठराविक कार्याचा ठराविक परिणाम (Law of Uniformity) हा भौतिकशास्त्रातील नियम काटेकोरपणे पाळणारे यंत्र आहे, म्हणजे ते वैविध्यशील नाही, तर यांत्रिकपणे भौतिक नियम पाळणारा तो एक मातीचा गोळा आहे. सॅगनला उत्क्रांती झाली हेच मान्य नसावे! किंवा उत्क्रांतीमध्ये वैविध्यशीलता वाढत गेली हे तरी मान्य नसावे. याला बुद्धिवाद म्हणता नाहीत, विज्ञानवाद तर मुळीच नाही. याला कमीत कमी अंधश्रध्दा व जास्तीत जास्त बौद्धिक वेडेपणा म्हणता येईल.

आपले स्वप्न खोटे ठरले या कारणासाठी कार्ल सॅगनला भविष्यसूचक स्वप्ने नाकारण्याची गरज वाटली. याच्या उलट जे. डब्ल्यू. डन या लेखकाला आपली अनेक

(भविष्यसूचक) स्वप्ने खरी ठरल्याचा अनुभव वरचेवर आल्यामुळे कालविषयक एक खास सिद्धांत मांडण्याची व त्यासाठी **An Experiment with Time** हा ग्रंथ लिहिण्याची गरज वाटली. [१९८० साली लंडन 'टाईम्स' ने केलेल्या एका पाहणीत ४२ टक्के लोकांना आपले एक तरी स्वप्न खरे झाल्याचा अनुभव आल्याचे आढळून आले आहे. भविष्यातील घटनांचे अतींद्रिय ज्ञान होणाऱ्या व्यक्तींपैकी ज्यांना ते ज्ञान स्वप्नात होते अशा लोकांचे प्रमाण ७५ टक्के असल्याचे लुइसा ऱ्हाइनने केलेल्या सर्वेक्षणात आढळून आले आहे. (**ESP in Life and Lab** - 1967. **The Invisible Picture** - 1981) ही गोष्ट माणसाचे मन किती वैविध्यशील असू शकते हे दाखवून देते. व्यावहारिक पातळीवर मनाच्या या वैविध्यशीलतेचा पुरावा म्हणजे मानसोपचारासाठी उदय पावलेल्या अनेक उपचार पध्दती होत.] आता प्रश्न असा आहे की; कार्ल सॅगन व जे. डब्ल्यू. डन या दोघांपैकी कोण बरोबर? व एकाने दुसऱ्यावर लबाडीचा आरोप करणे उचित होईल काय? मनाची वैविध्यशीलता ही वैज्ञानिक वस्तुस्थिती दृष्टीआड केली तर या दोघांपैकी प्रत्येकाने दुसऱ्याला लबाड म्हणण्याचा अनवस्थाप्रसंग निर्माण होतो. आपणच बरोबर असे म्हणण्याचा हेकेखोरपणाही त्यातून निर्माण होतो. कार्ल सॅगन असेच म्हणत आहे. (मला येणारा -स्वप्न खोटे ठरण्याचा -अनुभव सर्वांनाच आला पाहिजे, असे तो म्हणत आहे.) दु:खाची गोष्ट म्हणजे स्वत:ला विज्ञानवादी म्हणवून घेत असताना तो असे म्हणत आहे. हा वैज्ञानिक प्रमाद आपण करीत आहोत, हे त्याच्या लक्षात बुद्धिवादाचा कैफ चढल्यामुळे कदाचित येत नसेल. असे असेल तर ती त्याची आत्मवंचना ठरते. (शास्त्रज्ञातसुद्धा मनाचा कमकुवतपणा असू शकतो, असे मी वर याच कारणासाठी म्हटले आहे.) आणि त्याने जाणूनबूजून ही भूमिका स्वीकारली असेल, म्हणजे त्याचा हा धोरणात्मक पवित्रा असेल तर तो त्याचा अवैज्ञानिक हेकेखोरपणा आहे असे ठरते. दोन्ही दृष्टींनी त्याचे वर्तन अवैज्ञानिक आहे.

आत्मवंचनेपासून मुक्त असलेल्या एखाद्या व्यक्तीला वैयक्तिक पातळीवर येणाऱ्या 'फसवणुकीच्या पलीकडील' अतींद्रिय अनुभवांपैकी भविष्यसूचक स्वप्ने हे एक उदाहरण झाले. अशी वैयक्तिक पातळीवरील इतर उदाहरणे म्हणजे देह सोडण्याचा अनुभव (Out of Body Experience), मृत्यूसमयी पूर्वी मृत झालेल्या नातेवाईकांची होणारी भासमान दर्शने (Deathbed Visions), पूर्वजन्माच्या आठवणी, आगामी संकटांची पूर्वजाणीव, घनिष्ठपणे संबंधित असलेल्या व्यक्तिमधील भावनांची व विचारांची परस्परजाणीव (उदा. आई-मुलगा , गुरू- शिष्य , पति -पत्नी, इत्यादी), दूर अंतरावरील व्यक्तीच्या मृत्यूचे त्याच्या भासमान दर्शनाने होणारे ज्ञान, इत्यादी होत. हे अनुभव भ्रम (खोटे) की खरे हेही ज्याने त्याने अनुभवानेच (पडताळून) ठरवणे शक्य असल्यामुळे

ज्या त्या व्यक्तीच्या खात्रीचाच तो प्रश्न बनतो. म्हणून येथे फसवणुकीचा आरोप अप्रस्तुत ठरतो. ज्यांना असे अनुभव आलेले नाहीत, किंवा असे अनुभव कोणालाही येणे शक्य नाही असे (अन्य कारणासाठी) स्वत:चे मत ज्यांनी बनवले आहे, ते असे अनुभव येणाऱ्यावर आत्मवंचनेचा आरोप करू शकतात. पण हे अनुभव पडताळून पाहता येत असल्यामुळे म्हणजे ते खरे की खोटे हे प्रत्यक्ष ठरविता येत असल्यामुळे, त्याविषयी संशोधन न करताच एखादे 'मत' बनविणे हे अवैज्ञानिकपणाचे ठरते. हा विषय संशोधनाच्या योग्यतेचाही नाही, असे म्हणणेही पूर्वग्रहदूषित, आणि म्हणून अवैज्ञानिक दृष्टिकोण सूचित करते. ही गोष्ट ओळखूनच परामानसशास्त्राला (जे शास्त्र अशा अनुभवांचा व घटनांचा अभ्यास व संशोधन करते) खोटे विज्ञान म्हणून विरोध करणारे लोक अशा घटनाकडे दुर्लक्ष करतात, व फसवणूक जेथे शक्य आहे, अशा घटनावर आपले लक्ष केंद्रित करतात. अशारीतीने ते स्वत:ला व दुसऱ्यानाही फसविण्याचा प्रयत्न करीत असतात.

सार्वजनिकरीत्या घडणाऱ्या अतींद्रिय घटनावर नियंत्रण ठेवून फसवणूक अशक्य करण्याचा व त्याद्वारा त्या घटनांचे खरेपण सिद्ध करण्याचा शास्त्रज्ञांनी कितीही प्रयत्न केला तरी त्याविषयी बुद्धिवादी संशय व्यक्त करीत असतात. (भानामतीचे प्रकारसुद्धा खोटे- मुद्दाम घडवून आणलेले-असतात असे ते म्हणतात.) म्हणून जेथे फसवणुकीचा प्रश्नच उद्‌भवत नाही अशा घटनांकडे लक्ष वेधले पाहिजे. अशा घटनांमध्ये हस्तस्पर्शाने रोग बरा करणे व बोटाने वा चाकूने शस्त्रक्रिया करून एखाद्याचा शारीरिक विकार वा दोष नाहीसा करणे यांचा समावेश होतो. हे सामर्थ्य असलेल्या व्यक्तीही बऱ्याच असून काही शास्त्रज्ञांनी त्यांचा अभ्यास केला आहे. पण त्यांच्याकडे दुर्लक्ष करण्याचे धोरण बुद्धिवाद्यांनी जाणीवपूर्वक अवलंबिलेले दिसून येते. जमिनीखाली (अगर पाण्याखाली) स्वत:ला गाडून घेण्याच्या प्रकारातही फसवणूक अशक्य असून अशा लोकांचीही मुबलक उदाहरणे आहेत. (१९५१ साली कोल्हापूरच्या खासबाग मैदानात एका साधूने सर्व बाजूंनी सिमेंट काँक्रीटने बंद केलेल्या खड्ड्यात स्वत:ला तीन दिवस पुरून घेतल्याचे उदाहरण प्रसिध्द आहे. हा प्रयोग सार्वजनिकरीत्या झाला होता. हा साधू पुरून घेतेवेळी व बाहेर येतेवेळी प्रस्तुत लेखक तेथे हजर होता. ही घटना त्यावेळी वृत्तपत्रातूनही प्रसिद्ध झाली होती.) यात भौतिकशास्त्राला अज्ञात अशी काही शक्ती नाही हे सिद्ध करण्यासाठी हुदिनी स्वत:ला एका पेटीत सीलबंद करून पाण्याखाली एक तास (!) राहिला होता. पण 'त्याचा हा एक तासाचा पराक्रमसुद्धा खरा नाही, पाण्याबाहेरील व्यक्तीशी बोलण्यासाठी म्हणून बापरलेल्या टेलिफोनच्या पाईपमधून हुदिनीने ऑक्सिजन वापरला होता. म्हणजे ही जादूच होती.' असा त्याच्यावर आरोप करण्यात

आला होता. असा आरोप होताच टेलिफोन न वापरता (फार तर विजेची बेल वापरून) हुदिनीने आपले खरेपण सिद्ध करावयास पाहिजे होते. पण त्याने असे काही केलेले नाही ही गोष्ट अर्थपूर्ण आहे! जेम्स रँडीने हुदिनीचे रेकॉर्ड मोडले असून तो पाण्याखाली दोन तास राहू शकतो अशी मिलबोर्न ख्रिस्तोफर याने त्याची भलावण केली आहे.[१६] पण ५ नोव्हेंबर, १९७४ च्या **Toronto Sun** मध्ये रँडिला Sun च्या ऑफिसमधील तिजोरीतून ९ मिनिटे ३५ सेकांदानी बेशुद्ध बाहेर काढल्याची व तो मरता-मरता वाचल्याची बातमी 'सन'नेच प्रसिद्ध केली आहे. जो पाण्याखाली २ तास राहू शकतो, तो तिजोरीत १० मिनिटेसुद्धा राहू शकला नाही हे आश्चर्य नव्हे काय?

फसवणूक अशक्य असलेल्या सार्वजनिक प्रयोगात अंगात तीक्ष्ण शस्त्र खुपसून घेण्याच्या प्रकाराचाही समावेश होतो. हेही प्रकार आपल्याकडे मुबलक प्रमाणात आढळतात.सहनशीलतेचा पराक्रम म्हणून याची नेहमी वासलात लावली जात असली तरी ही उपपत्ती सर्वत्र लागू होत नाही. (पॉल ब्रन्टन याने आपल्या **A Search in Secret India** या ग्रंथात एका फकीराने आपले डोळे खोबणीतून बाहेर काढून परत खोबणीत बसवून दाखवल्याचे उदाहरण प्रत्यक्ष पाहिल्याचे -हे पाहताना आपल्या पोटात गलबलल्याचे -लिहिले आहे.) अलेक्झांडर कॅनन या लेखकाने **The Power Within** या ग्रंथात काही छायाचित्रे प्रसिध्द केली आहेत. एका छायाचित्रात (एक माणूस कसाबसा मावू शकेल इतक्या) अरूंद अर्धपारदर्शक काचेच्या पेटीत उभ्या असलेल्या माणसाच्या शरीरात सर्व बाजूंनी पेटीच्या बाजूना असलेल्या फटीतून अनेक सुरे खुपसलेले दाखवले असून एक मनुष्य त्या माणसाच्या डोक्यात वरच्या फटीतून दोन्ही हातानी एक सुरा प्रत्यक्ष खुपसत असल्याचे व तो सुरा त्याच्या डोक्यात अर्धा घुसल्याचे स्पष्ट दाखविले आहे. पेटीला समोर अर्धपारदर्शक काच बसवली असल्याने हे स्पष्ट दिसते. हा 'मास हिप्नॉटिझम' चा (नजरबंदीचा) प्रकार नाही, हे फोटोवरून सिद्ध होते, व छायाचित्रे ट्रिक -फोटोग्राफीने घेतलेली नाहीत, हे सिद्ध करण्यासाठी हे प्रयोग ज्या ठिकाणी झाले, त्या ठिकाणी प्रत्यक्ष हजर असलेल्या बातमीदारांनी दिलेल्या बातम्या ज्या वृत्तपत्रात प्रसिद्ध झाल्या होत्या, त्या वृत्तपत्रातील त्या बातम्यांचे तारखेसह उतारे त्यात प्रसिद्ध केले आहेत. हे प्रयोग सार्वजनिक ठिकाणी झालेले असल्यामुळे, म्हणजे अनेक लोक त्याचे साक्षीदार असल्यामुळे बातमीदार प्रयोगकर्त्यांच्या किंवा छायाचित्रकारांच्या कटात सामील झाल्याचा (संगनमताचा) आरोपही कोणी करू शकणार नाही. .

(साप्ताहिक 'सह्याद्री' ने आपल्या ३० जून १९८८ च्या अंकात Sunday मॅगेझीनवरून घेतलेले, डोक्यातून आरपार पाते घातलेल्या एका माणसाचे छायाचित्र छापले आहे. ते पाहिल्यानंतर त्यात ट्रिक फोटोग्राफी नाही याची कोणलाही खात्री पटते.

कारण जखमातून रक्त बाहेर आलेले दिसते.)

ही सर्व उदाहरणे कितीही नि:संदिग्ध असली तरी ती भूतकाळातील व दुसऱ्यांनी पाहिलेली वा नोंद केलेली असल्यामुळे ज्यांना स्वत:ची खात्री करून घ्यावयाची आहे, त्यांच्या दृष्टीने निरूपयोगी आहेत. विज्ञानाचे एक लक्षण प्रयोगशीलता आहे. शक्य तर हे प्रयोग पुनरावृत्तीचे- असावेत-मग ते प्रयोग निसर्गत:च का घडून येईनात. सूर्य व चंद्रग्रहणाचे प्रयोग असेच निसर्गत: घडून येतात (व अशाच एका सूर्यग्रहणाच्या प्रयोगात आईन्स्टाईनच्या सापेक्षता सिध्दांताचा पडताळा पाहण्यात आला.) अतींद्रिय घटनांचे असे प्रयोगात्मक निरीक्षण केव्हाही करता आले तर ती अतींद्रिय विज्ञानाच्या दृष्टीने किती उपकारक गोष्ट होईल! सुदैवाने आपल्या भारतात अशा प्रकारच्या निरीक्षणासाठी सूर्य-चंद्रगहणासारखे अतींद्रिय घटनांचे प्रयोग पर्वकाळी, विशिष्ट तिर्थींना दरवर्षी होत असतात. वृत्तपत्रातून त्याकडे बुद्धिवाद्यांचे लक्ष वेधले तरी तिकडे ते दुर्लक्ष करतात असा प्रस्तुत लेखकाचा अनुभव आहे. (म्हणूनच हे लोक सत्याला समोरे जाण्याला भितात, असा त्याने निष्कर्ष काढला आहे.) अशा तीन घटनांचा येथे उल्लेख करून बुद्धिवाद्यांनी त्याची खात्री करून घ्यावी असे पुन्हा आवाहन करतो.

पहिली घटना भेंडवाड या बेळगांव जिल्ह्यातील रायबाग तालुक्यातील गावची आहे. हा गाव चिकोडी रोडहून पूर्वेला ४ किलोमीटरवर असून ही घटना जेथे घडते, ते ठिकाण रामनकट्टी नावाच्या डोंगराळ भागातील एक मठ आहे. दर वर्षी चैत्र पाडव्याच्या दिवशी सकाळी साडेआठ वाजता शिजलेल्या गरम खिरीत मुतेप्पा खाडगोळ नावाचा ३८ वर्षे वयाचा मठातील मनुष्य अर्ध्या तासापर्यंत एक हात घालून ठेवतो व दुसऱ्या हाताने आशीर्वादाचे नारळ भक्तांना देतो. हात बाहेर काढल्यानंतर त्याच्या हाताला कसलीच इजा पोचलेली नसल्याचे कोणीही वाटेल तितका वेळ तपासणी करून खात्री करून घेऊ शकतो. हा प्रयोग नियंत्रित परिस्थितीत करण्यासही त्याची हरकत नसल्यामुळे येथे फसवणुकीची शक्यता नसल्याचीही खात्री करून घेता येते. 'कंट्रोल' म्हणून असा प्रयोग दुसरीकडे अशाच नेमक्या परिस्थितीखाली करून पाहूनही खात्री करून घेता येते.[४१] (गोकाक तालुक्यातील तवग गावीही हाच प्रकार करण्यात येतो. तवग हे पाच्छापूर स्टेशनहून सुमारे ३५ किलोमीटर अंतरावर आहे.)

दुसरी घटना गोकाक तालुक्यातील सुणधोळी गावची आहे. या गावात जडीसिद्धेश्वर नावाच्या सत्पुरुषाचे समाधीमंदिर (देऊळ) असून तेथे प्रत्येक वर्षाच्या चैत्र वद्य पंचमीच्या दिवशी संध्याकाळी सूर्यास्ताच्या वेळी चार दगडी चाके असलेला एक रथ केवळ आठ-दहा लोकांच्या अल्प प्रयत्नाने २०० फुटापर्यंत जातो व तसाच परत तितकेच अंतर येतो. ही चाके प्रत्येकी ५ फूट व्यासाची असून मध्यभागी त्यांची

जाडी १५ इंच व कडेला ७॥ इंच आहे. हा रथ दोरीलावून ओढत नाहीत. १८ फूट लांबीची एक तुळई रथाच्या मध्यभागी बांधतात. त्याचा पुढचा भाग केवळ दोन फूट रथाच्या बाहेर आलेला असतो व तो धरणारे लोक पुढे दोन-चार व पाठीमागे दोन-चार असतात. एवढ्या लोकांना हा रथ हालणेसुद्धा शक्य नाही. पण प्रारंभी एकदम तो वेग घेतो असे आढळून येते. (याची व्हिडीओ फिल्म प्रस्तुत लेखकाने घेतली आहे. ''वैज्ञानिकांनी शोध घ्यावा'' या मथळ्याखाली 'अनंतराव वामनाचार्य' या टोपण नावाखाली या चमत्काराची माहिती 'सकाळ'च्या ६-५-८७ च्या अंकात वाचकांची पत्रे या सदरात देऊनही हा प्रकार पाहण्यास कोणीच फिरकले नसल्याचे आढळून आले.)

तिसरी घटना - अथणी तालुक्यातील (जि. बेळगाव) मंगसूळी गावच्या मल्लय्याच्या देवळात वर्षाच्या प्रत्येक आश्विन शुद्ध दशमी व चैत्र शुद्ध दशमी या दोन तिथींना साखळदंड तोडण्याचा कार्यक्रम होतो. एक अशक्त व बुटका मनुष्य हा साखळदंड गळ्यात घालून अनिश्चित अशा काही हिसक्यात तोडतो. भीमकाय मनुष्य कितीही हिसके देत राहिला तरी तुटणार नाही इतका तो साखळदंड जाड आहे. हे कोणीही तेथे जाऊन प्रत्यक्ष पाहून खात्री करून घेऊ शकतो.

याशिवाय विस्तवावरून चालत जाण्याचे प्रकार तर भारतभर विशिष्ट काळी सर्वत्र होत असतात. पण बुद्धिवादी त्याची रूढ वैज्ञानिक उपपत्ती देऊन त्यात अभौतिक अगर अतींद्रिय काही नसल्याचे असे प्रयोग स्वत: करून दाखवून देत असतात. पण हा जनतेच्या डोळ्यात धूळ फेकण्याचा प्रकार असतो, हे ज्या परिस्थितीत ते हा प्रयोग करतात त्यावरून स्पष्ट दिसून येते. म्हणून १४९४ अंश फॅरेनहाइट इतक्या उष्णतेच्या इंगळावरून २५ फुटापर्यंत चालत (पळत नव्हे) जाऊन जागतिक दाखला प्रस्थापित केलेल्या १९८५ सालच्या गिनीज बुकमधील कोमारचे उदाहरण मी याच ग्रंथात दिलेले असून[५०] बुद्धिवाद्यांनी आपली 'रूढ वैज्ञानिक उपपत्ती' वापरून हा प्रयोग स्वत: करून दाखवायला काय हरकत आहे ? असा माझा त्यांना सवाल आहे.

वर उल्लेख केलेले दरवर्षी ठराविक तिथींना होणारे चमत्कार दैवी म्हणून संबोधले जात असले तरी त्यांची परामानसशास्त्रीय उपपत्ती देणे शक्य असून त्यात आढळून येणारी भक्ती व श्रद्धा या शेवटी मानसिक अवस्थाच असल्याने त्याचे कोणालाही आश्चर्य वाटणार नाही. (भक्ती व श्रद्धेने घडणाऱ्या अशा चमत्कारांच्या वैज्ञानिक उपपत्तीसाठी **विज्ञान आणि चमत्कार** हा प्रस्तुत लेखकाचा ग्रंथ पहावा.)

## समारोप

जीवनाच्या झगड्यात स्वत:ची बुद्धी वापरूनच मनुष्य यशस्वी झाला आहे,

आणि अशारीतीने यशस्वी होण्यासाठी बुध्दीची कास धरणे आवश्यक असून याला बुद्धिवाद म्हणायचे झाल्यास प्रत्येकजण बुद्धिवादी आहे आणि असणे आवश्यक आहे. पण विश्व बुद्धीलाच कळणे शक्य आहे, (बुद्धी याचा अर्थ तर्कबुध्दी) असे अगोदरच गृहीत धरून तिच्या मर्यादेतच ते समजून घेण्याचा प्रयत्न करणे, किंवा या तर्कबुद्धीला जे समजते तेच सत्य होय, दुसरे काही सत्य असूच शकत नाही, असे अगोदरच ठरवून संशोधनाची इतर द्वारे बंद करून टाकणे, याला बुद्धिवाद म्हणावयाचे झाल्यास ती एक अंधश्रद्धा पोसणारी व विज्ञान विरोधी वृत्ती व शक्ती ठरते. तिचे पोषण करणारे लोक स्वत:च एका खोट्या विज्ञानाचा प्रचार व प्रसार करीत असून खोटे विज्ञान म्हणून परामानसशास्त्राला त्यांचा होणारा कडवा विरोध हा खऱ्या वैज्ञानिक संशोधनालाच विरोध असून त्यामुळे त्यांच्या हातून विज्ञानाची मोठीच हानी होत आहे हे जितक्या लवकर त्यांच्या लक्षात येईल तितके बरे.

## टीप :

१. क्वॉंटम सिद्धांत अपूर्ण आहे असे समजले तर तो पूर्ण करण्यात भौतशास्त्रज्ञांना एकीकडे अपयश आल्यामुळे व दुसरीकडे तो पूर्ण आहे असे समजले तर विश्व गणिताने (बुद्धिवादाने) विज्ञानाला समजणे शक्य नाही असे ठरत असल्यामुळे वैज्ञानिकापुढे एक पेचप्रसंग निर्माण झाला आहे. त्यामुळे विज्ञानाला बुद्धिवादाने विश्लेषणपद्धतीने (Aalytically) विश्व समजणे, सत्य कळणे, शक्य नाही हे मान्य करावे लागत आहे. यातून मार्ग निघणे शक्य नाही काय? जरूर आहे. पण त्याचा स्वतंत्रपणे विचार करणे भाग आहे. (**विज्ञान आणि चमत्कार** हा ग्रंथ त्यासाठी पाहावा.)

## संदर्भ टिपा :

१. **Scientific Revolutions** -Ed. Ian Hacking (1985)

२. " Science is just one of the many ideologies that propel society and it should be treated as such." **Ibid.**

३. "Heretics in science are sill made to suffer from the *most severe sanctions* this relatively tolerant society has to offer." **Ibid** (Italics in the original)

४) येथे धर्म हा शब्द द्व्यर्थी वापरून गोंधळात अधिकच भर टाकण्यात आली आहे. एक: धर्म म्हणजे पंथ (Religion) आणि दुसरा : धर्म म्हणजे परमार्थाचा शोध. परमार्थाचा शोध हा कधीच पंथ (Religion) बनू शकत नाही.

५. प्रकरण ३ पाहा.

६. आईन्स्टाईन व बोहर याच्यामधील क्वॉंटम सिद्धांताविषयीचा हा वाद इतक्या

विकोपास गेला होता की त्यांच्यामध्ये शेवटी या मुद्यावरून वैयक्तिक बेबनाव निर्माण झाला! त्यांच्यात दिलजमाई घडवून आणण्यासाठी हर्मन वील या शास्त्रज्ञाने त्यांची एक खासगी बैठक बोलावली. पण व्यर्थ ! त्या बैठकीत ते दोघे एकमेकांशी बोललेसुद्धा नाहीत! गणित व तर्कशास्त्र ही साधने विश्व समजण्यास शास्त्रज्ञांना किती साहाय्यभूत ठरतात हे यावरून दिसून येते.

७. गणित (वा तर्कशास्त्र) ही विज्ञानाची भाषा भौतिक विश्व समजण्यास कशी अपुरी पडते, या भाषेने विश्व 'समजते'. असे समजणे, हाच कसा मूर्खपणा ठरतो यासंबंधीची चर्चा ए. कोर्झीब्स्की या तत्त्ववेत्याने आपल्या **Science and Sanity** (1950) या ग्रंथात केली आहे.

८. **Science** June 1982 **Ghost in the Atom** (1986) P.C. W. Davies and Brown.

९. प्रकाशापेक्षा जास्त वेगाने माहिती ज्या पद्धतीने संक्रमित होते त्या पद्धतीला विचारसंक्रमण (टेलिपथी ) म्हणतात. आईन्स्टाईनला मानवी मनाच्या बाबतीत टेलिपथीचे अस्तित्व मान्य होते. पण भौतिक विश्वात ते मान्य नव्हते ! मानवी मन भौतिक विश्वाचा एक भाग आहे, आणि निसर्गाला विश्वात असे कप्पे करणे मंजूर नाही, हा विचार आईन्स्टाईनला सुचला नाही, याचे कारण त्याच्या मनावरील प्रबळ बुद्धिवादाचा पगडा हे होय.(प्रकाशापेक्षा जास्त वेग सापेक्षता सिद्धांतानुसार शक्य नसल्याने, पण क्वाँटम सिद्धांत खरा ठरला असल्याने, 'टेलिपथी' चे अस्तित्व मानणे भौत विज्ञानाला भाग पडते. आईन्स्टाईनने आपल्या आत्मचरित्रात भौतशास्त्रीयदृष्ट्या सुद्धा 'टेलिपथी' ला मान्यता दिली असल्यामुळे बुद्धिवादाच्या मर्यादा भौतशास्त्रदृष्ट्या त्याला शेवटी मान्य कराव्या लागल्या असे म्हणता येईल. क्वाँटम सिद्धांताला ही अप्रत्यक्ष मान्यताच त्याने दिली असे ठरते. पाहा : **Autobiographical Notes** - A. Einstein- 1949.)

१०. **Science, Order and Creativity** -David Bohm and F. David Peat (1985).

११. विज्ञान पद्धतीविषयी अनेक सिध्दांत आहेत. कोणताही सिध्दांत स्वीकारला तरी वास्तवांचे विज्ञानातील अनन्यसाधारण महत्व आबाधित आहे. **Philosophies of Science** - Harre.1985

१२. न्यूटनच्या गुरूत्वाकर्षणाच्या नियमांचा अपुरेपणा दाखवणारा सापेक्षता सिद्धांत मांडणाऱ्या आईन्स्टाईनला सुद्धा तो सिद्धांत छपरावरून खाली पडणाऱ्या माणसाच्या काल्पनिक चित्रावरून सुचला ही वस्तुस्थिती असून 'ती माझ्या जीवनातील सर्वात आनंदी कल्पना' असे तिचे त्याने वर्णन केले आहे. इतकेच नव्हे तर "There are no logical paths to such natural Laws; only intuition can reach them." (असे नियम तर्कपद्धतीने सापडत नाहीत, केवळ ते स्फूर्तीनेच कळतात.) असे यासंबंधी त्याने विधान केले आहे (**Ideas and Opinions**) कार्ल पॉपरनेही म्हटले आहे की, ''प्रत्येक मोठा शोध अतार्किकतेवर किंवा उत्स्फूर्तपणावर

आधारलेला असतो." "Every great discovery contains an irrational element or a creative intuition". **Objective Knowledge** - by K. R. Popper.) डॉ. जयंत नारळीकर यांनीही आपणाला ३-४ वेळा अंत:स्फूर्तीने कल्पना सुचल्याचे एका मुलाखतीत मान्य केले आहे. (पुढारी १ एप्रिल १९९०)

१३. गणितातील सिद्धांतसुद्धा स्फूर्तीतून सुचतात व सिद्ध होतात. (पाहा: **The Psychology of Invention in the Mathematical Field.**- J. Hadamard -1945) यासंबंधी फ्रेडरिक कार्ल गॉस व हेन्री पॉयंकेरे यांची उदाहरणे पुराव्यादाखल देता येतील. गॉसला कोणतीही संख्या अविभाज्य संख्येच्या गुणाकाराने मिळविता येते, हे अशा रितीने उत्स्फूर्तपणे सुचले, तर पॉयंकेरेला भूमितीतील नॉन-युक्लीडीयन व फ्युक्शीयन गणिती प्रक्रियेतील तादात्म्य प्रवास करीत असताना एकदम सुचले. गणित हीच एक स्फूर्ती आहे असे एका गणिततज्ज्ञाने म्हटले आहे. (" Mathematics is a series of great intuitions." **Mathematics: The Loss of Certainty** - by M. Kline.)

१४. Mathematics and Metaphysicians, in **Mysticism and Logic** by Bertrand Russell.)

१५. असा एक शतप्रतिशत नसला तरी अतिरेकी संशयवादी इतिहासात होऊन गेला आणि अतिरेकी संशयवादामुळेच अक्षरश: खड्ड्यात गेला! त्याचा शिष्य इतिहासात जास्त प्रसिद्ध असून तो इ. स. पू. ३०० च्या सुमारास एलिस देशात होऊन गेला . त्याचे नाव पिरो (Pyrrho) असे होते. (इंग्रजीत त्याच्या नावावरूनच संशयवादाला पिरनीझम हे नाव प्राप्त झाले आहे.) एकदा त्याचा गुरू रस्त्याने जात असता खड्ड्यात पडला (बहुधा तो खड्डा नसावा या संशयाने!) आणि आपल्या शिष्याला वर काढण्यास विनवू लागला. पण शिष्य गुरूपेक्षाही कांकणभर जास्त संशयवादी असल्यामुळे गुरू खड्ड्यात पडला असावा काय? किंवा खड्ड्यात पडलेला आपला गुरूच असावा काय? किंवा खड्ड्यातील गुरू व खड्ड्याबाहेरील गुरू यापैकी कोणता गुरू चांगला? (म्हणजे खड्ड्यातून गुरूला बाहेर काढून उपयोग होईल काय?) याविषयी निश्चित पुरावा उपलब्ध नसल्यामुळे गुरूला खड्ड्यातून बाहेर न काढताच पिरो निघून गेला असे सांगतात! ही गोष्ट खरी असो अगर खोटी असो. संशयवाद नावाचे तत्त्वज्ञान मात्र खरे असून ते बरेच प्रतिष्ठित पावले आहे या विषयी संशय नाही. देकार्त या फ्रेंच तत्त्ववेत्त्याने संशयवादाला तत्त्वज्ञानात प्रथम प्रतिष्ठा मिळवून दिली. त्याने (विचार करणाऱ्या) माझ्याशिवाय जगात खरे काहीच नाही (Cogito ergo sum) असा निष्कर्ष काढला असून त्याचे हे म्हणणेही खरे नाही असा युक्तिवाद मूलगामी संशयवाद्यांनी केला आहे. पण मूलगामी (वा सार्वत्रिक-) (Universal) संशयवाद अर्थहीन ठरतो. कारण जगात काहीच खरे (Real) नसेल तर एखादी गोष्ट खोटी (Unreal) म्हणण्यालाही काही अर्थ नाही. कारण खोटे शेवटी खऱ्याशिवाय उभे राहू शकत नाही. तात्पर्य, संशयवादही खरा ठरत नाही. (I doubt that I doubt.)

१६. **Houdini -The Untold Story.** by Milbourne Christopher.

१७. **Proceedings of the society for Psychical Research** 1909, XXIII, 309, 569, Ref. Parapsychology and Physical Systems. **Handbook of Parapsychology**. Ed. B. Wolman.

१८. Psicologia "Spiritismo". E. Morselli. Ref. in Wolman, **op.cit.**

१९. एखाद्या मध्यमाने एखाद्या प्रयोगात कपटाचाअवलंब केल्याचे सिद्ध झाले तर त्याचे सर्वच प्रयोग कपटयुक्त व खोटे म्हणून धुडकावून लावणे कसे चुकीचे आहे, हे खुद्द शास्त्रज्ञसुद्धा आपल्या रूढ व नित्याच्या शास्त्रीय संशोधनात कित्येकदा कपटाचा अवलंब कसा करतात, हे दाखवून दिल्यास स्पष्ट होईल. जे. बी. वॅटसन या नोबेल पारितोषिक विजेत्या जैवरसायन शास्त्रज्ञाने म्हटले आहे की, आपल्या जैवरसायन शास्त्रात दरवर्षी जैवरसायन शास्त्रज्ञांची एक तरी लबाडी उघडकीस येते. शिवाय इतिहासात अशी अनेक उदाहरणे आढळतात. मेंडेलचे जननशास्त्रातील प्रसिद्ध आनुवंशिकतेविषयीचे नियम सर्वांना माहीत आहेत. पण मेंडेलने या बाबतीत लबाडी केली होती, हे फार थोड्यांना माहीत असेल. वाटाण्यातील प्रकट (Dominant) आणि सुप्त (Recessive) गुणांची मेंडेलने दिलेली प्रमाणाची आकडेवारी इतक्या कमी प्रयोगसंख्येच्या आधारे दिली आहे की, संभवशास्त्राच्या नियमानुसार ती खरी असणेच शक्य नाही. त्यात त्याने लबाडी केली हे सूर्यप्रकाशाइतके स्पष्ट आहे, हे फिशर या आकडेशास्त्रज्ञाने सप्रमाण दाखवून दिले आहे. इंग्लंडमध्ये डॉसन या प्राच्यवस्तुसंशोधकाला पिल्टडॉउन येथे 'सापडलेली' सर्वात प्राचीन मानवाची कवटी ही बनावट होती, हे नंतर पुराव्यानिशी सिद्ध झाले. कॅमरर या ऑस्ट्रियन जीवशास्त्रज्ञाने बेडकावरील प्रयोगाने उत्क्रांतीतील लामार्कवाद सिध्द होत असल्याचे दाखवून दिले. पण नंतर त्याच्या प्रयोगातील एका सहाय्यकाने (की स्वत: कॅमररने?) बेडकाच्या पुढील पायावरील लैंगिक कवच रंगवलेले होते. (अस्सल नव्हते.) हे जेव्हा आढळून आले, तेव्हा कॅमररने आत्महत्या केली. अगदी अलीकडचे उदाहरण म्हणजे जगप्रसिद्ध 'स्लोन -केटरिंग इन्स्टिट्यूट फॉर कॅन्सर रिसर्च' या न्यूयॉर्कच्या संस्थेचा प्रमुख वुइल्यम समरलिन याने एका प्राण्याचे दुसऱ्या प्राण्यावर केलेले त्वचारोपन यशस्वी झाल्याचा केलेला दावा होय. पण प्रत्यक्षात पांढऱ्या उंदरावर काळ्या उंदराच्या त्वचेचे आरोपण केले नव्हते, तर पांढरी त्वचाच काळ्या रंगाने रंगवली होती, आणि तीही खुद्द समरलिननेच !

२०. एस.जी. सोल या प्रसिद्ध गणितज्ज्ञ असलेल्या परामानसशास्त्रज्ञाने गोल्डनीबरोबर केलेले प्रसिद्ध प्रयोग विश्वासार्ह नसल्याचे, त्यात सोलने डमी आकडे घातल्याचे बेटी मार्कविक या स्त्री संशोधिकेने दाखवून दिले असून ("The Soal Goldney Experiment with Basil Shackle-ton; New Evidence of Data Manipulation". Proceedings of the Society for Psychical Research, Vol. 567, May 1978 PP. 250-277) या गोष्टीचा बुद्धिवादी बराच गाजावाजा करीत असतात. पण जे. जी. प्रॅट या परामानसशास्त्रज्ञाने हे एक्सपेरिमेंटर बायस (प्रयोगकर्त्याचा प्रयोगावरील परिणाम) याचे उदाहरण म्हणून कसे घेता

येते हे दाखवून दिले आहे. पण सोलने जाणूनबुजून फसवणूक केली असे गृहीत धरले, तरी सोलने आपल्या प्रयोगाने जे सिद्ध केल्याचा दावा केला (प्रिकॉग्निशन) ते खोटे ठरत नाही. कारण इतर अनेकांच्या अनेक प्रयोगातून ते सिद्ध झाले आहे. (प्रयोगकर्त्याचे प्रयुक्तावर व प्रयोगावर असे परिणाम होतात हे कळण्यासाठी पाहा: **Experimenter Effects in Behavioural Research** - R. Rosenthal, 1966).

२१. Milbourne Christopher, **op.cit.**

२२. **Houdini, The Magician Who Walked through Walls**-by Lindsy Gresham.

२३. हा अपवाद केंब्रिजच्या किंग्ज कॉलेजचा भौतशास्त्राचा प्राध्यापक जॉन टेलर याचा आहे. या प्राध्यापकाने **Superminds** नावाचा ग्रंथ १९७५ साली लिहिला असून त्यात यूरी गेलरवर प्रयोग केल्यानंतर त्याची अतींद्रिय शक्ती खरी असल्याची आपली खात्री झाल्याचे सांगितले, पण नंतर आपला पवित्रा बदलून विज्ञानाच्या कोणत्याही नियमात ही शक्ती बसत नाही असे कारण देऊन गेलरची शक्ती खोटी असल्याचे आपले मत बनल्याचे **Science and Supernatural** या आपल्या १९८० सालच्या ग्रंथात म्हटले आहे. अतींद्रिय शक्तीवर विश्वास ठेवल्याबद्दल त्याची टर उडविणाऱ्या मार्टिन गार्डनरने हे चुकलेले वासरू आपले मत बदलून परत आपल्या कळपात आल्याबद्दल आनंद व्यक्त केला आहे. ("The Extraordinary Mental Bending of professor Taylor": Martin Gardner in **Skeptcal Inquirer** Winter 1979-80 Reprint in **Science : Good, Bad and Bogus**-by M. Gardner). आपल्या अतींद्रिय शक्तीविषयक प्रयोगांना आपल्या सहकाऱ्यांकडून होत असलेल्या विरोधाला भिऊन आपण त्यांच्या म्हणण्याला मान तुकवली असा आपल्या बदललेल्या पवित्र्याचा अर्थ कोणी केला तर त्यात चूक नाही, हे त्याने मान्य केले असून आपण यूरीविषयी केलेले प्रयोग तितकेसे नियंत्रित नव्हते, हेच ही शक्ती खोटी मानण्याचे एक कारण टेलरने दिले आहे. पण याविषयी लायल वॅटसनने म्हटले आहे की, "It is clearly more politic to be seen gullible than to be unscientific." (आपण अवैज्ञानिक आहोत, हे कबूल करण्यापेक्षा कोणत्याही शास्त्रज्ञाला आपली फसगत झाली, हे कबूल करणे अधिक मुत्सद्देगिरीचे वाटते.) हे टेलरच्या मनोवृत्तीचे निदानच बरोबर वाटते. **(The Double Helix of the Mind** - by S. Gooch.)

२४. **In the Name of Science** - by M. Gardner, Putnam (1952) pp. 299-300. हे पुस्तक नंतर **Fads and Fallacies in the Name of Science** या मथळ्याखाली प्रसिद्ध झाले आहे.

२५. "A Skeptic view of Parapsychology". M. Gardner **Humanist**. Nov. Dec. 1977 Reprint in M. Gardner **op.cit.**

२६. Exploratory Investigations of the Psychic Photography of Ted Serios, **Journal of the American Society for Psychical Research**, 1968, 62,

103-129 , quoted in Paranormal Photography by Jule Eisenbud, in Wolman **op.cit.**

२७. **ESP Research Today**: "A Study of Development of Parapsychology Since 1960" -by J G. Pratt, quoted by J. Eisenbud - Ref. Wolman **op.cit.**

२८. Jule Eisenbud vs. Amazing Randi, **Fate**. August 1974. 65-74.

२९. **Parapsychology and the Nature of Life** -by John L. Randall. टीकाकार नेहमी २३ व्या अंकाचाच तेवढा उल्लेख करतात. २४ व्या अंकाचा उल्लेख टाळतात ही गोष्ट खरे लपविण्याचा त्यांचा प्रयत्न दाखवून देते.

३०. **Psychic**, June 1973 quoted in **Geller Effect**- by Uri Geller and Guy Lyon Playfair. (1987)

३१. **Ibid** P. 183.

३२. हा संपादक १९८४ साली यूरी इस्रायलमध्ये आल्याचे कळल्यावर त्याला फोन करून मुद्दाम भेटायला आला. त्यावेळचा आपला दृष्टिकोण पूर्वग्रहदूषित होता हे त्याने त्याच्याजवळ मान्य केले. तो म्हणतो, "I have changed my mind about you. I am convinced today that you are endowed with abilities that allow you to perform feats that I cannot explain." **Ibid.** P. 198

३३. 'हावोलेम हाझे' या साप्ताहिकाचा मालक व प्रकाशक असलेल्या अवनेरीने त्या साप्ताहिकाच्या २१ नोव्हेंबर , १९८४ च्या अंकात आपला अनुभव कथन केला असून, ज्या शिपी या आपल्या मित्राच्या खुणांमुळे यूरी मनातले ओळखण्याचे सोंग करतो असा त्याच्यावर आरोप करण्यात येत होता, तो शिपी जवळ नसतानाही त्याने आपल्या व *आपल्या बायकोच्या मनातील विचार ओळखल्याचे म्हटले आहे.* तसेच कागदावर काढलेल्या चित्राचे घड्याळात पडलेले प्रतिबिंब पाहून तो ते कागदावर उतरवतो, असा कित्येक वर्षे योजेक ॲलोन हा कॉम्प्यूटर तज्ज्ञ त्याच्यावर आरोप करीत असे. पण आपण प्रयोग केला त्या वेळी त्याच्या हातात घड्याळही नव्हते, असे या प्रकाशकाने म्हटले आहे. **Ibid.** P. 196-197.

३४. **Fads and Fallacies** - by M. Gardner. हा दावा पोरकट आहे हे बुद्धिवादाची झाडपे नसलेल्यांना सांगण्याची आवश्यकता नाही.

३५. **Humanist** Vol. 15, No. 4 , 1955 Ref. in Geller and Playfair. **op.cit.**

३६. स्टिफन कॅनफर याने १९७४ साली 'टाईम' मध्ये The Psychics नावाची कव्हर स्टोरी लिहिली असून त्यात अतींद्रिय विषयावर संशोधन करणारे SRI नष्ट करावे असे म्हटले आहे. कारण काय, तर म्हणे फॅसिझमचा अशाच रीतीने उदय होत असतो. आपणाला

नको असलेल्या गोष्टीचे संशोधन करणारी वैज्ञानिक संस्था नष्ट करण्याची ही प्रवृत्तीच फॅसिझमची व हिटलरशाहीची मनोवृत्ती दर्शवीत नाही काय?

३७. जादूगार आपल्या युक्त्या प्रकट करू शकत नाही, या सबबीखाली आपण यूरी गेलर कोणत्या युक्त्या वापरतो हे सांगू इच्छित नाही, अशी एक नामी शक्कल आपली असमर्थता लपविण्यासाठी हे लोक वापरत असतात. पण ही एक शक्कलच आहे. खरे कारण नाही, ही गोष्ट या लोकांनी यूरीविरुद्ध काढलेल्या शिकार मोहिमेवरून स्पष्ट होते. यूरी जादूगार असेल तर तसे सांगून मोकळे व्हावे, त्याच्याविरुद्ध शिकार मोहीम का काढावी? जादूगार दुसऱ्या जादूगाराविरुद्ध अशी कधी मोहीम काढत नसतात. यावरून यूरी जादूगार नाही, हे त्यांनी अप्रत्यक्षपणे मान्य केल्यासारखे होते. तो या लबाड जादूगारांचे उत्पन्न आपल्या खऱ्या (नैसर्गिक) जादूने बुडवीत आहे, हा त्यांचा पोटशूळ आहे (आणि प्रारंभी त्यांनी हे मान्यही केले आहे.)

३८. **Humanist.** Geller, Gulls and Nitinol. M. Gardner. Reprint in **op.cit.** P. 172-173.

३९. Geller and Playfair **op.cit** P. 257

४०. **Ibid** P. 235.

४१. **विज्ञान आणि चमत्कार** या प्रस्तुत लेखकाच्या ग्रंथात या विषयी सविस्तर पुरावे दिले आहेत.

४२. कोणत्याही शास्त्रीय सिद्धांताचे बळ त्याला मिळणाऱ्या पुराव्यांच्या संख्येच्या प्रमाणावर अवलंबून आहे असे काही सर्वसामान्य विधान करता येत नसले तरी पुराव्याच्या संख्येच्या प्रमाणाचा विचारही महत्वाचा आहे, हे न्यूटनच्या गुरूत्वाकर्षण सिद्धांताला लाखो प्रमाणे मिळाल्यामुळेच तो सापेक्षता सिद्धांतानंतरही टिकून आहे यावरून स्पष्ट आहे. **Problems of Scientific Revolution-** ed. Harre R.(1975.)

४३. वाल्टर हेस इंजेक्शन देऊन मन बदलतो हा 'शोध' दाभोळकर प्रभृतींनी कुठे लावला याचा शोध घेता असे आढळून येते की, अब्राहम कोवूर यांच्या **Begone Godmen** या पुस्तकातील Deceptive Perception या प्रकरणात हा उल्लेख आढळतो. पण कोवूरनी इंजेक्शन देऊन मन बदलता येते असा हेसचा शोध असल्याचे म्हटलेले नाही. तर विद्युत उद्दीपनाने भावना कृत्रिमपणे निर्माण करता येतात असे म्हटले आहे. 'इंजेक्शन' हा डॉक्टर मजकूरांचा 'शोध' दिसतो ! शिवाय 'कृत्रिमपणे' भावना निर्माण करणे म्हणजे 'मन बदलणे' नव्हे. सिनेमा नाटकातील पात्रेही 'कृत्रिमपणे' भावना निर्माण करतात!

४४. हे पत्र डॉ. वर्तकांकडून येताच मी त्यांना लगेच पत्र लिहिले की शाम मानवांनी अशी खोटी विधाने करुन आपली बदनामी केली असल्याने आपण त्यांच्या विरुध्द अब्रूनुकसानीचा दावा करावा. त्याप्रमाणे वर्तकांनी मानवाविरुध्द दावा केला. या दाव्याचा

निकाल लागून कोर्टातर्फे मानवांना शिक्षा व दंड झाला. (पाहा : **विज्ञान आणि अंधश्रध्दानिर्मूलन** प्रकरण - ७)

४५. प्रयोगातील नियंत्रण शिथिल करून स्वयंस्फूर्तीला वाव दिला तर फसवणुकीलाही वाव मिळतो; आणि खुल्या वातावरणातच अतींद्रिय शक्ती प्रकट होण्याचे कारण फसवणुकीला संधी मिळते हेच होय, असा युक्तिवाद विरोधक करीत असतात. पण संधी मिळते म्हणून फसवणूक होते असे सिद्ध होत नाही. अर्थात ती होत नाही असेही सिद्ध होत नाही. कडक नियंत्रणाखाली ती कधीकधी प्रकटते हाच अतींद्रिय शक्तीच्या बाजूचा निर्णायक पुरावा असून तो शिथिल नियंत्रणाच्या परिस्थितीलाही लागू होतो, व त्यामुळे फसवणुकीचा युक्तिवाद कमकुवत बनतो.

४६. The Influence of the Experiment on psi Test Results-by Rhea White in Wolman **op.cit**.

४७. Intrasubject and Subject-Agent Effects in ESP Experiments - by James C. Carpernter. Wolman **op.cit**

४८. **The Twenty Fifth Man** - by Ed. Morrell (1924)

४९. या संदर्भात डॉ. सी. बी. देसाई यांनी मला लिहिलेल्या १०-४-१९८९ च्या पत्रातील एक परिच्छेद उद्धृत करणे उचित होईल. डॉ. देसाई लिहितात. ''(महाराजांनी) खिरीत बुडवलेले एक श्रीफळ माझ्या हातात दिले. श्रीफळास लागलेल्या (चिकटलेल्या) खिरीस महाराजांनी मला स्पर्श करण्यास सांगितले. मी उजव्या तळहाताने स्पर्श केला. तळहातास चटका असा बसला की डोळ्यात पाणी आले. महाराजांनी मला शिव शिव म्हणावयास सांगितले. काही क्षणानंतर हात पूर्ववत झाला.''

५०. प्रकरण - २ पाहा (पृ. १४) तुलनेसाठी मनुष्याच्या शरीराचे सामान्य तापमान ९७ डिग्री फॅरनाईट असते हे येथे लक्षात घ्यावे.



७

# विश्व आणि मानव

## ज्ञानेश्वरांच्या विश्वात्मक देवाच्या संकल्पनेची वैज्ञानिक मीमांसा

मानव या विश्वातील स्वत:च्या स्थानाविषयी व विश्वाच्या खऱ्या स्वरूपाविषयी फार प्राचीन काळापासून चिंतन करीत आला आहे. आतापर्यंत हा विषय धर्माचा व तत्त्वज्ञानाचा असून या क्षेत्रातील तज्ज्ञ जे सांगतील तेच खरे होय, असे मानण्यात येत होते. पण विज्ञानाच्या उदयाबरोबर ही परिस्थिती पालटली असून हल्ली वैज्ञानिकांचा शब्द प्रमाण मानण्यात येतो. स्वाभाविकच जेथे धार्मिक व वैज्ञानिक विचारात विरोध निर्माण होतो, तेथे धार्मिक विचारांना अंधश्रद्धेत ढकलून वैज्ञानिक विचारांचा पुरस्कार करण्याकडे सामान्यत: प्रवृत्ती दिसून येते. हे स्वाभाविक असून योग्यही आहे. पण असे करताना दुसऱ्या टोकाला जाऊन विज्ञान जे सांगते, ते शंभर टक्के बरोबर आहे, असे प्रतिपादण्याची, म्हणजे दुसऱ्या एका नव्या वैज्ञानिक अंधश्रद्धेचे परिपोषण करण्याची चूक आपल्या हातून घडता कामा नये, याचीही आपण काळजी घेतली पाहिजे. असा इशारा देण्याची आवश्यकता विज्ञानाचे स्वरूप नीट लक्षात न घेतल्यामुळे निर्माण होते. विज्ञान हे परिवर्तनशील आहे व आजचे वैज्ञानिक सिद्धांत उद्या खोटे ठरू शकतात- म्हणजे विज्ञानाचे कालनिरपेक्ष असे काहीच खरे नसते- हे कधीही विसरून चालणार नाही. दुसऱ्या शब्दांत चिरंतन सत्य हुडकणे हे विज्ञानाचे काम नाही आणि धर्म व अध्यात्म यांचे ते काम असेल तर विज्ञानाचे त्यांच्याशी भांडण असण्याचे कारण नाही. हे व्यावहारिक क्षेत्राच्या बाबतीत झाले. पण शेवटी विज्ञानाला व्यावहारिक क्षेत्राच्या पलीकडे जावेच लागते आणि हे स्वाभाविक आहे. कारण जड जगताचा शोध घेताना 'तत:किम्?' हा प्रश्न विज्ञानालाही सतावतो आणि येथेच त्याची अध्यात्माशी अपरिहार्यपणे गाठ पडते. विश्व व मानव आणि त्यांचा संबंध हे विषय असे आहेत, की जेथे ही गाठ सुरुवातीलाच अगदी प्राथमिक पातळीवरच पडते. परंतु जणू ही 'धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे' जुंपलेली लढाईच आहे, असे समजून एखादी बाजू घेऊन काही वीर पुढे सरसावतात. हे लोक हे विसरतात की ही लढाई एकमेकांविरुद्ध नसून दोघांचीही आहे. त्यामुळे यात बाजू घेण्याचा प्रश्न उपस्थित होत नाही. ही लढाई सत्यासाठी असल्याने तुम्ही सत्य कोणत्या बाजूने जिंकता

(जाणता) याला महत्व नाही. एव्हरेस्ट गाठण्यासाठी तुम्ही चीनच्या बाजूने गेला काय किंवा भारताच्या बाजूने गेला काय, त्यात विशेष फरक पडत नाही. एखादा मार्ग लांबचा, दिशाभूल करणारा असू शकतो तर दुसरा एखादा मार्ग जवळचा (खात्रीचा) पण छाती दडपणारा असू शकतो. हाच काय तो फरक. कोणता मार्ग तुम्हाला पसंत आहे, हे अर्थात तुमच्या स्वभाववैशिष्ट्यावर अवलंबून राहील. ही गोष्ट इतर कोणत्याही विषयापेक्षा विश्व व मानव व यांच्यातील संबंधाच्या विचारामुळे जास्त सुलभ रीतीने स्पष्ट होते असे दिसून येते.

## मानव अपघाताने निर्माण झाला?

विश्व व मानव यांच्यातील संबंधाविषयी वैज्ञानिकदृष्ट्या विचार केला तर असे दिसून येते की, विश्वाचा पृथ्वीवरील मानवाशी कार्यकारणदृष्ट्या काहीच संबंध नाही. म्हणजे असे की, मानवाच्या बाबतीत हे विश्व अगदी पूर्णपणे उदासीन आहे. मानव या पृथ्वीवर जगला काय किंवा नष्ट झाला काय त्यामुळे या विश्वाचे काहीच बिघडणार नाही. कारण मानव या विश्वात आगंतुक आहे. अर्थहीन आहे. हा मानवाविषयीचा वैज्ञानिक दृष्टिकोण बर्ट्रांड रसेलने आपल्या एका ग्रंथात पुढीलप्रमाणे व्यक्त केला आहे. 'मानव हा आंधळ्या प्रक्रियांचा परिणाम आहे, त्याच्या आशा - आकांक्षा विचार-श्रद्धा इत्यादी अपघाताने एकत्र आलेल्या अणुसंघातांचा परिणाम आहे. त्यामुळे त्याचे विचार, भावना, ध्येयवाद, शौर्य हे सर्व शेवटी मातीत जाणार आहे. सूर्यमालेच्या मृत्यूबरोबर त्याचे सर्व यशसंपादनही नष्ट होणार आहे. या गोष्टी वादातीत नसल्या तरी इतक्या निश्चित आहेत की त्यांचा विचार गंभीरपणे न करणारे तत्त्वज्ञान टिकण्याची आशा नाही.'[१]

हाच विचार थोड्या वेगळ्या रीतीने जॅक मोनो या नोबेल पारितोषिक विजेत्या रेण्विक जीवशास्त्रज्ञाने पुढीलप्रमाणे व्यक्त केला "Man must at last wake out of his millenary dream and discover his total solitude, his fundamental isolation. He must realise that, like a gypsy, he lives on the boundary of an alien world, a world that is deaf to his music, and as indifferent to his hopes as it is to his suffering or his crime." [२] याचा अर्थ असा की, मानव हा या विश्वाचे अविभाज्य अंग तर नाहीच, उलट तो विश्वातील एक 'बिघाड' आहे! विश्व रचनेचे कार्य पृथ्वीवर चुकीच्या मार्गाने गेल्याचे ते चिन्ह आहे. स्वयंपाक करताना एखादा भाग बिघडला (उदा. करपला) तर तो जसा आपण टाकून -फेकून देतो, त्याप्रमाणे मानव हा विश्वाच्या योजनेत बिघाड असल्याने टाकाऊ, अर्थहीन आहे. मग या विश्वात मानव का आणि कसा निर्माण झाला? तो केवळ अपघाताने निर्माण झाला आहे. एखादा

किडा लाकूड खात जाताना लाकडावर चुकून एखादे अक्षर उमटावे, तसा याचा अर्थ होतो. या भौतिक विश्वात डोळस मानव निर्माण झाल्यामुळे विश्व डोळस ठरत नाही.रस्त्याने एखादा बैल मूत्र करीत जाताना एखादे अक्षर उमटले तर बैल साक्षर आहे असे ठरत नाही !

हा दृष्टीकोण बरोबर म्हणून स्वीकारला तर मानवाप्रमाणेच मानवाने निर्माण केलेली संस्कृती, तत्त्वज्ञान, नीती, धर्म, अध्यात्म, इत्यादी सर्व मानवी कृतीही अर्थहीन ठरतात. मानवाने त्यांचे कितीही गोडवे गायिले तरी ते अरण्यरुदन ठरते. त्यांचे मूल्य चिरंतन आहे, असा युक्तिवाद कोणी कितीही केला, तरी ते बुडणाऱ्या जहाजावरील माणसाने तोल सांभाळून स्वत:ला वाचवण्याचा प्रयत्न करावा तसे व्यर्थ आहे.

पण मानव या विश्वात अपघाताने निर्माण झाला आहे, हा वैज्ञानिक दृष्टिकोण बरोबर म्हणून का स्वीकारायचा? कारण विश्व भौतिक (आंधळ्या) नियमांनी बद्ध आहे, असा विज्ञानाचा सिध्दांत असून तो बरोबर म्हणून स्वीकारण्यावाचून गत्यंतर नाही. तो चुकीचा म्हटले तर विश्वात बेबंदशाही आहे असे ठरते. आणि आतापर्यंतच्या वैज्ञानिक संशोधनाने विश्वात बेबंदशाही नाही, त्यात नियमबद्धता आहे असे आढळून आले आहे. याच भौतिक नियमानुसार डार्विनने उत्क्रांतिवादी सिध्दांत मांडला आहे. या सिद्धांतानुसार भौतरासायनिक (म्हणजे आंधळ्या वा अपघाती) प्रक्रियातून जीव निर्माण झाला व या जीवापासून उत्परिवर्तन (Mutations) आणि नैसर्गिक निवड (Natural Selection) या आंधळ्या प्रक्रियातून म्हणजे भौतिक नियमानुसार मानवाची उत्पत्ती व उत्क्रांती झाली आहे. अशा रीतीने आंधळ्या भौतिक प्रक्रियातून डोळस माणूस कसा निर्माण झाला, हे उत्क्रांतिवादी सिद्धांताने विज्ञान सांगू शकत असले, तरी काही लोकांना मानवाची निर्मिती हा चमत्कार वाटतो. पण वस्तुत: यात कसलाच चमत्कार नाही. कारण खरी गोष्ट अशी आहे की माणूस डोळस आहे हेच खरे नाही. माणूस केवळ यंत्र आहे, आणि यंत्रात बिघाड होऊ शकतो. आणि प्रत्यक्षात माणूस बिघडतो हे आपण नेहमीच पाहतो. कधी कधी तो इतका बिघडतो की मोठा बिघाड होऊन यंत्राचा स्फोट व्हावा, त्याप्रमाणे त्याचा सर्वनाश होण्याचा प्रसंगही गुदरतो. आतापर्यंत दोन जागतिक युद्धे झाली असून तिसरे जागतिक युद्ध होण्याचा संभव कोणीच नाकारत नाही, ही गोष्ट याच (मानव यांत्रिक असल्याच्या किंवा नैतिक नसल्याच्या) सिद्धांताला पुष्टी देते. तात्पर्य, मानव या विश्वात जसा अपघाताने निर्माण झाला आहे, तसा अपघाताने या विश्वातून नाहीसा होण्याचीही शक्यता आहे. (अणुयुद्ध अपघाताने होण्याची शक्यताही कोणी नाकारत नाही.) एकंदरीत, माणूस नष्ट झाला तर धर्म, संस्कृती इत्यादी मानवनिर्मित सर्व गोष्टी फालतू किंवा अर्थहीन

होत्या हे आपोआपच सिद्ध होत असल्याने हे विश्व भौतिक (आंधळ्या) नियमानुसार चालते, नैतिक डोळस नियमानुसार चालत नाही हेही आपोआपच सिद्ध होते.

## विश्व कसे निर्माण झाले ?

मानव या विश्वात अपघाताने निर्माण झाला असेल तर विश्वही अपघातानेच (आंधळ्या नियमाने) (**अपरस्परसंभूतम्** । गीता १६/८) निर्माण झाले आहे, असे मानणे तर्कशुद्ध ठरते. कारण मानव हा विश्वाचा भाग असल्यामुळे जे नियम मानवाला लागू होतात, तेच (आंधळे) नियम विश्वालाही लागू होतात, असे मानणे भाग आहे. असे मानले नाही तर विश्वात नियमाच्या दृष्टीने पक्षपात (लहरीपणा) सिद्ध होतो. आणि हे वैज्ञानिक पद्धती व दृष्टीविरुद्ध आहे . पण *विश्व अपघाताने निर्माण झाले असे मानता येत नाही* हीच सर्वात मोठी अडचण आहे. विश्व निर्माण झाले असेच मुळी मानता येत नाही ही यातील मुख्य खरी अडचण आहे. असे मानले तर विश्व भौतिक नियम पाळत नाही असे ठरते. याला विज्ञानातील अनवस्था (किंवा एकांतिक अवस्था) समस्या (Singularity problem) म्हणतात. ही समस्या विज्ञानातील एका प्रमेयामुळे निर्माण होते. हे प्रमेय (theorem) स्टिफेन हॉकिंग या केंब्रिजच्या शास्त्रज्ञाने सिद्ध केले असून या प्रमेयानुसार १) आईन्स्टाईनचा सापेक्षतावाद खरा असेल, २) उष्णतागतीशास्त्राचे नियम बरोबर असतील, ३) कार्यकारणभाव खरा असेल आणि ४) गुरुत्वाकर्षण शक्ती अस्तित्वात आहे हे खरे असेल, तर विश्वाच्या प्रारंभी एकांतिक किंवा अनवस्था निर्माण होते असे ठरते. अनवस्था ही विज्ञानातील सर्वात मोठी समस्या असून ती अवस्था वरील सर्व नियम धाब्यावर बसवते असे दिसून येते. (म्हणूनच तिला अनवस्था म्हणायचे.) आणि *हॉकिंगने अनवस्था टाळता येत नाही. (म्हणजे विश्व हे निर्माण झाले आहे असे मानणे भाग आहे* ) हे उपर्युक्त प्रमेयाने सिद्ध करून दाखवले आहे. आणि हॉकिंग हा आईन्स्टाईननंतर विज्ञानात आईन्स्टाईन इतकाच किंबहुना त्याच्यापेक्षाही जास्त बुद्धिमान म्हणून ख्याती पावलेला शास्त्रज्ञ आहे, हे लक्षात ठेवले पाहिजे (केंब्रिजचे जे प्रसिद्ध अध्यासन न्यूटनने भूषविले होते, तेच अध्यासन हॉकिंगनेही भूषविले आहे.)

ही (अनवस्था) समस्या टाळण्यासाठी विश्व निर्माणच झालेले नाही, ते आहे तसेच अनादिकालापासून आहे, असे सिद्ध करण्याचा काही शास्त्रज्ञांनी प्रयत्न केला असून त्यांच्या सिद्धांताला 'स्थिरावस्था' सिद्धांत (Steady State Theory) म्हणतात.(बोंडी, गोल्ड आणि हॉइल या ब्रिटिश शास्त्रज्ञांनी हा सिद्धांत मांडला असून त्यात जयंत नारळीकर यांचाही सहभाग आहे.) त्यासाठी त्यांनी निर्दोष विश्वशास्त्रीय 'तत्त्वा'चा (Perfect Cosmological Principle) आधार घेतला आहे. पण

निरीक्षणात्मक पुरावे (उदा. पार्श्वभूमीस्थित २.७ अंश केलविनचे प्रारण) या सिद्धांताविरूद्ध आढळून आले असल्यामुळे हा सिध्दांत आता वस्तुसंग्रहालयात जावून पडला आहे. सर्व निरीक्षणात्मक पुरावे विश्व हे भूतकालात एका महास्फोटातून निर्माण झाले, या सिद्धांताला (Big Bang Theory) बळकटी आणणारे असून त्यामुळे अनवस्था (Singularity) समस्या टाळता येत नाही, हे आता सर्वमान्य झाले आहे. पण वर म्हटल्याप्रमाणे ही अनवस्था सर्वच भौतिक नियम धाब्यावर बसवते, असे आढळून येत असल्यामुळे तिच्या स्वरूपात शास्त्रज्ञांपुढे सर्वात मोठे आव्हान उभे ठाकले आहे.[३]

या आव्हानाला तोंड देण्यासाठी अनेक शास्त्रज्ञ पुढे सरसावले असून त्यानी हे ओळखले आहे की या समस्येला विज्ञानातील परंपरागत (रूढ) पद्धतीने उत्तर मिळणे शक्य नाही. येथे तर्कवाद लंगडा पडतो. आणि म्हणून त्यांनी विज्ञानातील नव्या क्वॉंटम तर्कपद्धतीचा (जिचा तोंडवळा अध्यात्म तर्कशास्त्राशी जुळणरा आहे) अवलंब केला आहे. या क्वॉंटम तर्कपद्धतीचा अवलंब करून उत्तर शोधण्याचा प्रयत्न करणाऱ्यामध्ये ट्रायॉन, व्हिलेंकिन या अमेरिकन, ब्राऊट एंगलर्ट, गुझिंग, स्पिंडेल या युरोपियन आणि झेलदोविच् व स्तारोबिंस्कि या रशियन शास्त्रज्ञांचा प्रामुख्याने समावेश होतो. या शास्त्रज्ञांनी क्वॉंटम सिद्धांताच्या आधारे शून्यातून विश्व निर्माण झाले आहे, असा सिद्धांत मांडला आहे! (असा सिद्धांत केवळ अध्यात्मवादीच मांडू शकतात, अशी सर्वसाधारण समजूत आहे.) शून्यातून वस्तू (अगर उर्जा) निर्माण होणे, हे विज्ञानाच्या गृहीतकृत्याविरुद्ध (अगर नियमाविरुद्ध) नाही काय? असा येथे साहजिकच प्रश्न निर्माण होतो. पण या शास्त्रज्ञांनी आपली सर्व शक्ती (आणि इभ्रतही!) यात विज्ञानाच्या कोणत्याही नियमांचा भंग होत नाही, हे दाखवून देण्यासाठीच पणाला लावली आहे.[४] क्वॉंटम सिद्धांतानुसार शून्यातून कण व प्रतिकण निर्माण होऊ शकतात. (याला Vacuum fluctuation म्हणतात.) पण ते लगेच नष्ट होतात. हे सामान्य ऊर्जापातळीवर घडते. पण विश्वाच्या प्रारंभिक अवस्थेत असामान्य ऊर्जापातळी होती. (याला 'प्लँक मर्यादा' म्हणतात व ती एका सेकंदाला एकापुढे त्रेचाळीस शून्ये इतक्या संख्येने भागिले असता जो कालावधी येतो ($१०^{-४३}$) त्या कालावधीच्या मर्यादेतील ऊर्जापातळी असते!) या ऊर्जापातळीत विश्व निर्माण झाल्यामुळे ते शून्यातून निर्माण होऊ शकते. (येथे क्वॉंटम सिद्धांत व गुरुत्वाकर्षण सिद्धांत एकत्रित होतात - Quantum Gravity - अशी कल्पना आहे.) क्वॉंटम सिद्धांतानुसार अशा रीतीने एकच विश्व निर्माण होत नाही, तर अनेक विश्वे निर्माण होतात! (अनेक विश्वांचा सिद्धांत-Many Worlds Theory- प्रथम एव्हरेट या शास्त्रज्ञाने मांडला व डी विट् याने त्याचा पुरस्कार केला. येथे Many म्हणजे अनेक असे म्हटले असले तरी ते लाक्षणिक अर्थाने. वास्तविक त्यांच्या संख्येला मर्यादा नाही.

म्हणून 'अनंत' ही म्हणता येईल. आपल्याकडे ही कल्पना 'अनंत कोटि ब्रम्हांड नायक' या शब्दसमूहांनी व्यक्त केलेली आढळते. अमृतानुभवात ज्ञानेश्वरांनी 'जगतामाद्यौ' असे ४ थ्या श्लोकात याचे वर्णन केले असून विष्णुबुवा जोगांनी त्याचे भाषांतर 'अनंत विश्व' असेच केले आहे.) स्टिफेन हॉकिंगनने फेनमनच्या 'पाथ इंटिग्रेल' या क्वॉंटम सिद्धांतातील एका कल्पनेच्या आधारे व क्वॉंटम गुरूत्वाकर्षणाच्या साहाय्याने पण सीमाविहीन (Finite but Unbounded) विश्व कसे निर्माण होते व अशा विश्वाच्या निर्मितीमध्ये अनवस्था प्रसंग (Singularity) टाळता येतो, हे दाखवून दिले आहे. (हॉकिंग एका असाध्य रोगाने खुर्चीला खिळलेला असून त्याला स्पष्ट बोलताही येत नाही. तथापि, त्याच्या बौध्दिक कार्यावरून त्याची बुद्धी अप्रतिहतपणे कार्य करू शकते असे म्हणावे लागते.) हॉकिंगच्या या सीमाहीन अवस्थेच्या (No Boundary Condition) कल्पनेनुसार विश्व निर्माण झाले असूनही ते अनादी (कालातीत) व स्थलातीत मानावे लागते. कारण स्थल व काल यांचीही विश्वा बरोबरच निर्मिती झाली आहे.

अशा रीतीने अनवस्था समस्या ही आपल्या परंपरागत (रूढ) तर्कबुद्धीने (Classical Logic) निर्माण केलेली समस्या आहे. ती आपल्या बुद्धीची समस्या आहे. ब्रम्हांडाची - विश्वाची - नाही.[५] आणि हे क्वॉंटम गणित विज्ञानाने शास्त्रज्ञांनी दाखवून दिले असल्याने एक तर विश्वाविषयीचा हा सिद्धांत खरा म्हणून स्वीकारला पाहिजे. अन्यथा विश्वाचे (व मानवाचेही) कोडे सोडविणे मानवी बुद्धीच्या पलीकडचे आहे, असे म्हणून काखा वर केल्या पाहिजेत. पण विज्ञानाचा जन्म काखा वर करण्यासाठी झालेला नाही. नाहीतर धर्माविरुध्द दंड थोपटून ते उभेच राहिले नसते. रणांगणांतून पळ काढायचा नाही ही विज्ञानाची प्रतिज्ञा आहे. कारण श्रद्धेचे दोर त्याने जन्मत:च तोडले आहेत. आता एक तर गड येईल, नाहीतर सिंह जाईल. (हॉकिंगने २० व्या शतकाच्या अखेर गड जिंकण्याचे - End of Science - भविष्य वर्तविले होते. हे भविष्य खोटे ठरले असल्यामुळे विज्ञानाला गड जिंकता आलेला नाही आणि कधी जिंकता येईल का हे कोणीही हल्ली सांगू शकत नाही.)

## अपघात ही अवैज्ञानिक कल्पना

विश्वाची उत्पत्ती हा विज्ञानाचा विषय होऊ शकतो, वैज्ञानिक पद्धतीने त्याचे संशोधन करणे शक्य आहे, एवढे जरी वरील चर्चेतून वाचकांना स्पष्ट झाले तरी पुरेसे आहे. (आणि या शास्त्रज्ञांचे याविषयीचे सिद्धांत संपूर्ण व निरपवादपणे सिद्ध झाले आहेत, असे समजण्याचे कारण नाही. वरील विवेचनाने असा वाचकांचा ग्रह होणे शक्य असले, तरी विज्ञानाचे स्वरूप हे नेहमीच तात्पुरते- Provisional - असते, याचे भान कधीही

सोडता कामा नये.) कारण त्यामुळे *विश्वाची उत्पत्ती अपघाती असल्याची कल्पना विज्ञान मान्य करीत नाही,* हे वाचकांना पटेल. जेथे विश्व अपघाती आहे हेच विज्ञान मान्य करीत नाही, तेथे विश्वातील एखादी घटना अपघाती म्हणून स्वीकारणे विज्ञानाला कसे मंजूर होईल? अपघात याचा अर्थ कार्यकारण भावाविषयीचे अज्ञान होय आणि कोणत्याही घटनेचा कार्यकारण भाव समजून घेणे, अज्ञान नाहीसे करणे, हे विज्ञानाचे ध्येय असल्याने कोणतीही घटना अपघाताने घडली असे सामान्य मनुष्य जेथे म्हणतो, तेथे विज्ञान त्याची कार्यकारण परंपरा अजून समजलेली नाही असे मानते. यादृष्टीने विचार केला तर मानवाची (किंवा जीवाची) पृथ्वीवरील निर्मिती अपघाती आहे, हे म्हणणे विज्ञानाच्या दृष्टीने काटेकोर नाही असेच मानावे लागते. विज्ञानाला ही निर्मिती कशी झाली, हे अजून कळलेले नाही, हे विधान विज्ञानाच्या दृष्टीने काटेकोर (खरे) म्हणून समजावयास पाहिजे.[६] पण यात विज्ञानाचा पराभव व अध्यात्मशास्त्राचा जय सूचित होतो, अशी काही लोकांची (चुकीची) समजूत झाल्यामुळे ते असे विधान करण्याऐवजी मानव हा विश्वात अपघाताने निर्माण झाला आहे, असे विधान करतात आणि ते विज्ञानाच्या नावाखाली खपवतात. पण वरील चर्चेवरून हा प्रयत्न मुळात अवैज्ञानिक आहे, हे वाचकांच्या लक्षात येईल. *जेथे संपूर्ण विश्वच विशिष्ट नियमानुसार निर्माण झाले आहे असे शास्त्रज्ञ मानतात, तेथे मानव (किंवा जीव) हा कोणत्याही नियमा शिवाय म्हणजे अपघाताने -निर्माण झाला आहे, हे म्हणणे वैज्ञानिक म्हणून कसे स्विकारता येईल?*[७.]

विश्वाप्रमाणेच मानवाची उत्पत्तीही विशिष्ट नियमानुसार झाली आहे, ती अपघाती नाही, हा दृष्टिकोण असे सूचित करतो की दोन्हीच्याही उत्पत्तीचा विचार एकत्रितच केला पाहिजे, स्वतंत्रपणे करून चालणार नाही. मानव अणूंचा बनला आहे, आणि विश्वही अणूंचेच बनले आहे. पिंडी ते ब्रम्हांडी या न्यायाने शास्त्रज्ञांना विश्वोत्पतीची समस्या सोडवताना अणूच्या उपपत्तीसाठी ज्या सिद्धांताचा अवलंब करावा लागतो, ज्या असाम्यावस्था (Disequillibrium) कल्पनेचा अवलंब विश्वोत्पत्तीसाठी शास्त्रज्ञांना करावा लागतो, त्याच असाम्यावस्था कल्पनेचा अवलंब पृथ्वीवरील जीवांच्या (आणि पर्यायाने मानवाच्या) उत्पत्तीसाठीही करावा लागतो असे आढळून येते. क्वाँटम गुरूत्वाकर्षणाच्या साहाय्याने शून्यातून विश्व कसे निर्माण होते, हे दाखवून देता आले तरी हल्ली विश्वात आढळून येणारे वस्तूचे प्राबल्य कसे निर्माण झाले, याची उपपत्ती त्याने लागत नाही. क्वाँटम सिद्धांतानुसार वस्तूकणाबरोबर प्रतिवस्तूकण (Anti-Matter) निर्माण होतात व हे परस्पर विरोधी कण एकमेकांशी संयोग पावून नष्ट होतात. मग हल्ली आढळून येणारे वस्तूकण कोठून आले? भौतविज्ञानातील प्रसिद्ध CPT प्रमेयानुसार असे घडता

कामा नये!* तसेच काल भूतकालाकडून भविष्यकालाकडे कसा मार्गक्रमण करत आहे (Arrow of Time) ? विज्ञानातील प्रसिद्ध गतिशास्त्राच्या (Dynamics) नियमानुसार असे घडता कामा नये ! तसेच हल्ली विश्वात आढळून येणारी सुव्यवस्था (Order) कोठून व कशी निर्माण झाली? उष्णतागतिशास्त्रानुसार हे अशक्य आहे! तरीही या सर्व गोष्टी प्रत्यक्षात आढळून येतात. या सर्व गोष्टी प्रत्यक्षात आढळून येत असल्यामुळे त्या परस्परसंबंध्द असल्या पाहिजेत हे उघड आहे. प्रसिद्ध रशियन भौतशास्त्रज्ञ सखारोव्ह याने विश्वातील वस्तूकणांचे प्राबल्य प्रारंभिक असाम्यावस्थेतून (Non -Equllibrium Condition) कसे निर्माण होते व कालाची दिशाही त्यातून कशी निर्माण होते हे दाखवून दिले आहे. नोबेल पारितोषिक विजेता इलिया प्रिगॉजिने या भौतरसायनशास्त्रज्ञाने असाम्यावस्था उष्णतागतिशास्त्राच्या (Non Equillibrium Thermodynamics) सहाय्याने सुव्यवस्था (Order) कशी निर्माण होते, हे दाखवून दिले आहे. (याला त्याने Dissipative Structures असे नाव दिले आहे.) याच Dissipative Structures च्या साहाय्याने जीवाची उत्पत्ती अपरिहार्यपणे कशी होऊ शकते, हे आयजेन या शास्त्रज्ञाने दाखवून दिले आहे. अशा रीतीने हल्ली आढळून येणारे विश्व व मानवासह सर्व जीव (म्हणजे सुव्यवस्था) अत्यंत सूत्रबद्ध नियमानुसार अपरिहार्यपणे निर्माण झाल्याचे या भौतशास्त्रज्ञांच्या प्रयोगातून निष्पन्न होते.

तरीही एक प्रश्न अनुत्तरीत राहतो. तो प्रश्न असा की हे सर्व घडावे, असे या नियमातून आपोआप निष्पन्न होते काय? दुसऱ्या शब्दांत, भौतशास्त्रज्ञांना असा एक अंतिम सिद्धांत (Ultimate Theory) मांडता येतो का, की ज्यामुळे विश्वात हल्ली आढळून येणाऱ्या सर्व घटनांची उपपत्ती लावता येईल किंवा त्यांचे भाकीत करता येईल? विज्ञानाचे अंतिम ध्येय असे भाकीत करणे हेच असल्याने असा सिद्धांत त्याला मांडता आला पाहिजे. कारण विज्ञान काहीच गृहीत (Given) धरत नाही. अशा सिद्धांताला सर्व भौतिक मूल्ये अमूकच का हे सांगता आले पाहिजेच, पण इतरही अनेक गोष्टींची उपपत्ती देता आली पाहिजे. (उदा. अवकाश तीनच मितीचा -लांबी, रूंदी, जाडी- का आहे ?) अशा सर्वसमावेशक सिद्धांताचा शोध आईन्स्टाईनच्या कालापासून सुरू असून असा सिद्धांत सापडला असल्याचा दावा अलीकडे काहींनी केला आहे. (कारण वस्तू कणाऐवजी रज्जूंची बनली आहे, असे हा सिद्धांत सांगतो.) पण दुर्दैवाने हा सिद्धांत विश्व १० (किंवा २६) मितीचे असल्याचे भाकीत करतो ! पण प्रत्यक्षात अवकाश तीनच मितीचा आहे. मग बाकीच्या सात मिती कुठे आहेत? या सिद्धांतानुसार त्या सूक्ष्म जगात दुमडल्या गेल्या आहेत. पण मग सातच मिती का दुमडल्या गेल्या, सहा किंवा

* CPT विषयी अधिक माहिती प्रकरण १ मध्ये पाहावी.

आठ मिती का दुमडल्या गेल्या नाहीत? या प्रश्नाचे उत्तर या सिद्धांताला देता येत नाही. म्हणूनच अनेक ख्यातनाम भौतशास्त्रज्ञ (आणि अशा शास्त्रज्ञात आईन्स्टाईनची परंपरा चालवणारा व त्याच्यापेक्षाही जास्त तीव्र बुद्धिमत्ता असल्याची ख्याती असलेला स्टिफेन हॉकिंग या केंब्रिजच्या शास्त्रज्ञाचाही समावेश होतो.) विश्वातील सर्व गोष्टींची सुसूत्र उपपत्ती लावण्यासाठी मानवीय तत्त्वाची (Anthropic Principle) कास धरली पाहिजे अशा निर्णयाला आले आहेत.

## मानवशास्त्रीय तत्त्व (Anthropic Principle)

विश्वातील सर्व घटनांची उपपत्ती मानवीय किंवा मानवशास्त्रीय तत्त्वाने लावण्याची गरज भौतवैज्ञानिकांना वाटण्याचे कारण या तत्त्वाखेरीज अन्य कोणत्याही तत्त्वाच्या वा सिद्धांताच्या साहाय्याने विश्वातील सर्व घटनांची व मूल्यांची सुसूत्र उपपत्ती लावता येत नाही हेच होय. म्हणूनच स्टिफेन हॉकिंग, जे. ए. व्हीलर यासारख्या परामानसशास्त्र व धर्म यांच्या विरुद्ध जाहीर भूमिका घेणाऱ्यांनासुद्धा या तत्त्वाचा पुरस्कार करावा लागला आहे. हे तत्त्व हॉकिंगने पुढील शब्दात संक्षेपाने व्यक्त केले आहे : We see the universe the way it is because we exist (विश्व आम्हाला जसे दिसते तसे आहे, याचे कारण विश्वात आम्ही (मानव) आहोत हे होय.)[८] दुसऱ्या शब्दात, मानवाची निर्मिती व्हावी म्हणूनच विशिष्ट गुणांनी आणि मूल्यांनी विश्व युक्त आहे. हे गुण व ही मूल्ये विश्वात नसती तर मानव निर्माणच झाला नसता. उदा. अणुगर्भातील शक्तीचे मूल्य (Strong Force) हल्ली आहे त्यापेक्षा किंचित जरी जास्त असते, तर हायड्रोजन निर्माण झाला असता, ते किंचित जरी कमी असते, तर फक्त हायड्रोजनच निर्माण झाला नसता. (इतर मूलतत्त्वे तयार झाली नसती. परिणामी मानव निर्माण झाला नसता.) तसेच इलेक्ट्रॉनचा विद्युत भार किंचितही कमी अगर जास्त असता तर सूर्य व तारे प्रकाशले नसते किंवा स्फोट पावले नसते. स्फोटातूनच ताऱ्यातील जड तत्त्वे विश्वात पसरली आहेत. आणि मानवाच्या निर्मितीसाठी जड तत्त्वांची आवश्यकता आहे.

गुरूत्वाकर्षण शक्तीचेही असेच आहे. या शक्तीचे मूल्य हल्ली आहे त्यापेक्षा किंचित जरी जास्त असते तर सूर्याइतके मोठे तारे निर्माण झाले नसते व जे झाले असते ते एका वर्षापेक्षा अधिक काल अस्तित्वात राहू शकले नसते ते मूल्य किंचित कमी असते तर सूर्य व तारे निर्माणच झाले नसते.

विश्वातील सर्वात महत्वाचा शोध म्हणजे विश्व प्रसरण पावत आहे, हा होय. विश्वाच्या या प्रसरणाचा वेग विश्वातील मानवाच्या निर्मितीशी, (अस्तित्वाशी) निगडित असल्याचा आढळून येतो. तो किंचितही कमीजास्त असता तर मानव निर्माण झाला

नसता. विश्वाच्या प्रसरणाचा हा वेग विश्वात सार्वत्रिक प्रमाणात आढळून येणाऱ्या न्यूट्रिनो नावाच्या कणांवर अवलंबून आहे. एका न्युट्रिनो कणाचे वस्तूमान $१०^{-३८}$ ग्रॅम इतके अल्प आहे. (एका ग्रॅमला एकापुढे ३८ शून्ये इतक्या संख्येने भागिले असता येणारे ग्रॅम मूल्य!) या मूल्यात एकाने जरी फरक पडला असता (म्हणजे हे मूल्य $१०^{-३७}$ असते) तरी विश्वाच्या प्रसरणात प्रचंड फरक पडला असता व विश्व प्रसरण पावण्याचे मागेच थांबले असते. म्हणजे मानवाची निर्मितीच झाली नसती.

पण सर्वात महत्वाचे म्हणजे *या मानवशास्त्रीय तत्त्वाच्या आधारेच अवकाश त्रिमिती का आहे (द्विमिती किंवा चतुर्मिती का नाही) याची उपपत्ती लागते.* अवकाश द्विमिती असता तर अशा अवकाशातील प्राणी (फक्त लांबी व रूंदी असलेला) अन्नच खाऊ शकला नसता व अन्न खाण्याच्या प्रयत्नात त्याचे दोन तुकडे झालेअसते. (पुढील चित्र पाहा.) या उलट अवकाश चतुर्मिती असता तर गुरुत्वाकर्षण शक्तीचा हल्लीचा समतोल बिघडला असता व पृथ्वी सूर्याभोवती स्थिर कक्षेत फिरू शकली नसती. परिणामी पृथ्वीवर जीव व मानव निर्माण झाले नसते. (म्हणून अवकाश त्रिमिती आहे.)




**द्विमिती प्राण्याने अन्न खाल्ले तर त्या प्राण्याचे दोन स्वतंत्र भाग होतात ! ( प्राणी मरतो.)**

अशा रीतीने इलेक्ट्रॉनच्या विद्युत भाराचे मूल्य, इलेक्ट्रॉन व प्रोटॉनच्या वस्तुमानातील फरकाचे मूल्य, येथपासून तो विश्व प्रसरण पावण्याच्या विशिष्ट वेगापर्यंतची सर्व मूल्ये इतक्या सूक्ष्म रीतीने जुळवली गेली आहेत ( Finely Adjusted) की त्यांचा उद्देश मानवासारखा बुद्धिमान प्राणी निर्माण करण्याशिवाय दुसरा कोणताही संभवत नाही.[१]

या मानवशास्त्रीय तत्त्वाविरुद्ध पुढील आक्षेप घेणे शक्य आहे. हा आक्षेप असा की मानवासाठी आपली सूर्यमाला निर्माण झाली, हे फार तर मान्य करता येईल. आपली आकाशगंगा (तारका-विश्व) मानवासाठी निर्माण झाली, हेही फार तर मान्य

करता येईल. पण विश्वात आढळून येणारी अब्जावधी तारकाविश्वे (Galaxies) केवळ मानवासाठी निर्माण झाली आहेत, यावर विश्वास ठेवणे कठीण आहे. या आक्षेपात विश्वात मानव एकटाच बुद्धिमान प्राणी आहे, असे गृहीत धरले आहे. पण याला काही आधार नाही. दुसरे असे की 'विश्वास' हा काही वस्तुनिष्ठ (Objective) वैज्ञानिक निकष होऊ शकत नाही. म्हणून त्याची वैज्ञानिकदृष्ट्या गंभीरपणे दखल घेण्याची आवश्यकता नाही. (परवा परवापर्यंत 'खालचे' लोक पडतील म्हणून पृथ्वी गोल आहे, यावरही लोक विश्वास ठेवत नव्हते!)

मानवशास्त्रीय तत्त्वाविरूद्ध वैज्ञानिक आक्षेप वस्तुत: घेताच येत नाही.हे कसे हे दुसऱ्या एका तत्त्वाच्या आधारे दाखवून देता येईल. हे 'माख वा मॅचचे तत्त्व' (Mach's Principle) म्हणून प्रसिद्ध आहे. या तत्त्वानुसार विश्वातील अगदी लहान आणि अगदी मोठी वस्तू यांच्यात घनिष्ठ संबंध आहे. उदा. कपातील चहा चमच्याने ढवळला तर तो कपाच्या काठाकडे वर जातो. याचे कारण त्या चहाला माहीत आहे की विश्वात अब्जावधी तारकाविश्वे (Galaxies) पसरली आहेत! याचा अर्थ ही तारकाविश्वे एकदम नष्ट झाली तर तो चहा ढवळला तरी कपाच्या काठाकडे वर जाणार नाही! *हे तत्त्व जर खोटे असेल तर, सापेक्षता सिद्धांतच खोटा ठरतो,* हे ओळखून आईन्स्टाईनने हे मॅचचे तत्त्व सापेक्षता सिद्धांतामध्ये गणिताच्या साहाय्याने समाविष्ट केले आहे. (प्रत्यक्षात हे गणित सोडविणे आईन्स्टाईनला शक्य झाले नाही. नंतरच्या काळी येल युनिव्हर्सिटीचा कोहेन आणि त्याच्या सहकाऱ्यांनी हे साध्य करून दाखविले.) आता प्रश्न असा आहे की, माझ्या कपातील चहाला विश्वात अब्जावधी तारकाविश्वे आहेत हे कसे कळले? आईन्स्टाईनच्याच सिद्धांतानुसार प्रकाशाचा वेग मर्यादित असून त्याच्यापेक्षा जास्त वेगाने विश्वात माहितीची देवाण-घेवाण होत नसल्याने (ही तारकाविश्वे आपल्यापासून अब्जावधी प्रकाशवर्षे दूर आहेत) हे अशक्य ठरते. पण प्रत्यक्षात हे असे घडते, असे समजल्याखेरीज आईन्स्टाईनचा सापेक्षता सिद्धांत घड्याळातील लंबकाच्या हालचालीची उपपत्ती देऊ शकत नाही, आणि परिणामी तो सिद्धांत खोटा ठरतो! म्हणूनच हे मॅचचे स्वतंत्र तत्त्व विज्ञानात मानण्याची पाळी शास्त्रज्ञावर येते. तसेच स्वतंत्र मानवशास्त्रीय तत्त्व विज्ञानात मानण्याची पाळी आली, तर वैज्ञानिकदृष्ट्या खळखळ करण्याचे कारण नाही!

भौतिक विश्वात हल्ली आढळून येणारी भौतिक मूल्ये मानवाच्या निर्मितीसाठी निर्माण झाली असली तरी क्वॉंटम सिद्धांतानुसार इतरही अनेक ( भिन्न मूल्ये असलेली ) विश्वे निर्माण होतात, त्यांचे काय? पण त्यांची निर्मिती मानवासाठी झालेली नसल्याने ती अपयशी विश्वे (Failed Universes) म्हणता येतील. पण जे. ए. व्हीलर या टेक्सास

(पूर्वी प्रिन्स्टन) युनिव्हर्सिटीच्या शास्त्रज्ञाचा विश्वास आहे की मानवनिर्मिती हेच विश्वनिर्मितीचे उद्दीष्ट असल्यामुळे मुळात अशी (मानवहीन) विश्वे निर्माण होणारच नाहीत! (आणि झाली तरी त्यांच्याशी आपला संपर्क शक्य नसल्याने ती न झाल्यातच जमा आहेत.)

विश्वातील भौतिक मूल्ये ( किंवा स्थिरांक Constants) मानवाच्या निर्मितीमध्ये अपरिहार्यपणे परिणत होण्याच्या दृष्टीने अस्तित्वात आली आहेत, या वैज्ञानिक प्रमेयातून जे निष्कर्ष निघतात, ते मानवाच्या दृष्टीने अत्यंत महत्वपूर्ण आहेत. हे निष्कर्ष हे दर्शवितात की *मानव या भौतिक विश्वात आगंतुक किंवा अर्थहीन तर नाहीच, पण स्वत: विश्वच त्याच्या निर्मितीने अर्थपूर्ण झाले आहे, डोळस ठरले आहे.* मानव नसता तर या विश्वाला अस्तित्वात असण्याचे कारणच नाही, आणि म्हणून मानवाच्या इच्छा-आकांक्षा ध्येये-उद्दीष्टे, धर्म-संस्कृती यांच्यात व या भौतिक विश्वात, माता व तिच्या उदरातील गर्भ यांच्यातील संबंधासारखा अतूट संबंध निर्माण झाला आहे. एकाला दुसऱ्यामुळे अर्थ प्राप्त झाला आहे. त्यामुळे मानवाच्या धार्मिक व नैतिक कल्पना म्हणजे अरण्यरुदन समजण्याचे कारण नाही. किंबहुना या गोष्टी म्हणजे भौतिक विश्वाचे अधिष्ठानच होय असे म्हणावे लागते. (विश्व आंधळ्या नियमांनी अपघाताने निर्माण झालेले नाही, याचा हाच अर्थ आहे.) म्हणूनच ज्ञानेश्वरांनी पसायदानात विश्वात्मक देवाची समस्त मानवाच्या कल्याणासाठी केलेली आळवणी अर्थगर्भ ठरते. विश्वाचे उद्दिष्ट मानव निर्माण करणे हे असेल तर ते विश्व मानवाला पसायदान देणारे का ठरू नये? त्याच्या यज्ञाने, प्रार्थनेने ते का संतुष्ट होऊ नये? कारण ते जसे आंधळे नाही, तसे बहिरेही नाही असे मानावे लागते.[१०]

## सर्वं यज्ञे प्रतिष्ठतम्!

विश्व मानवासाठी असेल तर मानवही विश्वासाठी आहे असे ठरते, विश्व व मानव या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत, हे सत्य उपनिषद्‌कारांनी 'नर' व 'वैश्वानर' या संकेतातून व्यक्त केले असून त्यांना यज्ञ जोडते असे म्हटले आहे. हे सत्य गीतेने **'तस्मात् सर्वगतं ब्रह्म नित्यं यज्ञे प्रतिष्ठितम्।'** या शब्दात व्यक्त केले आहे. विश्व व मानव यांना जोडणारा यज्ञ हा उपनिषद्‌कारांचा दुवा वैज्ञानिकांना सापडणे शक्य नसले तरी विश्व व मानव यांच्यात दुवा असल्याचे निदान विश्वशास्त्रात 'मानवशास्त्रीय तत्व' स्वीकारून वैज्ञानिकांनी मान्य केले आहे, हे महत्वाचे आहे. येथे विश्वशास्त्र व अध्यात्मशास्त्र ही दोन्ही शास्त्रे एकमेकांशी हस्तांदोलन करीत असल्याची आढळून येतात!

## टीप –

विश्व जसे भौतिक नियमानुसार चालले आहे, तसे ते नैतिक नियमानुसारही चालले आहे. म्हणजे ते यज्ञावर, त्यागावर, अधिष्ठित आहे, असा उपनिषदकारांचा सिद्धांत आहे. (याला 'ऋत' अशी वैदिक संज्ञा आहे) गुरुत्वाकर्षणाचा नियम न पाळणाऱ्यावर जसा कपाळमोक्षाचा प्रसंग गुदरतो, तसे नैतिक नियम (ऋत) न पाळणाऱ्यावर नैतिक (अध्यात्मिक) कपाळमोक्षाचा प्रसंग गुदरतो, असा हा दृष्टिकोण सांगतो. अशा रीतीने भौतिक व नैतिक नियम एकाच वैश्विक सत्याच्या दोन बाजू आहेत, असे म्हणता येईल. उदा. शक्ती खर्च केल्याशिवाय कोणतेही कार्य होत नाही, असे उष्णतागतिशास्त्राचा नियम सांगतो. दुसऱ्या शब्दात, वैज्ञानिकदृष्ट्या प्रत्येक वस्तूला किंमत आहे. हेच नैतिक परिभाषेत सांगावयाचे तर मानवाला कोणत्याही सुखाची किंमत त्यागाच्या किंवा दुःखाच्या स्वरूपात अपरिहार्यपणे मोजावी लागते. मानवाला आपल्या भौतिक सुखासाठी परिसर मालिन्य (Pollution) व परिसर-असमतोल (Ecological Imbalance) या स्वरूपात हल्ली जी जबर किंमत मोजावी लागत आहे, ती याच सत्याचे वा नियमाचे जागतिक पातळीवर प्रत्यंतर आणून देणारे उदाहरण आहे. स्वार्थ, लोभ, अहंकार या दोषांचे परिणाम नैतिक व आध्यात्मिक पातळीवर मानवाला भोगावे लागत असले, तरी ते सूक्ष्म असल्याने भौतिक डोळ्यांना दिसत नाहीत. पण त्यांचा अतिरेक झाला तर युद्धाच्या, रक्तपाताच्या व प्रचंड विनाशाच्या किंवा परिसर असमतोलाच्या स्वरूपात ते डोळ्यांना दिसतातही. म्हणून सर्वांचे (विश्व) कल्याण व्हावे असे वाटत असेल, तर यज्ञ करा, त्याग करा असा उपनिषद्कारांचा संदेश आहे. तो नाही केला तरी यज्ञ होणारच आहे! फरक इतकाच की पहिल्या प्रकारच्या यज्ञात मनुष्य स्वखुषीने विश्व कल्याणासाठी त्याग करतो. आपल्या इच्छेची आहुती देतो. दुसऱ्या प्रकारच्या यज्ञात वैश्विक नियमानुसार त्याच्या सुखाची (किंवा खुद्द त्याची !) आपोआप आहुती पडते, आणि विश्वाचा ढासळलेला नैतिक, वैश्विक तोल सांभाळला जातो! म्हणून उपनिषद्कार म्हणतात:

**ईशावास्यमिदं सर्वं यत्किंच जगत्यां जगत्।**
**तेन त्यक्तेन भुंजीथा: मा गृध: कस्यस्वित् धनम्।।**

**(ईशोपनिषत्, मंत्र १)**

**अर्थ:** या जगात जे काही आहे, ते सर्व ईश्वराचे आहे. म्हणून त्यागपूर्वक भोगा. दुसऱ्याच्या धनाचा अपहार करू नका. किंवा

**परस्परं भावयन्त: श्रेय: परमवाप्स्यथ।**
(एकमेकां साह्य करू, अवघा धरू सुपंथ) (**गीता**, ३।११)

## संदर्भ टिपा :

१. A Free Man's worship, in **Mysticism and Logic** -Bertrand Russell, Allen and Unwin Ltd. London 1949. P. 56.

२. **Chance and Necessity** - by Jacques Monod-Fount-Paper back 1983. P. 60.

३. स्फोटवादी सिद्धांत चुकीचा म्हणणारे कोणी विश्वशास्त्रज्ञ नसले तरी हॅन्स आल्फवेन नावाच्या स्वीडिश भौतशास्त्रज्ञाने त्याला पर्यायी असा आपला Plasma Universe चा सिद्धांत मांडला आहे. पण हल्ली त्याच्या बाजूने निरीक्षणात्मक पुरावे नाहीत. तथापि त्याचा पुरस्कार काहीनी केला आहे पाहा: **The Big Bang Never Happened.** Eric J. Lerner (1992)

४. शून्यातून वस्तू निर्माण होण्याची कल्पना प्रथम पास्कवल जॉर्डन या क्वॉंटम भौतशास्त्रज्ञाला सुचली व ती जॉर्ज गॅमो या विश्वशास्त्रज्ञाने आईन्स्टाईनला रस्त्याने चालत जात असताना सांगितली. ती ऐकून आईन्स्टाईन एकदम थबकला. त्याबरोबर ( ते दोघे रस्ता ओलांडत असल्यामुळे) अनेक वाहने त्यांना धडक लागेल म्हणून थांबली, असा किस्सा गॅमोने आपल्या आत्मचरित्रात सांगितला आहे. (**My World Line** - G. Gamow -Viking Press 1970)

५) या दृष्टीने बर्ट्रांड रसेलचा मानव विश्वात अपघाती असल्याचा उपर्युक्त निष्कर्ष घाईचा ठरतो. पण तो समर्थनीय म्हणता येईल. कारण त्याने हे लिहिले त्यावेळी विश्वशास्त्र बाल्यावस्थेत होते. पण जॅक मोनो या रेण्विक जीवशास्त्रज्ञाचा हाच अलीकडील निष्कर्ष मात्र आश्चर्यकारक व असमर्थनीय म्हणावा लागतो. जीवाची पृथ्वीवरील उत्पत्ती ही एक असामान्य (Singular) घटना असल्याचे त्याने म्हटले असून विश्वाची उत्पत्ती असामान्य अवस्थेत झाल्याचे म्हटल्याने निर्माण होणारी अनवस्था समस्या अशा रीतीने जीवाच्या उत्पत्तीमध्येही निर्माण होते आणि त्याची नियमबद्ध उपपत्ती लावणे अशक्य होऊन बसते व अपघाताच्या कल्पनेची कास धरून शास्त्रज्ञांना काखा वर कराव्या लागतात. पण विश्वाच्या उत्पत्तीमधील अनावस्था समस्या टाळण्यासाठी वैज्ञानिक सिद्धांत मांडणारा जसा हॉकिंग हा शास्त्रज्ञ निर्माण झाला आहे, तसाच जीवाच्या उत्पत्तीमधील अनवस्था समस्या टाळण्यासाठी वैज्ञानिक सिद्धांत मांडणारा प्रिगॉजिने हा शास्त्रज्ञ निर्माण झाला आहे. (या विषयीची माहिती पुढे दिली आहे.)

६. ब्रह्मांड क्वॉंटम विज्ञानाचे नियम पाळते आणि क्वॉंटम विज्ञान (अध्यात्म शास्त्राप्रमाणे) परंपरागत तर्कशास्त्राला विरोधी आहे. त्यामुळे 'शून्य' (Zero-Point Energy) म्हणजे सर्व काही आहे असे ठरते! आणि हे गणितानेही दाखवून देता येते. (पाहा : **Causality and Chance in Modern Physics** - by D. Bohm. Routledge and Kegan Paul. 1957 p. 163)

७. ज्या घटनेचे भाकीत करता येत नाही त्या घटनेला अपघात म्हणतात आणि ज्या घटनेची कार्यकारणमीमांसा करता येत नाही, त्या घटनेचे भाकीत करता येत नाही. कार्यकारणमीमांसा हे विज्ञानाचे व्यवच्छेदक लक्षण असल्याने अशी (कार्यकारणमीमांसे पलीकडील) घटना विज्ञानाच्या कक्षेत येत नाही असे मानावे लागते. अशी घटना गृहीत धरणे

म्हणजे विज्ञानाचे क्षेत्र मर्यादित करणे होय. जेथे संपूर्ण विश्वाची उत्पत्ती विज्ञानाचा विषय होऊ शकते, तेथे विश्वातील एखादी घटना विज्ञान क्षेत्राबाहेरची समजणे सयुक्तिक ठरत नाही. तात्पर्य, अपघात ही विज्ञानमान्य कल्पना ठरू शकत नाही. तरीही अपघात म्हणजे योगायोग (Chance) समजून विश्वाची उत्पत्ती योगायोगाने झाली असे म्हणणारे लोक आहेत. उदा. **Accidental Universe**-by Paul Davies, 1982. परंतु, हा योगायोग 'मानवीय तत्त्वा' (Anthropic Principle) च्या मदतीने नाहीसा करता येतो असे उपर्युक्त ग्रंथात पॉल डेव्हिसने दाखवून दिले आहे. याचे पुढे विवेचन केले आहे.

८) क्वाँटम सिद्धांतही असेच सूचित करतो. या सिद्धांतानुसार आम्हाला विश्व जसे दिसते, तसे ते असण्याचे कारण आम्ही विश्वात आहोत हेच होय. मानवी जाणिवेशिवाय विश्वाच्या अस्तित्वाला अर्थ नाही, असे हा सिद्धांत सांगतो. कारण बंदिस्त वा स्वयंपूर्ण वस्तुनिष्ठ (Objective) म्हणजे मानवी जाणीव (Subjective) नसलेल्या विश्वाचे वर्णन क्वाँटम सिद्धांतानुसार अशक्य आहे. म्हणून जे. ए. व्हीलरने या विश्वाचे वर्णन एकात्म किंवा सहयोगी (Participatory) असे केले आहे.

९. जीवशास्त्रातही अशा अनेक सूक्ष्म जुळवणुकी दिसून येतात की ज्यांचा उद्देश मानवासारखा बुद्धिमान प्राणी निर्माण करण्याखेरीज दुसरा कोणताही संभवत नाही. या सर्व गोष्टींची छाप काही शास्त्रज्ञांवर इतकी पडली आहे की ते बुद्धिमान प्राणी निर्माण करणाऱ्या या विश्वालाच बुद्धिमान म्हणण्याच्या थराला गेले आहेत! त्यांनी आपल्या पुस्तकांना दिलेल्या मथळ्यावरून ही गोष्ट स्पष्ट होते. उदा. **The Intelligent Universe** - by D. Foster, Abelard, 1975,**The Self Organising Universe**-by E. Jantsch, Pergamon,1980 **The Intelligent Universe** - by Fred Hoyle 1983. आईन्स्टाईननेही वैश्विक नियम अतिश्रेष्ठ बुद्धिमत्ता दर्शवितात असे म्हटले आहे. उदा. **The world As I see It, 1935**

१०. ज्ञानेश्वरांनी ज्ञानेश्वरीत 'निवृत्तीनाथ' या आपल्या गुरूंना उद्देशून विश्वात्मक देव ही शब्दयोजना केली असली तरी 'निवृत्तीनाथ' हे मानवी रूपातील त्यांच्या 'विश्वात्मक देवा'च्या संकल्पनेचे प्रतीक आहे हे 'अमृतानुभवा'च्या पहिल्याच संस्कृत श्लोकात निवृत्तीनाथांबद्दल 'अजं अक्षरं अनाख्येयम्' इत्यादी जी विशेषणे वापरली आहेत त्यावरून स्पष्ट होते.

## संदर्भ ग्रंथ / लेख


१. Boslough, John, **Stephen Hawking's Universe,** Avon, 1989

२. Calder, Nigel, **Einstein's Universe,** Penguin, 1988

३. गळतगे अद्वयानंद, विश्वाच्या उत्पत्तीविषयीचे दोन आधुनिक सिद्धांत, **नवभारत,**

एप्रिल व मे, १९६१.

४. Gamow, George, **The Creation of the Universe**, Mentor, 1952.

५. Gribbin, John , **In Search of the Big Bang**, Gorgi, 1986

६. Hawking, Stephen, **A Brief History of Time,** Bantam, 1989.

७. Hoyle, Fred, **The Nature of the Universe,** Mentor.1958

८. Kaku Michio, and Trainer, Jenifer, **Beyond Einstein,** Bantam, 1987

९. Monod, Jacques , **Chance and Necessity.** Fount, 1983

१०. Narlikar, Jayant, **Violent Phenomena in the Universe** Oxford, 1982

११. Pagels, Heinz, **Perfect Symmetry** , Bantam. 1985.

१२. Prigogine, Ilia and Stengers, Isabelle, **Order out of Chaos,** Flamingo, 1988.

१३. Russell, Bertrand, **Mysticism and Logic** , Allen and Unwin 1949.

१४. Sciama, Dennis, **The Unity of the Universe,** Faber and Faber 1959.

१५. Spencer-Jones, Harold, Continuous Creaton of Matter, **Science News,** 32, 1954.



८

# बुद्धियोगी विज्ञान

## एका नव्या विज्ञान- युगाचा जन्म

विज्ञानाचा व बुद्धीचा घनिष्ठ संबंध आहे हे सर्वांना माहीत आहे. या अर्थाने विज्ञान बुद्धिवादी आहे असेही म्हणता येईल. (आणि म्हटलेही जाते.) वरील मथळ्यात मात्र 'बुद्धियोगी विज्ञान' असा शब्दप्रयोग केला आहे. तेव्हा असा प्रश्न निर्माण होतो की, हे बुद्धियोगी विज्ञान बुद्धिवादी विज्ञानाहून वेगळे आहे काय? असेल तर ते कोणत्या दृष्टीने ? व दुसरा प्रश्न : एक नवे युग खरोखरच जन्माला येत आहे काय? येत असेल तर ते कोणते? व ते कसे जन्माला येत आहे? या प्रश्नांची उत्तरे सुरुवातीलाच वाचकांना कळावीत म्हणून एक गोष्ट सांगता येईल. गोष्टीचा मथळा आहे:'सत्याचे दर्शन'

### एका साधूची गोष्ट

एकदा एका राजाला आपल्या संपत्तीचा मोठा वाटा धर्मासाठी दान करण्याची इच्छा झाली. पण ते दान धर्मासाठी होत आहे याची त्याला खात्री करायची होती. म्हणून त्याने आपल्या विश्वासातील एका पाव भट्टीवाल्याला बोलावून एका पावात भरपूर रत्ने घालून तो पाव अत्यंत धार्मिक माणसाला द्यायला सांगितले, दुसरा एक साधा पाव भाजून तो अत्यंत अधार्मिक माणसाला द्यायला सांगितले .

दुसरे दिवशी दोन माणसे पाववाल्याकडे आली. त्यापैकी एक भगवी वस्त्रे घातलेला साधू होता. तो दिसायला अत्यंत धार्मिक दिसत होता. पण तो ढोंगी होता. दुसरा साध्या कपड्यातील माणूस होता. त्याला पाहून पाववाल्याला एका परिचयाच्या अत्यंत अधार्मिक माणसाची आठवण झाली व त्याची त्याला शिसारी आली. म्हणून त्याने रत्ने घातलेला पाव साधूला दिला व साधा पाव साध्या कपड्यातील माणसाला दिला.

पाव हातात पडताच साधूला तो जड लागला. हाताने तोलून पाहिल्यावर त्याला पाव भट्टीवाला बदमाष असावा, पावात त्याने दगड घातले असावेत असा संशय आला. आपण त्याची बदमाषी ओळखली हे दाखवून देण्यासाठी तो साध्या कपड्यातील माणसाला म्हणाला, "आपण पावांची अदलाबदल करू या का? हा मोठा पाव आहे, तू तर जास्त भुकेलेला दिसतोस." तो माणूस मिळेल ते स्वीकारणारा (श्रद्धाळू व भोळा)

असल्यामुळे त्या गोष्टीला तयार झाला व त्याने साधूचा पाव घेऊन आपला पाव त्याला दिला.

हे सर्व दाराच्या फटीतून राजा पाहात होता. त्याला वाटले की साधूला संपत्तीपासून दूर ठेवण्यासाठी दैवाने असा हस्तक्षेप केला. साध्या कपड्यातील माणसाने आपणाला मिळालेल्या रत्नांचा सत्कारणी उपयोग केला. राजाला काय घडले हे समजले नाही.

''मला सांगितल्याप्रमाणे मी वागलो.'' पाववाला म्हणाला. ''तू दैव बदलू शकत नाहीस.'' राजा म्हणाला.

''मी किती चतुर'' साधू म्हणाला.

गोष्ट संपली. गोष्टीचा मथळा 'सत्याचे दर्शन' असा आहे. गोष्टीतील शेवटची तीन वाक्ये प्रत्येकाचे 'सत्य' वेगळे असल्याचे व प्रत्येकजण मूळ सत्यापासून दूर असल्याचे दाखवतात. पाववाल्याने ढोंगी साधूला अत्यंत धार्मिक समजून रत्ने घातलेला पाव दिला असल्यामुळे राजाने सांगितल्याप्रमाणे तो मुळीच वागला नाही. राजा साधूला रत्नांचा पाव मिळण्यास दैवाने अडथळा निर्माण केला असे समजला; पण ते खरे नव्हते. कारण साधू 'साधू' नव्हता. साधू स्वत:ला फार चतुर समजला. पण ते खरे नव्हते, कारण तोच फसला होता. साधू म्हणजे बुद्धिवादी (रूढ) विज्ञान, साध्या कपड्यातील मनुष्य म्हणजे बुद्धियोगी (नवे) विज्ञान, राजा म्हणजे समाजाचे राजकीय, वैचारिक इत्यादी पुढारीपण करणाऱ्या लोकांचा प्रतिनिधी. पाववाला म्हणजे अर्थात सामान्य जनता. समाजातील नेत्यांनी व सामान्य जनतेने धार्मिकता व भगवी वस्त्रे यांच्यातील संबंध अतूट मानला आहे. (विज्ञानाचे म्हणणे खोटे कसे असेल?) श्रद्धेची (अंधश्रद्धा म्हणून) टवाळी करण्याची हल्ली फॅशन पडली आहे. बुध्दीचे गोडवे गाणे, प्रत्येक गोष्टीकडे चिकित्सेने व संशयी दृष्टीने पाहणे (Scepticism) हा विज्ञानवादी जगाचा धर्म बनला आहे. सत्य अशाने सापडत नाही, सत्याचा लाभ श्रध्देतूनच होऊ शकतो, हे या गोष्टीतून सांगावयाचे आहे. या श्रद्धावादाचे निकषसुद्धा वैज्ञानिकच असून (ते कसे हे पुढे स्पष्ट केले आहे.) त्या विज्ञानाला (गीतेतील तत्त्वज्ञानाला अनुसरून) बुद्धियोगी विज्ञान म्हटले आहे. अशा बुद्धियोगी विज्ञानाचे नवे युग जन्माला आले असून त्याची ज्या थोड्या लोकांना जाणीव झाली आहे, त्यांना तो उदय स्पष्ट दिसतही आहे. त्याची जाणीव या लेखातून वाचकांनाही करून द्यावयाची आहे.

## युगप्रवर्तन कसे होते?

एखादे नवे युग कसे जन्माला येते हे माहीत असल्याशिवाय नवे युग जन्माला येत आहे, असे विधान कोणालाही करता येणार नाही. आणि युगप्रर्वतनाची यंत्रणा काय

आहे हे इतिहासाचा सांगोपांग अभ्यास केल्याशिवाय कोणालाही कळणार नाही. अर्नोल्ड टॉयंबी या प्रसिद्ध इतिहासवेत्त्याने इतिहासाचा असा सांगोपांग अभ्यास करून **A Study of History** हा आपला दहा खंडात्मक ग्रंथ प्रसिद्ध केला आहे. या ग्रंथात तो म्हणतो की नवी संस्कृती (किंवा नवे युग) निर्माण होण्यासाठी परिस्थितीचे आव्हान प्रथम असावे लागते. या आव्हानाला प्रतिसाद म्हणून नवी संस्कृती वा समाज जन्माला येतो. जगातील अनेक संस्कृतींच्या व समाजांच्या उदयाची उपपत्ती या आव्हान व प्रतिसाद (Challenge and Response ) या सूत्राने लावता येते. येथे हेही सांगितले पाहिजे की धर्माचे अधिष्ठान स्वीकारल्याशिवाय भावी समाजाचा व संस्कृतीचा निभाव लागणार नाही, असे टॉयंबीने म्हटले आहे.

टॉयंबीची युगप्रवर्तनाची मीमांसा बरोबर असेल व हल्ली युगप्रवर्तन होत आहे हे खरे असेल तर कोणते आव्हान हल्लीच्या समाजापुढे उभे आहे असा साहजिकच प्रश्न निर्माण होतो. तसे पाहिले तर प्रत्येक समाजापुढे नेहमीच आव्हाने उभी असतात. पण ती सर्व युगप्रवर्तक नसतात. असे युगप्रवर्तक प्रसंग पाश्चात्य इतिहासात चार-पाच वेळाच येऊन गेले असे लेविस ममफोर्ड याने आपल्या **The Transformation of Man** या ग्रंथात म्हटले आहे.

उदा. नवाश्मयुगाच्या शेवटी शेतीच्या शोधामुळे झालेला नागरी संस्कृतीचा उदय, रोमन सम्राज्याच्या अस्ताबरोबर झालेला ख्रिश्चन धर्माचा उदय, व मध्ययुगाच्या शेवटी झालेला विज्ञान-युगाचा उदय. पुन्हाआता या जुन्या विज्ञानयुगाचा अस्त होऊन विसाव्या शतकानंतर नव्या विज्ञानयुगाचा उदय होऊ घातला आहे.

नदीचा उगम जसा सुरुवातीला लहान असतो तसा नव्या युगाचा उदयही प्रथम नजरेत न भरण्याइतका लहान प्रमाणावरच असतो. विज्ञानयुगाच्या बाबतीत हे विशेष खरे आहे. उदा. विज्ञानयुगाचा उदय कोपर्निकसच्या 'सूर्य स्थिर असून पृथ्वी त्याच्या भोवती फिरते' या सिध्दांतापासून झाल्याचे मानण्यात येते. या सिध्दांतावर विश्वास ठेवणारे लोक युरोपात सुरुवातीला हाताच्या बोटावर मोजण्याइतकेच होते. हा सिद्धांत युरोपियन समाजाच्या गळी उतरायला मात्र बराच काळ जावा लागला. दृष्टिकोणातील किंवा माणसाच्या जाणीवेतील बदलामुळे होणाऱ्या सामाजिक स्थित्यंतराला बराच काळ जावा लागतो हेही यावरून कळून येते. हा कालावधी शतकातच मोजावा लागतो. उदा. कोपर्निकसचा उपर्युक्त सिद्धांत मांडणारा ग्रंथ प्रथम इ. स. १५४३ साली (कोपर्निकसच्या मृत्यूच्या वर्षी) प्रसिद्ध झाला. या सिद्धांताचा हिरीरिने पाठपुरावा करणाऱ्या व त्याबद्दल समाजाचा छळ सोसणाऱ्या गॅलिलियोचा मृत्यू यानंतर बरोबर शंभर वर्षांनी (म्हणजे इ. स. १६४२ साली) झाला. पण या सिद्धांताला गणिताचा आधार नव्हता. त्याला ज्या

न्यूटनने गणिताचा आधार दिला त्याचाही जन्म त्याच वर्षी (म्हणजे शंभर वर्षानी) झाला. (इ. स. १६४२) पण अजून रसायनशास्त्राचा जन्म झाला नव्हता. ते अजून मध्ययुगीन कल्पनांतून बाहेर आले नव्हते. हे काम लॅव्हायझीरने केले. (म्हणून त्याला 'रसायनशास्त्राचा जनक' म्हणतात.) या रसायनशास्त्राच्या जनकाचा जन्म, ज्याला आधुनिक विज्ञानाचा जनक म्हणतात त्या गॅलिलिओच्या मृत्यूनंतर बरोबर शंभर वर्षानी म्हणजे इ. स. १७४२ साली झाला. आणि त्यानंतर शंभर वर्षानी जीवशास्त्राला वैज्ञानिक बैठक मिळाली. (ती अर्थात डार्विनच्या उत्क्रांतीवादी सिद्धांताने १८४० नंतर बीगल या जहाजातून जगप्रवास करून डार्विन परतल्यानंतर) आणि यानंतर शंभर वर्षांनी , म्हणजे इ. स. १९४२ साली, आधुनिक विज्ञानाच्या अधिकृत जन्मानंतर बरोबर चारशे वर्षानी या विज्ञानयुगाचे प्रथमच खरे स्वरूप जगाला माहीत झाले. कारण त्यावर्षी शिकॅगो विद्यापीठाच्या आवारात पहिली अणुभट्टी फर्मी याने कार्यान्वित करूनअणुशक्तीला प्रथम जन्म दिला. अशा रीतीने या विज्ञानयुगाने आपण भस्मासुरकुलोत्पन्न असल्याचे दाखवून दिले असले तरी येथे मुख्य सांगावयाचा मुद्दा हा की युगप्रवर्तनाची कालगणना शेकडो वर्षात करावी लागते. युगप्रवर्तनाची सुरूवात वर म्हटल्याप्रमाणे लहान प्रमाणावर व अल्पसंख्य लोकांच्या दृष्टीकोणातील व जाणिवेतील बदलाने होते. तेव्हा जे नवे युगप्रवर्तन हल्ली होऊ घातले आहे त्याचीही जाणीव फार थोड्यांना असून त्याची सर्व समाजाला जाणीव व्हायला किमान एक शतक जरी लोटले तरी आश्चर्य वाटायला नको.

## तांबडा इस्पिक व काळा बदाम

कोपर्निकसच्या सिद्धांताने झालेल्या विज्ञानयुगाच्या प्रारंभावरून एक गोष्ट लक्षात येते की एखाद्या युगाची सुरुवात नवीन कल्पनेतूनच होते असे नाही,तर जुन्याच एखाद्या कल्पनेचा समाजाच्या एखाद्या विशिष्ट परिस्थितीत पुनर्जन्म झाला तरी हे युगप्रवर्तन होते. कारण कोपर्निकसचा सूर्यकेंद्री सिध्दांत काही नवीन नव्हता.यापूर्वी ग्रीकांनी व भारतीयांनी याचा शोध लावला होता व भारतीयांच्या समाजात ही कल्पना रूढही झाली होती. (ही गोष्ट लेखक-कवी आपल्या प्रतिपाद्य विषयाच्या स्पष्टीकरणार्थ या कल्पनेचा दृष्टांत देत असत यावरून स्पष्ट होते. उदा. ज्ञानेश्वरांची पुढील ओवी पाहा:

*आणि उदोअस्ताचेनि प्रमाणे । जैसे न चालता सूर्याचे चालणे ।*
*तैसे नैष्कर्म्यत्व जाणे । कर्मीच असता ॥ (४.१९)*

या गोष्टीचा उल्लेख करण्याचे कारण हल्ली जे युगप्रवर्तन होत आहे, तेही जुन्याच कल्पनेच्या व दृष्टिकोणाच्या पुनर्जन्माने होत आहे. मात्र हा दृष्टिकोणातील बदल अल्पसंख्य लोकांतच घडून आला असून त्यांना बहुसंख्य प्रस्थापितांशी त्याच्यासाठी लढावे लागत

आहे. नव्या दृष्टिकोणाच्या लोकांना प्रस्थापिताशी असे का लढावे लागते याचे विश्लेषण थॉमस कुह्न या लेखकाने 'वैज्ञानिक क्रांतीची संरचना' **The Structure of Scientific Revolutions** या आपल्या प्रसिद्ध ग्रंथात फारच चांगल्या रीतीने केले आहे. रूढ विज्ञान (Normal Science) नाविन्याच्या (व म्हणून नवयुगाच्या) विरुद्ध कसे असते (व लढते) हे दाखवून देण्यासाठी त्यांने जेराम ब्रूनर या मानशास्त्रज्ञाने प्रत्यक्ष केलेल्या एका प्रयोगाचा दाखला दिला आहे. या प्रयोगात प्रयुक्तांना एका पाठोपाठ एक असे खेळातले पत्ते ओळखण्यासाठी दाखविले जातात. हे पत्ते दाखवताना मध्येच एखादा 'नवा' पत्ता दाखवला जातो. उदा. 'तांबडा इस्पिक सहा' किंवा 'काळा बदाम चार' इत्यादी. हे नवे पत्ते दाखवताना ब्रूनरला असे आढळून आले की हे नवे पत्ते पाहून प्रयुक्त अडखळत, गोंधळत व काहीजण तर चिडखोरही बनत व चुकीचे ओळखत. पत्ते दाखवण्याचा काल वाढवावा तसे काही लोकांच्या लक्षात खरा प्रकार येत असे. पण काही असे लोक निघत की ज्यांना बरोबर ओळखण्यासाठी सामान्यपणे लागणाऱ्या वेळेच्या ४० पट अधिक वेळपर्यंत पत्ते दाखवले तरी खरा प्रकार त्यांच्या लक्षात येत नसे व ते गोंधळून जात व चुकीचे ओळखत. यावरून कुह्नने असा निष्कर्ष काढला आहे की - खेळातील पत्त्याप्रमाणे विज्ञानातही पुर्वीच्या नियमात न बसणाऱ्या गोष्टी (शोध) स्वीकारण्यास काही लोकांचा सुप्त मानसिक विरोध (Resistane) असतो. तो मानसिक असल्यामुळे त्याचे तार्किक समर्थन करणे अशक्य असते. बुद्धियोगी विज्ञानातील नव्या शोधांना रूढ (बुद्धिवादी) वैज्ञानिकांचा विरोध अशाच प्रकारचा सुप्त मानसिक व तर्कविरोधी - निव्वळ प्रतिकार स्वरूपाचा आहे. पण तो फार काळ टिकण्यासारखा नाही कारण विज्ञानात नवीन काहीच निर्माण होऊ नये (प्रगती होऊ नये) किंवा होत नाही, हे म्हणणे टिकणे शक्य नाही. कुह्नने हेही दाखवून दिले आहे की नवीन शोध वरचेवर घडू लागले व त्याच्या बाजूचे पुरावे साचू लागले की हा प्रतिकार ज्या मानसिक चौकटीच्या आधारे होतो, ती चौकटच कोलमडून पडते. त्यामुळे तो विरोध नाहीसा होतो व नव्या मानसिक चौकटीचा (New paradigm) जन्म होऊन नवी दृष्टी जन्माला येते. ही दृष्टी शास्त्रीय जनमानसात रुजायला अर्थात वर म्हटल्याप्रमाणे बराच काळ जावा लागतो.

## रूढ विज्ञानाचा तोंडवळा

वर युगप्रवर्तन 'आव्हान व प्रतिसाद' या टॉयंबीच्या सूत्रानुसार होते असे म्हटले आहे. हल्लीच्या वैज्ञानिक संस्कृतीपुढे कोणते आव्हान उभे आहे की ज्याला प्रतिसाद दिल्याने नव्या युगाचे प्रवर्तन होणार आहे? असा साहजिकच प्रश्न उभा राहतो.[१] हल्ली सर्व क्षेत्रात मानवाने जी 'प्रगती' केली आहे ती विज्ञानामुळेच होय हे सर्वमान्य आहे. या

'प्रगती' चे स्वरूप वाचकांच्या नीट ध्यानात आणून द्यावयाचे तर लेखाचा फारच विस्तार होईल. तो या लेखाचा मूळ उद्देशही नाही. थोडक्यात, मानवाच्या हल्लीच्या सामाजिक, राजकीय, आर्थिक, नैतिक इत्यादी सर्व क्षेत्रातील अवस्थेला हे आधुनिक विज्ञानच पूर्णपणे जबाबदार आहे असे म्हटले तर या विधानाला कोणी फारसा आक्षेप घेईल असे वाटत नाही. या क्षेत्रांचे थोडे बारकाईने निरीक्षण केल्यास आधुनिक शास्त्रज्ञांना व तंत्रज्ञांना 'भीक नको पण कुत्रा आवर' असे म्हणण्याची पाळी आली आहे, हे कोणाच्याही लक्षात येईल. आजच्या राजकीय, सामाजिक, आर्थिक, इत्यादी क्षेत्रातील सर्व अनर्थांचे खापर या आधुनिक विज्ञानाच्या डोक्यावर मी फोडत आहे असे कोणाला वाटेल. पण तसे मुळीच नाही. माझे म्हणणे आधुनिक विज्ञानामुळे हे अनर्थ प्रत्यक्ष ओढवले आहेत असे नसून आधुनिक विज्ञानदृष्टी स्वीकारल्यामुळे मानवी मनात (जाणिवेत) जे परिवर्तन घडून आले आहे, त्यामुळे हे अनर्थ ओढवले आहेत. या अनर्थांना मानवच प्रत्यक्षात जबाबदार आहे. आधुनिक विज्ञानामुळे ज्या श्रद्धा व दृष्टिकोण त्याच्यात निर्माण झाल्या आहेत त्या या अनर्थांना कारणीभूत आहेत. त्या श्रद्धा टाकून नव्या श्रद्धा त्याने स्वीकारल्या व तदनुसार आपले जीवन घडविले तर हे अनर्थ निश्चितपणे टळू शकतील. आता या अनर्थकारी जुन्या वैज्ञानिक श्रद्धा कोणत्या बरे?

आधुनिक विज्ञानाच्या दोन मूलभूत श्रद्धा आहेत.

१. विश्व हे वस्तुनिष्ठ ज्ञानाशिवाय कळणार नाही आणि वस्तुनिष्ठ ज्ञान हेच सत्यज्ञान आहे.

२. विश्व जड, निर्जीव व यंत्रवत् आहे. ते तसे नसेल तर त्याचे वस्तुनिष्ठ ज्ञानच होणार नाही.

आता प्रश्न असा आहे की, विश्वात सजीव व जाणीवयुक्त वस्तूही (मानव व इतर प्राणी) आहेत. त्यांचे वस्तुनिष्ठ ज्ञान कसे व्हायचे? त्यांचे वस्तुनिष्ठ ज्ञान होण्यासाठी त्यांचे जे मूलभूत जड घटक आहेत त्या घटकांत त्यांचे अपवर्तन (Reduction) केले पाहिजे हे उघड आहे. कारण जे जड नाही त्यांचे वस्तुनिष्ठ (सत्य) ज्ञान होणार नाही असे वर म्हटले आहे. परिणामी जीव, मन, जाणीव हे भ्रामक व असत्य ठरतात. म्हणजे असे की त्यांचे वस्तुनिष्ठ ज्ञान होत नाही. तथापि, त्यांचा वस्तुनिष्ठ अभ्यास वर म्हटल्याप्रमाणे जड मूलभूत घटकांत त्याचे अपवर्तन करून करता येतो. हाच त्याचा खरा शास्त्रीय अभ्यास असून त्याला विज्ञानाचा मूलभूत वाद (Reductionism) म्हणतात. यामुळे जीवाचा शास्त्रीय अभ्यास म्हणजे त्याच्या रासायनिक मूलभूत घटकांचा अभ्यास व मनाचा शास्त्रीय अभ्यास म्हणजे मनाचा मूलभूत (दृश्य) घटक जे वर्तन (Behaviour)

त्याचा अभ्यास ठरतो. दुसऱ्या शब्दांत जीवशास्त्र म्हणजे जीव नसलेले शास्त्र व मानसशास्त्र म्हणजे मन नसलेले शास्त्र ठरते. पहिल्याला रेणविक जीवशास्त्र (Molecular Biology) म्हणतात. दुसऱ्याला वर्तनवाद (Behaviourism) म्हणतात. रेणविक जीवशास्त्रज्ञ जीवाचा अभ्यास यंत्राची प्रतिकृती तयार करून करतात व वर्तनवादी मानसशास्त्रज्ञ घुशीवर प्रयोग करून मानवी मनाचा अभ्यास करतात. अशा अभ्यासाने जीव व मानवी मन समजेल असा त्यांना विश्वास वाटतो. अशा रीतीने या शास्त्रज्ञांचे अभ्यासाचे नमुने यंत्र व घूस (Machine Model and Rat Model) असल्यामुळे जीवाचा व मानवाचा अभ्यास करताना त्यांची दृष्टी यंत्राच्या व घुशीच्या पलीकडे जाणार नाही हे स्पष्ट आहे.

या वैज्ञानिक श्रध्दांचा व हल्लीच्या जगातील अनेक अनर्थांचा काय संबंध असा वाचकांना प्रश्न पडेल. हा संबंध स्पष्ट आहे. जर सर्व विश्व निर्जीव व यांत्रिक असेल व घुशीप्रमाणे मानवाचे मन असेल तर या निर्जीव जगाची लुबाडणूक (Exploitation) यंत्रपद्धतीने व घुशीप्रमाणे करणे क्षम्यच नव्हे तर समर्थनीय ठरते. निर्जीव जगाचा यंत्राच्या साहाय्याने व घुशीप्रमाणे उपभोग घेण्यात काहीच चूक नाही असे ठरते. मन व जाणीव भ्रामक असतील तर नैतिक जाणीवही भ्रामक ठरते. नैतिक भावनेचे अधिष्ठान व्यक्तिनिष्ठता व मूल्यनिष्ठता आहे, तर विज्ञानाचे अधिष्ठान वस्तुनिष्ठता आहे. तेव्हा जगाकडे वस्तुनिष्ठ दृष्टीने पाहणाऱ्या विज्ञानाच्या दृष्टीने भावनेचा व नीतीचा विचार करणे विज्ञानबाह्य व विज्ञान- तर्कबाह्य ठरते. याचे मानवी जीवनावर काय परिणाम झाले आहेत हे आपण पाहातच आहोत. या जडवादी वैज्ञानिक दृष्टिकोणामुळे उपभोगवादाला प्रतिष्ठा मिळाली आहे. पृथ्वीच्या साधन संपत्तीच्या उद्दाम व बेताल लुबाडणुकीलाही त्यामुळेच प्रतिष्ठा मिळाली आहे. या साधनसंपत्तीच्या लूटमारीमुळे मानवावर ओढवलेली ऊर्जेची समस्या सर्व-परिचितच आहे. पण या दृष्टिकोणामुळे पृथ्वीच्या परिसराचा जो समतोल बिघडला आहे (Ecological Imbalance) तो सावरता न येणारा आहे. उद्योगधंद्याच्या बेसुमार वाढीमुळे पृथ्वीच्या वातावरणाचे प्रदूषण तर वाढत आहेच. पण तापमानही वाढत असून ते असेच सतत वाढत राहिले तर त्याचा परिणाम काही वर्षात ध्रुव प्रदेशातील बर्फ वितळून समुद्राची पातळी वाढण्यात व काही शहरे बुडण्यात होईल. इतकेच नव्हे, पण पर्जन्यावरही त्याचे अतर्क्य परिणाम होतील . त्याचे पृथ्वीवरील वनस्पती, प्राणी व मानवी जीवनावर काय परिणाम होतील हे अर्थातच सांगता येणार नाही.

कारखानदारीचे वातावरणावरील अन्य परिणामही भयानकपणे जाणवत आहेत. याचा तडाखा Smog च्या रूपाने (धूर - Smoke - व धुके - Fog - यापासून Smog शब्द तयार करण्यात आला आहे.) मोठ्या शहरांना बसत असला तरी आम्लयुक्त

पर्जन्याचा (Acid Rain) तडाखा मात्र सर्व जगाला भोगावा लागत असून त्यामुळे तळी व सरोवरे यामधील प्राणी व वनस्पतीजीवन नष्ट होऊन ते ओस पडत आहेत. हवेतील क्लोरोफ्ल्यूरोकार्बनच्या (हे एक उपभोग्य वस्तूच्या कारखानदारीतून निर्माण होणारे द्रव्य आहे) वाढत्या प्रमाणामुळे वातावरणातील ओझोन वायूचा थर नष्ट होत आहे. त्यामुळे सूर्याच्या नीलातीत किरणापासून नैसर्गिकपणे होणारे मानवाचे संरक्षण कवच नष्ट होऊन मानवी जीवन धोक्यात येत आहे. (दक्षिण ध्रुवावर या थरात मोठे भगदाड पडल्याचे व ते वाढत असल्याचे आढळून आले आहे. ) हवा, पाणी, आणि अन्न हे रासायनिक खते व कारखाने यामुळे विषारी व दूषित बनत आहेत व मानवी आरोग्य धोक्यात आणत आहेत.

ऊर्जेची समस्या सोडविण्यासाठी शास्त्रज्ञ अणुशक्तीच्या भस्मासुराला मदतीला बोलावून मानवी संकटात आणखीनच भर घालत आहेत. या अणुशक्तीचा धोका अण्वस्त्रांच्या चाचणी प्रयोगातूनच निर्माण होतो असे नाही, (अणुयुद्धाचा धोका बाजूला ठेवू ) तर बीज निर्मितीसाठी ज्या अणुभट्ट्या बांधण्यात येत आहेत, त्यातूनही तो निर्माण होतो, कारण अणुभट्टीचा कचराही किरणोत्सारी असून तो कोठे टाकायचा हा प्रश्न भेडसावत आहे. (अणुभट्ट्यांचे चेर्नोबिलसारखे अपघात होतात हे वेगळेच) आणि तरी अणुभट्ट्या निर्माण करण्याचे कार्य अनेक राष्ट्रांत जोरात सुरूच आहे.

## जग हीच एक भोगवादी विज्ञान-वेड्यांची बंदिशाळा?

वैज्ञानिक प्रतिष्ठा मिळालेल्या या उपभोगवादाचे मानवाच्या आर्थिक जीवनावर व त्याच्या शारीरिक व मानसिक आरोग्यावर काय परिणाम झाले आहेत व होत आहेत, याची सविस्तर चर्चा येथे प्रस्तुत नाही. आर्थिक विषमता (संपत्तीची पृथ्वीवरील विषम वाटणी-श्रीमंत राष्ट्रे, गरीब राष्ट्रे,) एकीकडे अन्नाशिवाय माणसे मरत असताना अब्जावधी डॉलर्सचा माणसे मारणाऱ्या अस्त्रांच्या निर्मितीसाठी होणारा वाढता विनियोग, जागतिक पातळीवरील व अर्थशास्त्राच्या आवाक्याबाहेर गेलेली चलनवाढ , बैठ्या, विलासी व खादाड जीवनामुळे निर्माण होणाऱ्या (ज्यांना नागरी संस्कृतीचे रोग म्हणतात अशा) रोगातील वाढ, तणावयुक्त व धकाधकीच्या जीवनामुळे होणाऱ्या मानसिक आजाराची वाढ, आत्महत्या करणाऱ्यांच्या व मोटार अपघातात मरणाऱ्यांच्या संख्येत होणारी सततची वाढ, जग विसरायला लावणाऱ्या अंमली पदार्थांचे सेवन करणाऱ्यांची सर्व वयोगटात झपाट्याने वाढणारी संख्या, बालगुन्हेगारी बरोबरच सर्वच प्रकारच्या गुन्हेगारातील भयानक वाढ, औषध-सेवनाने होणाऱ्या (Iatrogenic) नव्या रोगांची वाढ, परंपरागत कुटुंब संस्था व नीतिमूल्ये याविषयीची वाढती अनास्था व या जुन्या मूल्यांच्या व दृष्टिकोणांच्या जागी निर्माण झालेली नवी उपभोगवादी मूल्ये व दृष्टिकोण (उदा. अति सुखलोलुपता,

विलासी जीवनाची जबरदस्त हाव, बुद्धीचा फाजील अभिमान, स्पर्धावृत्ती, सत्तेचा व संपत्तीचा बेसुमार लोभ, अहंकारी वृत्ती) या सर्व गोष्टी माणसाची नैतिक अध:पाताकडे जलद वाटचाल दर्शवीत असून त्या सर्वांचा जडवादी विज्ञानाने शिकविलेल्या उपभोगवादाशी घनिष्ठ संबंध आहे.[२] उपभोगवाद व निसर्गाची लूटमार शिकवणाऱ्या या विज्ञानाचे शिक्षणच सर्व शिक्षण संस्थातून मिळत असल्यामुळे या परिस्थितीत शिक्षणाने सुधारणा होण्याची सुतराम शक्यता नाही. कारण या शिक्षणामध्ये जीवनाचा खरा अर्थ शिकवला जात नाही. त्यामुळे हे शिक्षण घेऊन बाहेर पडलेले तरुण आपल्या जीवनात एका भयानक पोकळीचा (Vacuum) अनुभव घेतात[३] व ती पोकळी भरून काढण्यासाठी खून, बलात्कार, मादकद्रव्यसेवन, आत्महत्या, मोटार अपघात, इत्यादी अतिरेकी मार्गाचा अवलंब करतात, किंवा सरळ हिप्पी बनतात. ज्यांना हे काहीही जमत नाही ते वेडे होतात किंवा कर्करोगासारख्या रोगांना बळी पडतात. (कारण रोग हाही जीवनाचा अर्थ शोधण्याच्या अपयशातील एक पर्याय आहे.)[४]

हल्ली सर्व समाजात मनोरुग्णांची जी संख्या वेगाने वाढत आहे, तिचा या जडवादी व उपभोगवादी विज्ञानवृत्तीशी घनिष्ठ संबंध आहे. यांत्रिकीकरणामुळे ८५ टक्के लोकांचे काम श्रमजीवी लोकांपैकी (Labour Force) १५ टक्के लोक करू शकत असल्यामुळे हे ८५ टक्के निरुपयोगी लोक, ज्यांचे जीवन पूर्वी सृजनशील कामामुळे अर्थपूर्ण बनले होते, काम नसल्यामुळे जीवनाचा अर्थ गमावून बसले आहेत. जे १५ टक्के लोक काम करतात त्यांनाही आपल्या यांत्रिक स्वरूपाच्या कामामुळे आपण नवीन कांही निर्माण करीत नाही याची जाणीव असल्यामुळे कामातील आनंद गमावून तेही आपण अर्थहीन जीवन जगत आहोत, या जाणिवेने जीवनातील पोकळीचा अनुभव घेत आहेत.याचा परिणाम म्हणून दुभंगलेले मन (Schizophrenia) या मनोरोगाच्या बळींची संख्या वाढत आहे. ग्रेगरी बेटसन या प्रसिद्ध विचारवंताने दुभंगलेल्या मनोरूग्णांच्या अवस्थेचे जे विश्लेषण केले आहे ते 'आई जेऊ घालीना व बाप भीक मागू देईना' (Double Bind Theory) या स्वरूपाचे असून ज्या परिस्थितीत जगणे अशक्य बनते त्या परिस्थितीत जगण्यासाठी वेडे बनणे (दुभंगलेल्या मनाने जगणे ) याची एक व्यूहरचना म्हणून (Strategy of Survival) या लोकांनी स्वीकार केलेला असतो.[५] (अमेरिकेतील निम्मे मनोरूग्ण या रोगाचे बळी आहेत.) आर. डी. लैंग हा ब्रिटिश मानसोपचारतज्ज्ञ म्हणतो की, ''हल्लीच्या समाजात शहाणे म्हणून वावरणारे बहुसंख्य लोक हे वेडे (विज्ञानवादाचे बळी) असून आपली शिक्षण व्यवस्था म्हणजे माणसांना वेडे बनविण्याची व्यवस्था होय.''[६]

वरील विवेचनावरून वाचकांच्या हे लक्षात आले असेल की हल्लीचे (रूढ) विज्ञान हे माणसाच्या जीवनात अर्थ तर निर्माण करू शकत नाहीच, उलट त्याच्या

जीवनातील अर्थ हिसकावून घेऊन त्याला सर्व दृष्टींनी कफल्लक बनवीत आहे. या विज्ञानापासून माणसाचे कोणत्याही दृष्टीने भले होण्याची कसलीही शक्यता नाही. भले होण्याचे बाजूला राहू द्या. या विज्ञानाने माणसाला वेडे बनविण्यात जे अभूतपूर्व यश मिळवले आहे त्याचे गुपित काय ? असा प्रश्न निर्माण होतो. त्याचे गुपित अर्थात त्या वेडातच आहे. 'दुभंगलेले व्यक्तिमत्व' (स्किझोफ्रेनिया ) हा मनोरोग हे सूचित करतो की जे जीवन जगणे अशक्य आहे ते जीवन जगण्यास हे विज्ञान माणसाला भाग पाडत आहे - म्हणजेच अशक्य गोष्ट शक्य आहे असे समजून वागण्यास त्याला भाग पाडत आहे. विज्ञान शिकवत असलेली व आचरणात आणणे अशक्य असलेली ही जीवनतत्त्वे कोणती? वास्तविक ही तत्त्वे नसून श्रद्धा वा गृहीतकृत्ये आहेत. पण जणू ती सिद्ध केलेले सिद्धांत वा तत्त्वे आहेत अशा थाटात वैज्ञानिक त्यांचा उदो उदो करतात. ही गृहीतकृत्ये पुढील प्रमाणे आहेत.

## रूढ विज्ञानाची गृहीतकृत्ये

१. आधुनिक विज्ञान मानव यंत्र आहे असे मानते. कारण मानवाची संपूर्ण उपपत्ती भौतरासायनिक यंत्रणेने देता येते, (हल्ली देता येत नसेल तर भविष्यात ती देता येईल) ही या विज्ञानाची ठाम श्रद्धा आहे. पुराव्या दाखल नोबेल पारितोषिक विजेता शरीरशास्त्रज्ञ चार्लस् शेरिंग्टन याचा हा उतारा पाहा : Chemistry and physics account for so much of what the cell does and for so much to which years ago physical science could at that time offer no clue, that it is justifiable to suppose that the still unexplained residue of the cell's behaviour (and hence man's behaviour) will prove resolvable by chemistry and physics.

२. मानव यंत्र असल्यामुळे त्याला स्वत:ची (स्वतंत्र) इच्छाशक्ती (Free will) नाही. स्किनरचे पुढील वाक्य पाहा: The hypothesis that man is not free is essential to the application of scientific method to the study of human behaviour.

३. मनुष्य यंत्र असल्यामुळे व त्याला स्वतंत्र इच्छाशक्ती नसल्यामुळे त्याला मन किंवा जाणीव नाही हा निष्कर्ष आपोआप निघतो.

४. मानवाला मन नसल्यामुळे त्याला आत्मा नाही हाही आपोआप निष्कर्ष निघतो.

५. मानवाला आत्मा नसल्यामुळे मृत्यूच्यावेळी मानवाच्या शरीराबरोबर सर्व काही संपते. मरणोत्तर काही उरत नाही. ( फार तर राख उरते.) तेव्हा भुते व पुनर्जन्म या निव्वळ कल्पना आहेत असे ठरते. पुराव्यादाखल प्रसिद्ध विज्ञानवादी तत्वज्ञ बर्ट्रांड रसेल

याची ही वाक्ये पाहा : (Man's) hopes and fears, his loves and beliefs, are but the outcome of accidental collocation of atoms, that no thought and feeling can preserve an individual life beyond grave.

६. अशा रीतीने मानवाचा शेवट (दफन किंवा दहन पद्धतीनुसार ) मातीत किंवा राखेत होणार असल्यामुळे त्याचे जीवन अर्थहीन आहे, त्याचा ध्येयवाद खोटा आहे. पुराव्यादाखल अर्नेस्ट बेक्कर या तत्त्ववेत्त्याची ही वाक्ये पाहा: (The remakable convergence of twentieth century thinkers...is the elaboration of the idea that human meaning is arbitrary. The world of human aspiration is fictitious.

७. वैज्ञानिकदृष्ट्या मानवी जीवन अर्थहीन असल्यामुळे देवा-धर्माच्या कल्पना वैज्ञानिकदृष्ट्या खुळचट आहेत. ईश्वर अस्तित्वात नाही आणि धर्म हे थोतांड आहे.

८. मानवाला पाच ज्ञानेंद्रियामार्फतच केवळ ज्ञान होत असल्यामुळे अतींद्रिय शक्ती खोटी आहे. भूतभविष्य कळणे, दुसऱ्याच्या मनातील विचार कळणे, प्रार्थनेने रोग वगैरे बरा होणे इत्यादी हे सर्व थोतांड आहे.

वरील वैज्ञानिक गृहीतकृत्ये खरी समजून त्याप्रमाणे प्रामाणिकपणे जीवन जगणे कोणत्या सुबुद्ध माणसाला शक्य आहे? स्वत:ला कसलेही स्वातंत्र्य नाही असे समजून कोण जगू शकेल? मानवी जीवन अर्थहीन आहे (जगण्यात काही अर्थ नाही) असे समजून कोण जगू शकेल? ध्येयवाद, महत्वाकांक्षा भ्रामक आहेत असे समजून कोण जगू शकेल? दुसऱ्या शब्दात उंदराचे व घुशीचे जीवन कोण जगू शकेल? आणि असे जीवन जगून 'माणुसकी' कोण टिकवू शकेल? आणि एकाच वेळी घुशीचे आणि माणसाचे जीवन जगण्याच्या प्रयत्नात कोणाचे मन (व्यक्तित्व) दुभंगणार नाही? असा प्रामाणिक प्रयत्न करून मन अभंग राखणारे 'वैज्ञानिक शहाणे' किती जण आहेत?आणि असले तरी अशा शहाणपणाला काय किंमत आहे?

पण मुख्य प्रश्न वरील गृहीतकृत्यानुसार जीवन जगणे माणसाला शक्य आहे का? हा नसून वरील गृहीतकृत्ये बरोबर आहेत का? हा आहे. आणि या प्रश्नातून दुसरा प्रश्न उपस्थित होतो तो हा की वरील गृहीतकृत्ये चुकीची ठरली तर वैज्ञानिक ती टाकून द्यायला व नवीन गृहीतकृत्ये स्वीकारायला तयार आहेत काय? दुसऱ्या शब्दात, वैज्ञानिक सत्य संशोधनात ज्या वस्तुनिष्ठतेची गरज असल्याचे हे वैज्ञानिक आवर्जून व सतत सांगत असतात ती वस्तुनिष्ठता त्यांच्यात आहे काय ?

### वैज्ञानिकांची वस्तुनिष्ठता आणि फॅशन

विज्ञानाची जी आठ गृहीतकृत्ये वर सांगितली आहेत, ती गृहीतकृत्ये आहेत, सिद्ध झालेले सिद्धांत नव्हेत, हे प्रथम लक्षात ठेवले पाहिजे. तरीही ते जणू सिद्ध झालेले सिद्धांत आहेत अशा थाटात वैज्ञानिक त्यांचा स्वीकार का करतात? असा प्रश्न विचारणे म्हणजे अरबस्तानातील स्त्रिया बुरखा का वापरतात? साड्या का नेसत नाहीत? असा प्रश्न विचारणे होय. फॅशन किंवा रूढीपुढे जसा कसलाही युक्तिवाद चालत नाही, तसे या वैज्ञानिकांच्या साध्यांपुढेही कसलाही युक्तिवाद चालत नाही. मग हे वैज्ञानिक अंधश्रद्धाळू आहेत काय? त्यांच्यामध्ये वस्तुनिष्ठता नाही काय? असे कोणी विचारील. वैज्ञानिकांत वस्तुनिष्ठता असते ही समजूतच अस्थानी असल्याचे अनेक उदाहरणांनी दाखवून देता येईल.

न्यूटनने प्रकाश हा कणांचा बनला असल्याचा सिद्धांत (Corpuscular Theory) मांडला होता व तो विज्ञानात सर्वमान्यही झाला होता. पण नंतर १८०२ साली थॉमस यंग याने प्रकाश तरंगाचा बनला असल्याचे सप्रयोग दाखवून दिले. पण अनेकांनी, खुद्द रॉयल सोसायटीच्या सभासदांनी त्याची टर उडवली. एकाने तर विज्ञानाच्या प्रगतीला खीळ घालणारा हा सिद्धांत आहे अशी त्याची संभावना केली. पण पुढे हा तरंगाचा सिद्धांत वैज्ञानिकांनी बरोबर आहे म्हणून स्वीकारला. तो विज्ञानात रूढही झाला. न्यूटनचा सिद्धांत मागे पडला. पण याच न्यूटनच्या सिद्धांताचे पुनरूज्जीवन आईन्स्टाईनने शंभर वर्षांनी (१९०५ साली) केले. तेव्हा अनेक वैज्ञानिकांनी आईन्स्टाईन विज्ञानाला अनेक शतके मागे नेत आहे अशी टीका केली. पण नंतर हा सिद्धांतही मान्य झाला. नंतर नील्स बोहरने कण व तरंग या दोन्ही सिद्धांताचा Complementary चा सिध्दांत मांडून समन्वय केला. हा सिध्दांत बरोबर आहे असे म्हणण्याची फॅशन हल्ली रूढ आहे.

मॅक्सवेलच्या प्रकाशाच्या विद्युतचुंबकीय तरंगस्वरूपाच्या गणिती सिद्धांतालाही असाच विरोध झाला. रॉटजनने क्ष-किरणांचा शोध लावून मॅक्सवेलच्या सिद्धांताला बळकटी आणली तरी प्रसिद्ध भौतिक शास्त्रज्ञ लॉर्ड केल्व्हिन हा मरेपर्यंत क्ष-किरणे म्हणजे एक थोतांड मानत असे!

इ. स. १७७२ साली फ्रेंच अकॅडमीने उल्कांच्या अशनींचे संशोधन करून त्यावर इतिवृत्त सादर करण्यासाठी एक कमिटी नेमली. (या कमिटीवर रसायनशास्त्राचा जनक लव्हायझीर हाही होता.) या कमिटीने बऱ्याच उल्कांची छाननी व अभ्यास करून असा निष्कर्ष काढला की आकाशातून उल्कांचे दगड पडतात हे खरे नाही, कारण आकाशात (पडायला) मुळी दगडच नसतात. या कमिटीची इभ्रत इतकी मोठी होती की

तिचा निष्कर्ष प्रसिद्ध झाल्यावर युरोपातील सर्व वस्तुसंग्रहालयांनी आपल्या संग्रहातील सर्व उल्कांचे दगड फेकून दिले. (त्यामुळे १७९० पूर्वीच्या उल्का अशनी हल्ली मिळत नाहीत.)

वरील उदाहरणावरून वैज्ञानिक हे वस्तुनिष्ठ असतात हे म्हणणे कसे स्वीकारायचे असा प्रश्न पडतो. बरे, वरील उदाहरणात पुरावे नव्हते असे नाही. (गॅलिलिओची तर तक्रार आपले विरोधक दुर्बिणीतून मुळी पुरावे पाहायलाच तयार नाहीत ही होती.) परामानसशास्त्रातील शोधांचे पुरावे पाहण्याची मुळी जरूरीच नाही अशी भूमिका वीव्हर, हेब या सारखे प्रसिद्ध शास्त्रज्ञ आजही घेत आहेत. पुरावे असूनही (वा पाहूनही) ते न स्वीकारण्यात शास्त्रज्ञांना काय अडचण वाटते? असा साहजिकच प्रश्न निर्माण होतो. याचे उत्तर सोपे आहे. धोतर नेसणाऱ्या जुन्या लोकांना पँट घालण्यात जी अडचण वाटते तीच अडचण जुन्या दृष्टिकोणात वाढलेल्या या शास्त्रज्ञांना नवा दृष्टिकोण स्वीकारताना वाटते! हा निव्वळ मानसिक प्रतिकार आहे. कदाचित काही जुने शास्त्रज्ञ त्यालाही तयार होतील. पण जेव्हा सर्वच कपडे फेकून देण्याची पाळी येते तेव्हा, ज्याला कुह्न आपल्या **The Structure of Scientific Revolution** या ग्रंथात 'मानसिक चौकटीतील बदल' किंवा 'नमुना क्रांती' (Paradigm Shift) म्हणतो तो बदल वा क्रांती घडून येते. अशा वेळी पूर्वीच्या सर्वच शास्त्रीय गृहीतकृत्यांचे वा श्रध्दांचे वस्त्रहरण होते. ती उघडी पडतात. आणि हीच सर्वात मोठी अडचण आहे. कपडे बदलणे, फॅशन बदलणे, समजू शकते हो, पण दिगंबर होणे... हे फारच झाले ! असा प्रसंग कोपर्निकसच्या व गॅलिलिओच्या काळी आला होता. तो प्रसंग आता पुन्हा आला आहे! त्यामुळे बुद्धियोगी विज्ञानाचे नवे युग येऊ घातले आहे. आणि म्हणून जुन्या वैज्ञानिकांचा त्याला कडाडून विरोध होणे स्वाभाविक आहे.[७]

आता नवीन वैज्ञानिक शोध हे जुन्या श्रद्धांचे वस्त्रहरण कसे ठरतात हे पाहणे अगत्याचे आहे. पण तत्पूर्वी जुन्या श्रद्धा वस्त्रहरण करण्यास कशा लायक होत्या हे पाहिले पाहिजे.

## प्रकाशातील अंधार

रूढ विज्ञानाच्या श्रद्धांचा व गृहीतकृत्यांचा मागे उल्लेख केला असून त्यांची कपड्यांच्या फॅशनशी तुलना केली आहे. ही फॅशन कोण व कशी रूढ केली हे पाहिलेतर ती इतके दिवस कशी टिकली, ती या पूर्वीच कालबाह्य कशी झाली नाही,याचेच कोणालाही आश्चर्य वाटेल.

या जुन्या विज्ञानाच्या श्रद्धांचे (फॅशनचे) जनक आहेत इटालियन शास्त्रज्ञ,

ज्याला आधुनिक विज्ञानाचा जनक (Father of Modern Science) म्हणतात तो गॅलिलिओ, व फ्रेंच तत्त्वज्ञ-ज्याला आधुनिक तत्त्वज्ञानाचा संस्थापक (Founder of Modern Philosophy) म्हणतात, तो - रेने देकार्त. गॅलिलिओ म्हणतो की जे 'मोजतामापता' येते, तेच विज्ञानाचा विषय होऊ शकते व देकार्तला असा साक्षात्कार झाला की, हे जे मोजता येणारे आहे, ते यांत्रिक असून त्याचे ज्ञानच खात्रीचे (Certain) ज्ञान आहे व असे ज्ञान मिळविणे हेच विज्ञानाचे उद्दिष्ट आहे. येथे साक्षात्कार हा शब्द टवाळीच्या हेतूने वापरलेला नसून स्वत: देकार्तला स्वप्नात व जागेपणी या दृष्टिकोणाचा (परमेश्वराची देणगी म्हणून) साक्षात्कार झाल्याचे (Revealed) त्यानेच म्हटले आहे. (नक्की दिवस 'सेंट मार्टिनचा दिन' १६१९ इ. स. आणि ठिकाण डॅन्यूब नदीच्या काठावरील न्यूबर्ग हा गाव). अशा रीतीने आधुनिक विज्ञानाचा यंत्रवाद साक्षात्कारी (वा ईश्वरदत्त) आहे ! (ज्या यंत्रवादाने नंतर ईश्वराची विज्ञानातून हकालपट्टी केली तो यंत्रवाद ईश्वरदत्त कसा ठरतो? या कूट प्रश्नाचे उत्तर शोधण्याचा प्रयत्न न केलेलाच बरा !) अशा रीतीने जे यांत्रिक नाही व जे मोजता येत नाही ते विज्ञानाचा विषय होऊ शकत नाही हे स्पष्ट आहे आणि जे विज्ञानाचा विषय होऊ शकत नाही ते विज्ञानाच्या दृष्टीने खरे नाही. तात्पर्य, मोजता मापता न येणारे मन, जाणीव, जीव, आत्मा वगैरे खरे नाहीत. इतकेच नव्हे तर विज्ञानाच्या दृष्टीने रंग, वास, चव, आवाज, स्पर्श, गुण, नीतिमूल्ये, सौंदर्य यांनाही अस्तित्व नाही. (कारण हे मोजता येत नाहीत.) मग ईश्वर, परलोक, पाप-पुण्य या विषयी बोलायलाच नको. ( वर रसेल व बेकर यांचे जे उतारे दिले आहेत ते याच गोष्टी स्पष्ट करणारे आहेत.) विज्ञानाचे जग केवळ ईश्वरहीनच नाही, तर ते रंग, वास, चव-हीन व सौंदर्यहीनही आहे. ते एक प्रचंड यंत्र आहे. या यंत्रवादाला नंतर न्यूटनने आपल्या नव्या नियमांच्या शोधांनी प्रतिष्ठा मिळवून दिली.

या यंत्रवादाला पहिला मोठा धक्का आईन्स्टाईनच्या सापेक्षतावादी सिद्धांताने दिला. स्वत: आईन्स्टाईन आपल्या **Evolution of Physics** (भौतविज्ञानाचा विकास) या आपल्या ग्रंथात म्हणतो, "Science did not succeed in carrying out the mechanical programme convincingly and today no physicist believes in the possibitiy of its fulfilment" (1966. P.121) (विज्ञानाला यंत्रवादी विचारसरणी बरोबर असल्याचे पटवून देण्यात अपयश आले आहे आणि आज कोणताही भौतशास्त्रज्ञ हे शक्य होईल, यावर विश्वास ठेवत नाही.)

दैव-दुर्विलास असा की, जे वैज्ञानिक ज्ञान खात्रीचे व निश्चित आहे हे दाखवून देण्यासाठी यंत्रवादावर विश्वास असणाऱ्या देकार्तने मानवी शरीराची घड्याळाशी तुलना

केली होती, तेच वैज्ञानिक ज्ञान अनिश्चित असल्याचे दाखवून देण्यासाठी बुद्धीवर विश्वास असलेल्या आईन्स्टाईनने विश्वाची तुलना (त्याच पण उघडता न येणाऱ्या) घड्याळाशी केली आहे. (उपर्युक्त ग्रंथ)

आईन्स्टाईनला विश्वाची तुलना घड्याळाशी ( मग ते उघडता न येणारे असेना का) का करावीशी वाटली ? कारण आईन्स्टाईन जुन्या (धोतरवाल्या) शास्त्रज्ञांपैकी होता. तो पॅन्ट घालायला तयार होता पण 'कमरेचे सोडायला' तयार नव्हता ! विज्ञानाला विश्वाचे निश्चित ज्ञान होणार नाही (आणि या विषयी देकार्त - न्यूटन-गॅलिलिओ यांची दिशाभूल झाली.) हे तो मान्य करायला तयार होता (न उघडता येणार घड्याळ) पण शेवटी विश्व हे एक घड्याळ आहे; कारण आपणाला माहीत नसलेल्या पण एका यंत्रणेने ते चालले आहे असे तो मानत होता. विश्वाची यंत्रणाच अस्तित्वात नाही, हे तो मान्य करायला तयार नव्हता (God does not play dice with the world). असे मान्य करणे म्हणजे कार्यकारणभावच अस्तित्वात नाही, हे मान्य करणे होय. पण क्वॉंटम सिद्धांत हेच सांगत होता. क्वॉंटम सिद्धांताने विज्ञानाचा मूलभूत आधार जो कार्यकारणभाव त्या कार्यकारणभावाचीच विज्ञानातून हकालपट्टी केली! जुन्या श्रध्दांचे वस्त्रहरण करणाऱ्या या क्वॉंटम सिद्धांताचा पुरस्कर्ता नील्स बोहर याने आईन्स्टाईनला कमरेचे सोडायला (विश्व कार्यकारणभावावर चालत नाही हे मान्य करायला) कितीही सांगितले तरी शेवटपर्यंत त्याला तो तयार झाला नाही याचे कारण त्याची बुद्धीवरची, वस्तुनिष्ठ ज्ञानावरची, अढळ श्रद्धा होय. आणि क्ष-किरणे थोतांड आहे असे मरेपर्यंत म्हणणाऱ्या लॉर्ड केल्व्हिनप्रमाणे विश्व घड्याळाप्रमाणे (कार्यकारण भावानुसार) चालत नाही हे बोहरचे म्हणणे थोतांड आहे असे आईन्स्टाईन मरेपर्यंत म्हणत राहिला.[८]

आता प्रश्न असा आहे की जो यंत्रवाद पूर्णपणे चुकीचा होता, तो यंत्रवाद पूर्णपणे बरोबर आहे असे देकार्त-न्यूटन प्रभृती शास्त्रज्ञांना मुळात का वाटले? व ही चूक कळायला विज्ञानाला दोनशे वर्षे का लागली? ही चूक कळल्यानंतरही आईन्टाईनची विश्वाच्या 'यंत्रणे' वरची (कार्यकारणभावावरची) श्रद्धा का ढळली नाही ? याचे उत्तर असे की प्रारंभिक यशाने हे शास्त्रज्ञ हुरळून गेले व त्या यशाला भाळून विज्ञानातील नंतरचे दिग्गजही त्याच मार्गाने डोळे झाकून गेले. (गतानुगतिकता - अंधपरंपरा-फक्त धर्मातच आढळून येते असे नाही!) बद्धीचा मार्ग पाश्चात्य (ॲलोपथी) वैद्यकशास्त्राप्रमाणे चटकन परिणाम दाखवून देणारा असल्यामुळे त्या मार्गाने गेले तरच सत्य सापडते अशी या शास्त्रज्ञांची समजूत (अर्थात चुकीची) झाली. या मार्गाने जाणारा सर्वात शेवटचा मोठा शास्त्रज्ञ म्हणजे आईन्स्टाईन होय. या मार्गात प्रारंभी यश मिळण्याचे व तो खात्रीचा

वाटण्याचे कारण या मार्गाचे जनक या मार्गाला यश मिळवून देणाऱ्या पद्धतीचेही जनक होते हेच आहे. कारण यंत्रवाद (Mechanical Motion) ज्या गणिती पद्धतीवर आधारला आहे, त्या गणिती पद्धती न्यूटन आणि देकार्त यांनीच शोधून काढल्या. (न्यूटनने डिफरन्शियल कॅलक्यूलसचा व देकार्तने ॲनॉलिटिकल जॉमेट्रीचा शोध लावला.) पण या मूलभूतवादी (Reductionistic) बुद्धीच्या मार्गाने गेले तरच सत्य सापडते, असे समजणाऱ्यांची अवस्था रस्त्याच्या दिव्याच्या प्रकाशाखाली किल्ली हुडकणाऱ्या दारुड्यासारखी आहे. कारण जेथे प्रकाश चांगला आहे तेथेच किल्ली सापडेल असे ज्याप्रमाणे तो दारुडा समजतो व तेथेच ती तो शोधतो, तसे हे मुलभूतवादी शास्त्रज्ञ जड जगाचे ज्ञान पृथक्करण करणाऱ्या बुद्धीने चांगले होते म्हणून सत्य तेथेच आहे असे समजत आहेत. याला Learned Ignorance (जास्त शिकलेल्यांचा अडाणीपणा) म्हणतात. वरील गोष्टीतील दारुड्याची उपमा रूढ विज्ञानवाद्याला लागू होत असल्यामुळे *हल्लीचे (रूढ )विज्ञान म्हणजे बुद्धीच्या प्रकाशातील अंधार म्हणता येईल. कारण रुढ (व्यावहारीक) बुद्धी ही अंधारमय आहे.*

## एकविसाव्या शतकातील विज्ञान

रूढ विज्ञानाची फॅशन इतके दिवश कशी टिकली याचेच आश्चर्य वाटते असे वर म्हटले आहे. असे म्हणण्याचे कारण जे विज्ञान मनाचे वा जाणिवेचे अस्तित्व नाकारते ते विज्ञान 'स्व'-त्वहीन, आत्मविस्मृतीने पछाडलेले व म्हणून विकृत (Aberration) ठरते. ज्या देकार्तने निश्चित व खात्रीचे ज्ञान (Certain Knowledge) विज्ञानानेच होते असे मानले होते, त्या देकार्तने पहिले खात्रीचे व निश्चित ज्ञान 'मी' चे होते. (Cogito ergo sum) असे म्हटले होते हे लक्षात घेता, त्या 'मी'-चीच विज्ञानातून हकालपट्टी करणाऱ्या त्याच्या अनुयायांचा हे निर्जीव, रंग-वास-हीन, जड व यांत्रिक जगच सत्य होय, असे शिकवणारे विज्ञान रचण्याचा प्रयत्न यशस्वी होणार तर नव्हताच, पण तो फार दिवस टिकण्यासारखाही नव्हता हे आधीच ठरून गेले होते. देकार्तच्या या अनुयायांना मात्र आपल्या प्रयत्नाच्या यशाची खात्री वाटत होती. याचे कारण वर म्हटल्याप्रमाणे या मार्गात त्यांना प्रारंभी मिळालेले नेत्रदीपक यश होय. हे यश तीन क्षेत्रात मिळाले असून त्याचा उल्लेख तीन तऱ्हेच्या क्रांतीने केला जातो. प्रत्येक क्रांतीत धार्मिक विचारसरणीची पीछेहाट व जडवादी विज्ञानाची सरशी झाल्याचे सांगण्यात येते. उदा. पहिल्या भौतविज्ञानातील (कोपर्निकसच्या) क्रांतीने माणूस आपल्या सिंहासनाला (श्रेष्ठत्वाला) मुकला, दुसऱ्या जीवशास्त्रातील (डार्विनच्या) क्रांतीने तो आपल्या आत्म्याला मुकला व तिसऱ्या मानसशास्त्रातील (फ्रॉइडच्या) क्रांतीने तो आपल्या नैतिक मनाला मुकला,

असे सांगण्यात येते. या तिन्ही तथाकथित क्रांत्या मुळात तकलादू होत्या, उथळ विचारसरणीच्या व दिशाभूल करणाऱ्या होत्या, हे विसाव्या शतकातील त्या त्या क्षेत्रातील शोधांनीच दाखवून दिले असून एकविसावे शतक त्यांना अधिक बळकटी आणणारे ठरणार आहे याची स्पष्ट चिन्हे दिसत आहेत. त्यामुळे एकविसावे शतक हे जडवादी विज्ञानाच्या पिछेहाटाची विसाव्या शतकात सुरू झालेली प्रक्रिया पूर्णत्वास नेणारे ठरणार आहे याविषयी कसलीही शंका बाळगण्याचे कारण नाही.

वर उल्लेख केलेल्या तथाकथित क्रांत्या तकलादू कशा होत्या हे थोड्या विचारअंती कोणासही कळेल. कोपर्निकसच्या 'पृथ्वी सूर्यमालेच्या केंद्रस्थानी नाही', या सिद्धांताने मानवाचे श्रेष्ठत्व नाहीसे झाले असे समजणे म्हणजे महात्मा गांधी भारताच्या एका कोपऱ्यातील गावात जन्मल्यामुळे त्यांचे महात्म्य संपुष्टात आले असे समजणे होय. (मानवाच्या भौतिक स्थानावर त्याचे मोठेपण अवलंबून नाही.) तसेच उत्क्रांतीच्या सिद्धांतामुळे मानव मोठेपणा (आत्मा) गमावून बसला असे म्हणणे म्हणजे, एखाद्या व्यक्तीचे मोठेपण त्याच्या कुलावर अवलंबून आहे असे मानणे होय. त्याचप्रमाणे फ्रॉइडच्या अबोध मनातील (Unconscious) हीन (लैंगिक) इच्छांच्या शोधामुळे माणसाचा मोठेपणा (नैतिक मन ) नाहीसा झाला असे मानणे म्हणजे एखाद्या शहराचे मूल्य त्या शहरातील भूमीगत गटारीवरून ठरते असे मानणे होय.

मानवाचे मोठेपण त्याच्या भौतिक विश्वातील स्थानावर तर अवलंबून नाहीच, उलट भौतिक विश्वच मानवावर, त्याच्या मनावर , आत्म्यावर अवलंबून असल्याचे भौतशास्त्रातील शोधांनी दाखवून दिले आहे. क्वॉंटम सिद्धांतानुसार कोणतीही भौत वस्तू मानवाच्या जाणिवेशिवाय अस्तित्वात आहे या विधानाला निश्चित अर्थ नाही. याचे कारण विश्व भौतिक कार्यकारणभावावर अवलंबून नाही हे आहे. याचा अर्थ, *मानवाचे मन हेच भौतिक वस्तूंना व घटनांना निश्चित स्वरूप देते असा होतो.* हा शोध भौतविज्ञानात 'श्रोडिंजरचे मांजर' 'विग्नेरचा मित्र' 'व्हीलरचा वीस प्रश्नांचा खेळ' इत्यादी नावांनी प्रसिद्ध आहे. या शोधामुळे भौतिक विश्व मानवाच्या जाणिवेबाहेर (Out There) वस्तुनिष्ठ स्वरूपात अस्तित्वात आहे या म्हणण्याला वैज्ञानिकदृष्ट्या कांही अर्थ नाही. ते वस्तुनिष्ठ नाही याचा अर्थ त्याला मानवी व्यक्तीच्या जाणिवेमुळे अस्तित्व व अर्थ प्राप्त झाला आहे असा होतो. म्हणूनच व्हीलर हा शास्त्रज्ञ या विश्वाला अर्थयुक्त विश्व (Meaning Universe) म्हणतो. विज्ञानाने चारशे वर्षे जोपासलेल्या वस्तुनिष्ठ जगाची व वस्तुनिष्ठ ज्ञानाची ही शोकांतिका आहे. ज्या मानवी मनाची विज्ञानातून हकालपट्टी केली गेली होती, ते मानवी मनच विज्ञानाचे, वैज्ञानिक ज्ञानाचे, अधिष्ठान ठरले आहे. प्रसिद्ध भौतशास्त्रज्ञ आर्थर एडिंग्टन म्हणत असे की, मानव वैज्ञानिक सत्य शोधण्यासाठी बाह्य

जड जगात भटकत होता. असे भटकताना त्याला अज्ञाताच्या किनाऱ्यावर पाउलांच्या खुणा आढळल्या आणि आश्चर्य असे की ती पाऊले आपलीच असल्याचे त्याला आढळून आले.[९] तुकारामांच्या वचनाप्रमाणे 'तुज आहे तुजपाशी, परी तू जागा चुकलासी' अशी आतापर्यंत भौतशास्त्रज्ञांची अवस्था झाली होती.

पण यापेक्षाही महत्वाचा शोध शास्त्रज्ञांना लागला आहे. या शोधाला आईन्स्टाईनच कारणीभूत झाला. क्वाँटम सिद्धांत चुकीचा आहे हे दाखवून देण्याच्या प्रयत्नात तो सिद्धांत बरोबर असल्याचे सिद्ध होऊन बाजू त्याच्यावरच उलटली. पण त्यामुळे क्वाँटम सिद्धांताची एक नवी बाजू शास्त्रज्ञांच्या नजरेस आली . या नव्या शोधाला 'बेलचे प्रमेय' Bell's Theorem म्हणतात. हे प्रमेय क्वाँटम सिद्धांत बरोबर असेल तर विश्व एकात्म आहे असे ठरते हे दाखवून देते; आणि प्रत्यक्षात विश्व एकात्म असल्याचे १९८२ साली अस्पेक्ट आणि त्याच्या सहकाऱ्यांनी पॅरीस येथे केलेल्या प्रयोगाने सिद्ध झाले. हा शोध विज्ञानपद्धतीच चुकीची असल्याचे दाखवून देणारा असल्यामुळे रूढ विज्ञानाला 'मूले कुठार:' ठरला आहे. कारण *विश्व रूढ वैज्ञानिक समजत होते तसे तुकडे पाडून समजणार नाही* हे हा शोध सांगतो. या शोधाला तंत्रज्ञानाच्या शोधानेही पाठिंबा मिळाला आहे. तंत्रज्ञांनी 'होलोग्रॅफी' या नव्या भिंग विरहित फोटो काढण्याच्या तंत्राचा शोध लावला असून या तंत्राने काढलेल्या छायाचित्रातील *प्रत्येक बिंदूत संपूर्ण छायाचित्रच आढळते.* आणि Part is equal to whole (अंश हा पूर्णाबरोबर आहे) हा वरवर तर्कविरोधी वाटणारा सिद्धांत बरोबर ठरून अध्यात्मवाद्यांचे 'पिंडी ते ब्रम्हांडी' हे सनातन सत्य व गूढवाद्यांचा (Mystics) विश्वात्मक जाणिवेचा अनुभव भ्रामक नाही हे म्हणणे प्रस्थापित होते. क्वाँटम सिद्धांताच्या या नव्या बाजूच्या आधारे डेव्हिड बोहम या ( पूर्वी आईन्स्टाईनचेच शिष्यत्व पत्करलेल्या) शास्त्रज्ञाने 'अविभाज्य विश्वा' चा (Undivided whole) सिद्धांत मांडला असून त्याला गणिताचा आधार देण्याचा तो प्रयत्न करीत आहे.[१०] हा प्रयत्न यशस्वी झाला तर विज्ञान व अध्यात्मवाद यांच्यात मिलन घडून येईल. (बोहम हा जे. कृष्णमूर्तींचाही शिष्य आहे हे येथे लक्षात ठेवावे) पण हे मीलन विश्वशास्त्रात अगोदरच घडले असून विश्वातील सर्व भौतशास्त्रीय मूल्यांची व नियमांची उपपत्ती विश्वातील मानवाच्या अस्तित्वानेच लावता येते, या शोधाने ते घडून आले आहे. याला विश्वशास्त्रात (Cosmology) मानवशास्त्रीय तत्त्व (Anthropic Principle) असे संबोधण्यात आले असून जॉन व्हीलर, स्टिफेन हॉकिंग यासारख्या मातब्बर शास्त्रज्ञांनी या तत्त्वाचा पाठपुरावा केला आहे. (याविषयीचे सविस्तर विवेचन ७ व्या प्रकरणात केले आहे.)

## रूढ उत्क्रांतिवादी सिध्दांतातील अपुरेपणा

भौतशास्त्रातून यंत्रवादाची हकालपट्टी झाली असली तरी जीवशास्त्र अजूनही यंत्रवादाला चिकटून बसले आहे. पण आता हळूहळू जीवशास्त्रातूनही यंत्रवादाची हकालपट्टी होत आहे. या कामी इलिया प्रिगॉजिने या नोबेल पारितोषिक -विजेत्या शास्त्रज्ञाने महत्वपूर्ण कामगिरी बजावली आहे. यंत्रवादानुसार विश्व हळूहळू 'मृत' (थंड) होत असल्यामुळे जीवाची उत्पत्ती ही विश्वातील एक विकृती (Aberration) अथवा अपघात ठरतो. (हा उष्णतागतिशास्त्राच्या दुसऱ्या नियामचा सिद्धांत आहे.) अनेकांनी विश्वातील जीवाची उत्पत्ती अपघाती आहे, हे समजण्यात काय अडचणी आहेत हे दाखवून दिले असले तरी ती उत्पत्ती अपघाती नाही हे सिद्ध करण्यात कोणालाही यश आले नव्हते. हे काम प्रिगॉजिने याने करून दाखवले असून त्याबद्दल त्याला १९७७ चे नोबेल पारितोषिक मिळाले आहे. *जीवाची उत्पत्ती हा अपघात नसून विश्वाचा नियमच असल्याचे म्हणजे विश्व 'मृत' होणे अपरिहार्य नसल्याचे त्याने असाम्यावस्था उष्णता गतिशास्त्रातील (Non -Equilibrium Thermodynamics) कांही घटनांच्या साहाय्याने, विशेषतः ज्यांना तो जीवसदृश रचना (Dissipative Structures) म्हणतो त्यांच्या शोधाने दाखवून दिले आहे*. मानव विश्वात अपघाताने निर्माण झालेला नाही या दृष्टिकोणाला त्यामुळे बळकटी मिळाली आहेच, पण **उत्क्रांतीची यंत्रणा 'योगायोग' 'अपघात' यासारख्या घटकांनी, म्हणजे आंधळ्या प्रक्रियांनी चालणारी नाही** हे त्यावरून स्पष्ट झाले आहे. कारण हे 'डिसिपेटिव्ह स्ट्रक्चर्स' (जीवसदृश घटक) अपवादात्मक परिस्थीतीने निर्माण होत नसून निमयमानुसार घडणाऱ्या (Regular) प्रक्रियांनी निर्माण होतात. बर्ट्रांड रसेलच्या वर दिलेल्या उताऱ्यातील 'अणूंच्या अपघाती संयोगाने' (Accidental Collocation Of Atoms) ते निर्माण होत नसल्यामुळे या गृहीतकृत्यावर आधारलेले त्याचे सर्व निष्कर्ष चुकीचे ठरतात. (ते चुकीचे असल्याचे अन्य पुरावे आहेत हे वेगळेच,) ही गोष्ट विश्वाचे नियम सहेतुक असल्याचे व ज्याला व्हीलर भौतशास्त्रातील शोधामुळे Meaning Universe (अर्थवाही विश्व) म्हणतो, त्या व्हीलरच्या दृष्टिकोणातील विश्वाच्या कल्पनेशी हा शोध जुळत असल्यामुळे विश्वाची यांत्रिक कल्पना पूर्णपणे चुकीची असल्याचे दाखवून देते. आणि यात आश्चर्य नाही. कारण भौतशास्त्रानुसार विश्व यांत्रिक नसेल तर जीवशास्त्रानुसार ते यांत्रिक कसे असेल? विश्वाचे नियम एका क्षेत्रात यांत्रिक व दुसऱ्या क्षेत्रात यंत्रविरोधी कसे असतील? अलीकडे प्रसिद्ध होत असलेल्या ग्रंथाचे लेखक, असा नियमातील भेदभाव निसर्गाला मंजूर नाही हे आपल्या ग्रंथातील चर्चेतून व मथळ्यातूनही स्पष्ट सूचित करीत आहेत.(उदा. **God and the New Physics** -Paul Davies. (1983 ) **God and the New Biology** -Arthur Peacocke 1986)

प्रिगॉजिनेचा शोध विश्वात मानव अपघाती नसल्याची कल्पना मांडणाऱ्या विश्वशास्त्रातील मानवशास्त्रीय तत्त्वाशी (Anthropic Principle) जुळणारा असल्यामुळे मानवशास्त्रीय तत्त्वाला त्यामुळे अधिक बळकटी मिळाली आहे.

विश्वशास्त्र व भौतशास्त्र यांच्या या शोधाबरोबरच खुद्द जीवशास्त्रात रूपर्ट शेल्ड्रेक या जीवशास्त्रज्ञाने लावलेल्या आकारिक कार्यकारण भावाच्या (Formative Causation) शोधामुळे, जीवशास्त्रातील उत्क्रांती आंधळ्या प्रक्रियांनी -निसर्ग निवडीच्या तत्त्वाने (Natural Selection) - चालते या रूढ कल्पनेला जबर धक्का बसला आहे (याविषयीच्या अधिक माहितीसाठी प्रकरण ४ थे 'मरणोत्तर अस्तित्व' हे पाहा.)

डेव्हिड बोहमचा 'अविभाज्य विश्वा' चा सिध्दांतही उत्क्रांती यांत्रिक पद्धतीने होत नाही या कल्पनेला पुष्टी देणारा आहे.

हे सर्व शोध आणि सिद्धांत प्रसिद्ध मानसशास्त्रज्ञ कार्ल युंग याच्या 'अर्थपूर्ण विश्वा' च्या (Synchronistic Universe) सिद्धांताला पुष्टी देतात. या सिद्धांतानुसार जड विश्वातील घटना आणि मानवी मनातील व जीवनातील घटना यांच्यामध्ये अर्थपूर्ण संबंध आहे (Meaningful Connections). या सिद्धांताचे सूत्र मानवी मन व जड विश्व एकाच नाण्याच्या दोन बाजू असून ते अविभाज्य आहे, हे आहे. (हा सिद्धांत प्रत्यक्ष अनुभवावर आधारलेला असून 'आय चिंग' या चिनी भविष्यकथन पद्धतीचा त्यात उपयोग केलेला आहे.) युगंच्या या दृष्टिकोणाला बोहम, व्हीलर, प्रिगॉजिने यांचे सिद्धांत पुष्टी देतातच, पण क्वॉटम सिद्धांताचा भौतिक कार्यकारणभाव भ्रामक असल्याचा सिद्धांतही त्याला पुष्टी देतो - नव्हे तो त्याचा गाभाच आहे असे म्हणता येईल. (हा मुद्दा **विज्ञान आणि चमत्कार** या ग्रंथात विस्ताराने चर्चिला आहे.)

उत्क्रांतीमधील अनेक विलक्षण गोष्टींची उपपत्ती रूढ उत्क्रांतीवादाने यापूर्वी लागत नव्हती. याचे कारण उत्क्रांती प्रक्रिया नैसर्गिक निवडीच्या (Natural Selection) व उत्परिवर्तनाच्या (Mutations) अपघाती व आंधळ्या पद्धतीने चालते असे हा दृष्टिकोण मानत होता. पण आता यंत्रवादाच्या अस्ताबरोबर जो नवीन दृष्टिकोण सर्व क्षेत्रात उदय पावत आहे, तो या जीवशास्त्रातही उत्क्रांतीच्या अनेक गोष्टीवर प्रकाश टाकणारा ठरला आहे. उदा. काही एकपेशी जीव (उदा. Dictyostelium नावाची बुरशी किंवा लॅबोरिंथ्यूला नावाचे सागरी एकपेशी जीव) एकाकी जीवन जगतात (प्रसंगी ते एकमेकांना खातातसुद्धा) पण अन्नाचा तुटवडा पडला तर ते एकत्र येतात व बहुपेशी जीवाप्रमाणे सामूहिक व सहकारी जीवन जगतात. कारण असे एकत्र आल्याखेरीज त्यांना जगणे अशक्य असते. अशा प्रकारच्या या एकपेशी जीवांच्या वर्तनाची उपपत्ती रूढ यांत्रिक पद्धतीच्या प्रक्रियांनी देणे अशक्य आहे. उत्क्रांतीमध्ये अशा असंख्य गोष्टी आहेत की

ज्यांची रूढ पद्धतीने उपपत्ती देता येत नसल्यामुळे रूढवादी जीवशास्त्रज्ञ (ज्यांना नव - डार्विनवादी - Neo -Darwinists - म्हणतात) त्यांचा आपल्या चर्चेत एक तर उल्लेख टाळतात किंवा त्याला एखादे नाव देऊन (उदा. Adaptation, Pre-Adaptation) मोकळे होतात.[११]

ज्या पृथ्वीवर जीवाची उत्पत्ती व उत्क्रांती झाली ती पृथ्वीच सजीव असल्याप्रमाणे वागते असे आढळून आले असून हा सिद्धांत गैया (Gaia) नावाने प्रसिद्ध आहे. रूढ दृष्टिकोणातून पृथ्वीवरील वातावरणाच्या तापमानाची व घटकांची (त्यांच्या सातत्याची) उपपत्ती लावता येत नसल्यामुळे हा नवा सिद्धांत स्वीकारावा लागला आहे.[१२]

## परामानसशास्त्रीय युगप्रवर्तक शोध

आतापर्यंत ज्या शोधांची चर्चा केली ते सर्व शोध, कुह्न ज्याला 'नमुना क्रांती' (Paradigm shift) म्हणतो त्या स्वरूपाचे व रूढ कल्पनांना धक्का देणारे असले तरी ते गॅलिलिओच्या मोजता - मापता येणे या निकषाला उतरणारे असल्यामुळे कोणालाही नाकारता येण्यासारखे नाहीत. *ते शोध बुद्धिवादाच्या निकषानेच बुद्धीच्या मर्यादा दाखवून देणारे असल्यामुळे* युगप्रवर्तक या संज्ञेला पात्र असले तरी रूढ विज्ञानाच्या चौकटीतच ते युग प्रवर्तक ठरतात. पण रूढ विज्ञानाची चौकटच मोडणारे आणि म्हणून खऱ्या अर्थाने ज्यांना युगप्रवर्तक म्हणता येईल असे शोध परामानसशास्त्रज्ञांनी लावले असून त्यांना गॅलिलिओच्या निकषांखेरीज अन्य निकषांची गरज असल्याचे दिसून आले आहे. (तथापि, गॅलिलिओचे निकष लावूनही त्यांचे सत्यत्व शास्त्रज्ञांनी सिद्ध केले आहे. पण हे निकष लावण्याच्या प्रयत्नात त्यांचे सामर्थ्य कमी होते - अभिव्यक्ती हिणकस ठरते असे आढळून येते.) असे शोध म्हणजे दुसऱ्याच्या मनातील विचार ओळखणे (टेलिपथी) दूरस्थ वस्तूचे ज्ञान होणे (क्लेअरव्हॉयन्स) केवळ मन:शक्तीने जड वस्तूचे स्थलांतर वा रूपांतर घडवून आणणे (सायकोकायनेसिस) व भूत - भविष्याचे ज्ञान होणे (रिट्रो व प्रीकॉग्निशन). हे शोध नवे नसले तरी त्यांचे शास्त्रीय पद्धतीने केले जाणारे संशोधन नवे असून ते रूढ भौतविज्ञानांचीच नव्हे, तर रूढ मनोविज्ञानाचीही गृहीतकृत्ये उलथून टाकणारे ठरले आहेत. (याविषयीची सविस्तर चर्चा 'बुद्धिप्रामाण्यवाद व परामानसशास्त्र' या तिसऱ्या प्रकरणात केली आहे.)

हे शोध फिके पडणाऱ्या काही घटना सर्व समाजात नेहमीच घडत आल्या आहेत. उदा. अठराव्या शतकात इंग्लंडमध्ये 'चेटूक' प्रकार घडत असल्याचे प्रत्यक्ष पुरावे रॉयल सोसायटीला मिळाले. पण तिने ते दडपून टाकले. कारण रूढ विज्ञानात ते बसत नव्हते. पण नंतर संमोहन (हिप्नॉटिझम) प्रयोगात असेच प्रकार कमी जास्त प्रमाणात

घडतात असे जेव्हा आढळून आले, तेव्हा ते पुरावे उघडपणे मान्य करणे त्या सोसायटीस भाग पडले. पण नंतर संमोहनाचे प्रयोगच थोतांड मानण्याची फॅशन पडली. पण हल्ली हे प्रयोग खरे आहेत हे सर्व शास्त्रज्ञांनी मान्य केले असून काही शास्त्रज्ञांनी या संमोहन प्रकाराचा शास्त्रीय अभ्यासही करण्याचा प्रयत्न केला आहे. या प्रयत्नातून जे डोळ्यांना दिसते ते खरे (Seeing is believing) नसून (म्हणजे बुद्धिवाद खरा नसून) जे खरे वाटते तेच डोळ्यांना दिसते (Believing is seeing) हा सिद्धांत (श्रद्धावाद) मान्य करण्याची पाळी त्यांच्यावर आली आहे. याचे कारण मानवी मनाची अगाध शक्ती होय, जिच्याकडे आतापर्यंत, यंत्रवादी-जडवादी दृष्टिकोणाच्या चौकटीत वाढल्यामुळे ती चौकटच खरी म्हणणारे रूढ शास्त्रज्ञ पद्धतशीरपणे व सोयिस्करपणे दुर्लक्ष करीत आले होते. येथून पुढे मात्र प्रत्यक्ष पुराव्यांच्या संख्येच्या रेट्यापुढे त्याकडे त्यांना दुर्लक्ष करणे शक्य होणार नसल्याचे स्पष्ट झाले आहे.

ज्या मनाचे अस्तित्वच मुळात हे जडवादी शास्त्रज्ञ नाकारत होते त्या मनाचे अगाध सामर्थ्य संमोहन प्रयोगातच नव्हे तर अन्य तऱ्हेनेही प्रकट होत असल्यामुळे ते नाकरणे त्यांना अशक्य झाले आहे. प्रथम संमोहन प्रकार घेऊ. संमोहनामध्ये केवळ साध्या पेन्सिलीसारख्या (थंड) वस्तूने त्वचेवर भाजल्याचे फोड उठवता येतात हे अनेकांनी सिद्ध केले आहे. (**The Challenge of Hypnosis** - L. Chertok. 1980) येथे भौतिक कार्यकारणभाव (विस्तवाने भाजते हा नियम) खोटा ठरत असून मन हेच भाजण्याच्या कार्याचे कर्तृत्व (Causal Agency) स्वत:कडे घेते असे दिसून येते. असे घडण्यास संमोहनावस्थाच पाहिजे असे नाही , तर जाणिवेतील बदल (Altered State of Consciousness) हा सुद्धा त्यासाठी पुरेसा आहे. उदा. जोसेफ पीअर्स या लेखकाने **The Crack in the Cosmic Egg** या ग्रंथात तरुण असताना एकदा जाणिवेच्या बदललेल्या अवस्थेत जळत्या सिगारेटच्या टोकाचे चटके आपल्या गालावर, डोळ्यांच्या पापण्यांवर इत्यादी शरीराच्या अनेक भागावर देऊनसुद्धा आपणाला वेदनाच नव्हे, तर भाजल्याची जखमसुद्धा झाली नसल्याचे अनेक साक्षीदारांच्या समक्ष प्रत्यक्ष दाखवून दिले असल्याचे म्हटले आहे. वास्तविक जळत्या सिगारेटच्या टोकाचे तापमान १४०० अंश फरनाइट इतके असल्याने भाजल्याची जखम होणे अपरिहार्य आहे. ही कदाचित काल्पनिक कथा वाटेल म्हणून भारताप्रमाणेच अमेरिकेतही विस्तवावरून चालण्याचे सार्वजनिक प्रयोग हल्ली सर्रास होत आहेत या गोष्टीकडे लक्ष वेधता येईल. या घटनेची रूढ वैज्ञानिक (Normal) उपपत्ती देण्याचा प्रयत्न बुद्धिवादी नेहमीच करतात. म्हणून मी अन्यत्र दिलेले उदाहरण, ज्याची रूढ वैज्ञानिक उपपत्ती देणेच अशक्य आहे, येथे पुन्हा देत आहे.[१३] अमेरिकेतील कोमार नाव धारण केलेल्या एका गोऱ्या माणसाने १४९४

अंश फॅरनहाइट इतक्या तापमानाच्या इंगळावरून २५ फूटपर्यंत चालत जाऊन (पळत नव्हे) आपल्या पायांना काहीच इजा होत नाही हे दाखवून दिले असून हा प्रयोग डॉक्टर व शास्त्रज्ञ यांच्या उपस्थितीत कडक तपासणीखाली झालेला असल्यामुळे गिनीज बुकच्या १९८५ च्या आवृत्तीत 'रेकॉर्ड' म्हणून त्याची नोंद झालेली आहे. (या इंगळाजवळ १५ फूटाच्या अंतरावर जाणेसुद्धा प्रेक्षकांना अशक्य होत असे.)

या खेरीज भानामतीचे प्रकार सर्व देशात सार्वजनिक स्वरूपात अनेकदा घडून येत असून अनेक शास्त्रज्ञांनी त्यांच्या खरेपणाची खात्रीकरून त्यावर अनेक शोध इतिवृत्ते लिहिली आहेत. हे प्रकार रूढ वैज्ञानिकांना पूर्णपणे गोंधळात टाकणारे असल्यामुळे त्यांच्याकडे ते पूर्णपणे दुर्लक्ष करतात. तथापि, काहींनी त्यांचा शास्त्रीय अभ्यास करण्याचा प्रयत्न केला आहे. अशा अनेकांच्या प्रयोगात अशा घटना घडवून आणण्यात यश मिळाले असून त्यापैकी एकाची माहिती फारच उद्‌बोधक आहे.

## 'भूत' निर्माण करण्याचा एक यशस्वी प्रयोग

१९७२ मध्ये टोरोंटो (कॅनडा) येथे **Can We Explain the Poltergeist?** (भानामतीचा उलगडा करता येतो का?) या प्रसिद्ध पुस्तकाचा लेखक A. R.G. Owen याची पत्नी इरीस आणि इतर सात लोकांनी एका टेबला भोवती बसून १७ व्या शतकातील एका काल्पनिक व्यक्तीचे भूत बोलविण्याचा प्रयोग करण्याचे ठरविले. त्यांनी त्या काल्पनिक व्यक्तीला 'फिलीप' असे काल्पनिक नाव दिले. त्या व्यक्तीचे एक काल्पनिक चरित्र म्हणजे जीवन इतिहास तयार केला. म्हणजे तो कसा होता, कोठे रहात होता, काय करीत होता, त्याची पत्नी, प्रेम प्रकरण वगैरे सर्व तपशील कल्पनेने तयार केला . आश्चर्य असे की थोड्याच दिवसात हा काल्पनिक 'फिलीप' प्रकट झाला, व त्यांच्या प्रश्नांना (त्यांनी तयार केलेल्या खुणेच्या भाषेत ) टेबलाचा आवाज करून उत्तरे देऊ लागला. ही त्याची उत्तरे त्याला स्वतंत्र व्यक्तिमत्व असल्याप्रमाणे (उदा. त्याच्या स्वतः च्या आवडी निवडी ) तो देत असे. तो टेबलसुद्धा हालवत असे. ते टेबल आपोआप नाचतसुद्धा असे. ही बातमी कर्णोपकर्णी झाल्यामुळे टोरोंटो शहरातील कॅनडाच्या ब्रॉडकास्टिंग कार्पोरेशनने १९७३ च्या नोव्हेंबर महिन्यात कॅमेरा व इतर लवाजम्यासह तेथे येऊन त्याची फिल्मही घेतली. क्वचितच घडणारी गोष्ट म्हणजे हे 'भूत' कॅनडाच्या राष्ट्रीय दूरदर्शनवर जाहीर प्रयोग करायलाही तयार झाले आणि त्याच्या प्रयोगाचे थेट प्रक्षेपण करून सर्व प्रेक्षकांना या भुताच्या या कार्यक्रमाचे दूरदर्शनवर दर्शनही घडविण्यात आले. **(Conjuring Up Philip-** Iris Owen and Margaret Sparrow. 1976)

हा अनेकांच्या सामूहिक मनांचा प्रयोग झाला. एकाच व्यक्तीच्या मन:सामर्थ्याने बराच काळ सतत प्रयत्न करीत राहिले तर कोणतेही 'भूत', कोणतीही कल्पित व्यक्ती प्रत्यक्ष मूर्त रूप धारण करू शकते, या संबंधीचा प्रयोग अलेक्झांड्रा डेव्हिड नील या बाईने **Magic and Mystery in Tibet** या ग्रंथात स्वानुभवाने वर्णन केला आहे. (याला तिबेटी योगात 'तुल्पा' म्हणतात.) 'रामकृष्ण लीलाप्रसंग' भाग २ या ग्रंथात शारदानंद यांनी रामकृष्ण परमहंस यांना एका बाबाजी नावाच्या साधूची रामाची मूर्ती (रामलाल) प्रत्यक्ष हालचाल करीत असलेली, खातपीत असलेली दिसल्याचे वर्णन केले आहे. या सर्व अशक्य वाटणाऱ्या गोष्टी केवळ मन:सामर्थ्याने घडू शकतात.* याची खात्री करून घ्यावयाची असल्यास आधुनिक विज्ञानवादी समाजाचा व संस्कृतीचा संपर्क न लागलेल्या समाजात शमन, चेटुकवैद्य (Witch -Doctors) जादूटोणा करणारा (Sorcerer) माध्यम (Medium) इत्यादी नावांनी प्रसिध्द असलेल्या व्यक्तींचा अभ्यास व प्रयोग करून खात्री करून घेतलेल्या मानववंशशास्त्रज्ञांचे या विषयावर प्रसिद्ध झालेले ग्रंथ वाचावेत. या व्यक्ती दूरच्या घटना सांगणे, केवळ हाताच्या बोटांनी शस्त्रक्रियाकरणे, शत्रूंना चेटूक करून मारणे (Hex death) अशाअनेक अतीतसामान्य (Paranormal) शक्तींनी युक्त असल्याच्याआढळून येतात (**Parapsychology and Anthropology** Eds. A. Angof and D. Banta . 1974. Parapsychology and Anthropology , Van de Castle in **Handbook of Parapsychology** -1977.) या समाजातील इतर व्यक्तीमध्येही आधुनिक सुधारलेल्या समाजातील व्यक्तीपेक्षा जास्त अतींद्रिय शक्ती (Psychic Power) असल्याचे त्यांची याविषयी खास परीक्षा घेतल्यानंतर परामानसशास्त्रज्ञांना आढळून आले आहे. लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट अशी की या समाजातील जे लोक आधुनिक पाश्चात्य शिक्षणामुळे 'सुधारक' बनले होते. त्यांच्यात ही शक्ती कमी असल्याची आढळून आली. ही गोष्ट माणसाच्या जाणीवेशी या शक्तीचा संबंध असून, प्रत्येक समाज व त्यातील व्यक्ती आपल्या जाणीवेने आपले जग वा 'वास्तव' (Reality) तयार करते हे दाखवून देते.

मानवी मनाला आपण जशी शिकवण देऊ तसे ते तयार होते. व जगही त्याला त्या शिकवणुकीप्रमाणेच दिसते ही गोष्ट मानसशास्त्रज्ञ Jean Piaget मानववंशशास्त्रज्ञ

---

* प्रस्तुत लेखकाच्या **'विज्ञान आणि चमत्कार'** या पुस्तकात वि. स. पागे व संत फुटाणे यांना पंढरपुरात संत चोखोबा भेटल्याच्या ज्या घटनेचे वर्णन केले आहे, ती घटना मन भूतकालात होऊन गेलेल्या व्यक्तीही निर्माण करू शकते याचे निदर्शक आहे. मनाने दूरस्थ वस्तूची चित्रे (फोटो) फिल्मवर घेता येतात हे टेड सिरिओसने सप्रयोग अगणित वेळा दाखवल्याचे वर्णन प्रकरण ६ मध्ये आलेच आहे.

Claude Levi-strauss व याकुई या अमेरिकन इंडियन जमातीच्या डॉन जुआन बरोबर राहून अनुभव घेतलेल्या Carlos Castaneda यांच्या व इतरही अनेक शास्त्रज्ञांच्या संशोधनांनी वादातीतपणे सिद्ध झाली आहे. त्यामुळे आपण मनाला कशी शिकवण देतो, ते कसे घडवतो, याला फार महत्व आहे. संशयवादी लोकांना (आणि जड विज्ञानवाद संशयवादच शिकवतो) अशा प्रयोगात अपयश येण्याचे हेच कारण आहे. (आणि हाच युक्तिवाद - म्हणजे आम्ही प्रयोग केला, पण आम्हाला परिणाम दिसले नाहीत हा 'शोध' हे लोक परामानसशास्त्रज्ञांनी प्रस्थापित केलेल्या शोधाविरुद्ध नेमके वापरतात). अशा प्रकारच्या प्रयोगात परंपरागत वैज्ञानिक तटस्थता उपयोगाची नाही, तर ज्या घटनेचे आपण संशोधन करतो त्या घटनेचा अनुभव यावयाचा झाल्यास त्या घटनेमध्ये स्वत:ला 'झोकून' द्यावयास पाहिजे. ज्या वस्तूचा अनुभव घ्यावयाचा ती वस्तूच आपण बनले पाहिजे. हीच खरी वैज्ञानिक 'वस्तुनिष्ठता' होय.

## मनाच्या साहाय्याने तरा किंवा मरा

फ्रँक एल्. बॉम याने **The Wizard of Oz** (ओझचा जादूगार) या पुस्तकात एका 'पाचूच्या शहरा'चे वर्णन केले आहे. या पाचूच्या शहरातील लोकांना सर्व माणसे, त्यांचे कपडे इमारती इत्यादी सर्व हिरवी दिसत असत. याचे कारण माणसे, इमारती इत्यादी खरोखरच हिरवे होते हे नव्हते, तर त्या शहरातील लोक हिरवे चष्मे वापरीत होते हे होते. हल्ली आपण सर्वजण 'विज्ञानाच्या शहरात' राहतो व रूढ विज्ञानाचे चष्मे वापरतो. त्यामुळे आपणाला सर्व गोष्टी, सर्व जग विज्ञानाच्या भौतिक कार्यकारणभावाच्या चौकटीत दिसते. म्हणजे विस्तवाने भाजते हेच एकमेव सत्य (वास्तव) दिसते. त्यामुळे क्वचित एखादेवेळी पेन्सिलीने त्वचेवर भाजल्याचे फोड उठले किंवा सिगारेटच्या जळत्या टोकाने भाजले (फोड उठले) नाही, तर ब्रूनरच्या प्रयोगातील 'काळा बदाम' पाहून गोंधळणाऱ्या प्रयुक्ताप्रमाणे आपण गोंधळून जातो. कारण येथे विज्ञानाचा निकष, जो ओळखीचा कार्यकारणभाव (तांबडा बदाम) हाच कोलमडून पडलेला दिसतो. आणि या लेखाच्या आरंभी दिलेल्या गोष्टीतील, दगड भरल्यामुळे पाव जड लागतो, असा निष्कर्ष काढून आपण फार चतुर असल्याचे, पाववाल्याची आपण लबाडी ओळखल्याचे सांगणाऱ्या साधूप्रमाणे आपण या प्रकारात (प्रयोगात) लबाडी असल्याचे मानून साधा (हलका) पावच, दररोजचे कार्यकारणभाव लागू असलेले सामान्य संसारी वास्तवच (Consensus Reality) बरे म्हणून स्वीकारतो (आणि विस्तवावरून चालणे खोटे म्हणणे पसंत करतो.) पण संमोहनशास्त्र, जाणीव - बदल प्रकार (Altered State of Consciousness.) मानववंशशास्त्रज्ञांची आदिकालीक समाजातील निरीक्षणे, व नवीन उदयास आलेले व्यक्तिमत्वातीत मानसशास्त्र (Transpersonal Psychology) यासर्वांचे निष्कर्ष ही गोष्ट

वादातीतपणे सिद्ध करतात की आपले रूढ संसारी वास्तव हेच एकमेव वास्तव नाही. आपणाला तेच एकमेव व खरे वास्तव वाटते, याचे कारण आपणाला जन्मल्यापासून तसे शिक्षण मिळालेले असते हे होय. कदाचित पूर्वी जगण्यासाठी या वास्तवाची गरज वाटली असेल, पण आज हेच वास्तव आपणाला जगणे अशक्य करत असल्याचे, त्यानेच निर्माण केलेल्या प्रदूषण, अण्वस्त्रे, साधन-संपत्तीचा विनाश या समस्यातून दिसून येत असल्यामुळे, टोरोंटोच्या लोकांनी 'फिलीप' जसा निर्माण केला, तसे नवीन वास्तव निर्माण करण्याची, तसे मनाला शिक्षण देण्याची आज गरज निर्माण झाली आहे. आपल्या श्रद्धा (Belief Systems) बदलण्यानेच हे शक्य असल्यामुळे श्रद्धा बदलण्याची आज पूर्वी कधीही नव्हती इतकी निकड निर्माण झाली आहे. श्रद्धा बदलणे किती महत्वाचे आहे हे जीवनातील श्रद्धेचे महत्त्व कळल्याशिवाय समजणार नाही. **कोणतेही वास्तव श्रद्धेतूनच निर्माण होते**, हे लक्षात घेतले तर हे कळेल. कोणतेही वास्तव श्रद्धेतून कसे निर्माण होते याची उदाहरणे वरील 'फिलीप'च्या उदाहरणावरून व मानववंशशास्त्रज्ञांनी आदिकालिक समाजातील निरीक्षणावरून काढलेल्या निष्कर्षातून तर मिळतातच (विशेषत: पाहा, **The Teachings of Don Juan-** Carlos Castaneda.1969) पण आपल्या नेहमीच्या जीवनातही त्याचे चांगलेच प्रत्यंतर येते. वैद्यक क्षेत्रात तर त्याचे 'सायकोसोमॅटिक' या प्रकारात निर्णायक अस्तित्व व महत्व सर्रास मान्य करण्यात आले आहे. येथे पाश्चात्य देशातील एक प्रसिद्ध घटना उदाहरणादाखल सांगता येईल.

डॉ. फिलिप वेस्ट हे अमेरिकेतील मानसोपचारतज्ज्ञ डॉक्टर एका कर्करोगाने भयंकर आजारी असलेल्या रुग्णावर उपचार करीत होते. त्या काळी क्रिबियोझेन नावाच्या औषधाचा कर्करोगावरील रामबाण औषध (Miracle Drug) म्हणून अमेरिकेत फार मोठा गवगवा करण्यात आला होता. डॉ. वेस्टनी हे औषध त्या रोग्याला दिले. या औषधाच्या एकाच डोसमध्ये तो रोगी पूर्णपणे बरा झाला. इतका की पूर्वी प्राणवायूच्या कृत्रिम पुरवठ्याशिवाय जगू न शकणारा तो आता आपले विमान चालवू लागला. थोड्याच दिवसात क्रिबियोझेन या औषधाचा कर्करोगावर काही उपाय चालत नसल्याचा एक रिपोर्ट त्याच्या वाचनात आला. अल्पावधीत त्याचा कर्करोग पुन्हा बळावला, व त्याला इस्पितळात ठेवावे लागले. डॉ. वेस्टनी त्याची ही अवस्था पाहून त्याच्याशी खोटे बोलण्याचे ठरविले व त्यांनी हा रिपोर्ट जुना असून हल्ली नवे जास्त परिणामकारक क्रिबियोझेन तयार करण्यात आले असून ते आपल्याकडे आहे असे त्याला सांगितले, व निव्वळ साधे पाणी नवे क्रिबियोझेन म्हणून दिले. पुन्हा त्याची प्रकृती सुधारली. पण नंतर एका मासिकात अमेरिकेच्या मेडिकल असोसिएशन आणि फूड अँड ड्रग अॅडमिनिस्ट्रेशनने कर्करोगावर क्रिबियोझेन कुचकामी ठरल्याचे निर्णायकपणे सिद्ध केल्याचे सांगणारा एक मासिकातील लेख त्यांच्या वाचनात आला. त्याबरोबर पुन्हा त्याचा रोग बळावला,

यानंतर थोड्याच दिवसात तो मरण पावला.

औषधानेच रोग बरा होतो ही श्रद्धा अमेरिकन लोकात किती खोलवर रुजली आहे, हे या उदाहरणावरून स्पष्ट होते. पण औषधाने रोग बरा होतो की नाही हा प्रश्न जीवन-मरणाच्या दृष्टीने महत्त्वाच्या नसून या गोष्टीवर आपली किती श्रध्दा आहे हा प्रश्न जीवन - मरणाच्या दृष्टीने महत्वाचा आहे, हे वरील उदाहरणावरून सिद्ध होते. श्रद्धा जीवन -मरण ठरवत नाही, तर रूढ विज्ञानाला जे करणे अशक्य ठरले आहे, असे नवे वास्तव ती तयार करू शकते याची प्रस्तुत लेखकाकडे अनेक उदाहरणे आहेत. लेख - विस्तार भयास्तव फक्त एकच उदाहरण येथे देतो : शमनेवाडी ता. (चिक्कोडी, जि. बेळगाव) येथील शांतिनाथ उगारे (वय ४४ ) यांना लग्न होऊन २० वर्षे झाली तरी अपत्य नव्हते. त्यांनी स्वत:ची व पत्नीची सांगली, पुणे, मुंबई येथील अनेक डॉक्टर्सकडून तपासणी करून घेतली. तरी काही उपयोग झाला नाही. आधुनिक वैद्यकशास्त्राला जे काही करणे शक्य आहे ते सर्व काही केले. उदा. कृत्रिम गर्भधारणा (Artificial Insemination) प्रयोगही मुंबईच्या अद्ययावत प्रयोगशाळेत केला. पण परिणाम शून्य. कंटाळून त्यांनी हे सर्व उपचार बंद केले. शेवटी सांगलीचे डॉ. एम. एल्. अडिगा यांनी त्यांना शेवटचा उपाय म्हणून कुलदेवतेला सहा महिनेपर्यंत प्रत्येक अमावस्या अगर पोर्णिमेला जायला सांगितले. त्याप्रमाणे दोघेही नवरा-बायको न चुकता जाऊ लागली. (यापूर्वी ते कधीच गेले नव्हते.) सात महिन्यानंतर पत्नीची परीक्षा केली तेव्हा गर्भधारणा झाल्याचे सिद्ध झाले. (तिला नंतर मुलगा झाला.) माझ्याकडे अनेक उदाहरणे असताना मी हेच उदहरण का दिले? अशासाठी दिले आहे की डॉक्टर नामांकित स्त्रीरोगतज्ज्ञ अशी ख्याती पावलेले आहेत (ते फेलो ऑफ रॉयल कॉलेज ऑफ सर्जन्स, एडिंबरो आहेत). त्यांनीच हा उपाय सुचविला असल्याने व तो यशस्वी झाला असल्याने स्वत: आधुनिक रूढ विज्ञानच अध्यात्मवादाला (वा श्रद्धावादाला) कसे शरण जाते ही गोष्ट हे उदाहरण दाखवते. त्याचबरोबर शेवटी पाहिजे ते 'वास्तव' ठरविण्यासाठी काय केले पाहिजे हेही हे उदाहरण दाखवून देते.

## अध्यात्मविज्ञानाचे पुनरागमन

श्रद्धेचे मानवी जीवनातील अनन्यसाधारण स्थान व महत्व फार पूर्वीपासून ओळखण्यात आले आहे. भगवद्गीतेत मनुष्य हा श्रद्धामय पुरुष आहे, तो जशी श्रद्धा बाळगतो तसा होतो. **(श्रद्धामयो ऽ यं पुरुष: यो यच्छ्रध्द: स एव स: ।)** असे श्रीकृष्णाने म्हटले आहे. याचा अर्थ असा की मानव श्रद्धेशिवाय जगूच शकत नाही. फक्त कोणत्या श्रद्धा स्वीकारायच्या एवढेच त्याने ठरविले पाहिजे. कारण श्रद्धेमुळे (रज -तम -सत्व गुणांनुसार) तो मानव, दानव अगर देव होऊ शकतो. गॅलिलिओ-देकार्तच्या विज्ञानावरील

श्रद्धेने मनुष्य चंद्रावर जाऊ शकला तरी पृथ्वीवरील मानवाचे जीवन त्या श्रद्धेने यंत्रवत् बनवून जगण्यास असह्य आणि अशक्य केले आहे. मध्ययुगीन मानवाच्या श्रद्धा विज्ञानाने बदलल्या आहेत. पूर्वी मनुष्य निसर्गाला जिवंत मानत होता त्याला स्वत:चा मित्र समजत होता, आणि तसाच तो निसर्गाशी वागतही होता. (वृक्षांची, भूमीची पूजा अनेक समाजात रूढ होती व आजही काही ठिकाणी आहे.) आज तो निसर्गाला निर्जीव समजत असल्यामुळे त्याचा शत्रू झाला आहे, आणि त्यामुळे तो स्वत:चाही शत्रू झाला आहे. स्वत:चा सर्वनाश ओढवून घेत आहे. अर्थात ज्या विज्ञानाने मानवाच्या श्रद्धा प्रथम बदलल्या त्याच विज्ञानामुळे पुन्हा त्या बदलण्याची शक्यता आहे. आणि सुदैवाने नव्या विज्ञानाने पूर्वीच्या (जुन्या) विज्ञानाच्या सर्व श्रद्धा चुकीच्या होत्या हे सिद्ध केले आहे. यंत्रवाद व जडवाद चुकीचा ठरला असून पृथ्वी, निसर्ग व संपूर्ण विश्व हे निर्जीव नसून जिवंत, जाणीवयुक्त, एकसंघ व अविभाज्य आहे, हे विज्ञानाच्या सर्व शाखांतील शोधांनी सिद्ध झाले आहे. वर नोबेल पारितोषिक विजेत्या सर चार्ल्स् शेरिंग्टन या मज्जाशास्त्रज्ञाचा मनुष्य यंत्र असल्यामुळे त्याची भौतरासायनिक उपपत्ती देता येते (आज देता येत नसली तरी भविष्यात ती देता येईल) असे प्रतिपादन करणारा उतारा दिला आहे. पण याच चार्ल्स् शेरिंग्टनने मरण्याच्या नऊ दिवसापूर्वी (नक्की दिवस २४ फेब्रुवारी १९५२) सर जॉन एकलस या आणखी एका नोबेल पारितोषिक विजेत्या मज्जाशास्त्रज्ञाजवळ अत्यंत गंभीरपणे जे म्हटले ते स्वत: एकलसने आपल्या **Facing Reality** या ग्रंथात नमूद केले आहे. शेरिंग्टन म्हणाला, ''मानवी आत्मा हेच एकमेव वास्तविक सत्य असल्याची आता माझी खात्री झाली आहे.'' (1970, P. 175) ही गोष्ट विसाव्या शतकाच्या मध्यालाच विज्ञानाचे वारे अध्यात्म्याच्या दिशेने वाहू लागले होते याची साक्ष पटविते. आणि मृत्यूशय्येवरील माणूस कधी खोटे बोलत नाही, हे जणू विज्ञानालाच दाखवून द्यायचे होते, अशी घटना घडली. कारण खुद्द सर जॉन एकलस यानेच मेंदू व मज्जाशास्त्रातील प्रदीर्घ संशोधनाचा निष्कर्ष आत्म्याच्या अस्तित्वाच्या बाजूने कसा आहे हे तीस वर्षानंतर सविस्तरपणे दाखवून दिले. (**The Wonder of Being Human** :Sir John Eccles and D. N. Robinson, 1984. ) यापूर्वी वाइल्डर पेनफील्ड यानेही असाच निष्कर्ष निघत असल्याचा शोध लावला होता. (**The Mystery of Mind**,1975) मनुष्याला आत्मा असल्याचा नोबेल पारितोषिक विजेत्या एकलसचा हा मेंदू व मज्जाशास्त्रातील शोध सर्व मज्जाशास्त्रज्ञांना कदाचित मान्य नसेल. कोणताही नवा शोध वा सिध्दांत कधीच एकदम सर्वमान्य होत नाही. किंबहुना प्रथम त्याला विरोधच होतो, हे विज्ञानाच्या इतिहासावरून वरचेवर दिसून आले आहे. पृथ्वी सजीव असल्याचा गैया (Gaia) सिद्धांत, मानवाच्या निर्मितीसाठीच विश्वाची निर्मिती झाली असे सांगणारे विश्वशास्त्रातील मानवशास्त्रीय तत्व (Anthropic Principle), विश्व अर्थयुक्त व

अर्थपूर्ण आहे असे सांगणारा व्हीलर व युंग यांचा सिद्धांत , विश्व बुद्धिमान (Intelligent Universe) असल्याचे सांगणारा फ्रेड हॉइलचा सिद्धांत, विश्व वा निसर्ग जाणीवयुक्त आहे असे सांगणारा बेट्सनचा सिद्धांत, विश्व अविभाज्य व एकात्म असल्याचे सांगणारा क्वॉटम सिध्दांतावर आधारलेला बोहमचा अविभाज्य -विश्वाचा सिद्धांत, हे सर्व विज्ञानात आज सर्वमान्य झाले आहेत असे समजण्याचे कारण नाही. पण जेव्हा विज्ञानाच्या सर्व शाखांतील संशोधनाचा सूर एकाच दिशेने निघतो व तो पूर्वीच्या विश्वविषयक सर्वमान्य दृष्टीकोणाशी एकदम विरोधी असतो तेव्हा युगप्रवर्तनाची मुहूर्तमेढ रोवली जाते व विरोध बोथट व्हायला लागतो, हे मध्ययुगानंतर झालेल्या विज्ञानाच्या उदयाचा इतिहासच सांगतो. हे विज्ञानाच्या सर्व शास्त्रशाखांतील शोध परामानसशास्त्रातील सर्वात क्रांतीकारक शोधांना बळकटी आणणारेच ठरले असल्यामुळे नव्या युगाचा पायाभूत शास्त्रीय दृष्टिकोण हे परामानसशास्त्रच ठरणार आहे, याविषयी संशय बाळगण्याचे कारण नाही. आणि या शास्त्राचा मुलभूत दृष्टिकोण असा आहे की तुमच्या ठिकणी श्रद्धा असेल तरच परिणाम दिसून येतील; आणि जितकी श्रद्धा बळकट तितके परिणाम चांगले दिसतील. याची उलटी बाजू म्हणजे अर्थात संशयवाद (Scepticism). संशय बाळगाल तर परिणाम शून्य. याच्याही पुढे जाऊन याविषयी गीतेने फार पूर्वीच सांगून ठेवलेले आहे. **संशयात्मा विनश्यति** ! हाच नव्या विज्ञानयुगाचा संदेश आहे.[१४]

## टीप :

जुना यंत्रवादी दृष्टिकोण हा विज्ञानबाह्य झाला असून नवा जीववादी (Systemic) दृष्टिकोण विज्ञानसंमत होण्याची नमुनाक्रांती (Paradigm Shift) होऊ घातली असल्याबद्दलचा दृष्टिकोण मांडणारे **Belonging to the Universe (1992)** व **The Web of Life** (1996) हे फ्रिजॉफ काप्राचे दोन ग्रंथ प्रस्तुत लेख लिहिल्यानंतर प्रसिद्ध झाले आहेत. ते या प्रकरणातील विचारसरणी व दृष्टीकोणच उचलून धरतात.

## संदर्भ टिपा :

१. प्रस्तुत लेखकाने यापूर्वी जीवशास्त्रातील कल्पनांच्या साहाय्याने (उत्क्रांतिवादाने) युगप्रवर्तन समजून.घेण्याचा प्रयत्न केला असून अशा युगप्रवर्तनाला सांस्कृतिक उत्परिवर्तन (Cultural Mutation) म्हटले आहे. जीवात घडून येणाऱ्या उत्परविर्तनाप्रमाणे ते घडून येते असे मानले असून अणुशक्तीच्या शोधाने असे सांस्कृतिक व नैतिक उत्परिवर्तन होऊन नवे मानवयुग जन्माला येत आहे असे म्हटले आहे. (पाहा: अणुयुग आणि उत्क्रांती. **'नवभारत'** सप्टेंबर १९६०)

२. पाहा : **The Unconscious God**-by Victor Frankl (1977) फ्रँकल म्हणतो की, मनुष्याची वैज्ञानिक व्याख्या यंत्र, घूस, माकड यांच्या वर्तनाशी जुळणाऱ्या भाषेत व

अर्थात करून मानवी जीवनाचे वैशिष्ट्य व अर्थच या विज्ञानाने नष्ट करून टाकले आहेत. त्यामुळे वर उल्लेख केलेली संकटे निर्माण झाली आहेत. या संकटाची तीन वर्गात तो विभागणी करतो. विमनस्कता (Depression) व्यसनाधीनता (Addiction) आणि आक्रमकता (Aggression). निसर्गाची लूटमार हे आक्रमकतेचेच एक रूप असून निसर्गावरील बलात्कारही त्याने सूचित होतो.

३. अमेरिकेतील ४८ कॉलेजामधून जॉन्स हॉपकिन्स विद्यापीठाने ७९४८ विद्यार्थ्यांना 'त्यांच्या दृष्टीने सर्वात महत्वाची गोष्ट कोणती?' असा प्रश्न विचारला असता ७८ टक्के विद्यार्थ्यांनी 'जीवनाचा अर्थ व हेतू शोधणे' हे उत्तर दिले. 'श्रीमंत होणे' म्हणणारे अवघे १६ टक्के निघाले फ्रान्समधील जनमत गणनेत जीवनाचा अर्थ शोधणे महत्वाचे म्हणणारे ८९ टक्के निघाले. **Man's Search for Meaning**-Victor Frankl. (1984)

४. आत्महत्या करण्याचा गंभीर प्रयत्न केलेल्या ६० विद्यार्थ्यांचा इडाहो विद्यापीठाने अभ्यास केला असता असे आढळून आले की, यापैकी ९३ टक्के विद्यार्थ्यांच्या जीवनात कशाचीही कमतरता नव्हती. यापैकी ८५ टक्के विद्यार्थ्यांना 'जीवनात काही अर्थ नाही' हेच आत्महत्येचे कारण दिले. **The Unconscious God.**

५. **Steps to Ecology of Mind** - Gregory Bateson (1972)

६. **The Politics of Experience** - R. D. Laing (1978) Half of Americans go nutty' या मथळ्याच्या 'इंडियन एक्स्प्रेस' ( १८.१.१९९४) च्या बातमीत मिशिगन युनिव्हर्सिटीच्या 'इन्स्टिटयूट ऑफ सोशल रिसर्च' या संस्थेच्या सर्वेक्षणात स्किझोफ्रेनिया व डिप्रेशन या मनोव्याधींनी ५० टक्के अमेरिकन प्रौढ व्यक्ती आयुष्यात एकदा तरी पीडलेल्या असतात असे आढळून आल्याचे म्हटले आहे.

७. कोपर्निकसच्या सिद्धांतामुळे झालेल्या युगबदलाची हल्ली होत असलेल्या युगबदलाशी वस्तुत: तुलनाच होऊ शकत नाही. हल्लीच्या युगबदलाच्या मानाने कोपर्निकसच्या सिद्धांताने झालेला युगबदल अगदीच सामान्य ठरतो. कोपर्निकसच्या सिद्धांताला विरोध करणारे लोक शास्त्रज्ञ नव्हते, तर धर्मनिष्ठ होते. या उलट हल्लीच्या नव्या वैज्ञानिक शोधांना वा सिद्धांताना विरोध करणारे लोक नावाजलेले शास्त्रज्ञ आहेत, हा फरक लक्षात ठेवला पाहिजे. ही वस्तुस्थिती या युगबदलाचे अनन्यसाधारण महत्व दाखवून देते.

८. बुध्दी (अर्थात् स्थूल व्यावहारिक बुध्दी) खरे म्हणून समजत असलेल्या कार्यकारणभावाच्या (संकल्प-विकल्पात्मक) जगाच्या पलीकडे गेल्याशिवाय (कमरेचे सोडल्याशिवाय) सत्याचे दर्शन होणार नाही, हा क्वॉटम सिद्धांताचा दृष्टिकोण ज्ञानेश्वरांनी पुढीलप्रमाणे व्यक्त केला आहे.

**संकल्प विकल्पांचे लुगडे । सांडुनी मन उघडे ।**
**बुद्धिही मागिलेकडे । उगीच बैसे ।। (१६.७४०)**

बायबलमध्ये ॲडम आणि ईव्ह यांनी ज्ञानाचे (व्यावहारिक बुद्धीचे) फळ चाखल्यानंतरच त्यांना आपल्या नग्नत्वाची जाणीव झाली व ते ईश्वरापासून (सत्यापासून) दूर

जाऊन लपून बसले अशी कथा आहे. ही (बायबलमधील) बुध्दी अर्थात् (नग्न) सत्यापासून दूर जाणारी, आईनस्टाईनची, व्यावहारिक (कार्यकारणात्मक) रूढ विज्ञानाची बुध्दी आहे. ज्ञानेश्वरांना (व गीतेला) अभिप्रेत असलेली (कार्यकारणाबाहेरील) बोहरची क्वाँटम बुध्दी नव्हे. क्वाँटम बुध्दी ही नग्न सत्याची बुध्दी आहे.

९. "We have found that where science has progressed the farthest, the mind has but regained from nature that which the mind has put into nature. We have found a strange foot-print on the shores of the unknown. We have devised profound theories one after another to account for its origin. At last we have succeeded in reconstructing the creature which has made the foot-print, and lo, it is our own". A. S. Eddington, **Space, Time and Gravitation.**

१०. **Wholeness and the Implicate Order**- David Bohm (1980) दुदैवाने हे कार्य तडीस नेण्यापूर्वीच त्याचा मृत्यू झाला (१९९२).

११. प्रसिद्ध जीवशास्त्रज्ञ ज्युलियन हक्स्ले याच्या **Evolution : Modern Synthesis** या प्रसिद्ध ग्रंथात -ज्या ग्रंथाची भलावण टाइम्स लिटररी सप्लिमेंटने उत्क्रांतीची सर्वंकष चर्चा करणारा यापेक्षा दुसरा ग्रंथ नाही अशी केली आहे - डोळ्याची उत्क्रांती कशी झाली याची चर्चा आढळत नाही. जी.जी. सिंप्सनने **The Meaning of Evolution** या आपल्या ग्रंथात याची चर्चा जुजबी केली असून डोळ्याची रचना व दोन डोळे (Binocular Vision) कसे उत्क्रांत झाले या प्रश्नांना बगल दिली आहे. मात्र डार्विनने आपल्या **Origin of Species** या ग्रंथात *डोळे नैसर्गिक निवडीच्या (आंधळ्या) प्रक्रियेने उत्क्रांत झाले आहेत असे समजणे हा सर्वात मोठा निर्बुद्धपणा (**Absurd in the highest degree**) होय,* हे मोकळेपणाने मान्य केले आहे. (Collier Books , 1962 P. 178.)

१२. **Gaia** - James Lovelock, Oxford University Press, 1982.

१३. 'विज्ञानातील चमत्काराकडून चमत्कारांच्या विज्ञानाकडे' हे दुसरे प्रकरण पाहा.

१४. नव्या विज्ञानाला 'बुद्धियोगी' हे नाव देण्याचे कारण बुद्धी अनेक तऱ्हेच्या (**बहुशाखा** : गीता) असून त्या सर्व खोट्या आहेत; खरी बुद्धी (**व्यवसायात्मिका** - निश्चयात्मक) एकच असून ती सत्-तत्त्वावर विश्वास -श्रद्धा ठेवणारी आणि म्हणून खरी (अंतिमत: कल्याण करणारी) आहे असे गीता सांगते. नव्या विज्ञानाचा गाभा 'श्रद्धा' असल्याने या *सत्-तत्त्वावरील श्रद्धा हे नव्या विज्ञानाचे सूत्र राहील.* या सत्-तत्त्वावरील श्रद्धा हाच 'बुद्धियोग' होय. या श्रद्धायुक्त, बुद्धियोगी (अध्यात्म) विज्ञानाचे निकष कोणते व ते कसे ठरवायचे या विषयाची चर्चा **विज्ञान आणि चमत्कार** या ग्रंथात केली आहे.



९



# सत्याची बुद्धिवादी कसोटी
## एक वैज्ञानिक परीक्षण

बुद्धिवादी ईश्वराचे अस्तित्व मानत नाहीत. ते सत्याच्या कसोटीवर ईश्वर असत्य ठरतो असे म्हणतात. **'विवेकवाद'** नावाच्या आपल्या ग्रंथात श्री. नी. र. वऱ्हाडपांडे यांनी 'सत्याची कसोटी' व 'गूढवादाचा गौप्यस्फोट' या प्रकरणात प्रत्यक्ष व अनुमान या दोन प्रमाणांखेरीज 'गूढनुभूती' नावाचे सत्याचे तिसरे प्रमाण अस्तित्वात नाही, हे सिध्द करण्यासाठी व ईश्वर गूढनुभूतीने सिद्ध होत नाही, हे दाखविण्यासाठी गूढानुभूतीची स्वप्नाशी तुलना केली आहे व स्वप्नाप्रमाणेच गूढानुभूतीही खोटी मानली आहे. स्वप्नातील वस्तूचा स्वप्न न पडलेल्या माणसावर ज्याप्रमाणे प्रत्यक्ष परिणाम होत नाही, (या परिणामाला ते 'अर्थक्रियाकारित्व' म्हणतात.) त्याप्रमाणे ज्या ईश्वराची 'गूढानुभूती' येते असे म्हटले जाते, त्या ईश्वराचा 'गूढानुभूती' न येणाऱ्यावर प्रत्यक्ष परिणाम होत नाही. म्हणून ईश्वर (स्वप्नवत्) खोटा असा वऱ्हापांड्यांचा युक्तिवाद आहे.

प्रत्यक्ष आणि अनुमान याखेरीज तिसरे ज्ञानाचे प्रमाण अस्तित्वात आहे की नाही याचा नंतर विचार करू. एखाद्या गोष्टीचा अनुभव ज्या व्यक्तीला येत नाही, त्या व्यक्तीवरही त्या गोष्टीचा प्रत्यक्ष परिणाम झाला तरच ती गोष्ट खरी, अन्यथा खोटी या वऱ्हाडपांड्यांच्या सत्याच्या कसोटीचा प्रथम विचार करू. स्वप्नातील विंचू ज्याला स्वप्न पडते त्याच्या दृष्टीने (आणि तेही स्वप्नापुरते) खरा व स्वप्न न पडणाऱ्यांच्या दृष्टीने (त्यांच्यावर तो प्रत्यक्ष परिणाम करीत नसल्यामुळे ) खोटा, हे खरे असले तरी 'स्वप्नातील विंचू' किंवा 'विंचवाचे स्वप्न' खोटे आहे असे कोणी म्हणणार नाही. याचा अर्थ असा की, एखादी गोष्ट एका अर्थाने खरी आणि दुसऱ्या अर्थाने खोटी असू शकते.[१] (येथे काही स्वप्ने खरी ठरतात ही वस्तुस्थिती आणि स्वप्नातील अनुभव वेगळ्या पातळीवरचे असतात हा सिद्धांत बाजूला ठेवू.) येथे मानसिक दृष्टीने (म्हणजे स्वप्नाच्या दृष्टीने) विंचू खरा आहे, पण भौतिक दृष्टीने (म्हणजे जागृत दृष्टीने) तो खोटा आहे. आता मानसिक घटना (स्वप्नातील विंचू) खोटी आणि भौतिक घटना (प्रत्यक्ष विंचू अस्तित्वात नसणे) खरी असे मानण्यात जी कसोटी वापरली आहे, ती भौतिक सत्य हेच काय ते सर्वार्थाने सत्य होय, हे गृहीतकृत्य खरे समजून वापरली आहे. पण हे गृहीतकृत्य

खरे नाही. असे मानले तर भौतिक शास्त्र हेच काय ते खरे शास्त्र होय, मानसशास्त्र हे खोटे शास्त्र होय असे मानण्याची पाळी येईल. इतकेच नव्हे तर मानसशास्त्राच्या अभ्यासाने सत्य कधीच कळणार नाही, (म्हणून त्याचा अभ्यास व्यर्थ होय) असेही म्हणावे लागेल. पण बुद्धिवादीही असे म्हणणार नाहीत. तात्पर्य, सत्य हे जसे भौतिक असू शकते तसे मानसिकही असू शकते, हे मान्य केले पाहिजे आणि ज्या योगे सत्याच्या कसोटीमध्ये मानसिक सत्याचाही समावेश होईल अशा रीतीने तिची व्याख्या केली पाहिजे. या दृष्टीने वऱ्हाडपांड्यांची सत्याची कसोटी पक्षपाती आणि अशास्त्रीय ठरते. हे पुढील प्रत्यक्ष केलेल्या मानसशास्त्रीय प्रयोगाच्या उदाहरणावरून स्पष्ट होईल.

एखाद्या संमोहनशील व्यक्तीला खोल संमोहन अवस्थेत नेले व तिच्या त्वचेवर कागदाचा एखादा तुकडा चिकटवला व सूचना दिली की तुला तापलेल्या लोखंडाने डागणी देत आहे, तर तिच्या त्वचेवर काही कालाने भाजल्याचे फोड उठतात. (पाहा : **(Sense and Nonsense in Psychotherapy** - L. Chertok) आता येथे प्रत्यक्षात कागद (भौतिक सत्य) अस्तित्वात असला तरी त्याचा जो प्रत्यक्ष (भौतिक) परिणाम होतो तो 'भाजणे' होय असे कोणी म्हणणार नाही. (कारण कागदाने कधी भाजत नाही.) मग हा भाजण्याचा परिणाम कोठून आला? तो भौतिक कारणांनी घडून आलेला नसून मानसिक कारणाने घडून आलेला आहे. म्हणून 'कागदाने भाजणे' हे (मानसिक प्रयोगातील घटना म्हणून) मानसिक पातळीवरील 'सत्य' ठरते, व ते येथे 'कागदाने कधीच भाजत नाही' हे भौतिक 'सत्य' खोटे ठरविते. अशा रीतीने भौतिक सत्य हेच सर्वार्थाने सत्य होय, हे गृहीतकृत्य खरे समजून केलेली वऱ्हाडपांड्यांची सत्याच्या कसोटीची वरील व्याख्या येथे चुकीची ठरते.

वऱ्हाडपांडे सत्याच्या कसोटीची व्याख्या पुढीलप्रमाणे करतात: ''ज्यांना 'अ' या वस्तूचा अनुभव येत नाही, त्यांच्यावर देखील 'अ' या वस्तूचे परिणाम होतात व हे परिणाम ज्यांना 'अ' चा अनुभव आला त्यांनी घडवून आणलेले नसतात असे म्हणता आले तर 'अ' ही वस्तू भ्रामक नसून सत्य आहे असे समजावे.'' (**विवेकवाद** पृ. १२५)

आता वऱ्हाडपांड्यांनी 'अ' ही वस्तू म्हणून जिचा उल्लेख केला आहे व आपल्या सत्याच्या कसोटीच्या व्याख्येने जी भ्रामक नसून सत्य आहे असे म्हटले आहे, ती 'अ' वस्तू 'कागद' की 'तापलेले लोखंड' हे स्वतःच सागावे ! 'कागद' म्हटले तर तो भाजणार नाही. (पण येथे तो भाजतो, म्हणजे त्याचे 'अर्थक्रियाकारित्व' खोटे ठरते.) 'तप्त लोखंड' म्हटले तर त्यांच्या दृष्टीने सत्य असलेली 'कागद' ही वस्तू भ्रम (खोटी) ठरते. ('तप्त लोखंड' खरे ठरते.) तात्पर्य, त्यांची सत्याची कसोटी सर्वार्थाने खोटी ठरते.

वरील उदाहरणात ज्याने आपल्या सूचनेने हा परिणाम घडवून आणला (प्रयोजक) त्याला 'तप्त लोखंडा' चा म्हणजे 'अ' च्या भाजण्याचा अनुभव आलेला नाही. म्हणून वऱ्हाड पांड्याच्या व्याख्येप्रमाणे 'ज्यांना 'अ' चा अनुभव आला त्यांनी (हे परिणाम) घडवून आणलेले नसतात' असे म्हणता येत असल्यामुळे वऱ्हाडपांड्यांची सत्याच्या कसोटीची वरील व्याख्या शंभर टक्के चुकीची ठरते. येथे दिलेल्या उदाहरणात सूचना देणारा 'प्रयोजक' आहे आणि 'संमोहन' नावाची बाह्य (दृश्य) अवस्था आहे. पण जेथे हे दोन्हीही घटक नाहीत व ज्याला Psychosomatic Disease (मनोदैहिक रोग) म्हणतात, त्या रोगाच्या प्रकारात 'भ्रामक' (कल्पनेने मानलेले) रोग प्रत्यक्षात होतात असे आढळून येत असून त्याचे एक Psychotherapy (मानसोपचार) नावाचे स्वतंत्र वैद्यकशास्त्र निर्माण झाले आहे. हीच वस्तुस्थिती 'भानामती'च्या बाबतीत आढळून येते. भानामती कोणाच्याही अनुभवाला येत नसूनही (ती कोणालाही दिसत नसूनही) तिचे प्रत्यक्ष परिणाम मात्र सर्वांवर (ती न दिसणाऱ्यांवरही किंवा तिच्यावर विश्वास नसणाऱ्यांवरही) होत असतात असे आढळून येते. (याची **विज्ञान आणि चमत्कार** या ग्रंथात सोपपत्तीक उदाहरणे दिली आहेत) संमोहन, मनोरोग, भानामती ही सर्व अपवादात्मक समजण्याचे कारण नाही. समाजात शेकडा दहा टक्के लोक संमोहनशील असतात, आणि म्हणून तितक्या लोकांना मनोरोग होण्याचा संभव असतो आणि असे एकही वर्ष जात नाही की ज्या वर्षी कुठे ना कुठे भानामतीचा प्रकार घडत नाही. आणि हे प्रकार अपवादात्मक समजले तरी तेवढ्यामुळे ते कमी महत्वाचे किंवा खोटे ठरत नाहीत. स्फोट पावणारे तारे (Supernova), धूमकेतू , ज्वालामुखी इत्यादी घटनासुद्धा नेहमी घडणाऱ्या नसून अपवादात्मकच आहेत. पण अशा घटनांतूनच शास्त्रज्ञांना शास्त्रीय सत्याचे दर्शन होते. (विश्वातील जड मूलतत्त्वे स्फोट पावणाऱ्या ताऱ्यांमुळे निर्माण झाली असून जड तत्त्वे नसती तर मनुष्याची निर्मिती अशक्य ठरली असती.)

यावर वऱ्हाडपांडे म्हणतील की, आपण जडवादी असल्यामुळे आपण सत्याच्या कसोटीची व्याख्या 'भौतिक सत्य' नजरेसमोर ठेवून केली आहे. म्हणजे ही व्याख्या शास्त्रीय नाही हे मान्य केले पण तार्किक आहे असा त्यांनी दावा केला, तरीही ती व्याख्या चुकीची ठरते. कारण त्यांनी 'अनुभव' आणि 'परिणाम' हे दोन वेगळे मानले आहेत. पण ते असे वेगळे मानता येत नाहीत. कारण ज्यांना 'अ' चा अनुभव येत नाही, त्यांच्यावर 'अ' चा परिणाम होणार नाही. कारण परिणाम होणे म्हणजेच अनुभव येणे होय. विंचू चावल्याचा परिणाम म्हणजे विंचवाचा अनुभवच नव्हे काय? 'अनुभव' म्हणजे 'ज्ञान' समजले, म्हणजे विंचू चावला तरी काय चावले याचे 'ज्ञान' झाले नाही, असे समजले तरी ज्ञान होऊन सुद्धा ज्याचे ज्ञान होते त्याचा ज्ञान होणाऱ्यावर परिणाम

होतोच असे नाही. उलट ज्यांच्यावर परिणाम होतो त्याला मात्र त्याचे ज्ञान होतेच. अशा रीतीने परिणामाच्या दृष्टीने ज्ञान म्हणजे खऱ्या अर्थाने अनुभवच ठरतो.[२] उदा. अमेरिकेत जेव्हा दिवस असतो तेव्हा भारतात रात्र असते. या भारतीयांच्या (अनुभवशून्य) ज्ञानामुळे भारतीयांवर अमेरिकेतील दिवसाचा काही परिणाम होत नाही. उलट ज्यांच्यावर (अमेरिकनांवर) त्याचा परिणाम होतो, त्यांना मात्र त्याचे ज्ञान होतेच. म्हणजे अनुभव येतोच. अशा रीतीने अनुभव व परिणाम एकच असल्यामुळे ते वेगळे समजून केलेली व्याख्या एक तर चुकीची अथवा अर्थहीन ठरते (वरील वऱ्हाडपांड्यांच्या व्याख्येतील 'अ' या वस्तूच्या जागी 'अमेरिकेतील दिवस' आणि 'अनुभव' या शब्दाच्या जागी एकदा 'ज्ञान' व एकदा 'परिणाम' हे शब्द वापरून वाक्य तयार केले तर हे स्पष्ट होईल.)[३]

वऱ्हाडपांड्यांनी वरील सत्याच्या कसोटीची व्याख्या प्रतिपक्षाला ती चुकीची आहे हे सिद्ध करण्याचे आव्हान देऊन केलीआहे, हे लक्षात घेता वाचकांना वऱ्हाडपांडे हे कसले बुद्धिवादी असे वाटून सत्याच्या कसोटीची वैज्ञानिक राहू द्या, तार्किक व्याख्यासुद्धा नीट करू न शकणारा त्यांचा हा बुद्धिवाद नेभळट वाटेल व त्यांना त्यांची कीवही येईल. पण त्यांचा बुद्धिवाद नेभळट (किंवा भोळसटही) नाही, हे लक्षात ठेवले पाहिजे. नाहीतर त्यांनी मैदानात उतरून प्रतिपक्षाला शड्डू ठोकून आव्हान दिले नसते! मग त्यांचा बुद्धिवाद काय आहे? तो 'काय' आहे हे त्यांची व्याख्या का चुकली हे समजून घेतले तर कळेल.

वऱ्हाडपांडे 'अनुभव' व 'परिणाम' वेगळे समजातात हे वर सांगितलेच आहे. ते हे वेगळे का समजतात? कारण त्यांच्या दृष्टीने (आणि त्यांची दृष्टी जडवादी आहे हे लक्षात ठेवावे) * अनुभव गौण असून प्रत्यक्ष परिणाम महत्वाचे आहेत! अनुभव गौण का? तर ते जडवादात बसत नाहीत म्हणून! कारण एखाद्याला स्वप्नाचेच नव्हे तर अतींद्रिय (ईश्वरी) अनुभवही येऊ शकतात, आणि ते या निरीश्वरवादी बुद्धिवाद्यांना अडचणीचे ठरतात! प्रत्यक्ष परिणाम मात्र नेहमी डोळ्यांना दिसतात. कारण ते भौतिक ('जड') आणि ऐंद्रिय असतात. पण वर अनुभव व परिणाम वेगळे मानता येत नाहीत, ते एकच मानले पाहिजेत, हे आपण तार्किकदृष्ट्या सोदाहरण (अमेरिकेतील दिवसाच्या उदाहरणाने) पाहिले आहे. पण आपले (अनुभव व परिणाम वेगळे नाहीत) हे म्हणणे वऱ्हाडपांड्यांची सत्याच्या कसोटीची व्याख्या त्यामुळे (म्हणजे तार्किकदृष्ट्या) चुकीची ठरते म्हणून बरोबर ठरत नसून वर दिलेल्या व प्रत्यक्ष केलेल्या मानसशास्त्रीय प्रयोगावरून व भानामतीसारख्या घटनांवरून बरोबर ठरते. यावरून सर्वार्थाने सत्याची कसोटी कोणती

---

* वऱ्हाडपांडे चार्वाकवादी आहेत. चार्वाकवाद हा जडवादी (शरीरसुखवादी) आहे. तो वाद शरीरसुख हेच खरे सुख मानतो.

हेही स्पष्ट होते. भानामतीचा अनुभव म्हणजेच तिचा परिणाम असल्याचे किंवा 'कागद' हाच 'तप्त लोखंड' हा अनुभव व 'भाजण्या' चा परिणाम हे एकच असल्याचे (म्हणजे अनुभवापासून परिणाम वेगळा करता येत नसल्याचे) आपले म्हणणे अशा रीतीने सप्रयोग व अनुभवाने सिद्ध होत असल्यामुळे भ्रम व सत्य यातील फरक भौतिक नसून मानसिक (वा अनुभवात्मक) असल्याचे सिद्ध होते. हा फरक भौतिक समजून म्हणजे मानसिकतेला किंवा अनुभवाला गौण लेखून सत्याच्या कसोटीची केलेली वऱ्हाडपांड्याची व्याख्या म्हणूनच चुकली आहे. आपली व्याख्या एक तर चुकीची आहे हे सिद्ध करावे (किंवा बरोबर म्हणून मान्य करावे) नाहीतर समज व वेड यात काही फरक नाही असे मानायला तयार व्हावे, असे शेवटी वऱ्हाडपांड्यांनी म्हटले आहे. त्यांची व्याख्या अशा रीतीने तार्किक व वैज्ञानिक अशा दोन्ही दृष्टीनी चुकीची असल्याचे सिद्ध झाले असल्यामुळे त्यांनी प्रतिपक्षापुढे ठेवलेला पर्याय आता त्यांच्याच पुढे उभा आहे! त्यांनी एक तर आपली सत्याच्या कसोटीची व्याख्या चुकली हे मान्य करावे, नाही तर वेड व समज एकच मानायला तयार व्हावे ! आपली व्याख्या चुकली हे त्यांनी मान्य केले तर ज्या जडवादी सत्याच्या पायावर त्यांनी आपला विवेकावाद उभा केला आहे तो सत्याचा पायाच उपर्युक्त वैज्ञानिक प्रयोगाने व भानमतीमुळे उखडून निघत असल्यामुळे त्यांचा 'विवेकवाद' पूर्णपणे कोलमडतो. आणि त्यांनी हे मान्य केले नाही तर त्यांचा विवेकवाद (त्यांच्याच भाषेत) वेड व समज यात काही फरक करीत नाही असे ठरते! अशा रीतीने त्यांचा बुद्धिवाद नेभळट वा भोळसट नसला तरी असमंजस (किंवा पुन्हा त्यांच्याच भाषेत वेडपट) निश्चित ठरतो.[४]

प्रत्यक्ष आणि अनुमान या खेरीज ज्ञानाचे तिसरे प्रमाण अस्तित्वात नाही, असे वऱ्हाडपांड्यांचे म्हणणे आहे. तिसऱ्या प्रकरणामध्ये अतींद्रिय ज्ञान सत्याच्या कसोटीला उतरत असल्याचे (Verifiable) अनेक उदाहरणांनी दाखवून दिलेले आहे. अशा रीतीने अतींद्रिय अनुभव हे ज्ञानाचे (सत्याचे) तिसरे प्रमाण ठरत असल्यामुळे जे प्रत्यक्ष व अनुमान प्रमाणांनी कळत नाही, पण जे अतींद्रिय प्रमाणानेच कळते, असे 'अतींद्रिय' सत्य (उदा. ईश्वर)अस्तित्वात आहे हे म्हणणे सयुक्तिक ठरते. उदा. प्रत्यक्ष व अनुमानांनी भविष्यज्ञान अशक्य आहे पण 'बुद्धिप्रामाण्यवाद आणि परामानसशास्त्र' या तिसऱ्या प्रकरणात दाखविल्याप्रमाणे भविष्यज्ञान होऊ शकते. म्हणजे ते सत्य ठरू शकते. आता वऱ्हाडपांड्यांच्या सत्याच्या कसोटीच्या दृष्टीने पाहिले तर भविष्यातील घटनांचे (किंवा वस्तूचे) 'अर्थक्रियाकारित्व' (प्रत्यक्ष परिणाम) वर्तमानात दिसणे (किंवा होणे ) कसे शक्य आहे ? शक्य आहे असे म्हटले तर अस्तित्वात नसलेल्या घटनांचा (किंवा वस्तूंचा) प्रत्यक्ष परिणाम होतो असे मानण्याचा प्रसंग येतो. पण असे मानल्याशिवाय भविष्यज्ञानच

होणार नाही. (असा परिणाम करणाऱ्या लहरींना पूर्वभावी लहरी -Advanced Waves- असे भौतिकशास्त्रज्ञ म्हणतात. पाहा : **Quantum Physics and Parapsychology- Ed. L. Oteri) अशा रीतीने भविष्यातील (हल्ली अस्तित्वात नसलेल्या)** घटनांचा वा वस्तूंचा परिणाम मेंदूवर पूर्वभावी लहरींनी होत असेल तर तिन्ही कालात अस्तित्वात असलेल्या (म्हणजे आध्यात्मिक भाषेत 'कालातीत असलेल्या') ईश्वराचा -अतींद्रिय सत्याचा - परिणाम का होऊ नये व असा परिणाम जे करते ते (अतींद्रिय) सत्य का असू नये हे कळणे कठीण आहे. ते सत्य प्रत्यक्ष व अनुमान या प्रमाणांनी कळत नाही, अतींद्रिय ज्ञानाच्या प्रमाणानेच फक्त कळते म्हणून त्याला अतींद्रिय सत्य म्हणायचे. (म्हणजे असे सत्य की ज्याचा व्यवहार भौतिक वा ऐंद्रिय वस्तू वा घटनेप्रमाणे होत नाही.) त्याचा व्यवहार प्रत्यक्ष व अनुमान प्रमाणांनी कळणाऱ्या भौतिक व ऐंद्रिय वस्तू वा घटनेप्रमाणे होत नाही म्हणून त्याला भौतिक सत्याची कसोटी लावता येत नाही आणि ती लावली तर ते सत्य कळणारच नाही. बुद्धिवादी प्रत्यक्ष व अनुमान या सत्याच्या प्रमाणांची कसोटी लावूनच ईश्वराचे अस्तित्व नाकारतात हे लक्षात घेतले तर त्यांना ईश्वरी (अतींद्रिय) सत्य कळणार नाही यात काहीच आश्चर्य नाही. (खरे तर ईश्वराचे अस्तित्व त्यांना नाकारायचे असते, म्हणूनच या प्रमाणांची कसोटी ते लावतात.)

अतींद्रिय सत्य अतींद्रिय प्रमाणाखेरीज अनुमानासारख्या अन्य कोणत्याही प्रमाणांनी कळणार नाही ही साधी गोष्ट बुद्धिवाद्यांना कळत नाही. उदा. वऱ्हाडपांडे म्हणतात की अतींद्रिय सत्य (ज्याला ते 'गूढानुभूति' म्हणतात) हे (अस्तित्वात असेल तर) स्वत: त्या सत्याचा अनुभव न घेता अनुमानाने कळू शकते (किंवा कळाले पाहिजे). उदा. ते म्हणतात की साखर गोड आहे, हे स्वत: साखर न खाता कळते. कसे ? तर ती खाणाऱ्याला विचारून ! म्हणजे 'शब्दप्रमाण' हे तिसरे प्रमाण स्वीकारून. मग ईश्वरानुभूती (अतींद्रिय ज्ञान) असणाऱ्याला विचारून त्याची सत्यता का स्वीकारत नाही? साखर खाणारे सर्वजण 'गोड' या एकाच शब्दात त्याची चव जशी वर्णन करतात, तसे ईश्वरानुभूतीची 'चव' एकाच (आध्यात्मिक) शब्दात ईश्वरवादी (त्याचा अनुभव घेणारे) **वर्णन करीत नाहीत म्हणून काय? ईश्वर म्हणजे ते कार्बन,** डायड्रोजन व ऑक्सिजन या अणूंचा बनलेला गोळा समजतात काय? वऱ्हाडपांडे म्हणतात की अनुभव आल्याशिवाय अनुभवाच्या सत्यतेची प्रतीती घेता येते. (हे वाक्य ते जाड ठशात ठेवतात. यावरून त्यांच्या विवेकवादी सत्याचा हा निकष समजण्यास हरकत नाही.) उदा. ते म्हणतात की डोळसांना दिसते, हे सत्य कळण्यासाठी आंधळ्यांनी स्वत: डोळसच बनले पाहिजे असे नाही. (हे पटवून देण्यासाठी त्यांनी बरीच बुद्धी आणि शक्ती खर्च केली आहे.) पण डोळसांना दिसते की नाही हा सत्याचा प्रश्न नसून (कारण डोळस याचा अर्थच तो आहे.)

डोळसांना काय दिसते व ते आंधळ्यांना डोळस न बनता दिसते का? हा सत्याचा प्रश्न आहे. ती 'अनुभवाची सत्यता' आहे. डोळसांना दिसणारा पण आंधळ्यांना न दिसणारा प्रकाश सत्यच नाही, असे वऱ्हाडपांड्यांचे म्हणणे आहे काय? त्यांचे 'विवेकवादी' म्हणणे हेच आहे हे उघड आहे! कारण त्यांच्या विवेकवादी सत्याच्या निष्कषानुसार आंधळ्यांना 'अनुभव' आल्याशिवायच (म्हणजे डोळस न बनताच ) ज्याची प्रतीती घेता येते, तेच सत्य होय! प्रकाश 'अनुभव' आल्याशिवाय'च आंधळ्यांना प्रतीत होत नसल्यामुळे असत्य मानण्यात वऱ्हाडपांड्यांच्या 'सत्या' च्या प्रमाणाच्या किंवा निकषाच्या दृष्टीने कसलाच (तार्किक) प्रत्यवाय नाही! अशा रीतीने आंधळ्यांना 'अनुभव आल्याशिवायच' जे कळते तेच सत्य व त्यांना अनुभवाला न येणारे (उदा. प्रकाश) असत्य होय, असा थोडक्यात वऱ्हाडपांड्यांचा 'सत्याचा वाद' आहे. डोळस लोक याला 'आंधळ्यांचा वाद' म्हणतील. पण 'सत्यप्रिय' वऱ्हाडपांडे याला 'विवेकवाद' म्हणतात!

## टिपा -

१. स्वत: विवेकवादी आंधळा असून वाचकानाही तो कसा आंधळा बनवितो हे स्वत: वऱ्हाडपांडे यांच्या उदाहरणानेच दाखवून देता येते. एखादा आंधळा जर विवेकवादी असता (किंवा विवेकवादी आंधळा असता) तर तो डोळसांना सत्याचे ज्ञान होते की नाही हे ठरविण्यासाठी कसा वागला असता हे दाखवून देताना वऱ्हाडपांडे म्हणतात,'एखाद्या (विवेकवादी) आंधळ्याने डोळस माणसाला आपल्यापासून आपल्या काठीच्या साहाय्याने पाच-सहा फूट अंतरावर उभे केले असते मग आपल्या दोन हातात दोन दगड धरले असते. एक लहान व एक मोठा (लहान दगड कोणता व मोठा दगड कोणता हे आंधळ्याला स्पर्शज्ञानाने कळू शकते.) हे दोन्ही दगड डोळ्यासमोर धरून त्यातला मोठा कोणत्या हातात आहे व लहान कोणत्या हातात आहे हे विचारले असते. डोळसाने बिनचूक उत्तर दिल्यावर जे ज्ञान आपल्याला वस्तूला हात लावल्याशिवाय होत नाही तेच डोळसाला पाच फूट अंतरावरून होते याबद्दल त्या विवेकवादी आंधळ्याची खात्री पटली असती.' हीच विवेकवादी आंधळ्याची डोळसाचे ज्ञान खरे असल्यची (म्हणजे सत्याची) कसोटी होय, किंवा अनुभव घेतल्याशिवाय अनुभवाच्या सत्यतेची प्रतीती होय असे वऱ्हाडपांड्यांचे म्हणणे ! पण वस्तुत: ही 'सत्याची कसोटी' नसून 'आंधळ्याची कसोटी' आहे, किंवा 'अनुभवाशिवायच' अनुभवाच्या सत्यतेची प्रतीती नसून 'आंधळ्याची प्रतीती' आहे. कारण आंधळ्याला स्पर्शज्ञानाशिवाय डोळसाच्या ज्ञानाला दुसरी कसोटीच लावता येत नाही आणि स्पर्शज्ञानाची कसोटी ही फक्त आंधळ्याची कसोटी आहे आणि हीच एकमेव 'सत्याची कसोटी' आहे (दुसरी सत्याची कसोटीच नाही) असे आंधळ्याशिवाय दुसरा कोणीच म्हणणार नाही. वाचकांनाही हीच सत्याची एकमेव कसोटी आहे हे पटवून देण्यासाठी हे उदाहरण देऊन वऱ्हाडपांडे वाचकांनाही आंधळे बनवत आहेत!

डोळसांना स्पर्शज्ञानाशिवाय होणारी सौंदर्य प्रतीती आंधळ्यांना होत नसल्यामुळे ती या कसोटीवर असत्य ठरते हे उघड आहे. आता सौंदर्याच्या अनुभवाशिवायच सौंदर्याच्या अनुभवाच्या सत्यतेची प्रतीती आंधळ्यांना होत नसल्यामुळे ती या कसोटीवर असत्य ठरते हे उघड आहे. आता सौंदर्याच्या अनुभवाशिवायच सौंदर्याच्या अनुभवाच्या सत्यतेची प्रतीती आंधळ्यांना घेता येत नसल्यामुळे वऱ्हाडपांड्यासारखे 'आंधळे विवेकवादी' सौंदर्याची प्रतीती खोटी म्हणणार आहेत काय? कोणत्याही अनुभवाच्या सत्यतेची प्रतीती अनुभवाशिवायच घेता येते हे वऱ्हाडपांड्यांचे म्हणणे अशा रीतीने निराधार ठरते. हा युक्तिवाद जन्मांधाना पटेल, डोळसांना पटणार नाही. कारण डोळसांना तो लागू होत नाही. (आंधळ्यांची कसोटी डोळसाला लागूच करता येत नाही.) म्हणूनच आंधळ्यांच्या जगात डोळस अडाणी ठरतो हे एच्. जी. वेल्सचे म्हणणे शंभर टक्के बरोबर असून ते खोडून काढण्यासाठी वऱ्हाडपांडे करीत असलेला (आंधळ्यांचा) युक्तिवाद विवेकवाद आंधळा असल्याचे अधिक जोमाने सिद्ध करतो.

२. अमूक वस्तू ('गोड' नव्हे) 'साखर' आहे की नाही हे ठरविण्यासाठी रासायनिक पृथक्करणासारखी वस्तुनिष्ठ कसोटी उपलब्ध आहे, तसे एखाद्याला ईश्वरानुभूती आहे की नाही, हे ठरविण्यासाठी वस्तुनिष्ठ कसोटी उपलब्ध नाही. म्हणून ईश्वरानुभूती खोटी म्हणता येईल काय? एखाद्याला रतिसुखाचा अनुभव आहे की नाही हे ठरविण्यासाठीसुद्धा वस्तुनिष्ठ कसोटी उपलब्ध नाही . म्हणून रतिसुखाचा अनुभव खोटा म्हणता येईल काय? अर्थात रतिसुखाच्या अनुभवाची काही लक्षणे दिसत असतील तर ईश्वरानुभूतीची लक्षणेही दिसणे शक्य आहे असे म्हणता येईल. पण हे जावे त्यांच्या वंशा तेव्हा कळे !

३. ईश्वरानुभूती असलेल्या लोकांनी आपल्या अनुभवाचे शब्दांनी केलेले वर्णन सुसंगत आढळून येत नाही, असा एक वऱ्हाडपांड्यांचा आक्षेप आहे. जे बुद्धिग्राह्य व इंद्रियग्राह्य नाही ते बुद्धीला व इंद्रियांना कळणाऱ्या भाषेत सांगणे अशक्य आहे ही गोष्ट वऱ्हाडपांड्यांना कळत नाही. जे बुद्धिग्राह्य व इंद्रियग्राह्य आहे त्याचेसुद्धा वर्णन सुसंगत असत नाही हे प्रसिद्ध आहे. एकाला साखर कशी आहे असे विचारले, त्याने 'गोड' आहे असे उत्तर दिले. दुसऱ्याला 'रतिसुख' कसे आहे असे विचारले, त्यानेही 'गोड' आहे असे उत्तर दिले. दोन्हींचाही अनुभव न घेणाऱ्या व शब्दप्रमाण (वऱ्हाडपांड्यांच्याप्रमाणे) मानणाऱ्या बुद्धिवाद्याचा तर्कशुद्ध निष्कर्ष रतिसुख व साखर एकच होय असाच असणार, हे सांगण्याची जरूरी नाही! (यालाच वऱ्हाडपांडे 'अनुभव आल्याशिवाय' च अनुभवाच्या सत्यतेची प्रतीती घेणे म्हणतात!) ईश्वरानुभूती (अतींद्रिय ज्ञान) कायम टिकत नाही हे लक्षात घेता त्या उच्च पातळीवरून खाली उतरलेली व्यक्ती इतरांप्रमाणेच सामान्य बौद्धिक पातळीवरच असते, हे विसरून चालणार नाही. जेव्हा बुद्धीच्या पलीकडचा (अतींद्रिय) अनुभव येतो, तेव्हा बुद्धी ही कार्य करीत नसते, व जेव्हा बुद्धीचे कार्य चालते, तेव्हा अतींद्रिय अनुभव येत नाही. त्यामुळे अतींद्रिय अनुभव आलेली व्यक्ती जेव्हा तो अनुभव शब्दात व्यक्त करण्याचा प्रयत्न करते, तेव्हा आंधळ्याने प्रकाशाचे

वर्णन करावे, तसा काहीसा प्रकार होतो. म्हणून उपनिषद्‌कार या अनुभवाचे शब्दात वर्णन करता येत नाही (**नेति नेति** -किंवा **यतो वाचो निवर्तन्ते अप्राप्य मनसासह**) असे म्हणतात. त्यामुळे या वर्णनात देशकालपरिस्थितीचे आगंतुक घटक येणे स्वाभाविक आहे, नव्हे अशा घटकांनीच त्याचे वर्णन शक्य आहे. बुध्द, येसू, उपनिषद्‌कार ज्याचे वर्णन करतात ते अतींद्रिय सत्य नसून अतींद्रिय सत्याच्या पायावर आधारलेले, पण ऐंद्रिय व वैयक्तिक अनुभवावरून तयार झालेले बौद्धिक तत्त्वज्ञान आहे. त्यालाच ईश्वर (गूढानुभूती) समजणे म्हणजे विजेवर चालणाऱ्या कारखान्यालाच वीज समजण्यासारखे आहे. वीज एकच असली तरी कारखाने जसे वेगवेगळे, तसे ईश्वरानुभूती किंवा अतींद्रिय ज्ञान एकच असले तरी त्याची अभिव्यक्ती वेगवेगळी; म्हणून **'एकं सद् विप्रा: बहुधा वदंति'** *

**संदर्भ टिपा -**

१. उदा. पृथ्वीच्या दृष्टीने सूर्यग्रहण खरे, पण सूर्याच्या दृष्टीने त्याचा त्याच्यावर प्रत्यक्ष परिणाम होत नसल्यामुळे खोटे होय.

२. या दृष्टीने विंचवाचे खऱ्या अर्थाने 'ज्ञान' म्हणजे 'काय चावले' हे कळणे नव्हे तर 'विंचू चावणे' होय. कारण विंचू चावल्याचा ज्याला अनुभव नाही त्याला विंचू व इतर प्राणी हे सारखेच होत.

३. वऱ्हाडपांड्यांनी परिणामाशिवाय अनुभव येतो किंवा अनुभवाशिवाय परिणाम होतो, या चुकीच्या तर्कावर आपली व्याख्या रचून ईश्वराच्या अनुभवाशिवाय (ज्यांना ईश्वराचा अनुभव नाही त्यांच्यावर) ईश्वराचा परिणाम होऊ शकतो (किंवा झाला पाहिजे) अशी चुकीची कल्पना वाचकांच्या गळी उतरविण्याचा प्रयत्न केला आहे. वऱ्हाडपांड्यांचे अनुभव व परिणाम यांच्या स्वतंत्र अस्तित्वाचे हे तर्कशास्त्र बरोबर असेल तर उन्हात न जाता (उन्हाचा अनुभव न घेता ) ऊन लागले पाहिजे किंवा ऊन लागण्यासाठी उन्हात जाण्याची जरूरी नाही असे म्हटले पाहिजे ! ऊन, पाऊस, वारा, थंडी, खोकला, औषध इत्यादी शेकडो उदाहरणे याविषयी देता येतील आता वऱ्हाडपांड्यांच्या व्याख्येतील 'अ' च्या जागी 'ऊन' शब्द वापरला तर ती

---

* गौतम बुद्ध ईश्वरच नाही म्हणतो, मग बुद्धाला ईश्वरानुभूती (गूढानूभूती) आली असे कसे म्हणता येईल, असा अडाणी प्रश्न वऱ्हाडपांडे विचारतात. अतींद्रिय अनुभूती येणाऱ्यांनी आपल्या अनुभूतीला 'ईश्वरी अनुभव' या ऐवजी दुसऱ्या एकाद्या नावाने (उदा. निर्वाण) संबोधले म्हणजे ती अनुभूती खोटी कशी ठरते? काही तत्त्ववेत्त्यांना (उदा. लॉक, बर्कले, ह्यूम) भौतिक जग म्हणजे केवळ 'मनातील' कल्पना वाटते, या उलट इतर काही तत्त्ववेत्त्यांना (उदा . मुअर, ब्रॉड, लेअर्ड) भौतिक जग मानसिक अगर काल्पनिक नसून खरे आहे असे वाटते. जग काल्पनिक असो अगर खरे असो, ज्या जगाच्या अनुभवामुळे त्यांना ते काल्पनिक अगर खरे वाटते, तो जगाचा त्यांचा अनुभव त्यामुळे खोटा ठरतो काय?)

व्याख्या अशी होईल, ''ज्यांना उन्हाचा अनुभव येत नाही, त्यांच्यावर देखील उन्हाचा परिणाम होतो...... असे म्हणता आले तर ऊन भ्रामक नसून सत्य आहे असे समजावे.'' आता जे ऊन आपणाला न लागता (उन्हात न जाता) आपल्यावर परिणाम करते ते ऊन सत्य आहे असे म्हणणे हे कसले तर्कशास्त्र? मग जे शिंग आपणाला लागत नाही, त्या सशाच्या शिंगाने आपण जखमी का होऊ नये? ('सशाचे शिंग' सत्य का म्हणू नये?')

४. वऱ्हाडपांड्यांना आपला विवेकवाद बरोबर (अमोघ) असल्याचा इतका दांडगा आत्मविश्वास आहे की त्यांनी आद्य शंकराचार्य, अमेरिकन मानसशास्त्रज्ञ वुइल्यम जेम्स, एच्. जी. वेल्स यासारख्या जागतिक कीर्तीच्या विचारवंताचे याविषयीचे विचार पूर्णपणे चुकीचे वा तर्कविसंगत म्हणून जाता जाता ठोकरून लावले आहेत. सत्याच्या चुकीच्या कल्पनेमुळे (सत्य अनुभवनिरपेक्ष असल्याच्या समजुतीमुळे) असे करणे कोणालाही शक्य होईल, हे सांगण्याची आवश्यकता नाही. या 'विवेकवाद' ग्रंथाची तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी प्रस्तावना लिहून भलावण केली आहे. शास्त्रीबुवांच्या 'सत्यवादी' दृष्टिकोणाची त्यामुळे महाराष्ट्राला खरी ओळख व्हायला हरकत नाही.



१०

# विज्ञानाच्या दृष्टिकोणातून विवेकवाद आणि गुढानुभूतिवाद *

इंग्रजीतील Rationalism या शब्दाचे मराठी भाषांतर बुध्दिवाद (किंवा बुद्धिप्रामाण्यवाद) असे रूढ झाले आहे. पण काही जण 'विवेकवाद' असेही त्याचे भाषांतर करतात. श्री. नी. र वऱ्हाडपांडे यांनी '**विवेकवाद**' नावाचा एक ग्रंथ लिहिला असून त्याच्या पहिल्याच 'विवेकवाद म्हणजे काय?' या प्रकरणात आज बर्ट्रांड रसेलसारखे तत्त्वज्ञ ज्या Rationalism चा पुरस्कार करतात, तो विवेकवाद प्रमाण म्हणून स्वीकारून त्याची पुढीलप्रमाणे व्याख्या केली आहे: ''विज्ञानामध्ये सत्यशोधनासाठी जी पद्धती वापरण्यात येते त्या पद्धतीचा अवलंब केल्यावाचून जीवनाच्या कोणत्याही अंगाबद्दल सत्यज्ञान होऊ शकत नाही व त्या पद्धतीव्यतिरिक्त एखादी पद्धती वापरून झालेले ज्ञान सत्य आहे असे समजणे ही अंधश्रद्धा आहे असे मानणरा वाद म्हणजे विवेकवाद.'' (पृ.४)

श्री. वऱ्हाडपांडे बर्ट्रांड रसेलचा विवेकवाद प्रमाण म्हणून स्वीकारतात हे तर झालेच, (रसेलशी ते किती प्रामाणिक राहतात हे पुढे दिसेलच) पण वरील त्यांच्या अवतरणावरून विज्ञानपद्धतीलाच ते विवेकवाद म्हणतात हेही स्पष्ट आहे. विज्ञानपद्धती म्हणजेच विवेकवाद असेल तर विवेकवाद म्हणून वेगळा वाद करण्याची काय जरूरी आहे? असा स्वाभाविकच येथे प्रश्न निर्माण होतो. विज्ञानपद्धती अस्तित्वात असताना विवेकवादाच्या नावाखाली वेगळा वाद करणाऱ्यांना विज्ञानपद्धतीहून (व विज्ञानाहून) काही वेगळे सांगायचे असते हे स्पष्ट आहे. आणि हे 'वेगळे' काय आहे हे 'खरे विज्ञान व खोटे विज्ञान' या प्रकरणात स्पष्ट केले असून ते विज्ञानपद्धतीशी कसे विसंगत आहे हे तेथे साधार दाखवून दिले आहे.[१] प्रस्तुत लेखात 'गूढानुभूतिशास्त्र' (Mysticism) च्या संदर्भात विवेकवादाचे म्हणणे काय आहे व ते विज्ञानपद्धतीशी सुसंगत आहे काय, हे वऱ्हाडपांड्यांचा 'वाद' उदाहरणादाखल घेऊन तपासायचे योजले आहे.

* प्रस्तुत लेखात विज्ञानाच्या संदर्भात विवेकवादाची गूढानुभूतीविषयीची भूमिका कशी टिकू शकत नाही एवढ्यापुरताच विचार केला आहे. गूढानुभूतीला आधुनिक भौतविज्ञानातील संशोधनामुळे कशी शास्त्रीय बैठक प्राप्त झाली आहे याचा विचार स्वतंत्रपणे केला पाहिजे.

## विज्ञानपद्धती व अनुभवांची संगती

गूढानुभूतीने (Mystic Experience) सत्यज्ञान होऊ शकत नाही हे दाखवून देण्यासाठी वऱ्हाडपांडे पुढीलप्रमाणे युक्तिवाद करतात, " 'आम्हाला गुढानुभूती झाल्यामुळे 'जगाचे कारण चैतन्यरूप ब्रह्म आहे' आणि 'काल मिथ्या आहे' ही सत्य विधाने आहेत हे कळते. त्यांना खोटी ठरविण्यासाठी तुम्ही जे युक्तिवाद करता ते निरर्थक आहेत' असे जेव्हा गूढवादी विवेकवाद्याला म्हणतो, तेव्हा विवेकवादी उत्तरतो, 'तुम्हाला गूढानुभूतीत 'काल मिथ्याआहे' असा प्रत्यय येत असेल, पण जागृतीत काल सत्य आहे असा प्रत्यय सर्वांना येतो. त्यामुळे गूढानुभव खरा की जागृतीतला अनुभव खरा असा प्रश्न उपस्थित होतो. तुमचा गूढानुभव इतर सर्व अनुभवांशी विसंगत आहे व म्हणून तो स्वप्नतुल्य व भ्रामक आहे असे आम्ही समजतो.' " (पृ.६.)

गूढानुभूतीत प्रत्यक्ष काय 'कळते' हा प्रश्न तूर्त बाजूस ठेवू व 'जगाचे कारण चैतन्यरूप ब्रह्म आहे' व 'काल मिथ्या आहे' ही विधाने सत्य आहेत असे गूढानुभूतीत कळते हे वऱ्हाडपांड्यांचे म्हणणे बरोबर म्हणून स्वीकारू. वऱ्हाडपांड्यांचा मुख्य युक्तिवाद हा आहे की गूढानूभव इतर सर्व अनुभवांशी विसंगत असल्यामुळे तो स्वप्नतुल्य व भ्रामक आहे. "शास्त्र अनुभूतींची संगती लावण्यासाठी असते" (पृ.१४) असेही ते म्हणतात. या युक्तिवादात ज्याला ते 'जागृतीतला अनुभव' म्हणतात, तो अनुभवच प्रमाण मानतात हे स्पष्ट आहे. पण 'जागृतीतला अनुभव' प्रमाण मानण्याला व त्या अनुभवांची इतर अनुभूतींशी संगती लावण्याच्या आग्रहाला विज्ञानाचाच विरोध आहे हे वऱ्हाडपांड्यांना माहीत नाही. याविषयी आर्थर एडिंग्टन या भौतशास्त्रज्ञाने **The Nature of the Physical World** या ग्रंथात दिलेले दोन टेबलांचे उदाहरण - एक वैज्ञानिक टेबल व दुसरे व्यावहारिक (जागृतीतले) टेबल- प्रसिद्ध आहे. खरे टेबल वैज्ञानिकच होय -जे खरे म्हणून स्वीकारले तर व्यावहारिक टेबल (अर्थात वैज्ञानिकदृष्ट्या)- खोटे वा भ्रामक मानावे लागते, हे एडिंग्टनने मान्य केले आहे. (व्यावहारिक टेबल 'खरे' मानले तर काही प्रसंगी कशी 'चमत्कारिक' परिस्थिती निर्माण होते, हे त्याने सोदाहरण दाखवून दिले आहे.)

हायजेनबर्ग या प्रसिद्ध नोबेल पारितोषिक विजेत्या भौतशास्त्रज्ञाने अणूच्या सूक्ष्म पातळीवर 'जागृतीतले' स्थलकालयुक्त जगच अस्तित्वात नसते असे म्हटले आहे. (When we get down to the atomic level, the objective world of space and time does not exist.) भौतशास्त्रज्ञांचे हे स्थलकालातीत जग 'जागृतीत' आपल्या अनुभवाला येत नाही. म्हणून ते खोटे आहे असे वऱ्हाडपांडे म्हणणार आहेत काय?

आणखी एक भौतशास्त्रज्ञ रिचर्ड फेनमन याने विरोधी कण (Antiparticles) कालाच्या उलट दिशेने प्रवास करतात असा शोध लावला आहे! आणि या शोधाबद्दल त्याला १९६६ सालचे नोबेल पारितोषिकही मिळाले आहे. आता जागृतीत कालाच्या उलट प्रवास कुणाच्याही अनुभवाला येत नाही. म्हणून फेनमनचा हा शोधच खोटा होय (आणि म्हणून त्याबद्दल त्याला नोबेल पारितोषिक देणारे लोक निर्बुद्ध होत) असे वऱ्हाडपांडे म्हणणार आहेत काय? एरविन् श्रोडिंजर या नोबेल पारितोषिक विजेत्या भौतशास्त्रज्ञाने तर असे म्हटले आहे की, उडणाऱ्या (पंखांच्या) सिंहावर कदाचित विश्वास ठेवता येईल, पण नवभौतशास्त्रातील शोधांवर विश्वास ठेवणे कठीण आहे, कारण ते अनुभवाशी सुसंगत नाहीत.[२]

'जागृतीतला' (सामान्य माणसाचा, व्यावहारिक) अनुभव (वा कल्पना) वैज्ञानिकदृष्ट्या पूर्णपणे भ्रामक (वा चुकीचा) असल्याचा हा वैज्ञानिक दृष्टिकोण विज्ञान जगात इतका परिचित आणि रूढ झाला आहे की तो 'विवेकवादा' ची झापडे ज्यांनी लावून घेतलेली नाहीत, त्यांना अगदी 'सामान्य' वाटतो. तो मुद्दाम स्पष्ट करून सांगण्याची गरज आहे असे त्यांना वाटत नाही. पण विवेकवादाची झापडे लावून घेतलेल्यांना विज्ञानातील सामान्य गोष्टीही माहीत नसल्यामुळे त्या स्पष्ट करून सांगण्याची गरज आहे. म्हणून सत्तर वर्षापूर्वी लिहिलेल्या **Nature and Life** या व्हाइटहेड या प्रसिध्द शास्त्रज्ञाच्या ग्रंथातील पुढील अवतरण देत आहे. "The development of natural science has gradually discarded every single feature of the original commonsense notion . Nothing whatever remains of it, considered as expressing the primary feaures in terms of which the universe is to be interpreted. The obvious commonsense notion has been entirely destroyed , so far as concerns its function as the basis for all interpretation. One by one, every item has been dethroned.. in gerneral (between the scienific and commonsense views of the universe) there is no conciliation."

(भावार्थ: प्राकृतिक विज्ञानाच्या विकासामुळे सामान्य माणसाने भौतजगाविषयी स्वत:ची जी मूळ समजूत करून घेतली होती- भौतिक घटनांचा अर्थ करताना ज्या कल्पना गृहीत धरल्या होत्या- त्या सगळ्या (चुकीच्या, भ्रामक व म्हणून) त्याज्य ठरलेल्या आहेत. एका मागोमाग एक अशा सामान्य माणसाच्या सर्व व्यावहारिक कल्पनांचे विज्ञानाच्या विकासामुळे पूर्णपणे उच्चाटन झाले आहे. विश्वाविषयीची ही वैज्ञानिक दृष्टी व सामान्य माणसाची विश्वाविषयीची दृष्टी या दोन ध्रुवा इतक्या परस्पराविरुद्ध आहेत, व म्हणून त्यांचा मेळ घालणे अशक्य आहे.)

पण मुख्य प्रश्न हा नाही. गूढानुभूती ही 'अनुभूती' आहे हे वऱ्हांडपांड्यांना मान्य आहे की नाही हा मुख्य प्रश्न आहे आणि ती अनुभूती आहे हे त्यांना मान्य असेल तर त्या अनुभूतीला स्वत:चे असे अनुभवात्मक मूल्य आहे हे त्यांना मान्य आहे की नाही? असेल तर बुद्धिवादाला आपोआपच अनुभूतिशास्त्राच्या दृष्टीने मर्यादा पडतात हे त्यांना मान्य करावे लागेल. मूल्याच्या मुद्यावर बुद्धिवादाला मर्यादा आहेत हा मुद्दा वऱ्हाडपांड्यांना मान्य आहे असे दिसते. हे त्यांच्या पुढील विधानांवरून स्पष्ट होते. 'अमूक मूल्य हे मूल्यच नाही असे विवेकवादी म्हणू शकणार नाही.' (पृ. १३) 'मूल्याचे मूळ भावनेत आहे, बुद्धीमध्ये नाही हे विवेकवाद्याला मान्य आहे.' (पृ.१२) 'गुलाबाचे फूल सुंदर आहे हे तर्काच्या आधारे सिद्ध करता येत नाही.' 'हे नाक सरळ नाही म्हणून ते सुंदर असूच शकत नाही असा आग्रह धरणारा... विवेकवादी.. निर्बुद्ध असतो.' (पृ.१४) 'हरिभाऊंच्या कादंबऱ्या चांगल्या (हृदयंगम) आहेत की नाहीत हा साक्षात अनुभूतीचा प्रश्न आहे' इत्यादी. अशा रीतीने काही गोष्टी अनुभूतीच्या -अनुभूतीने कळणाऱ्या आहेत हे वऱ्हाडपांड्यांना मान्य असेल तर गूढानुभूतीलाही अनुभवात्मक असे स्वत:चे 'अनुभवाने कळणारे' म्हणून स्वतंत्र मूल्य आहे हे त्यांना मान्य करावे लागेल. पण हे त्यांना मान्य नाही! उदा. त्यांचे पुढील विधान पाहा : '' 'आम्ही पवित्र व श्रेष्ठ चारित्र्याचे लोक असल्यामुळे आम्हाला येणारे अनुभव इतरांना येत नाहीत. त्या अर्थी ते (लोक) हीन आहेत हे स्पष्ट आहे. आमच्यासारख्या श्रेष्ठ लोकांचे अनुभव हीन लोकांनी प्रमाण मानले पाहिजेत. मग ते अनुभव त्यांना येवोत वा न येवोत' असे जेव्हा गूढवादी म्हणू लागतो, तेव्हा विवेकवादी उत्तरतो, महापुरूषहो ! तुमच्या स्वयंमन्य श्रेष्ठतेशी व पावित्र्याशी आम्हाला काही कर्तव्य नाही. जे अनुभव फक्त तुम्हालाच येतात व ज्यांच्या सत्येतेची आमच्यासारख्या हीन लोकांना पटणारी कोणतीच प्रमाणे तुम्हाला देता येत नाहीत, ते अनुभव व स्वप्नातील अनुभव यात काही फरक आहे असे आम्ही का मानावे?'' (पृ. ७-८)

या अवतरणात वऱ्हापांड्यांची गूढानुभूतीविषयक दिसून येणारी टवाळखोर मनोवृत्ती उपेक्षणीय म्हणून सोडून दिली तरी प्रश्न असा आहे की वऱ्हापांडे गूढानुभूतीला स्वप्नवत् खोटी का मानतात?असे मानण्यास त्यांनी दोन कारणे दिली आहेत. एक, गूढानुभूती सर्वांना येत नाही, व दुसरे , तिच्या सत्यतेची (पटणारी) प्रमाणे गूढानुभूतिवाद्यांना देता येत नाहीत.

आता प्रश्न असा आहे की एखादी अनुभूती सर्वांना नेहमीच येते काय? यावी असा आग्रह धरता येईल काय? सौंदर्यानुभूतीचेच उदाहरण घेऊ. जी कलाकृती एखाद्याला

सुंदर वाटते ती दुसऱ्याला सुंदर तर वाटत नाहीच, उलट अर्थहीन वाटते आणि हे मॉडर्न आर्टनेच सिद्ध केले आहे! ज्या 'तृणाच्या पात्या' त एखाद्या कवीला सौंदर्य दिसते त्यात बहुसंख्य लोकांना जनावरांचा चारा दिसतो. वुइल्यम् ब्लेकसारख्या कवीला वाळूच्या एका कणात ब्रह्मांड दिसले व रानटी फुलात स्वर्ग दिसला.[३] पण बहुसंख्य लोकांना हा माथेफिरूपणा वाटतो. सौंदर्यदृष्टी व काव्यदृष्टी ही फार थोड्या लोकांत असते. म्हणूनच एका कवीने 'अरसिक लोकांना काव्य सांगण्याचे आपल्या नशिबी कधी न येवो' अशी विधात्याकडे त्रिवार प्रार्थना केली आहे. (**अरसिकेषु कवित्वनिवेदनं शिरसि मा लिख मा लिख मा लिख ।**) कारण बहुसंख्य लोकांना काव्यदृष्टी नसते. ते कवीला वेड्यात काढतात. ही गोष्ट गूढानुभूतीविषयीही खरी आहे. किंबहुना गूढानुभूतीविषयी जास्त खरी आहे. कारण सौंदर्य व काव्य यांच्या अनुभूतीप्रमाणे गूढानुभूती इंद्रियजन्य नाही. कानांनी ऐकून किंवा डोळ्यांनी पाहून गुहानुभूती येत नाही. एक तर गूढानुभव घेण्याची कुवत जन्मजात असावी लागते, अथवा श्रद्धायुक्त व दीर्घ प्रयत्नांनी (वैराग्य व अभ्यास यांनी) ती प्राप्त होते असे पतंजलीमुनींनी योगसूत्रात म्हटले आहे.[४] अशा रीतीने गूढानुभूती सर्वांना यावी हा वऱ्हाडपांड्यांचाआग्रह अनाठायी व अज्ञानमूलक ठरतो आणि एखादी अनुभूती सर्वांना येत नाही म्हणून ती खोटी हे म्हणणेही अर्थातच चुकीचे ठरते. नाहीतर सौंदर्यानुभूती वा काव्यानुभूतीही सर्वांना येत नाही म्हणून तीही खोटी मानावी लागेल.

## गूढानुभूतीविषयी एक वैज्ञानिक प्रयोग

अनुभवाच्या सत्यतेची प्रमाणे गूढवाद्यांना देता येत नाहीत असा वऱ्हाडपांड्यांचा गूढानुभूती विरुद्ध दुसरा आक्षेप आहे. सौंदर्यानुभूतीच्या सत्यतेची प्रमाणे तरी सौंदर्यवाद्यांना देता येतात काय? सौंदर्यानुभूतीला बाह्य प्रमाण नाही, हे स्वतः वऱ्हाडपांडेच मान्य करतात. उदा. ते म्हणतात, ''हे नाक सरळ नाही म्हणून ते सुंदर असूच शकत नाही असा (सरळपणाच्या प्रमाणाचा) आग्रह धरणारा विवेकवादी निर्बुद्ध असतो.'' इंद्रियजन्य सौंदर्यानुभूतीमध्ये सुद्धा जर प्रमाणाचा आग्रह धरणे अशा रीतीने निर्बुद्धपणाचे ठरत असेल तर इंद्रियातीत अशा गूढानुभूतीविषयी प्रमाणाचा आग्रह धरणे जास्तच निर्बुद्धपणाचे ठरते! पुन्हा वऱ्हाडपांडेच म्हणतात की, ''इंद्रियानुभवाच्या आधारावर ज्याप्रमाणे विज्ञानाची उभारणी होते, त्याचप्रमाणे सौंदर्यानुभावाच्या पायावर सौंदर्यशास्त्राची उभारणी होऊ शकते.'' (पृ.१४.) मग गूढानुभूतीच्या पायावर गूढानुभूती (अध्यात्म) शास्त्राची उभारणी का होऊ शकणार नाही? पण हे वऱ्हाडपांड्यांना मान्य नाही. गूढानुभूती ही अनुभूतीच नाही असे त्यांना म्हणायचे आहे काय? पण त्यांना असे म्हणायचे आहे असे वाटत नाही. उलट गूढानुभूती ही एका प्रकारची अनुभूतीच आहे,

यावर त्यांचा जास्त जोर आहे. कारण या अनुभूतीची तुलना दारूच्या व्यसनाशी व आत्महत्येस प्रवृत्त झालेल्या व्यक्तीच्या मनोवृत्तीशी ते करतात. (पृ.८-९) (आणि अशा रीतीने ही अनुभूती स्वप्नवत् खोटी हे आपलेच विधान ते खोडून काढतात.) आता आत्महत्या करणारी व्यक्ती अथवा व्यसनाधीन व्यक्ती भावनेच्या आहारी जाऊन आत्महत्या वा दारूसारखी व्यसने करते हे प्रसिद्ध आहे. मग गूढानुभूती म्हणजे भावनेच्या आहारी जाणे काय?मग " 'जगाचे कारण चैतन्यरूप ब्रह्म आहे'. हे विधान सत्य आहे असे कळणे" म्हणजे भावनेच्या आहारी जाणे असे ठरते! पण एखादी गोष्ट सत्य आहे की असत्य हे कळणे बुद्धीचे काम आहे, भावनेचे नाही, हे न कळण्याइतके वऱ्हाडपांडे अडाणी असतील असे वाटत नाही. मग ते गूढानुभूतीची आत्महत्या करणाऱ्या व व्यसनाधीन व्यक्तीच्या मनोवृत्तीशी का तुलना करतात? गूढानुभूतीला दारूच्या व्यसनाप्रमाणे ते तुच्छ वा हीन लेखत असावेत व आत्महत्या करणाऱ्यांच्या भावनेप्रमाणे गूढानुभूतीही क्षणिक समजत असावेत, हे स्पष्ट आहे. पण गूढानुभूतीविषयीची त्यांची ही समजूत पूर्ण चुकीची आहे. ही गोष्ट गूढानुभूतीच्या मूलभूत लक्षणांचा अभ्यास केला असता स्पष्ट होते. जगातील गूढानुभूतिवाद्यांच्या साहित्यातील अनुभव कथन करणाऱ्या विधानांचा अभ्यास केला असता पुढील नऊ लक्षणे गूढानुभूतींची मूलभूत लक्षणे म्हणून ओळखता येतात-

१. बहिरंग व अंतरंग अनुभवाची एकात्मता (Sense of Unity).

२. स्थलकालातीत अशा अस्तित्वाची जाणीव.

३. काहीतरी प्राप्त केल्याची खोल जाणीव.

४. पावित्र्याची भावना.

५. वस्तुनिष्ठता व सत्यता यांचा अनुभव (अनुभव भ्रामक नसल्याची खात्री व अंतिम सत्याच्या आयामाचा अनुभव.)

६. परस्परविरुद्धता (Paradoxicality) ('मी' चा अस्तित्वात्मक व नास्तित्वात्मक असा एकाच वेळी अनुभव.)

७. अनिर्वचनीयता (Ineffability) अनुभव तर्कसंगत शब्दात सांगण्याची असमर्थता-(नेति नेति अवस्था)

८. इंद्रियगोचर जगाविषयी क्षणभंगुरतेची -नश्वरतेची जाणीव.

९. दृष्टिकोणात, मनोवृत्तीत व वर्तनात झालेला चिरस्थायी व भावनात्मक बदल. हा बदल (अ) स्वत:विषयी (आ) दुसऱ्याविषयी (इ) जीवनाविषयी आणि (ई) खुद्द गूढानुभूतीविषयी झाल्याचा आढळून येतो.

वरील लक्षणे गूढानुभूतीमध्ये स्वाभाविकपणे दिसून येत असली तरी ती प्रयोगाने

निर्माण करता येतात, हे पाहंके या मानसशास्त्रज्ञाने हार्वार्डच्या धर्मशास्त्राच्या वीस विद्यार्थ्यांवर केलेल्या एका प्रयोगात आढळून आले आहे.[५] हा 'गुडफ्रायडे' प्रयोग म्हणून ओळखला जातो. एका गुडफ्रायडेच्या दिवशी वरील २० विद्यार्थ्यांना एका खाजगी चर्चमध्ये प्रार्थना, प्रवचन इत्यादीद्वारा प्रदीर्घ अध्यात्मिक अनुभव येईल अशी व्यवस्था केली व या विसांपैकी दहा विद्यार्थ्यांना कार्यक्रमाच्या अगोदर सिलोसिबिन नावाचे मानसिक अवस्थेत बदल घडवून आणणारे रासायनिक द्रव्य दिले व बाकीच्या दहा विद्यार्थ्यांना साधे जीवनसत्वयुक्त द्रव्य सेवन करण्यास दिले. दोन्ही प्रकारची द्रव्ये दिसायला सारख्याच वेष्टनातून (Capsule) गिळायला दिली. स्वत: त्या विद्यार्थ्यांना मात्र आपणास काय खायला दिले हे माहीत नव्हते. हा कार्यक्रम संपल्यानंतर प्रत्येक विद्यार्थ्याने आपणास काय वाटले याची नोंद केली. दुसऱ्या आठवड्यात प्रत्येकाने सविस्तरपणे आपली प्रतिक्रिया लिहून काढली व १४७ प्रश्नांना उत्तरे दिली व या प्रश्नांच्या आधारे नंतर एक दीड तासाची मुलाखतही दिली. सहा महिन्यानंतर आणखी एका प्रश्नावलीला उत्तरे दिली. या सर्वांचा अभ्यास करून पाहंके याने जो निष्कर्ष काढला आहे तो असा की जीवनसत्वे घेतलेल्या विद्यार्थ्यांपेक्षा सिलोसिबिन हे मानसिक अवस्थेत बदल घडवून आणणारे द्रव्य घेतलेल्या विद्यार्थ्यांमध्ये वरील गूढानुभूतीची नऊ लक्षणे फार मोठ्या प्रमाणात दिसून येतात. या प्रयोगाने गूढानुभूती निर्माण करण्याचे सामर्थ्य काही रासायनिक द्रव्यात आहे या गोष्टीबरोबरच 'गूढानुभूती' ही एक मनोवृत्तीत व दृष्टिकोणात गुणात्मक बदल घडवून आणणारी प्रक्रिया आहे व ती वृत्ती कायमची टिकू शकते ही गोष्टही सिद्ध झाली. "'अंतिम' सत्याची जाणीव झालेल्यांना सामान्य व्यावहारिक सत्याविषयी तुच्छता वाटते असे या प्रयोगाने मुळीच दिसून आले नाही." ("The data did not suggest that any 'ultimate' reality encountered had made 'ordinary' reality no longer important or meaningful.") असेही पाहंकेने म्हटले आहे.[६]

(रासायनिक द्रव्याने गूढानुभूती येत असेल तर ती सर्वांना सहजसाध्य आहे. असे वाचकांना येथे वाटण्याचा संभव आहे. पण या द्रव्य सेवनाबरोबरच मानसिक तयारीही करावी लागते व ती प्रयत्नसाध्य आहे हे खरे असले तरी ती सर्वांना प्रयत्नसाध्य नाही ही वस्तुस्थिती वरील प्रयोग 'धर्मशास्त्र' हा विषय अभ्यासासाठी निवडलेल्या - म्हणजे अध्यात्माची उपजत आवड असलेल्या -विद्यार्थ्यांवर केला होता यावरून स्पष्ट होते. निव्वळ या द्रव्य सेवनाने गूढानुभूती आपोआप निर्माण होते असे मुळीच आढळून आलेले नाही, असे पाहंकेने अन्यत्र म्हटले आहे.[६] या उलट हे द्रव्य सेवन न करता ध्यानधारणेच्या अभ्यासाने मात्र गूढानुभूती सदृश अनुभव कोणालाही येऊ शकतो हे आर्थर डीकमन याने अनेकांवर प्रयोग करून दाखवून दिले आहे.)[७]

## दोन भिन्न पातळीवरील अनुभवांची गल्लत

वर वर्णन केलेल्या गूढानुभूतीच्या मूलभूत लक्षणांवरून व प्रयोगावरून वऱ्हाडपांड्यांनी स्वत:ची गूढानुभूतीविषयी जी कल्पना करून घेतली आहे, ती किती साधीभोळी आहे हे लक्षात येईल. गूढानुभूतीत जगाचे कारण चैतन्यरूप ब्रह्म आहे हे विधान सत्य आहे असे कळते, असे जेव्हा वऱ्हाडपांडे म्हणतात तेव्हा बुद्धीला एखादी गोष्ट जशी कळते तसे गूढानुभूती घेणाऱ्या व्यक्तीला कळते, म्हणजे गूढानुभूती हे बुद्धीचे काम आहे, असे ते समजतात. तसे ते समजत नसते तर एखाद्या पाण्याच्या नमुन्यात पटकीचे जंतू आहेत की नाहीत हे समाधीमध्ये कळायला पाहिजे असा अडाणी आग्रह त्यांनी धरला नसता! (पृ.५२) जणू काही पटकीचे जंतू दिसावेत म्हणून समाधी लावायची असते! अथवा गूढानुभूती म्हणजे जणू पटकीच्या जंतूंची अनुभूती! आध्यात्मिक व भौतिक अशा भिन्नपातळीवरील अनुभवांची ते येथे गल्लत करीत आहेत हे उघड आहे. म्हणूनच गूढानुभूतीत (वा समाधीत) असे काही कळत नाही (भौतिक ज्ञान होत नाही) म्हणून समाधीचे ज्ञानात्मक मूल्य शून्य आहे असे ते म्हणतात. (पृ. ५५) (बिचाऱ्या पतंजलींनी योगसूत्रे लिहिण्यात व्यर्थ श्रम खर्च केले!) उपनिषदातील **यस्मिन् ज्ञाते सर्वमिदं ज्ञातं भवति,** (जे जाणल्याने सर्व जाणल्यासारखे होते.) या वाक्याचा वऱ्हाडपांडे असा भौतिक अर्थ करतात! पण हा अर्थ चुकीचा व अन्यायकारक ठरतो हे लक्षात आल्यानंतर ते आपल्या म्हणण्यात सुधारणा करून 'विज्ञान व गणित यांचे ज्ञान तुच्छ व हीन दर्जाचे आहे याची जाणीव समाधीत होते.' (पृ.५३) असा याचा सुधारलेला अर्थ करतात. पण भौतिक ज्ञान तुच्छ असल्याचे ज्ञान समाधीत होते किंवा 'जगाचे कारण चैतन्यरूप ब्रह्म आहे.' व 'काल मिथ्या आहे' ही विधाने सत्य असल्याचे गूढानुभूतीत कळते हा निष्कर्ष त्यांनी कशाच्या आधारे काढला आहे, किंवा असे कोणत्या गूढानुभूतीवाद्याने किंवा समाधी लावणाऱ्याने म्हटले आहे, हे ते कुठेच सांगत नाहीत. हे सांगण्याची जरूरी नाही इतकी ही गोष्ट सर्वज्ञात आहे असे ते समजत असावेत असे त्यांच्या याविषयीच्या चर्चेवरून वाटते. पण त्यांची ही समजूत खरी असेल तर पाश्चात्य गूढानुभूतीवाद्यांना ''जगाचे कारण चैतन्यरूप ब्रह्म आहे'' हे विधान सत्य असल्याचे गूढानुभूतीत कळावयास पाहिजे होते. पण त्यांना असे कळले असल्याचा पाश्चात्य गूढवादी वाङ्मयात कुठेच उल्लेख नाही. बरे, भारतीय गूढानुभूतीवाद्यांनी तरी असे म्हटले आहे असे म्हणावे तर तसेही कुठे आढळून येत नाही. **तैत्तिरीय** उपनिषदातील गूढानुभूती आलेल्या ऋषींच्या प्रसिद्ध उद्‌गारात 'मी अन्न आहे, अन्न खाणाराही मीच आहे; त्या दोघांना जोडणाराही मीच आहे' इत्यादी वर्णन आढळते. याच उपनिषदात त्रिशंकू नामक ऋषीने 'मी (संसाररूपी) वृक्षाचा प्रेरक आहे. मी पवित्र झालो, अमृत झालो' इत्यादी शब्दांत आपली गूढानुभूती

वर्णन केली आहे. हे सर्व ब्रह्म आहे, ते ब्रह्म मीच आहे, ब्रह्म जाणल्याने सर्व दुःखातून मुक्त होता येते अशी वर्णने उपनिषदात असली तरी गूढानुभूतीत ही वचने सत्य आहेत असे कळते, असे कुठेच म्हटलेले नाही. पतंजलीनीही समाधीत असे काही कळते असे कुठेच म्हटलेले नाही. (सर्वश्रेष्ठ निर्बीज समाधीत सर्व संस्काराचा निरोध होतो, सर्व गुणांचा लय होतो इतकेच म्हटले आहे.) आणि याचे कारण स्पष्ट आहे. 'अनुभव घेणे' व 'अनुभवाचा अर्थ करणे' (अनुभव शब्दांत सांगणे) या दोन गोष्टी अगदी भिन्न आहेत, त्या दोन भिन्न पातळ्यावरील घटना आहेत. वऱ्हाडपांडे त्या एकाच पातळीवरील घटना समजून त्याकडे पाहतात. साखर खाणे व साखर गोड आहे असे म्हणणे या गोष्टी एकच आहेत असे समजणे बरोबर आहे काय?

उदा. 'काल मिथ्या आहे' असे गूढानुभूतीत कळते (किंवा हे विधान सत्य आहे असे कळते) असे ते जे समजतात ते खरे नाही. गूढानुभूतीत कालातीत अवस्थेचा अनुभव येतो. (हा अनुभव आपल्या आवडत्या विषयात अति गुंग झालेल्या वेळेपुरते सर्वांनाच येतो 'वेळेच भान राहिले नाही' असे यावेळी आपण म्हणतो (मीचा सुध्दा असाच विसर पडतो.) गूढानूभूती संपलल्यानंतर (समाधीतून बाहेर आल्यावर) काळ मिथ्या असल्याचा अनुभव त्यांना येत नाही. इतराप्रमाणेच काल सत्य असल्याचेच त्यांनाही जाणवते. पण ही जाणीव अंतिम सत्याची जाणीव नव्हे याची त्यांना खात्री पटलेली असत, जी इतरांना पटलेली नसते. या अर्थाने 'काल मिथ्या आहे' असे ते म्हणतात. पण हे विधान ज्या पातळीवर सत्य आहे असे ते म्हणतात ती पातळी 'जागृतीची' (सामान्य माणसाच्या नित्य अनुभवाची ) नसते. वऱ्हाडपांडे ती जागृतीची (सामान्य माणसाच्या नित्य अनुभवाची) आहे असे समजतात. येथे त्यांची चूक होते.(गूढानुभूतीप्रमाणेच वैज्ञानिक दृष्ट्यासुद्धा अणूच्या सूक्ष्म पातळीवर स्थलकाल अस्तित्वात नसतात हे हायजनबर्गचे विधान मागे उद्धृत केलेच आहे.) गूढानुभूतीला अशा रीतीने ते जागृतीच्या -सामान्य, व्यावहारिक ज्ञानाच्या- पातळीवरील कसोटी लावत आहेत. तिच्या आधारे काल मिथ्या असल्याचा अनुभव येत नाही म्हणून ती खोटी असे ते म्हणत आहेत. पण हे अज्ञानमूलक आहे हे स्पष्ट आहे.

गूढानुभूतीला सामान्य व्यावहारिक ज्ञानाची कसोटी लावून गूढानुभूतीची सत्यता ते जसे नाकारतात, तसेच त्या अनुभवाची सामान्य अनुभवाशी संगती लावण्याचा प्रयत्न करून तशी संगती लागत नाही, म्हणूनही गूढानुभूतीची सत्यता ते नाकरतात. पण या लेखाच्या प्रारंभी म्हटल्याप्रमाणे गूढानुभवाचीच नव्हे तर वैज्ञानिक अनुभवाचीसुद्धा सामान्य अनुभवाशी संगती लागत नाही. म्हणून वैज्ञानिक अनुभूती खोटी म्हणता येत नाही, हे तेथे दाखवून दिले आहे. कधीकधी एका सामान्य ('जागृतीतल्या') अनुभवाची संगतीसुद्धा

दुसऱ्या सामान्य अनुभवाशी लागत नाही. अशा वेळी कोणता अनुभव खरा समजायचा? उदा. आकाश सर्वांना निळे दिसते पण अंतराळवीरांना ते काळे दिसते. मग आकाश निळे की काळे? हे व्यावहारिकदृष्ट्या ठरविणे अर्थातच कठीण आहे.[८] अशा वेळी वैज्ञानिक दृष्टीचाच स्वीकार केला पाहिजे, हे उघड आहे. पण वैज्ञानिकदृष्ट्या आकाशाच्या रंगहीनतेचा अनुभव कोणालाच येत नाही. म्हणून तो खोटा मानायचा काय? तो कोणीच खोटा मानत नाही, याचे कारण वैज्ञानिक 'अनुभव' वेगळ्या (वरच्या) पातळीवरचा आहे हे सर्वांना मान्य आहे.

गूढानुभूती अशीच वेगळ्या (वरच्या) पातळीवरची असते हे मात्र मान्य करणे अनेकांना जड जाते. याचे कारण वैज्ञानिक अनुभूतीपेक्षाही गूढानुभूती अधिक कठीण, अधिक कष्टसाध्य व अधिक दुर्मिळ आहे हेच होय. पण काही वैज्ञानिक अनुभवसुद्धा खरे म्हणून मान्य करणे अनेकांना जड जाते ही वस्तुस्थिती असून वऱ्हाडपांडे हे स्वतःच त्याचे उत्कृष्ट उदाहरण आहेत . कारण गूढानुभूतीतील कालाची अर्थहीनता ते स्वीकारायला तयार नाहीत. पण वैज्ञानिकदृष्ट्यासुध्दा कालाला स्वतंत्र अर्थ व अस्तित्व नाही, हे त्यांना माहीत नाही. उदा. कालाला स्वतंत्र अस्तित्व असते तर एकाच वेळी जन्मलेल्या दोन व्यक्तींची वये नेहमी सारखीच असावयास पाहिजेत हे उघड आहे पण अंतराळात अत्यंत वेगवान यानात प्रवास करून पृथ्वीवर परत आलेली व्यक्ती तिच्याच वयाच्या पृथ्वीवरील व्यक्तीपेक्षा अधिक तरुण बनते! (जितक्या वेगाने ती व्यक्ती प्रवास करील तितकी ती जास्त तरुण बनेल.) समजा ती व्यक्ती १९६० साली प्रवासाला निघाली व १९९० साली परतली, तर त्या व्यक्तीला आपण १९७० साली (किंवा १९६५ साली, हे तिच्या वेगावर अवलंबून राहील) परतलो असे वाटेल. हे वाटणे काल्पनिक नसून त्या व्यक्तीचे घड्याळ व दिनदर्शिका (कॅलेंडर) १९७० (किंवा १९६५) साल दाखवीत असल्याचे आपणाला दिसेल ! पृथ्वीवरील मनुष्य काळाचा हा उलटा प्रवास (व्यक्तीचे 'अधिक तरुण' होणे) अशक्य आहे असे म्हणेल. वऱ्हाडपांडे असेच म्हणत आहेत. उदा. ते म्हणतात, "'काल मिथ्या आहे' या वाक्याचा अर्थ तरी काय ? बाप मुलाच्या पूर्वी जन्माला येतो असे म्हटले काय किंवा 'बापाच्या पूर्वी मुलगा जन्माला येतो' असे म्हटले काय सारखेच... अशासारखी वाक्ये बोलणे काय किंवा 'गुडडधूप्' असे निरर्थक आवाज काढणे काय सारखेच."[९] हा 'गडडधुप्' चा आरोप वऱ्हाडपांडे अर्थात गूढानुभूतीविरूद्ध करीत आहेत. पण खुद्द विज्ञानविरूद्धच तो आरोप आहे हे वरील उदाहरणावरून स्पष्ट आहे.

अशा रीतीने वऱ्हाडपांड्यांचा विवेकवाद विज्ञानविरोधी आहे असे ठरते आणि म्हणून वऱ्हाडपांडे ज्याला 'गडडधुप्' म्हणून हिणवतात तो गूढानुभव किंवा विज्ञानानुभव

'गडडधुप' नसून त्याचा स्वत:चा विवेकवादच 'गडडधुप्' आहे असे म्हणावे लागते! विवेकवादाला मर्यादा आहेत हे वऱ्हाडपांड्यांना मान्य आहे. पण किती मर्यादा आहेत हे त्यांना माहीत नाही!

## येथे तर्काचे काम नाही

वरील विवेचनावरून गूढानुभूती आणि विज्ञान यांचे किती जवळचे नाते आहे हे स्पष्ट होईल. कालाचा उलटा प्रवासच जो सामान्य मनुष्याला अशक्य वाटतो, तो गुढानूभूतीतही अनुभवास येत असल्याचे गूढानुभूतीवाद्यांच्या पुढील विधानावरून दिसून येते. **बृहदारण्यक** उपनिषदामध्ये वामदेव ऋषीने 'मी सूर्य झालो, मनु झालो' असे (गूढानुभूतीमध्ये) म्हटल्याचा उल्लेख आहे. (१.४.१०) ( येथे वर्तमानकाळ भूतकाळ झाला आहे.) **तैत्तिरीय** उपनिषदातील गूढानुभूती घेणारा ऋषी मी देवांच्याही पेक्षा प्राचीन आहे असे म्हणतो. येसूनेही "Before Abraham was, I am" (अब्राहम होऊन गेला तरी त्याच्या पूर्वी मी आहे.) असे म्हटले आहे. ही विधाने आपणाला मूर्खासारखी वा तर्कहीन वाटतात. पण गूढानुभूती घेणाऱ्यांना ती तशी मुळीच वाटत नाहीत. तथापि, ती इतरांना तर्कहीन वाटतात, याची त्यांना जाणीव असते. म्हणनूच **'नैषा तर्केन मतिरापनीया'** [हे (गूढानुभूतीतले) अनुभव तर्काने कळणार नाहीत] किंवा **'अणीयान् हि अतर्क्यं अणुप्रमाणात्'** (अणुसारख्या सूक्ष्म जगतातील हा अनुभव असल्यामुळे तो तर्काच्या पलीकडचा आहे.) **(कठोपनिषद)** अशी वचने उपनिषदात आढळतात. हे शेवटचे विधान किती भविष्यदर्शक ठरले आहे याचे प्रत्यंतर 'अणूच्या पातळीर सामान्य लोकांचे स्थलकालयुक्त जग अस्तित्वात नसते.' या (लेखाच्या प्रारंभी उद्धृत केलेल्या) हायजेनबर्गच्या विधानावरून येते. मॅक्स प्लँक हा नोबेल पारितोषिक विजेता शास्त्रज्ञ म्हणतो, 'वैज्ञानिक प्रयोगांनी जे परिणाम मिळतात त्यांना कल्पनेचा आधार दिल्याशिवाय भौतिक नियम कळणार नाहीत. तर्काच्या आधारे त्याला एक पाऊलही पुढे टाकता येणार नाही. येथे शुद्ध तर्कवादाला थारा नाही.' **(Where is science going?)** (प्लँक हा रूढ विज्ञानातील तर्कवाद उखडून टाकणाऱ्या क्वॉंटम सिद्धांताचा जनक होय.) पी. बी. मेडावार या प्रसिद्ध स्वयंघोषीत बुद्धिवादी जीवशास्त्रज्ञाने विज्ञानाची प्रगती तर्काच्या आधारे होऊ शकत नाही असे आपल्या **The Limits of Science** या पुस्तकात म्हटले आहे.)

अध्यात्मवाद्यांच्या 'नेति-नेति' या उद्‌गाराची अनेकदा हेटाळणी करण्यात येते. पण आधुनिक विज्ञानसुद्धा 'नेति-नेति' म्हणत आहे हे अनेकांना माहीत नाही. उदा. अणुबॉंबचा जनक म्हणून प्रसिद्ध असलेला ओप्पेनहायमर हा अणुशास्त्रज्ञ म्हणतो, "If we ask whether the position of the electron remains the same, we

must say "no", : If we ask whether the electron's position changes with time, we must say 'no'; If we ask whether the electron is at rest we must say 'no'; If we ask whether the electron is in motion we must say 'no'." **(Science and Common Understanding)**. (इलेक्ट्रॉनचे स्थान तेच राहते काय असे विचारले तर त्याचे उत्तर 'नाही' असे द्यावे लागते, इलेक्ट्रॉनचे स्थान कालानुसार बदलते काय असे विचारले तर त्याचे उत्तर 'नाही' असे द्यावे लागते. इलेक्ट्रॉन स्थिर आहे काय असे विचारले तर 'नाही' असे उत्तर द्यावे लागते. इलेक्ट्रॉन चलनवलन करीत आहे काय असे विचारले तर, त्याचे उत्तर 'नाही' असे द्यावे लागते.'') तुमचे इलेक्ट्रॉनविषयीचे कोणतेही विधान खरेही नाही आणि खोटेही नाही- इलेक्ट्रॉनविषयी तुम्हाला कोणतेही विधान करता येत नाही- असा याचा अर्थ होतो. गूढानुभूतीवादी आत्म्याविषयी असेच म्हणतात. उदा. **ईशोपनिदषदात** आत्म्याचे पुढीलप्रमाणे वर्णन आढळते, ''**तदेजति तन्नेजति, तद्दूरे तद्वंतिके**'' (तो जातो, तो जात नाही, तो दूर आहे, तो जवळ आहे, तो आत आहे, तो बाहेर आहे.) तसेच ''**अणोरणीयान् महतो महीयान्**'' **(कठ)** (तो लहानाहून लहान आहे, मोठ्याहून मोठा आहे) या अनुभूतीलाच परस्परविरुद्धता (Paradoxicality) म्हणतात. हे गूढानुभूतीच्या भूलभूत लक्षणांपैकी एक लक्षण आहे. येसू व वामदेव यांची 'मी अब्राहमापूर्वी होतो, आताही आहे', 'मी मनु झालो, सूर्य झालो (व आताही आहे)' ही विधाने वर उद्धृत केलीच आहेत. (ही विधाने काल भूतकालाकडून भविष्याकडे जात नसून तो चलचित्राच्या गुंडाळलेल्या फिल्मच्या रिळाप्रमाणे सदैव वर्तमान Everpresent किंवा Eternal शाश्वत आहे असा गूढानुभूतीवाद्यांना अनुभव येतो, हे दर्शवितात आणि भूतभविष्य यांचे ज्ञान गूढानुभूतीवाद्यांनाच नव्हे तर माध्यमांना (Medium) व इतरांही अनेक अतिंद्रिय शक्ती असलेल्या लोकांनाही होते, ही वस्तुस्थिती आहे.[१०] बौद्ध धर्मग्रंथातही अशी गूढवादी, परस्पराविरुद्ध विधाने आढळतात. उदा. वच्छ बुद्धाला म्हणाला, ''साधूचा पुनर्जन्म कोठे होतो?'' बुद्ध म्हणाला, ''साधूचा पुनर्जन्म होतो असे काही नाही.'' वच्छ म्हणाला, ''मग साधूचा पुनर्जन्म होत नाही?'' बुद्ध म्हणाला, ''साधूचा पुनर्जन्म होत नाहीअसे काही नाही'' **(The Teaching of the Mystics** - W. T. Stace) डायोनिसिस या ग्रीक गूढवाद्याने म्हटले आहे की आध्यात्मिक सत्य आस्ति व नास्ति या कोणत्याही तार्किक प्रकारात बसत नाही. एडिंगटननेही म्हटले आहे की, 'It is a primitive form of thought that things eiher exist or do not exist.' (वस्तू एक तर अस्तित्वात असते अथवा अस्तित्वात नसते ही कल्पना आदिकालिक मानवाची आहे.) **(The Philosophy of Physical Science)** याचा अर्थ काल गूढानुभूती शास्त्राच्या व

भौतविज्ञानाच्या दृष्टीने- सामान्य माणसाच्या दृष्टीने नव्हे-मिथ्या आहे असे ठरते. कारण कालाच्या संदर्भातच एखाद्या वस्तूच्या अस्तित्वाला अगर नास्तित्वाला अर्थ आहे. कालाच्या दृष्टीनेच एखादी वस्तू आहे (वर्तमानकाल), किंवा आता नाही (पूर्वी होती) (भूतकाल) असे आपण म्हणतो. कालातीत वस्तूविषयी 'आहे' किंवा 'नाही' असे कोणतेच विधान करता येत नाही. किंवा अशा विधानाला काहीच अर्थ नसतो. याच कारणासाठी इलेक्ट्रॉनविषयी कोणतेच विधान करता येत नाही (किंवा इलेक्ट्रॉनविषयीच्या कोणत्याच विधानाला काही अर्थ नाही.) म्हणूनच हायजेनबर्ग अणूच्या पातळीवर स्थलकालयुक्त जग अस्तित्वात नसतेअसे म्हणतो. ('आहे' किंवा 'नाही' यांना कालाप्रमाणेच स्थलाच्या संदर्भात अर्थ आहे. स्थलातीत वस्तूविषयी 'आहे' किंवा 'नाही'. असे कोणतेच विधान करता येत नाही. किंवा अशा विधानाला काहीच अर्थ नसतो.) अशा प्रकारे कोणतेच विधान न करता येणे यालाच अनिर्वचनीयता (Ineffability) म्हणतात. आणि हीच तर्कबाह्यता वा अतार्किकता आहे. कारण तर्क 'आहे' किंवा 'नाही' यापैकी कोणतीच कल्पना 'सत्य' नाही हे मान्य करू शकत नाही. म्हणजे तर्काच्या दृष्टीने स्थलकालातीतता अशक्य आहे.

## विज्ञान व अंतिम सत्य

गूढानुभूतीप्रमाणेच वैज्ञानिक अनुभूतीसुद्धा स्थलकालातीत अवस्थेशी संपर्क साधत असल्यामुळे गूढानुभूतिवाद्यांप्रमाणे वैज्ञानिकही अंतिम सत्याविषयी बोलू धजत असल्याचे आढळून येतात. उदा. हेन्री मार्जिनो हा भौतशास्त्रज्ञ म्हणतो,

"There is something ineffable about the real, something occasionally described as mysterious and awe-inspiring : the property alluded to is no doubt its ultimacy, its spontaneity, its failure to present itself as the perfect and articulate consequence of rational thought." (**Albert Einstein: Philosopher**- Ed. P. A. Schilpp)

(सत्य हे असे काही तरी आहे की ज्याचे वर्णन शब्दात करता येत नाही; जे अनिर्वचनीय आहे, असे काही तरी की ज्याचे वर्णन कधीकधी आश्चर्यजनक,अचंबा निर्माण करणारे, गूढ असे करण्यात येते, आणि हे अंतिम सत्याविषयीच खरे आहे, कारण अंतिम सत्यच स्फुरद्रूप, शब्दातीत, तर्काच्या पूर्ण आवाक्याबाहेरचे असू शकते. असे निःसशंय म्हणता येते.) (येथे भगवद्गीतेतील आत्म्याविषयीचे **आश्चर्यवत् पश्यति कश्चित्** इ. हे वर्णन वाचकांना आठवेल.) वरील उताऱ्यात हेन्री मार्जिनो या भौतशास्त्रज्ञाने अंतिम सत्य म्हणून काही आहे हे तर मान्य केले आहेच पण ते आश्चर्यजनक, स्फुरद्रूपी, तर्कातीत, अनिर्वचनीय व गूढ आहे अशी गूढानुभूतीवाद्यांना

शोभणारी भाषा त्याविषयी वापरली आहे. भौतवैज्ञानिक व गूढानुभूतिवादी यांच्या विचारात, दृष्टिकोणात, भूमिकेत व भाषेमध्येसुद्धा साम्य आढळून येण्याचे कारण दोघांनाही भौतिक विश्व आणि काल याविषयी झालेला भ्रमनिरास हेच होय. म्हणजे सामान्य माणसाला भौतिक जगाचे स्वरूप जसे आहे असे वाटते तसे ते मुळात नाही हे दोघांनाही पटले आहे. असा याचाअर्थ होतो. **याचा अर्थ भौतशास्त्रज्ञांना व गूढानुभूतिवाद्यांना भौतिक जग खोटे किंवा मिथ्या आहे असे वाटते असा मुळीच नाही.** (आद्य शंकराचार्यसुद्धा भौतिक जग माया आहे असे जेव्हा म्हणतात तेव्हा ते आध्यात्मिकदृष्ट्या माया आहे असे म्हणतात. व्यावहारिकदृष्ट्या ते सत्य मानलेच पाहिजे असे त्यानी म्हटले आहे) *भौतिक जगाविषयी सर्वसामान्य (माणसाच्या) कल्पना व गृहीतके चुकीची आहेत एवढेच त्यांना म्हणायचे असते.* (व्हाईटहेड या शास्त्रज्ञाचा यासंबंधीचा उतारा मागे दिलाच आहे.) ***आणि हीच (चुकीची) गृहीतके विवेकवादाचीही गृहीतके आहेत!***

आणि ही गृहीतके विज्ञानाने खोटी ठरविली असतानाही वऱ्हाडपांड्यासारखे कांही बुद्धिवादी आपला 'विवेकवाद' विज्ञानाधिष्ठित असल्याच्या, किंवा विज्ञानपद्धतीचा अवलंब करीत असल्याच्या भ्रमात आहेत! इतकेच नव्हे तर विज्ञानाविषयी पुढीलप्रमाणे आचरट विधान ते करू शकतात. : ''विसाव्या शतकातला विज्ञान जास्त प्रगल्भ झाल्यावर त्याने विवेकवाद टाकून दिला आहे असा प्रचार कधीकधी करण्यात येतो. हा प्रचार किती खोटा आहे हे विसाव्या शतकातला श्रेष्ठ वैज्ञानिक आईन्स्टाईन याचा ईश्वरावर विश्वास नव्हता यावरून स्पष्ट होते.'' (पृ. ५९) विज्ञानाने विवेकवाद टाकून दिलेला नाही याला पुरावा काय तर आईन्स्टाईनचा ईश्वर नाही हा खाजगी विश्वास ! एखाद्या शास्त्रज्ञाच्या खाजगी व विज्ञानबाह्य विश्वासावरून संपूर्ण विज्ञानाचे स्वरूप ठरते ही आचरट कल्पना फक्त 'विवेक' वादी वऱ्हाडपांडेच करू जाणोत ! आईन्स्टाईनचा ईश्वरावर विश्वास आहे की नाही याचा व विसाव्या शतकातील विज्ञानाचे स्वरूप काय आहे याचा काय संबंध? आईन्स्टाईनच्या ईश्वरावरील विश्वासावरून विसाव्या शतकातील विज्ञानाचे स्वरूप ठरते काय? मग सतराव्या शतकातील सर्वश्रेष्ठ वैज्ञानिक न्यूटन याचा ईश्वरावर विश्वास होता यावरून सतराव्या शतकातील विज्ञान अविवेकवादी (किंवा अध्यात्मवादी) होते असे ठरते, असे का म्हणू नये? आईन्स्टाईन १९५५ साली वारल्यानंतर विज्ञानाचे स्वरूप बदलले की ते पोरके झाले? का इतर शास्त्रज्ञांच्या खाजगी विश्वासावरून ते ठरणार आहे? बरे, आईन्स्टाईनचा ईश्वरावर विश्वास नव्हता म्हणजे तो नास्तिक होता काय? आईन्स्टाईनची श्रध्दा काय होती हे वऱ्हाडपांड्यांना माहीत आहे काय? निश्चित माहीत असते तर त्यांनी आधार दिला असता. पण कुठल्याच विधानांना ते आधार देत नाहीत. त्यांची ती पद्धतच नाही. ठोकून विधाने करणे हा त्यांचा खाक्या आहे.(आईन्स्टाईन

विसाव्या शतकातील आघाडीच्या क्षेत्रात क्वाँटम भौतिकीत कसा एकाकी पडला होता व या क्षेत्रात त्याला आपले म्हणणे शेवटपर्यंत कसे सिद्ध करताआले नाही याविषयीची व आधुनिक विज्ञानाचा बुद्धिवादाशी कितपत संबंध आहे, याविषयीची सविस्तर माहिती 'खरे विज्ञान व खोटे विज्ञान' या प्रकरणात दिली आहे. आईन्स्टाईनची ईश्वरविषयक संकल्पना व श्रध्दा काय होती याविषयीची माहिती प्रस्तावनेत साधार दिली असून गूढानुभूतीच्या संदर्भात त्याची काय श्रद्धा होती याची माहिती प्रस्तुत प्रकरणात पुढे देण्यात येणार आहे.)

''अध्यात्मवादाची बहुतेक विधाने निरर्थक असतात'' ह्या मुद्द्यावर Logical Positivism (तार्किक प्रत्यक्षवाद) नावाच्या तत्त्वज्ञानातील एका ''वादाने अध्यात्मवादावर अगदी 'मूले कुठार:' असा प्रहार केला आहे.'' असे वऱ्हाडपांडे मोठ्या अभिमानाने म्हणतात. (पृ.५९-६०) 'निरर्थक' याचा अर्थ एखादे विधान खरे आहे की खोटे हे विज्ञानाच्या 'तार्किक' कसोटीखाली ठरविता न येणे असा असेल तर ही कसोटी गूढानुभूतीला लागू होत नाही. कारण गूढानुभूतीतील ज्ञान इतर क्षेत्रातील ज्ञानाप्रमाणे इंद्रियजन्य वा भौतिक स्वरूपाचे नसते. त्यामुळे ते (भौतिकदृष्ट्या)खरे की खोटे हा प्रश्नच उपस्थित होत नाही. त्या ज्ञानाचा पडताळा भौतिक प्रमाणांनी पाहता येणार नसून तो अनुभव प्रमाणानेच पाहता येणार आहे. ते वेगळ्या (अनुभूतिशास्त्राच्या) पातळीवरचे ज्ञान असल्यामुळे त्याचे निकषही वेगळे आहेत.[११]

## गूढानुभूतीच्या सत्यतेची कसोटी

गूढानुभूतिवाद्यांचा व आधुनिक भौतवैज्ञानिकांचा जगाकडे पाहण्याचा दृष्टिकोण सारखाच आहे, हे वर सांगितलेच आहे. हे जर खरे असेल तर आधुनिक भौतविज्ञान हे 'विवेकवादी' नाही हे आपोआपच ठरते. वऱ्हाडपांडे म्हणतात त्याप्रमाणे विवेकवाद खरोखर विज्ञानपद्धतीचा अवलंब करीत असेल तर वरील (गूढानुभूती व विज्ञान यात साम्य आहे हा) निष्कर्ष त्याला मान्य व्हावयास पाहिजे. पण वऱ्हाडपांड्यांच्या 'विवेकवादा' ला ते मान्य होणार नाही. म्हणून त्यांच्या 'विवेकवादा' च्या विज्ञाननिष्ठतेविषयी कोणालाही संशय येईल. म्हणूनच '' 'विवेकवादा' च्या नावाखाली वेगळा वाद करणाऱ्यांना विज्ञानाहून काही वेगळे सांगायचे असते.'' असे या लेखाच्या प्रारंभी मी म्हटले आहे . त्या विधानाला अशा रीतीने पुष्टी मिळते आणि हे जे वेगळे आहे ते 'अविवेकी' व 'अवैज्ञानिक' आहे ही गोष्ट ज्या बर्ट्रांडरसेलच्या विवेकवादाचा ते पुरस्कार करतात त्या रसेलच्या विवेकवादावरूनच स्पष्ट होते. कारण रसेलचा विवेकवाद वऱ्हाडपांड्यांच्याप्रमाणे अविवेकी (आडमुठा) नाही. कारण रसेलने गूढानुभूतिवादाला

स्वत:चे अनुभवात्मक मूल्य आहे हे तर मान्य केले आहेच, पण त्याला वैज्ञानिक मूल्य असल्याचेही त्याने मान्य केले आहे. उदा. रसेल आपल्या **Mysticism and Logic** या ग्रंथात म्हणतो,

"I believe that there is an element of wisdom to be learnt from the mystical way of feeling which does not seem to be attainable in any other manner. (Hence) mysticism is to be commended as an attitude towards knowledge."

('गूढानुभूतीमुळे जे शहाणपण प्राप्त होते ते इतर कोणत्याही ज्ञान प्रकाराने प्राप्त होत नसल्यामुळे ज्ञानाकडे पाहण्याचा हा गूढवादी दृष्टिकोण प्रशंसनीय ठरतो.')

तो पुढे म्हणतो. ("Even the cautious and patient investigation of truth by science... may be fostered and nourished by that very spirit of reverence in which mysticism lives and moves.")

( ज्या अंतिम सत्याविषयीच्या पूज्य भावनेमुळे गूढवादी गूढानुभूतीचा अनुभव घेतो व जगतो, त्या भावनेमुळेच सावधगिरीने आणि चिकाटीने सत्यशोधन करणाऱ्या वैज्ञानिकालाही प्रेरणा व जीवन शक्य आहे असे म्हणता येईल.)

वरील उताऱ्यावरून रसेल विज्ञानाची व गूढानुभूतीची प्रेरणा व जीवनस्रोत एकच आहे असे मानतो हे उघड होते. 'गूढानुभूती स्वप्नवत् खोटी' किंवा 'विज्ञान व गणित यांचे ज्ञान तुच्छ व हीन दर्जाचे आहे' याची जाणीव गूढानुभूतीमुळे होते हे वऱ्हाडपांड्यांचे म्हणणे कोणीकडे व 'गूढानुभूतीची व विज्ञानाची मूळ प्रेरणा एकच (सत्यशोधन ही) असल्यामुळे गूढानुभूतीवाद प्रशंसनीय ठरतो.' हे रसेलचे म्हणणे कोणीकडे !

रसेल गूढानुभूतिवाद्यांप्रमाणे काळ मिथ्या आहे हे मानण्यास तयार नसला तरी काळाचे जोखड झुगारून दिले पाहिजे असे गूढानुभूतिवाद्याप्रमाणे त्यालाही वाटते. पण या विषयीचा त्याचा दृष्टिकोण तर्कशुद्ध नाही. कारण काळ मिथ्या नसेल, तो खरा असेल, तर काळाचे जोखड झुगारून देणे कसे शक्य आहे? हे सांगितले पाहिजे. हे तार्किक सुसंगती राखून सांगता येणार नाही. म्हणून (तार्किक विसंगती टाळण्यासाठी) रसेल 'शाश्वत' (Eternal) काळाची कल्पना मांडतो . पण शाश्वत काळ कशाला म्हणायचे? ज्या काळात भूत, वर्तमान व भविष्य हे भेद खोटे वा मिथ्याआहेत त्या काळाला ! मग गूढानुभूतीवादी दुसरे काय म्हणतात?आणि गूढानुभूतिवादीही काळ शाश्वत मानतातच. 'शाश्वत' व 'मिथ्या' या काळाच्या नाण्याच्या दोन बाजू आहेत. नाणे एकाच बाजूने खरे आहे या दृष्टिकोणाला काही अर्थ नाही. रसेलने हा दृष्टिकोण अध्यात्मवादाविषयीच्या

आपल्या पूर्वग्रहामुळे स्वीकारला असून तोच त्याला 'खरा' वाटतो! पूर्वग्रहविरहित माणसाला अर्थातच तसे वाटणार नाही.

असे असले तरी रसेलने गूढानुभूती आणि विज्ञान यांची प्रेरणा एकच - सत्यशोधनच - आहे हे मान्य केले आहे. इतकेच नव्हे तर विज्ञानाला गूढानुभूतिवादापासून जीवन व प्रेरणा मिळू शकतात असे तो म्हणतो. विज्ञान गूढानुभूतीपासून बरेच शिकू शकते ही गोष्ट रसेल, गूढानुभूतीपासून मिळणारे .शहाणपण इतर कोणत्याही मार्गांनी मिळत नाही हे मान्य करतो या वस्तुस्थितीवरून स्पष्ट होतेच, पण गूढानुभूतिवाद सत्याविषयी 'पूज्य भावना' (Spirit of Reverence) बाळगतो या त्याच्या शब्दप्रयोगावरूनही स्पष्ट होते. यावरून गूढानुभूतीच्या व विज्ञानाच्या सत्यामध्ये फारसा फरक नाही, किंबहुना ते एकच आहे या मताला दुजोरा मिळतो.[१२] त्यांचे सत्य एकच असले तरी त्यांचे मार्ग अर्थातच भिन्न आहेत आणि कसोट्याही भिन्न आहेत. मार्गाच्या दृष्टीने कसोट्या भिन्न असल्या तरी सत्य एकच असेल तर त्याची सर्वसामान्य अशी एकच कसोटी असली पाहिजे हे उघड आहे. सर्व वैज्ञानिकांमध्ये एकवाक्यता असणे ही जशी विज्ञानातील सत्याची सामान्य कसोटी मानता येते, तसे सर्व गूढानुभूतिवाद्यांमध्ये एकवाक्यता असणे ही गूढानुभूतीच्या सत्याची सामान्य कसोटी मानता येईल आणि रसेलने त्यांच्यामध्ये एकवाक्यता असल्याचे मान्य केले असून सर्व गूढानुभूतिवाद्यांची ही सामान्य एकवाक्यता (लक्षणे) कोणती हेही त्याने सांगितले आहे. ( या ९ लक्षणांचा मागे उल्लेख केला आहे.)

गूढानुभूतीच्या सत्यतेच्या सामान्य कसोटीच्या बाबतीत सी. डी. ब्रॉड या वास्तववादी तत्त्ववेत्याचे म्हणणे काय आहे हे त्याचे अवतरण देऊन स्पष्ट करणे यासंदर्भात महत्वाचे आहे. तो म्हणतो,

"To me the occurrence of mystical experience, at all times and places and the similarities between the statement of so may mystics all the world over, seem to be a real significant fact. *Prima facie* it suggests that there is an aspect of reality with which these persons come in contact in their mystical experience, and which they afterwards strive and largely fail to describe in the language of every day life. I should say that this prima facie appearance of objectivity ought to be accepted at its face value unless and until some reasonably satisfactory explanation of the agreement can be given." **(Religion, Philosophy and Psychical Experience).**

('गूढानुभूती सार्वत्रिक व सार्वकालिक आढळून येणे, तिला देशकालाची मर्यादा नसणे आणि जगभर सर्वत्र पसरलेल्या इतक्या गूढानुभूतिवाद्यांच्या विधानांमध्ये

साम्य आढळून येणे ही वस्तुस्थिती खरोखर महत्वपूर्ण आहे असे मला वाटते. ती सकृतदर्शनी असे सूचित करते की हे लोक गूढानुभूतीमध्ये सत्याच्या एखाद्या भागाशी संपर्क साधतात व त्या भागाचे नंतर सामान्य लोकांच्या भाषेत वर्णन करण्याचा प्रयत्न करतात. पण त्यात त्यांना बहुतांशी अपयश येते. मी तर असे म्हणेन की जोपर्यंत या (गूढ अनुभवातील) एकवाक्यतेची समाधानकारक उपपत्ती कोणी देऊ शकत नाही तोपर्यंत आणि ती जर देताच येत नसेल तर, या अनुभवाची वस्तुनिष्ठता - ती अनुभूती भ्रामक नसल्याबद्दलची वस्तुस्थिती -जशी आहे तशी खरी म्हणून स्विकारली पाहिजे.')

गूढानुभूतिवाद्यांच्याअनुभवामध्ये (वैज्ञानिकांच्याअनुभवाप्रमाणे )एकवाक्यता आढळून येते, इतकेच नव्हे तर आपल्या अनुभवाच्या आधारे ते जे निष्कर्ष काढतात किंवा विधाने करतात तशीच विधाने आधुनिक भौतवैज्ञानिकही करतात व तेच निष्कर्ष तेही काढतात हे विशेष होय. हा काही योगायोग असणे शक्य नाही. विश्वाचे स्वरूप व कालाचे स्वरूप गूढानुभूतिवादी व वैज्ञानिक हे दोघेही एकाच तऱ्हेने जर वर्णन करून सांगत असतील तर ते बरेच सत्याच्या जवळ असले पाहिजे असे म्हटले पाहिजे.[१३] दोघेही एकाच निष्कर्षाप्रत येतात. इतकेच नव्हे तर दोघांची भाषासुद्धा सारखीच आढळून येते. याविषयी नमुन्यादाखल मार्जिनो या भौतशास्त्रज्ञाचा एक उतारा मागे दिलाच आहे. पण हे तुरळक उदाहरण समजू नये, लॉरेन्स लीशान या मानसशास्त्रज्ञाने याविषयी बरेच संशोधन करून एक प्रयोगच केला आहे.[१४]

त्याने अनेक ग्रंथातून ६२ अवतरणे निवडून काढली व ती अनेक तज्ज्ञ लोकांना वाचावयास दिली. या अवतरणांपैकी गूढानुभूतिवाद्यांची अवतरणे कोणती व भौतशास्त्रज्ञांची अवतरणे कोणती हे ओळखण्यास त्यांना सांगण्यात आले. या ६२ अवतरणांपैकी गूढानुभूतिवाद्यांची ३१ व भौतविज्ञानिकांची ३१ अवतरणे होती. (गूढानुभूतिवाद्यांच्या अवतरणात पाश्चात्याप्रमाणे पौर्वात्य, ग्रंथातूनही अवतरणे घेतली होती. पौर्वात्य ग्रंथात उपनिषदे, धम्मपद, अरविंद, विवेकानंद यांचे ग्रंथ, झेन, बुद्धिजम् इत्यादी ग्रंथ होते.) यामध्ये भौतशास्त्रज्ञांना ५० ते ६० टक्के यश आले तर, गूढवादाचा अभ्यास केलेल्यांना थोडे अधिक म्हणजे ६०ते ७० टक्के यश आले. योगायोगाने, म्हणजे आंधळेपणाने उतारे निवडले तर, ५० टक्के यश येणे शक्य आहे. हे लक्षात घेता हे यश फारसे महत्वाचे ठरत नाही. पण किती टक्के यश आले हे महत्वाचे नसून *उतारे कोणाचे हे ओळखणे कठीण आहे ही गोष्ट महत्वाची आहे.*

ज्या १६ शास्त्रज्ञांचे उतारे निवडले आहेत (त्यामध्ये रसेलचाही उतारा आहे. आणि भौतशास्त्रज्ञ नसलेला तोच एकमेव लेखक- तत्त्वज्ञ- आहे. ) शास्त्रज्ञ म्हणून आपल्या अभ्यास क्षेत्राविषयी लिहिलेल्या ग्रंथातून हे उतारे निवडले आहेत, म्हणजे हे

लिहीत असताना ते शास्त्रज्ञ म्हणून लिहीत होते हे लक्षात ठेवले पाहिजे.(ज्या भौतशास्त्रज्ञांचे उतारे निवडले आहेत, त्यापैकी निम्मे नोबेल पारितोषिक विजेते शास्त्रज्ञ आहेत ही गोष्ट अर्थातच महत्वाची आहे.) या भौतशास्त्रज्ञात आईन्स्टाईनचाही उतारा आहे. तथापि, तो ज्या परमेश्वरावर विश्वास ठेवतो तो ज्यूंचा वा ख्रिश्चनांचा आकाशातला बाप नसून गूढानुभूतिवाद्यांचा (उदा. ज्ञानेश्वरांचा) 'विश्वात्मकदेव' आहे, हे त्याने अनेक ठिकाणी व्यक्त केलेल्या विचारावरून स्पष्ट होते. (उदा. **The world As I see It. The Universe and Dr. Einstein**-Lincoln Barnett. **Ideas and Opinion** या ग्रंथात त्याने आपला कल गूढानुभूतीवादाकडे असल्याचे स्पष्टच मान्य केले आहे. या गूढानुभूतीला तो Cosmic Religious Feeling (वैश्विक आध्यात्मिक जाणीव) म्हणतो. ''संपूर्ण विश्वाचा एकात्म अनुभव घ्यावा असे माणसाला वाटते,'' असे तो जेव्हा म्हणतो तेव्हा तो आपलीच भावना प्रकट करतो. 'ही वैश्विक आध्यात्मिक जाणीव' निर्माण करणे, जिवंत ठेवणे हें कलेचे व विज्ञानाचे सर्वात महत्वाचे कार्य आहे, असे तो म्हणतो. आईन्स्टाईनचा गूढानुभूतिवाद स्पिनोझा व पायथॅगोरस यांच्या गूढानुभूतिवादांच्या संकरातून निर्माण झाल्याचे सांगण्यात येते.

## ज्ञानाचे दोन प्रकार

भौतविज्ञानाचे व गूढानुभूतिवाद्यांचे विश्वाविषयीचा निष्कर्ष, दृष्टिकोण व भाषा एकच आहेत हे खरेअसले तरी त्यांची बैठक, साधने व मार्ग फार भिन्न, किंबहुना परस्परविरुद्ध आहेत हे मात्र विसरून चालणार नाही. उदा. भौतविज्ञान इंद्रियानुभूतीवर आधारले आहे. एक बहिर्निष्ठ आहे तर दुसरे अंतर्निष्ठ आहे. एक वस्तुनिष्ठ आहे तर दुसरे व्यक्तिनिष्ठ (आत्मनिष्ठ) आहे. दोन्ही शास्त्रे प्रयोगनिष्ठ असली तरी एकाचे प्रयोग सार्वजनिक असतात, तर दुसऱ्याचे खाजगी असतात. असे असले तरी एकाने पूर्व दिशेला प्रवासाला निघावे व दुसऱ्याने पश्चिम दिशेला प्रवासाला निघावे व दोघांची काही वेळाने समोरासमोर गाठ पडावी व पृथ्वी गोल आहे या शास्त्रीय सत्याचा शोध दोघांनाही लागावा, तशातली ही परस्परविरुद्ध कार्यपद्धतीतून प्राप्त झालेली अनुभूती आहे असे म्हणावे लागते. त्यामुळे गूढानुभूतिवादी जे आंतरिक अनुभवाच्या आधारे 'हे सर्व आत्मा आहे' (**'इदं सर्वं यदयमात्मा'** बृ. ४.५.७.) असे म्हणतो, तेच भौतवैज्ञानिक बाह्य जगाच्या अनुभवाच्या आधारे हे सर्व ब्रह्म आहे.(**छां** ३.१४. १.) असे म्हणतो, असे कांही शास्त्रज्ञानीं म्हटले आहे. (असे शब्दप्रयोग करणाऱ्यांमध्ये एरविन् श्रोडिंजर प्रमुख आहेत.) एका अर्थाने हे खरे असले तरी दोघांचे अनुभव (आणि म्हणून 'आनुभविक सत्य') एकच नाहीत हे लक्षात ठेवले पाहिजे. किंबहुना गूढानुभूतिवाद्याला जशी अनुभूती येते तशी अनुभूती

भौतवैज्ञानिकाला येत नाही. भौतवैज्ञानिकाचा अनुभव इंद्रियजन्य असल्यामुळे व तो गणिताच्या चौकटीत बसविला असल्यामुळे तो 'माहिती' या सदरात मोडतो. त्यात 'विद्वत्ता' असते, पण 'शहाणपण' नसते. नीतिशास्त्राचा अभ्यास करणे व नीतीने वागणे यात जो फरक आहे, तोच फरक भौतवैज्ञानिकाचे ज्ञान व गूढानुभूती यात आहे. हे मुद्दाम सांगण्याचे कारण असे की गूढानुभूतीने जे 'ज्ञान' होते तेच 'ज्ञान' भौतविज्ञानाच्या अभ्यासाने होत असल्यामुळे गूढानुभूतीच्या लांब व कष्टमय मार्गाऐवजी भौतविज्ञानाच्या अभ्यासाचा सोपा मार्ग अवलंबणे श्रेयस्कर असे काहींना वाटणे शक्य आहे! हा भ्रम दूर करणे आवश्यक आहे.

## टिपा :-

१. समाधीमध्ये गणित व विज्ञान यांचे ज्ञान तुच्छ आहे हे कळते असे गूढवादी म्हणतात. पण गणिताची पुस्तके वाहून नेणारा उंट व विज्ञानाची पुस्तके खाणारी कसर यांना हे ज्ञान समाधीशिवायच तुच्छ आहे हे कळते. म्हणून ते गूढवाद्यांपेक्षा जास्त प्रगत ठरतात, असा बुद्धिवाद्याला साजेसा युक्तिवाद वऱ्हाडपांडे करतात. *एखादे ज्ञान तुच्छ वाटण्यापूर्वी त्या ज्ञानाचे वैयर्थ्य बुद्धीला पटले पाहिजे* ही गोष्ट दृष्टीआड करून हा युक्तिवाद केला आहे हे उघड आहे. शिवाय ज्ञानाच्या पातळ्या असतात या वस्तुस्थितीकडेही यात दुर्लक्ष केले आहे. गणिताचे ज्ञान गूढानुभूतिवाद्यांना समाधीच्या (अंतिम सत्याच्या ज्ञानाच्या) दृष्टीने तुच्छ वाटते. व्यवहाराच्या दृष्टीने ते तुच्छ वाटत नाही. समाधीसाठी (अंतीम सत्याच्या ज्ञानासाठी) गणिताच्या ज्ञानाची गरज नाही असे ते म्हणतात. व्यवहारासाठी त्या ज्ञानाची गरज नाही असे ते म्हणत नाहीत. ज्यांना गणिताचे ज्ञान सर्वार्थाने श्रेष्ठ वाटते, त्यांनी समाधीचा (अंतिम सत्याचा) अनुभव घेतला तर त्यांना तसे ते वाटणार नाही, त्या ज्ञानाची त्यांच्यावर भुरळ पडणार नाही असे गूढानुभूतिवाद्यांचे म्हणणे आहे. अंतिम सत्य म्हणून काही नाही असे ज्यांना वाटते, त्यांनी गणित श्रेष्ठ मानून त्याचा अवश्य अभ्यास करावा, किंवा भौतशास्त्र श्रेष्ठ मानून त्याचा अभ्यास करावा. गूढानुभूतिवाद्यांचा त्याला विरोध असण्याचे कारण नाही. (किंबहुना त्याला त्यांचा पाठींबासुद्धा आहे. कारण या ज्ञानाशिवाय सामान्य जीवन जगताच येणार नाही, हे गीतेने सांगितलेच आहे. ईशोपनिषदात या ज्ञानाला 'अविद्या' म्हटले असून मुंडक उपनिषद त्यालाच 'अपरा विद्या' म्हणते.) पण अंतिम सत्य म्हणून काही आहे हे मान्य असेल तर गणित किंवा भौतशास्त्र (अविद्या) यांच्या अभ्यासामुळे ते प्राप्त होऊ शकत नाही असे मात्र गूढानुभूतिवाद्यांचे म्हणणे आहे. या अंतिम सत्याचे ज्ञान गूढानुभूतीनेच होते, ते बुद्धीने होत नाही. कारण बुद्धी ही 'मी -तू' च्या द्वैत जगातच कार्य करू शकते. ती सापेक्ष आहे. अंतिम सत्य अद्वैत व निरपेक्ष आहे. या अंतिम अर्थाने गणित (वा कोणतेही भौतिक ज्ञान)- अविद्या-तुच्छ आहे असे गूढानुभूतिवादी म्हणतात. ज्याला निरपेक्ष (Absolute) व अंतिम (Ultimate) सत्य जाणून घेण्याची ओढ लागली आहे, तो सापेक्ष व आंशिक सत्याच्या पाठीमागे लागणार नाही, असा

या तुच्छतेचा अर्थ आहे. शेवटी महत्त्व कशाला आहे? आंबे मोजण्याला (गणित) की आंबे खाण्याला (गूढानुभूती) ? याचा अर्थ आंबे मोजू नयेत असा नाही. व्यापाऱ्याला आंबे मोजलेच पाहिजेत; (जगणाऱ्याला कर्मे केलीच पाहिजेत - गीता) पण तो आंबे का मोजतो? कोणीतरी आंबे खातो म्हणून मोजतो (सापेक्ष ज्ञान). आंबे खाण्यासाठी मात्र ते कोणीतरी मोजलेच पाहिजेत असे नाही. ते न मोजता खाता येतात (निरपेक्ष ज्ञान). आणि हेच खरे (अंतिम) ज्ञान आहे. **कारण शेवटी आंबे खाण्यासाठी असतात, मोजण्यासाठी नाही!** आणि व्यापारीसुद्धा जेव्हा आंबे खातो तेव्हा तो ते मोजत नाही. (खाताना पैशाचे गणित करीत नाही.) खाल्लेल्या आंब्याचे पैसे बुडाले असे तो मानत नाही. (आणि असे म्हणणाऱ्याला आपण व्यवहारात करंटा म्हणतो!) वैज्ञानिकांनासुद्धा आपण का मोजतो (गणित का करतो) हे आता कळून आले असून आंबे मोजण्याच्या (गणितशास्त्राच्या=व्यवहाराच्या) पाठीमागे आंबे खाण्याचे तत्त्वज्ञान (अध्यात्मशास्त्र) दडले आहे, हे त्यांना आता समजले आहे व पटले आहे. ''आपण गणित कशासाठी करतो व जे गणित करतो त्याने सत्य सापडते काय? हेच गणिततज्ज्ञांना माहीत नसते'' अशी (अध्यात्मशास्त्राचे अधिष्ठान नसेल तर) गणितज्ज्ञांची (कर्मे करणाऱ्यांची) अवस्था होते, हे खुद्द बर्ट्रांड रसेल या गणितशास्त्रज्ञानेच गणिताची व्याख्या करून स्पष्ट केले आहे. ("Mathematics may be defined as the subject in which we never know what we are talking about ; nor whether what we are saying is true." **Mysticism and Logic**)

२. 'यास्मिन् ज्ञाते सर्वमिदं ज्ञातं भवति' (जे जाणल्याने सर्व जाणल्यासारखे होते) या उपनिषद वाक्याचा अर्थ वऱ्हाडपांडे समाधिस्थ पुरुषाला सर्व भौतिक ज्ञान होते- व्हायला पाहिजे-असा करतात. उदा. ते म्हणतात, ''म्हणजे ज्याला समाधी लागते अशा पुरुषाला कोणतेही गणित विचारले तरी सोडवता आले पाहिजे. जगातल्या कोणत्याही भाषेतल्या कोणत्याही वाक्याचा अर्थ सांगता आला पाहिजे.'' इत्यादी. समाधीची गोष्ट बाजूला राहू द्या. समाधी म्हणून काही आहे हेच माहीत नसलेली काही लहान मुले (ज्यांना Idiot Savant म्हणतात) कोणतेही गणित सोडवू शकतात हे वऱ्हाडपांड्यांना माहीत आहे काय? स्थलाभावी एकच उदाहरण देतो. ऑलिव्हर सॅक्स या मानसोपचार तज्ज्ञाला जॉन आणि मायकेल या जुळ्या मुलांना कोणतीही व कितीही मोठी संख्या अविभाज्य आहे की नाही हे क्षणात सांगता येत असल्याचे प्रयोगांनी आढळून आले असून याविषयीची माहिती २८ फेब्रुवारी १९८५ च्या New York Review मधील एका लेखात त्याने दिली आहे.* कोणत्याही गणिततज्ज्ञाला प्रत्यक्ष गणित केल्याखेरीज (प्रत्येक संख्येने प्रत्यक्ष भागून पाहिल्याखेरीज) हे सांगता येत नाही.

---

* ही मुले चोवीस आकडे असलेली प्रचंड संख्यासुद्धा अविभाज्य आहे की नाही हे क्षणात सांगू शकत असल्याचे सॅक्सला आढळून आले . गणक यंत्रालासुद्धा हे ओळखण्यास बराच वेळ लागतो आणि गणक यंत्र विजेच्यावेगाने काम करते हे सर्वांना माहीत आहेच.

कारण अविभाज्य संख्या शोधून काढण्यासाठी गणितात कोणतेही 'सूत्र' अस्तित्वात नाही. या मुलांना प्रत्यक्ष गणित न करता ते कसे ओळखता येते हे वऱ्हाडपांड्यांनी आपल्या 'विवेकवादा' च्या आधारे प्रथम स्पष्ट करावे (मग समाधीची भाषा करावी).

वऱ्हाडपांड्यांनी उपस्थित केलेल्या भाषेच्या प्रश्नासंबंधीही एक उदाहरण येथे देता येईल. गुरूदेव रानडे एकदा अलाहाबादहून ॲनी बेझंटबाईंना भेटून जमखंडीस परत आले. तेथे त्यांचे आध्यात्मिक गुरू श्री. भाऊसाहेब उमदीकर आले असल्याचे कळताच त्यांना ते भेटले. रानड्यांनी सोबत आणलेले (बहुधा बेझंटबाईंनी दिलेले) First Step in Theosophy हे पुस्तक भाऊसाहेबांनी सहज उचलून चाळण्यास प्रारंभ केला. बराच वेळ ते पुस्तक ते चाळत होते. ते पाहून तेथे उपस्थित असलेल्या लोकांना फार आश्चर्य वाटले. त्यांच्या मनातील प्रश्न ओळखून भाऊसाहेब म्हणाले, ''मला इंग्रजी येत नाही हे खरे आहे. तथापि, या पुस्तकातील कोणत्याही उताऱ्याचा अर्थ मी सांगू शकतो.'' हे ऐकून रानड्यांचे कुतूहल जागृत झाले. त्यांनी त्या पुस्तकातील एक उतारा निवडला व तो मोठ्याने वाचून त्याचा अर्थ विचारला. भाऊसाहेबांनी तो बरोबर सांगितला. ते पाहून रानड्यांनी आश्चर्याने यातील रहस्य काय? असे विचारले. भाऊसाहेब म्हणाले, '' यात कसलेच रहस्य नाही. ही साधी गोष्ट आहे. सर्व भाषा कोठून निर्माण झाल्या ? परमेश्वरापासून होय ना? तोच सगळ्यांचे मूळ आहे. त्याला जाणले म्हणजे हजारो भाषा जाणता येतात. एका इंग्रजीचे काय घेऊन बसलात?'' (**Dr. Ranade's Life and Light**- M. S. Deshpande) (पतंजलीनी सांगितलेल्या समाधिसिध्द पुरुषाला आपोआप प्राप्त होणाऱ्या अनेक सिद्धींपैकी 'भाषाज्ञान' ही एक क्षुद्र सिद्धी असून अशा सिद्धींच्या पाठीमागे ज्ञानी पुरुष लागत नाही. कारण पतंजलीनीच म्हटल्याप्रमाणे त्या आत्मज्ञानाला विघ्नकारक ठरतात. (**समाधावुपसर्गाः**) त्या परत त्याला द्वैती (गुणात्मक) जगात ओढतात. (**व्युत्थाने सिद्धयः**)

३. वाल्टर पाहंके याने गूढानुभूतिविषयी केलेल्या प्रयोगात (गूढानुभूतीमध्ये) अंतिम सत्याची जाणीव झालेल्यांना सामान्य व्यावहारिक सत्याविषयी तुच्छता बुद्धी वाटते असे मुळीच आढळून आले नाही, असे या लेखात म्हटले आहे. या उलट अंतिम सत्याचा अनुभव घेतला तर भौतिक ज्ञानाची भुरळ पडणार नाही, ते तुच्छ वाटेल, असेही (टीप १ मध्ये) मी म्हटले आहे. यात कुणाला विसंगती वाटेल. पण तसे मुळीच नाही. गूढानुभूतिवादी दोन जगात वावरत असतात. एक- गूढानुभूतीचे जग व दुसरे व्यावहारिक जग. एकामुळे दुसऱ्याला बाधा येण्याचे काहीच कारण नाही. किंबहुना गूढानुभूतीमुळे गूढनुभूतिवाद्यांवर सामान्य लोकांच्या उद्बोधनाची एक अनन्यसाधारण अशी नवी जबाबदारी येऊन पडते. याच कारणासाठी उपनिषद्कार, कृष्ण, बुद्ध, येसू, शंकर, रमण, रामकृष्ण, विवेकानंद, ज्ञानेश्वर, कबीर हे जगाचे शिक्षक बनले . शिक्षकांना ज्याप्रमाणे मुलांच्या जगात रस घ्यावा लागतो, तसे या संतांना व सत्पुरुषांना व्यावहारिक जगात रस घ्यावा लागला. कृष्णाने कर्मसिद्धांत प्रतिपादिला. जगभर ज्याच्या शाखा पसरल्या आहेत त्या रामकृष्ण मिशनचे ध्येयवाक्य तर '**आत्मनो मोक्षार्थं जगद्हिताय च**' असेच आहे. बुद्धाच्या

शिकवणुकीचा केंद्रबिंदू 'करुणा' आहे आणि येसूचा 'प्रेम'. रामदास म्हणतात,

**''मुलाच्या चालीने चालावे । मुलाच्या मनोगते बोलावे ।**

**तैसे जनास सिकवावे । हळूहळू ।।''**

तुकाराम म्हणतात–

**''अर्भकाचे साठी । पंते हाती धरली पाटी ।**

**तैसे संत जगी । क्रिया करुनी दाविती अंगी ।।''**

भौतिक सुखाचा उपभोग घेण्यास कुणाला शिकवावे लागत नाही. पण भौतिक सुखोपभोग हेच जीवनाचे अंतिम उद्दिष्ट आहे काय, याविषयी विचार करण्यास मात्र शिकवावे लागते. गूढानुभूतिवाद्यांना अंतिम सत्याची अनुभूती आली असेल तर ती त्यांना स्वस्थ बसू देत नाही. 'बुडतीया जना, पाहवेना डोळा' अशी त्यांची अवस्था होते. सर्व जगाकडे पाहण्याची रूढ नानात्वाची भावना लोप पावून नवीन एकात्मतेची भावना त्यांच्यात दृढमूल झालेली असते. 'भेदाभेद भ्रम अमंगळ' वाटायला लागतो. एकाच देहाचे सर्व अवयव वाटायला लागतात. जितकी गूढानुभूती खोल तितकी ही एकात्मतेची भावना दृढ व तितकीच जगाविषयीची प्रेम, करुणा, आत्मीयता इत्यादी भावना बलवत्तर बनते. म्हणून ज्ञानेश्वर म्हणतात, 'देखे प्राप्तार्थ जाहले । जे निष्कामता पावले । तयाही कर्तव्य असे उरले । लोकालागी ।।'

## संदर्भ टीपा:

१. प्रकरण ६

२. आधुनिक विज्ञान बुद्धिवादाशी कशी फारकत घेते या संबंधीच्या चर्चेसाठी पाहा. 'विज्ञानातील चमत्कारांकडून चमत्कारांच्या विज्ञानाकडे' (प्रकरण २)

३. To see a world in a grain of sand and a Heaven in the wild flower.

४. भवप्रत्ययो विदेहप्रकृतिलयानाम् । श्रद्धावीर्यस्मृतिसमाधिपूर्वकं इतरेषाम् । अभ्यासवैराग्भ्यां तन्निरोधः ।

५. 'Drugs and Mysticism'-Walter Pahnke in **Psychedelics**-Ed. Aaronson and Osmond.

६. Implications of LSD and Experimental Mysticism -Pahnke and Richardson, in **J. Religion and Health**, Vol. 5. 1966 pp. 175. -208

७. Experimental Meditation- **J. of Nervous and Mental Dis.** Vol. 136, 1963.

८. गूढानुभूती व जागृतीतील अनुभूती यातील विसंगतीमुळेच त्या (जागृत) अवस्थेला 'अविद्या' म्हणतात. निर्गुण आत्म्यावर गुणांचा आरोप करणे ही अविद्या असून रंगहीन आकाशावर रंगाचा आरोप करण्यासारखीच ती अज्ञानमूलक आहे असे शंकराचार्यांनी

म्हटले आहे.

९. वऱ्हाडपांड्यांचा प्रस्तुत उताऱ्यातील दृष्टिकोण वैज्ञानिकदृष्ट्या कसा चुकीचा आहे हे **Einstein:Philosopher - Scientist** - Ed. P. A. Schilpp या ग्रंथातील गोडेलच्या पुढील अवतरणावरुन स्पष्ट होईल:

"(Since the Special Theory of Relativity) the assertion that events A and B are simultaneous (and for a large class of pairs of events, also the assertion that A happened before B) loses its objective meaning in so far as another observer with the same claim of correctness, can assert the claim that A and B are not simultaneous, (Or that B Happened before A)" (P. 557)

वरील उताऱ्यातील A च्या जागी 'बाप' व B च्या जागी 'मुलगा' हे शब्द वापरले व Happen म्हणजे 'जन्मणे' असा अर्थ केला तर वरील उताऱ्याचे पुढीलप्रमाणे भाषांतर होईल : "बाप व मुलगा एकाच वेळी जन्मले असे एखाद्याने विधान केले (आणि अशा अनेक घटनांच्या जोड्याविषयी बाप मुलग्याच्या अगोदर जन्मला असे विधान केले) तर त्यांना वस्तुनिष्ठ अर्थ नाही, कारण दुसरा एखादा निरीक्षक बाप व मुलगा एकाच वेळी जन्मले नाहीत (किंवा मुलगा बापाच्या अगोदर जन्मला) असे विधान बरोबर असल्याचा तितक्याच समर्थपणे दावा करू शकतो. (असे विशेष सापेक्षतावादी सिद्धांत रूढ झाल्यापासून आढळून आले आहे.)"

१०. प्रकरण ३ या (बुद्धिप्रामाण्यवाद व परामानसशास्त्र)

११. Logical Positivism चा आद्य प्रवर्तक विट्गेन्स्टीन याचे **Tractatus Logico Philosophicus** हे पुस्तक ज्या लोकांचे वेड (बौद्धिक वा मानसिक) दुरुस्तीच्या पलीकडे गेले आहे अशा लोकांसाठी आहे असे एका प्रसिद्ध आधुनिक गूढानुभूतिवाद्याने म्हटले आहे !

१२. गूढानुभूती व विज्ञान यांचे 'सत्य' एकच या समजुतीचा पुढे खुलासा केला आहे.

१३. एखाद्या गोष्टीविषयी एकवाक्यता असणे ही काही त्या गोष्टीच्या सत्यतेची कसोटी होऊ शकत नाही असे काही जणांचे म्हणणे आहे. उदा. जगातील सर्व मद्यपींना गुलाबी उंदीर दिसतात असे सांगतात ! पण म्हणून उंदीर गुलाबी असतात असे कोणी म्हणत नाहीत. पण मद्यपी नसलेल्यांना ते दिसू लागले -नव्हे त्यांना ते चावू लागले तर? गूढानुभूतिवादी हे मद्यपी समजले तर भौतवैज्ञानिक हे मद्यपी नसलेले, पण ज्यांना गुलाबी उंदीर चावले आहेत असे लोक होत!

१४. **The Medium, The Mystic and The Physicist** -Lawerence Le Shan.



११

# पुन्हा विज्ञानाच्या दृष्टिकोणातून विवेकवाद आणि गूढानुभूतिवाद *

## श्री. वऱ्हाडपांडे यांच्या चिखलफेकीचे कारण -

'पैलतीर' १९९५ च्या दिवाळी अंकातील माझ्या 'विवेकवाद आणि गूढानुभूतिवाद' (प्रस्तुत ग्रंथातील प्रकरण १०) या लेखाला श्री. नी. र.वऱ्हाडपांडे यांनी 'प्राचार्य गळतगे यांचे बौद्धिक अपचन' या मथळ्याचा वैयक्तिक पातळीवर उतरून चिखलफेक करणारा (Personal Vilification) लेख लिहून उत्तर दिले आहे.

वऱ्हाडपांड्यांचा हा लेख वाचणाऱ्यांना त्यांच्या 'विवेकवादा' वरील माझ्या टीकेमुळे त्यांच्या मनाचा तोल कसा पूर्णपणे सुटला आहे याची तीव्र जाणीव झाल्याशिवाय राहणार नाही. वास्तविक ज्यांची भूमिका शास्त्रीय पायावर भक्कम उभी आहे व म्हणून सत्य आहे, त्यांनी ती भूमिका, प्रतिपक्षाने तिच्यावर कितीही हल्ला केला तरी, भंगणार नसल्यामुळे स्वतःच्या मनाचे संतुलन बिघडू देण्याचे काहीच कारण नाही, आणि वऱ्हाडपांडे आपला 'विवेकवाद' विज्ञानाधिष्ठित असल्याचा दावा करीत असल्यामुळे त्यांच्याबाबतीत ही भीती संभवतच नाही. मग त्यांनी आपल्या मनाचे संतुलन बिघडू देण्याचे व प्रतिपक्षावर चिखलफेक करण्याचे कारण काय? एक तर त्यांच्या 'विवेकवादा' ची भूमिका विज्ञानधिष्ठित नाही व म्हणून सत्य नाही, किंवा त्यांच्या 'विवेकवादा'त विवेकाचा तीव्र अभाव आहे, किंवा दोन्ही खरे आहेत असे म्हणावे लागते. याविषयीचे सत्य माझ्या उपर्युक्त **'पैलतीर ९५'** मधील लेख (प्रस्तुत ग्रंथातील प्रकरण १०) ज्या वाचकांनी वाचला आहे त्यांना मुद्दाम उघड करून सांगण्याची आवश्यकता नाही. तथापि, या विषयात विज्ञानच साक्षीला उभे असल्यामुळे 'हा सूर्य व हा जयद्रथ' हा न्याय येथे लागू होतो. हा न्याय वाचकांपुढे ठेवण्याचा प्रयत्न प्रस्तुत लेखाद्वारा वऱ्हाडपांड्यांच्या लेखामुळे मला पुन्हा करावा लागत आहे.

---

* श्री. नी. र. वऱ्हाडपांडे यांच्या १९९६ च्या 'पैलतीर' मधील उत्तराच्या लेखास त्याच अंकात प्रसिद्ध झालेले प्रत्युत्तर.

## गूढानुभूतीची भूमिका

गूढानुभूती खोटी ठरविल्याशिवाय 'विवेकवाद' उभा राहू शकत नसल्यामुळे (निदान अशी वऱ्हाडपांड्यांची समजूत झाली असल्यामुळे ) वऱ्हाडपांड्यांनी आपल्या **विवेकवाद** या पुस्तकाच्या पहिल्याच 'विवेकवाद म्हणजे काय?' या प्रकरणात गूढानुभूतीवर हल्ला चढवला आहे. हा हल्ला वैज्ञानिकदृष्ट्या कसा आंधळा आहे हे मी माझ्या उपर्युक्त लेखात साधार दाखवून दिले आहे. हे दाखवून देताना मी गूढानुभूतीची भूमिका पुढीलप्रमाणे मांडली आहे.

१. गूढानुभूती आलेल्या (समाधिसिद्ध )पुरुषाला व्यावहारिक पातळीवरील (जागृतीतील) स्थलकालयुक्त जग व्यावहारिक पातळीवर (जागृतीत) खोटे आहे असे म्हणायचे नसते.

२. गूढानुभूतीचे ज्ञानात्मक मूल्यमापन भौतिक ज्ञानाच्या पातळीवरून (भौतिक ज्ञानाच्या मापदंडाने) करणे चुकीचे आहे. त्यामुळे गूढानुभूतीच्या सत्याची कसोटी भौतिक सत्याच्या कसोटीहून भिन्न ठरते. (भौतिक ज्ञानाची कसोटी वापरून गूढानुभूतीचा खरेखोटेपणा ठरवता येत नाही.)

३. गूढानुभूतीत स्थलकालातीत अशा निरपेक्ष (Absolute) आणि अंतिम (Ultimate) सत्याची जाणीव होते. ही जाणीव जितकी खोल तितकी एकात्मतेची भावना दृढ; आणि तितकीच जगाविषयीची प्रेम, करुणा, आत्मीयता इत्यादी भावना बलवत्तर बनते. (व्यावहारिक दृष्ट्या जग खोटे म्हणणाऱ्यांच्या ठिकाणी अशी भावना असणार नाही.)

४. आधुनिक भौतशास्त्रज्ञसुद्धा गूढानुभूतीची भाषा आपल्या विषयावरील पुस्तकात (वैज्ञानिक संशोधनातील परिपक्व विचाराअंती तात्त्विक निष्कर्षाच्या स्वरूपात) करीत असल्याचे आढळून येतात. ( पण भौतवैज्ञानिकांचे 'अनुभव' गूढानुभूतिवाद्यांच्या अनुभवाहून स्वरूपत: भिन्न असतात.)

श्री. वऱ्हाडपांड्यांनी माझ्या लेखातील गूढानुभूतीच्या वरील भूमिकेविषयी मौन पाळले असल्यामुळे त्यांना गूढानुभूतीची भूमिका खोडून काढता आलेली नाही, हे उघड आहे. मग त्यांनी माझ्या लेखाला काय उत्तर दिले आहे? उत्तर म्हणून त्यांनी जे लिहिले आहे ते मुख्यत: स्वत:चा बचाव करण्यासाठी मांडलेले काही आधुनिक भौतशास्त्राविषयीचे मुद्दे व गूढनुभूतीवरील काही वरवरचे विचार आहेत. त्या सर्वांचा पुढील मुद्यांखाली विचार करता येईल.

१. ''गूढानुभूतीचे शास्त्र म्हणजे मनोविकृतीच्या एका प्रकाराचे शास्त्र'' हे वऱ्हाडपांड्यांचे म्हणणे. (यातत्र गूढानुभूतीच्या नऊ लक्षणांविषयीची व रामकृष्णांच्या

गूढानुभूती संबंधीची त्यांची तर्कटे समाविष्ट होतात.)

२. मी अधिकारी भौतशास्त्रज्ञांच्या ज्या विधानांची अवतरणे दिली आहेत त्याविषयीचे वऱ्हाडपांड्यांचे म्हणणे. (यातच त्यांच्या 'प्रामाण्यवादा' संबंधीच्या विधानांचा समावेश होतो.)

३. रसेल व ब्रॉड यांच्या विषयीचे वऱ्हाडपांड्यांचे म्हणणे.

४. माझ्याविषयी वैयक्तिक स्वरूपाची वऱ्हाडपांड्यांनी केलेली विधाने.

## वऱ्हाडपांड्यांचा मिथ्यावाद

वरील क्रमांक २ विषयी असे म्हणता येईल की, मी दिलेली भौतशास्त्रज्ञांची विधाने खोटी आहेत असे वऱ्हाडपांडे म्हणू शकलेले नाहीत. (काही शास्त्रज्ञांच्या विधानांचा तर उल्लेखसुद्धा त्यांनी टाळला आहे. उदा. ओप्पेनहायमरचे विधान.) मला भौतशास्त्र समजत नाही असे त्यांचे याबिषयी म्हणणे आहे! पण मुख्य प्रश्न हा आहे की, मी दिलेली भौतशास्त्रज्ञांची विधाने त्यांची गूढानुभूतिविषयीची 'विवेकवादी' भूमिका चुकीची ठरवतात की नाही ? (आणि मी दिलेली भौतशास्त्रज्ञांची विधाने वऱ्हाडपांडे खोटी म्हणू शकत नसल्यामुळे व त्यांच्या 'विवेकवादा' विरुद्ध ती जात असल्यामुळे त्यांची 'विवेकवादी' भूमिका ती खोटी ठरवतात याविषयी वाद असण्याचे कारण नाही.) आणि तो (त्यांची 'विवेकवादी' भूमिका खोटी ठरविण्याचा) प्रश्न मला भौतशास्त्र समजते की नाही यावर अवलंबून नाही. वऱ्हाडपांड्यांना आपला 'विवेकवाद' वाचवायचा झाल्यास भौतशास्त्रज्ञांची ती विधाने खोटी असल्याचे सिद्ध करावे लागेल. त्यांचा चुकीचा अर्थ करून त्यांना आपला 'विवेकवाद' वाचवता येणार नाही. मला भौतशास्त्र समजत नाही असा मिथ्यावाद (जल्प) करून तर मुळीच नाही !

मी दिलेल्या भौतशास्त्रज्ञांच्या विधानांचा वऱ्हाडपांड्यांनी कसा चुकीचाअर्थ केला आहे व भौतशास्त्राविषयीचे आपले घोर अज्ञान प्रकट केले आहे, हे दाखवून देणे म्हणूनच अपरिहार्य ठरले आहे. त्यामुळे लेखाचा बराच विस्तार होणार असला तरी तो टाळता येत नाही. त्यामुळे 'विवेकवाद' विज्ञानपद्धतीचा अवलंब करीत असल्याचा वऱ्हाडपांड्यांचा दावा कसा पोकळ आहे,हे पुन्हा व दुप्पट जोमाने सिद्ध होणार आहे. पण हे दाखवून देण्यापूर्वी वऱ्हाडपांड्यांनी माझ्याविषयी जी वैयक्तिक स्वरूपाची (निंदाव्यंजक) विधाने केली आहेत, त्यांचा थोडा विचार केला पाहिजे. कारण ही विधाने त्यांचे लेखन किती उथळ व असंबद्ध आहे हे तर दाखवून देतातच, पण माझे मुद्दे खोडून काढण्यासाठी त्यांना युक्तिवादाची कशी तीव्र उणीव भासली आहे हेही दाखवून देतात.

## 'बौध्दिक अपचन' कुणाला झाले आहे?

माझ्याविषयी वऱ्हाडपांड्यांनी केलेल्या वैयक्तिक स्वरूपाच्या विधानापैकी काही पुढीलप्रमाणे आहेत. (कंसात त्यांच्या विधानांना माझी उत्तरे आहेत. )

''अर्थशून्यपणे मोठमोठ्या भौतिकज्ञांच्या वाक्यांचा शुकपाठ म्हणणे ही गळतग्यांची रीत.'' (ही मोठमोठ्या भौतिकज्ञांची वाक्ये म्हणजे वऱ्हाडपांड्यांच्या 'विवेकवादा' चा मृत्युलेख आहे. त्यामुळे गळतग्यांचे शुकपाठ हे त्याचे पुण्याहवाचन म्हणता येईल! पुण्याहवाचन हे शुकपाठच असते. मोठमोठ्या भौतिकज्ञांच्या वाक्यांचा वऱ्हाडपांड्यांनी इतका का धसका घेतला आहे हे यावरुन वाचकांच्या लक्षात येईल !)

''गळतग्यांची आकलनशक्ती किती केविलवाणी आहे.'' (वरील भौतिकज्ञांच्या वाक्यांमुळे वास्तविक खुद्द 'विवेकवादा'चीच अवस्था केविलवाणी झाली आहे व ही अवस्था वड्याचे तेल वांग्यावर या न्यायाने गळतग्यांवर आरोपित झाली आहे. केविलवाण्या अवस्थेचे हे वैशिष्ट्य आहे !)

''आपल्याला भौतिकी समजते हा गळतग्यांचा भ्रमदेखील जागृतीतलाच आहे.'' (वास्तविक गळतग्यांनी भौतशास्त्राविषयी स्वत:चे असे काहीच सांगितलेले नसून प्रसिद्ध भौतिकज्ञांचे म्हणणे त्यांच्याच शब्दांत सांगितले आहे. त्यामुळे हा जागृतीतला भ्रम या भौतिकज्ञांनाच झाला आहे असे वऱ्हाडपांड्यांच्या म्हणण्यानुसार ठरते!)

''गळतग्यांचे बौद्धिक अपचन कोणत्या थराला गेले आहे हे... त्यांनी जे उदाहरण दिले आहे त्यावरून स्पष्ट आहे.'' (हे उदाहरण आईन्स्टाईनच्या सापेक्षता सिद्धांताचे आहे. त्यामुळे हे 'बौद्धिक अपचन' खुद्द आईन्स्टाईनलाच झाले आहे, असे वऱ्हाडपांड्यांच्या म्हणण्यानुसार ठरते!)

''अध्यात्मवाद्यां (गळतग्यां) ची कोणतीच बडबड सुबुद्धपणाची ठरत नाही.'' (हे विधान मी दिलेल्या वरील आईन्टाईनच्या सापेक्षता सिद्धांताच्या उदाहरणाला उद्देशूनच वऱ्हाडपांड्यांनी केले आहे. त्यामुळे सापेक्षता सिद्धांताचे कालाविषयीचे आईन्स्टाईनचे म्हणणे वऱ्हाडपांड्यांच्या दृष्टीने 'बडबड' ठरते!)

वरील सारख्या प्रतिपक्षाला वैयक्तिक दूषणे देणाऱ्या विधानांची पखरण वऱ्हाडपांड्यांनी आपल्या लेखात सर्वत्र केली आहे. स्वत:च्या भूमिकेचे समर्थन करण्याठी वैयक्तिक पातळीवर उतरून प्रतिपक्षाला अशी दूषणे देण्याची वऱ्हाडपांड्यांना गरज वाटावी किंवा प्रतिपक्षाला अशी वैयक्तिक दूषणे दिल्याने आपल्या भूमिकेचे समर्थन होते असा भ्रम त्यांना व्हावा ही त्यांच्या भूमिकेच्या अंगभूत दुबळेपणाची तर साक्ष आहेच, पण प्रतिपक्षाचे मुद्दे खोडून काढण्यासाठी त्यांच्याजवळ युक्तिवाद व पुरावे पुरेशा प्रमाणात नसल्याचीही ती साक्ष आहे. प्रतिपक्षाचे मुद्दे खोडून काढण्यासाठी

स्वत:जवळ युक्तिवादांचा तीव्र अभाव असला म्हणजेच मनुष्य अशा वैयक्तिक पातळीवर उतरून चिखलफेकीचा अवलंब करीत असतो! मनुष्याच्या अशा चिखलफेकीचे दुसरे एक कारण प्रतिपक्षाने आपली भुमिका चुकीची असल्याचे सप्रमाण दाखवून दिल्याचा त्याच्या मनात सुप्त राग असतो हेही असते! वऱ्हाडपांड्यांनी हा राग वरीलसारख्या निंदाव्यंजक विधानातून कसा व्यक्त केला आहे, हे माझ्या मूळ लेखाच्या वाचकांना सहज कळण्यासारखे आहे. येथे एकच उदाहरण घेऊ. ते म्हणतात, ''आपल्याला भौतिकी समजते हा गळतग्यांचा भ्रमदेखील जागृतीतलाच आह'' हे वऱ्हाडपांड्यांचे वाक्य त्यांच्या लेखात मागचा पुढचा काही संबंध नसताना मध्येच एकदम उपटसुंभासारखे आले आहे! त्याचे कारण मी त्यांचा 'विवेकवाद' विज्ञानाधिष्ठित असल्याचा त्यांचा भ्रम माझ्या लेखात वैज्ञानिक प्रमाणांच्या आधारे उघड करून दाखवून दिला असून त्यासंबंधीचे माझे पुढील (निष्कर्षाच्या स्वरुपातील) वाक्य त्यांना झोंबले आहे हे आहे! हे वाक्य असे, ''आणि ही ('विवेकवादी') गृहीतके विज्ञानाने खोटी ठरविली असतानाही वऱ्हाडपांड्यांसारखे काही बुद्धिवादी आपला 'विवेकवाद' विज्ञानाधिष्ठित असल्याच्या भ्रमात आहेत!'' (पृष्ट २३७) अशा रीतीने मी त्यांचा (विवेकवादा-विषयीचा) भ्रम दाखवून दिल्यामुळे त्यांनाही मला कुठला तरी भ्रम झाल्याचे सांगणे आवश्यक वाटले! आणि ते वरीलप्रमाणे मधेच असंबद्ध विधान करुन त्यांनी सांगितले आहे! इतकेच नव्हे तर ते विधान अधोरेखितही केले आहे, जणू काही त्यांच्या लेखाचा तोच मुख्य प्रतिपाद्य विषय आहे! वऱ्हाडपांड्यांना त्यांच्या 'विवेकवादा' वरील माझी टीका पचवता आलेली नाही हे स्पष्ट आहे. माझ्या टीकालेखामुळे त्यांना झालेली ही मळमळ त्यांच्या लेखात सर्वत्र विखुरलेल्या वरील सारख्या निंदाव्यंजक वाक्यातून 'वमन' रुपाने बाहेर पडली असल्याचे वाचकांना स्पष्ट जाणवते.

अशा मळमळीतून कशी तर्कहीन विधाने (खरे तर 'वमने') बाहेर पडतात हे त्यांची पुढील विधानेही दाखवून देतात. ते म्हणतात, ''गळतगे ग्रंथ समजण्यासाठी वाचत नसून'' (लक्षात ठेवा ''समजण्यासाठी वाचत नसून''!) एखादे शब्दावडंबर वापरुन आपल्या अंधश्रद्धा कुरवाळण्यासाठी काही मसाला मिळावा म्हणून वाचतात.'' (हा 'मसाला' म्हणजे वऱ्हाडपांड्यांनी ज्यांचा धसका घेतला आहे ती 'मोठमोठ्या भौतिकज्ञांची' त्यांच्या 'विवेकवादा' चा मृत्युलेख लिहिणारी वाक्ये होत, हे वाचकांनी लक्षात ठेवावे!) आता जो 'समजण्या'साठी 'वाचत नाही' त्याला 'मसाला' मिळणे कसे शक्य आहे हे एक वऱ्हाडपांडेच जाणोत! ''औपपत्तिक भौतिकीसारखे विषय वाचण्याची कुवत'' (लक्षात ठेवा 'वाचण्याची कुवत'!) गळतग्यांच्या बुद्धीत नाही असेही ते म्हणतात. आता 'वाचण्याची' सुद्धा कुवत ज्यांच्या बुद्धीत नाही त्याच्या बुद्धीला 'समजण्याचा' कुठे प्रश्न येतो? माणसाचा विवेक सुटला म्हणजे तो असे 'जल्प' करू लागतो. वऱ्हाडपांड्यांनी आपल्या लेखातील युक्तिवाद

आणि पुरावे यांची उणीव अशा प्रकारच्या 'जल्पा'ने भरून काढली आहे. वस्तुत: हा त्यांचा 'जल्प' त्यांच्या लेखाच्या मथळ्यातूनच सुरू होतो. म्हणजे प्रतिपक्षाचे मुद्दे खोडून काढण्याची आपली असमर्थता त्यांनी आपल्या लेखाच्या मथळ्यातच मान्य केली आहे! 'गळतग्यांचे बौद्धिक अपचन' हा त्यांच्या लेखाचा मथळा म्हणजे वास्तविक प्रतिपक्षाला या असमर्थतेतून हासडलेली एक शिवीच आहे! लेखाचा विषय मथळ्यात येत असल्यामुळे त्यांच्या लेखाचा 'विषय' काय आहे (आणि म्हणून दर्जा काय आहे) हे ही शिवी तर सांगतेच, पण हे 'बौद्धिक अपचन' कुणाला झाले आहे हेही ती सांगते!

## विवेकवाद ग्रंथाबद्दल 'भरमसाट विधाने' व 'असंबद्ध प्रलाप'

याच ठिकाणी आपल्या विवेकवाद ग्रंथाबद्दल मला उद्देशून वऱ्हाडपांड्यांनी जी विधाने केली आहेत, त्यांचाही विचार करता येईल. माझ्या लेखाचा उद्देश 'विवेकवाद' ग्रंथावर टीका करणे हा आहे असे वऱ्हाडपांडे म्हणतात. वस्तुत: त्यांचा ग्रंथ म्हणजे अठरा धान्यांचे कडबोळे आहे- अनेक स्वतंत्र लेखांचा संग्रह आहे. माझ्या लेखाचा उद्देश ''विज्ञानाच्या दृष्टिकोणातून 'गूढानुभूती' (Mysticism) च्या संदर्भात 'विवेकवादा'चे म्हणणे काय आहे व ते विज्ञानपद्धतीशी सुसंगत आहे काय, हे वऱ्हाडपांड्यांचा 'वाद' उदाहरणादाखल घेऊन तपासायचे योजले आहे.'' (पृ. २२४) असे प्रारंभीच मी स्पष्ट शब्दात सांगितले आहे. म्हणून त्यांच्या ग्रंथातील ज्या प्रकरणात त्यांनी गूढानुभूतीविषयी 'विवेवादी' विधाने केली आहेत त्या प्रकरणातील अशा विधानांशीच मला कर्तव्य आहे आणि फक्त अशा विधानांचाच मी विज्ञानाच्या दृष्टिकोनातून विचार केला आहे; आणि अशी विधाने त्यांच्या ग्रंथात कुठे आहेत हे त्यांचा ग्रंथ संपूर्ण वाचल्याशिवाय कळणे शक्य नाही हे उघड आहे. तेव्हा ''पुस्तकावर (?) २२ पृष्ठे लिहिण्याच्या आधी त्यांनी त्याची २२ पृष्ठे जरी वाचली असती तरी वाचकांवर 'असंबद्ध प्रलाप' वाचण्याचा प्रसंग गुदरला नसतो'' या वऱ्हाडपांड्यांच्या विधानातील 'असंबद्ध प्रलाप' वास्तविक कुणाचे आहेत हे वाचकांना सांगण्याची जरुरी नाही.

तसेच ''विवेकवाद या ग्रंथातील 'सत्याची कसोटी' हे प्रकरण गळतग्यांनी वाचलेले नाही व ग्रंथाबद्दल (?) भरमसाठ लेखन केले आहे'' असेही वऱ्हाडपांडे म्हणतात. वस्तुतः त्यांच्या ग्रंथातील या 'प्रकरणा' वर मी यापूर्वीच - पैलतीर १९९० च्या दिवाळी अंकात - स्वतंत्रपणे टीका केली आहे.* (वस्तुत: 'विवेकवादी' सत्याची कसोटी चुकीची असल्याचे प्रथम सिद्ध केल्याशिवाय 'विवेकवादा'च्या गूढानुभूतिविषयक दृष्टिकोणावर कोणीही टीका करणार नाही.) वऱ्हाडपांड्यांनी त्याच (१९९५ च्या)

* प्रकरण ९ पाहा.

'पैलतीर' च्या शेवटी दिलेल्या मागच्या सर्व अंकातील लेखांच्या सूचीकडे थोडे लक्ष दिले असते तर हा टीकालेख त्यांच्या नजरेस आला असता. पण हे कष्ट त्यांनी घेतलेले नसल्यामुळे कुणी 'भरमसाठ' लिहिले आहे, हे वाचकांना सांगण्याची आवश्यकता नाही.

आता त्यांच्या लेखातील मुख्य मुद्यांकडे वळू.

## आधुनिक भौतशास्त्र व ज्ञानशास्त्र (Epistemology)

वऱ्हाडपांडे म्हणतात, "प्रामाण्यवादात सत्याचे लक्षण काय करायचे व सत्य जाणण्याची साधने कोणती याचा विचार असतो. या प्रश्नाचा विचार करणे हे भौतिकीचे काम नाही. तेव्हा प्रामाण्यवादाच्या संदर्भात भौतिकीचे दाखले देणे सर्वथैव अप्रस्तुत आहे." वऱ्हाडपांड्यांची ही विधाने वाचून आधुनिक भौतशास्त्रज्ञ वऱ्हाडपांड्यांचे भौतिकीचे ज्ञान किती बाल्यावस्थेत आहे हे ओळखून, ही विधाने विचार करण्याच्याही लायकीची नाहीत असे म्हणून ती तत्काळ झटकून टाकतील ! आधुनिक भौतविज्ञानात ज्ञानशास्त्राचे - (Epistemology) ज्याला वऱ्हाडपांडे 'प्रामाण्यवाद' म्हणतात. काय स्थान आहे, हे ज्यांना माहीत नाही, त्यांना आधुनिक भौतविज्ञानाची तोंड ओळखही नाही व त्यावर काहीही लिहिण्याचा त्यांना अधिकार नाही असे म्हणणे भाग आहे. विज्ञानाचे काम सत्याचा शोध घेणे हे नाही, असे वऱ्हाडपांडे म्हणतात काय? ते असे म्हणत असतील तर आपला 'विवेकवाद' विज्ञानधिष्ठित असल्याचा ते का दावा करतात हे ते सांगतील काय? वस्तुत: विज्ञानाचे काम सत्याचा शोध घेणे याशिवाय दुसरे काहीच असू शकत नाही (हे त्यांनी आपल्या ग्रंथात स्वत:च मान्य केले आहे.) आणि ज्याला सत्याचा शोध घ्यायचा आहे, त्याला ज्ञानशास्त्राचा आधार घेतल्याशिवाय - सत्याचे स्वरुप व साधने ठरविल्याशिवाय - सत्याचा शोधच घेता येणार नाही. म्हणून आधुनिक विज्ञानाची तात्त्विक चर्चा करणारे सर्व भौतशास्त्रज्ञ विज्ञानाच्या या अंगाचेही - त्याच्या ज्ञानशास्त्राचीही - चर्चा करीत असल्याचे आढळून येतात. किंबहुना ही चर्चा केल्याशिवाय त्यांची आधुनिक विज्ञानाची तात्त्विक चर्चाच पूर्ण होत नाही. म्हणून **Evolution of Physics** यासारख्या शुद्ध विज्ञानावरील ग्रंथातसुद्धा आईन्स्टाईनला सत्याच्या शोधाविषयी विधाने करावी लागली आहेत. एडिंग्टनचे **The Philosophy of Physical Science** यासारखे ग्रंथ तर भौतशास्त्रीय दृष्टिकोणातून ज्ञानशास्त्राची चर्चा करण्यासाठीच केवळ लिहिले गेले आहेत. भौतशास्त्र व ज्ञानशास्त्र हे आता एकमेकांशी इतके संलग्न झाले आहेत की एकाचे दुसऱ्याशिवाय किंचितही चालत नाही. आधुनिक भौतशास्त्राचे ज्ञानशास्त्राशिवाय का चालत नाही हे सांगताना सी.एफ.व्हॉन वायझॅकर हा भौतशास्त्रज्ञ म्हणतो, "Classical physics speaks of the things known, but not of the

way we know them. That paradise of ignorance has been lost for quantum theory, we must reflect now upon our way of knowing the things we know." (**The Physicist's Conception of Nature.**- Ed. J. Mehra, P. 656)

(म्हणजे "रुढ भौतशास्त्र ज्ञानाविषयी बोलत असे, पण ज्ञान मिळवण्याच्या साधनाविषयी बोलत नसे. ज्ञानसाधनाविषयीची ही अज्ञानावस्था आता क्वाँटम सिद्धांतामुळे नष्ट झाली आहे. क्वाँटम सिद्धांतामुळे ज्ञान कसे मिळते - ज्ञानाची साधने कोणती - याचाही आता आपल्याला विचार करावा लागत आहे.") वाईनबर्ग हा नोबेल पारितोषिक विजेता भौतशास्त्रज्ञ आपल्या **The Dreams of Final Theory** या ग्रंथात म्हणतो,

"Metaphysics and Epistemology have at last been intended to play a constructive role in science" (P. 182)

(म्हणजे "सत्ताशास्त्र व ज्ञानशास्त्र ही विज्ञानात रचनात्मक पात्र बजावावीत यात शेवटी अनपेक्षित असे काही नाही.") सत्ताशास्त्र व ज्ञानशास्त्र जसे भौतशास्त्रात रचनात्मक पात्र बजावतात, तसे भौतशास्त्रही ज्ञानशास्त्र व सत्ताशास्त्र यात रचनात्मक पात्र बजावते. **Physics and Philosophy** या ग्रंथात हायजेनबर्गने प्रसिद्ध जर्मन तत्त्ववेत्ता कांट याची ज्ञानशास्त्रीय मीमांसा क्वाँटम सिद्धांतामुळे कशी चुकली आहे हे सप्रमाण दाखवून दिले आहे. नील्स बोहर या क्वाँटम सिद्धांताच्या आद्य प्रणेत्याने आपल्या ग्रंथात भौतशास्त्रातील ज्ञानमीमांसा करताना बुद्ध आणि लाओत्सु यांच्याच (ज्ञानविषयक व सत्ताविषयक) समस्यांना आपल्याला कसे तोंड द्यावे लागते हे स्पष्ट केले आहे. (**Atomic Physics and Human Knowledge** p. 20) ओप्पेनहायमरनेही आपल्या **Science and Common Understandnig** या ग्रंथात नेमके असेच म्हटले आहे. अशा रीतीने आधुनिक भौतशास्त्र व ज्ञानशास्त्र ही परस्परपूरक, परस्परावलंबी व अविभाज्य बनली आहेत. पण याची वऱ्हाडपांड्यांना कसलीही माहिती नाही.

## आधुनिक भौतशास्त्रातील 'प्रत्यक्ष'

पुढे वऱ्हाडपांडे प्रायोगिक भौतशास्त्र व औपपत्तिक भौतशास्त्र असा फरक करून विचारतात की "प्रायोगिक भौतिकी प्रत्यक्षाला प्रमाण मानून चालत नाही असे गळतग्यांना म्हणायचे आहे काय?... प्रत्यक्ष हेच फक्त एकमात्र प्रमाण आहे या चार्वाकाच्या तत्त्वाचे समर्थन हा विवेकवाद या ग्रंथाचा मुख्य विषय आहे. त्याच्याविरुद्ध प्रायोगिक भौतिकीची साक्ष गळतग्यांना मिळणे केवळ अशक्य आहे."

प्रत्यक्ष याचा अर्थ डोळ्यांनी पाहणे असा वऱ्हाडपांडे करीत असतील तर भौतशास्त्रातील प्रयोग शास्त्रज्ञ डोळे झाकून करतात असे गळतग्यांचे म्हणणे आहे, असे वऱ्हाडपांडे समजतात काय? आणि जर 'प्रत्यक्ष' याचा अर्थ भौतशास्त्रातील सिद्धांतांचा

'प्रायोगिक पडताळा पाहणे' असा वऱ्हाडपांडे करत असतील तर प्रायोगिक पडताळा पाहण्याची जरुर नाही, असे मी माझ्या लेखात कुठे म्हटले आहे, किंवा 'प्रायोगिक पडताळा' नसलेले एक तरी विधान माझ्या लेखात मी कुठे केले आहे, हे वऱ्हाडपांडे दाखवून देऊ शकतील काय? मग प्रत्यक्षविरुद्ध प्रायोगिक भौतिकीची गळतऱ्यांना साक्ष मिळणे अशक्य आहे असे ते कसे म्हणतात? त्यांचा 'विवेकवाद' खोटा ठरवणारी मी दिलेली भौतशास्त्रज्ञांची सर्व विधाने प्रत्यक्ष प्रायोगिक संशोधनावरच - प्रायोगिक पडताळ्यावरच - आधारलेली आहेत. 'कल्पनाजाला' वर नाही ! म्हणजे ज्याची साक्ष मिळणे केवळ अशक्य आहे असे वऱ्हाडपांडे म्हणतात, त्या प्रत्यक्षाचीच ती साक्ष आहे. हे त्यांना कळू नये हे त्यांच्या 'कसल्या' आकलनशक्तीचे द्योतक म्हणावे?

आणि जर त्यांना 'प्रत्यक्ष' म्हणजे 'व्यावहारिक' (चार्वाकीय) प्रत्यक्ष म्हणायचे असेल व 'आशा' प्रत्यक्षाशिवाय भौतशास्त्राचे चालत नाही असे सुचवायचे असेल तर भौतविज्ञानात याला 'प्रत्यक्ष' म्हणत नाहीत हे त्यांना माहीत नाही. भौतशास्त्रज्ञ आपण टेबल खुर्ची जसे पाहतो तसे भौतशास्त्रातील 'द्रव्य' (प्रयोगवस्तू) पाहत नसतात. त्यांचे 'प्रत्यक्ष' हे 'व्यावहारिक प्रत्यक्ष' नसते. आपण वैज्ञानिक उपकरणांच्या साहाय्याने जे पाहतो ते मुळात काय आहे हे म्हणूनच व्यावहारिक भाषेत भौतशास्त्रज्ञांना सांगता येत नाही. भौतशास्त्रातील सर्व 'प्रत्यक्ष' हे (एडिंग्टनच्या शब्दात)Pointer Reading शिवाय, म्हणजे प्रयोग उपकरणावरील दर्शक आकड्याशिवाय (आधुनिक भाषेत गणकयंत्रावरील 'मापना' शिवाय) दुसरे काहीच असत नाही. दुसऱ्या शब्दात सांगायचे तर भौतशास्त्रज्ञांचे 'प्रत्यक्ष' हे केवळ गणिती किंवा सैद्धांतिक असते. या संदर्भात खुद्द आईन्स्टाईनने एकदा हायजेनबर्गची 'प्रत्यक्ष' म्हणजे Observable (दृश्य वस्तू) समजल्याबद्दल कशी कानउघाडणी केली होती, याचा किस्सा खुद्द हायजेनबर्गनेच आपल्या **Physics and Beyond** या ग्रंथात सांगितला आहे. आईन्स्टाईन हायजेनबर्गला या संदर्भात जे म्हणाला, त्याचा मथितार्थ असा की भौतशास्त्रातील एखादा सिद्धांत भौतिक घटनांची उपपत्ती देत असेल, तर त्या सिद्धांतामध्ये काय 'प्रत्यक्ष वस्तू' आहे असे विचारण्याचे कारण नाही.[१]

याचा हायजेनबर्गच्या मनावर असा परिणाम झाला (हा किस्सा तो आपल्या जाहीर व्याख्यानात नंतर सांगत असे) की त्याने नंतर भौतशास्त्रातील युगप्रवर्तक 'अनिश्चितता तत्त्वा'चा शोध लावला. या तत्त्वानुसार अणूच्या पातळीवर वस्तू 'स्थळा'त (वस्तूचे स्थान) व 'काळा'त (वस्तूचा वेग)एकाच वेळी कधीच 'पाहता' येत नाही. (दोन्ही एकाच वेळी कधीच निश्चित माहीत होत नाहीत.) म्हणजेच वस्तू दोन्हीत एकाच वेळी कधीच प्रत्यक्ष नसते. दुसऱ्या शब्दांत ***आण्विक पातळीवर वस्तू व्यवहारातील वस्तूप्रमाणे कधीच 'स्थळकाळात'त नसते!***

आधुनिक भौतविज्ञानातील 'प्रत्यक्षा' विषयीची ही संकल्पना लक्षात घेता चार्वाकीय (व्यावहारिक) प्रत्यक्षविरुद्ध साक्ष मिळणे अशक्य आहे असे (या अर्थाने) वऱ्हाडपांडे म्हणत असतील तर भौतविज्ञानातील प्रायोगिक 'प्रत्यक्षा' विषयी त्यांना काहीही माहिती नाही असे म्हणणे भाग आहे.

## 'विवेकवादा'च्या मुळावर घाव घालणारा हायजेनबर्गचा शोध

'अनिश्चितता तत्त्वा'च्या शोधामुळेच "When we get down to the atomic level, the objective world of space and time does not exist". (अणूच्या पातळीवर स्थळकाळाचे वस्तुनिष्ठ जग अस्तित्वात नसते) असे हायजेनबर्गने म्हटले आहे. मी दिलेल्या या वाक्याचे भाषांतर करताना *वऱ्हाडपांड्यांनी Objective (वस्तुनिष्ठ) या शब्दाचे भाषांतर आपल्या लेखात धूर्तपणे टाळले आहे* हे वाचकांनी लक्षात ठेवावे! याचे कारण म्हणजे चार्वाकीय प्रत्यक्षाच्या मुळावरच तो शब्द घाव घालतो! *'वस्तुनिष्ठ' याचाअर्थ वस्तू 'स्थळ' व 'काळ' या दोन्हीत असणे असा असून, वस्तू अशी स्थळकाळात असली तरच पाहता येते* हे सर्वांना माहीतच आहे. एखादी वस्तू 'स्थळा'त आहे,पण 'काळा' त नाही, किंवा 'काळा' त आहे, पण 'स्थळा' त नाही असे व्यावहारिक जगात कधीच होत नाही. ( म्हणजेच अशी वस्तू व्यवहारात कधीच 'प्रत्यक्ष' नसते, किंवा अनुभवाला येत नाही.) ( पण हायजेनबर्गचे 'अनिश्चितता तत्त्व' नेमके हीच विलक्षण गोष्ट सांगते. कारण या तत्त्वानुसार अणूच्या पातळीवर वस्तू एक तर 'स्थळा' त आढळते किंवा ' काळा' त. ***दोन्हीत ती कधीच (निश्चित) आढळत नाही!***वस्तूच्या या अवस्थेला वऱ्हाडपांडे 'माया' म्हणत असतील (मी 'माया' हा शब्द वापरलेला नसतानाही, ती माया आहे असे मी म्हणतो असा वऱ्हाडपांडे हेटाळणीच्या सुरात माझ्यावर आरोप करतात) तर ती हायजेनबर्गच्या अनिश्चितता तत्त्वाची (अणूच्या पातळीवरील) माया असून ती वऱ्हाडपांड्यांच्या 'विवेकवादा'च्या मुळावरच घाव घालते! त्यांनी नाणेफेकीचे उदाहरण वास्तविक ही माया नाही- अणूच्या पातळीवर स्थळ-काळ सत्य आहेत - हे दाखवून देण्यासाठी दिले आहे. पण ते उदाहरण ही 'माया' कशी आहे हेच सिद्ध करते हे त्यांना कळलेले नाही ! कारण अणूच्या पातळीवर वस्तू एक तर स्थळात असते हे वऱ्हाडपांड्यांच्या नाण्याचे 'चीत' पडणे, व ती काळात असते हे त्या नाण्याचे 'पट' पडणे असून, नाणे 'चीत' व 'पट' एकाच वेळी पडत नाही. ही वस्तुस्थिती वस्तू 'स्थल' व 'काल' या दोन्हीत एकाच वेळी असत नाही ही गोष्ट सिद्ध करते ! म्हणजे नाणे फेकीचे उदाहरण जी गोष्ट सिद्ध करण्यासाठी वऱ्हाडपांडे देतात तिच्या नेमके विरुद्ध गोष्ट ते सिद्ध करते ! यातील गंमत अशी की हे त्यांना कळलेले नाही !

वस्तुत: अणूच्या पातळीवरील घटना नाणेफेकीने कळणार नाहीत याची वऱ्हाडपांड्यांना कल्पना नाही. ( नाणेफेकीचे उदाहरण स्थूल जगातील एखादी अनिश्चित घटना घडण्याची *संभवनीयता* किती हे कळण्यासाठी देतात.) नाणे कसे पडेल हे सांगता न येण्याचे कारण नाण्यात नसून भाकीत करण्याच्या आपल्या असमर्थतेत -आपल्या माहितीच्या अभावात- आहे. ही माहितीची न्यूनता अगणित वेळा नाणे फेकून घालवता येते. उलट अणूच्या पातळीवर इलेक्ट्रॉनच्या अवस्थेचे भाकीत करता न येण्याचे कारण *आपली असमर्थता वा माहितीचा अभाव नसून इलेक्ट्रॉनचे अंगभूत लक्षण हे आहे.* त्यामुळे आपली असमर्थता घालवण्याचा प्रश्नच निर्माण होत नाही.

वऱ्हाडपांडे म्हणतात, 'हे (गळतग्यांचे) अनुमान ऐकून हायजेनबर्ग हे फळ काय मम तपाला? म्हणून कपाळावर हात मारून घेईल.' *अणूच्या पातळीवर स्थलकाळ मिथ्या आहेत असे गळतगे म्हणत नसून स्वत: हायजेनबर्गच (वरील इंग्रजी वाक्यात) म्हणतो* हे वऱ्हाडपांडे कसे विसरले? स्वत:चे म्हणणे ऐकून स्वत:च कोण कपाळावर हात मारून घेईल काय? वास्तविक वऱ्हाडपांड्यांचे हे असंबद्ध विधान वाचूनच तो कपाळावर हात मारुन घेईल! अणूच्या पातळीवर स्थळ - काळ मिथ्या असताना ते सत्य असल्याचे नाणेफेकीच्या उदाहरणाने सिद्ध करण्याचा हा वऱ्हाडपांड्यांचा अशास्त्रीय खटाटोप पाहून तो काय म्हणेल? (किंवा काय करील?) याचे अनुमान करण्याचे काम मी वाचकावरच सोपवितो! (आण्विक पातळीवरील घटना कळण्यासाठी नाणेफेकीचे उदाहरण देणे कसे चुकीचे आहे याबद्दलच्या माहितीसाठी पाहा : **Other Worlds** - P-C. W. Davies pp. 111-112)

## वऱ्हाडपांड्यांची काळाच्या उलटच्या दिशेमुळे झालेली दिशाभूल

विरोधी कण काळाच्या उलट दिशेने प्रवास करतात, या फेनमनच्या शोधाचा मी विपर्यास केला आहे असे वऱ्हाडपांडे म्हणतात. तो कसा हे दाखवून देण्यासाठी साडेतीन मुलांचे सरासरी कुटुंब अस्तित्वात असू शकते, ते डोळ्यांना दिसत नसले तरी त्याचा पडताळा पाहता येतो. म्हणून ते खोटे म्हणता येत नाही अशी भूमिका ते मांडतात. (डोळ्यांना न दिसणाऱ्या साडेतीन मुलांच्या 'सरासरी' कुटुंबाची तुलना ते 'डोळ्यांना न दिसणाऱ्या एखाद्या जंतूशी करतात ! यावरून त्यांची वैज्ञानिक जाण किती अनुकंपनीय आहे याची वाचकांना कल्पना येईल !) यात मी नेमके कशाचा विपर्यास केला आहे हे मात्र ते कुठेच सांगत नाहीत ! उलट जे डोळ्यांना दिसत नाही, ते खरे मानावे लागते, हे प्रतिपक्षाचे म्हणणे मान्य करून *आपल्या चार्वाकीय (प्रत्यक्षवादी) विवेकवादाला आपणच मूठमाती देत आहोत,* हे त्यांच्या लक्षात आलेले नाही! यात पुन्हा गंमत अशी की, ते

मलाच उलट विचारतात की, "जागृतीत जे अनुभवास येत नाही ते खोटे असे वऱ्हाडपांड्यांनी कोठे म्हटले आहे, हे गळतगे सांगू शकतील काय?" जणू काही विज्ञान स्वप्नात चालते असे गळतग्यांचे म्हणणे आहे! विज्ञान हे जागृतीतलेच शास्त्र आहे, स्वप्नातले नाही! पण मग गूढानुभूतीशास्त्रही जागृतीतलेच आहे. स्वप्नातले नाही! विज्ञान व अध्यात्म ही दोन्ही जागृतीतलीच शास्त्रे असली तरी जागृतीतील (व्यवहारातील) अनुभवाहून त्या शास्त्रांच्या अनुभवाच्या (ज्ञानाच्या) पातळ्या भिन्न आहेत, असे ती शास्त्रे सांगतात. म्हणूनच काळाच्या उलट्या प्रवासासारखी जागृतीत अनुभवाला न येणारी गोष्ट ती शास्त्रे आपल्या ज्ञानाच्या पातळीवर सत्य म्हणून स्वीकारतात.

वऱ्हाडपांड्यांचा 'विवेकवाद' हा फक्त व्यावहारिक पातळीवरील अनुभवच सत्य मानत असल्यामुळे (कारण व्यावहारिक पातळीशिवाय अन्य ज्ञानाची पातळी असू शकत नाही असा त्यांचा 'विवेकवाद' आहे!) त्या वादाला हे मान्य नाही. त्यामुळे अंतिम सत्य म्हणून काही असू शकते व ते व्यावहारिक ('विवेकवादी') पातळीवरून कळू शकत नाही असे जे ही दोन्ही शास्त्रे सांगतात, ते वऱ्हाडपांड्यांना मान्य नाही. हे त्यांना मान्य असेल तर 'जागृतीत जे अनुभवास येत नाही ते खोटे असे वऱ्हाडपांड्यांनी कोठे म्हटले आहे?' असा प्रश्न त्यांनी विचारण्याचे कारण नाही. त्यांच्या 'विवेकवादा' ला *जागृतीत जे अनुभवास येत नाही ते खोटे नाही हे मान्य असेल तर* 'अंतिम सत्य' म्हणून काही असून ते 'जागृती'त (व्यावहारिक पातळीवर) कळू शकत नाही - ते **वैज्ञानिक व गूढानुभूतीच्या पातळीवरच कळू शकते** - हेही त्याला मान्य करावे लागेल. काळाची उलटी दिशा हे जागृतीत न कळणारे असे (क्वाँटम भौतिकीचे) सत्य आहे. हे विज्ञान व गूढानुभूतीनेच कळणार असून त्या पातळीवरील अनुभव काळाला स्वत:चे 'वस्तुनिष्ठ' अस्तित्व नसल्याचे -काळ अंतिमत: सत्य नसल्याचे -सांगतो.

अशा रीतीने "जागृतीत जे अनुभवास येत नाही ते खोटे असे वऱ्हाडपांड्यांनी कोठे म्हटले आहे हे गळतगे सांगू शकतील काय?" हा प्रश्न वऱ्हाडपांड्यांनी पूर्ण अक्कल हुशारीने विचारलेला असेल, तर त्यांचा 'विवेकवाद' अडगळीच्या खोलीत जाऊन पडतो! स्वत:चा 'विवेकवाद' खोटा ठरविणारी आणि प्रतिपक्षांची भूमिका सत्य म्हणणारी विधाने स्वत:च करणाऱ्या आणि प्रतिपक्षाची 'आकलनशक्ती' केविलवाणी म्हणणाऱ्या वऱ्हाडपांड्यांच्या 'या' 'आकलनशक्ती' ला कसले विशेषण लावावे?

## श्रोडिंजरचा 'उडणारा सिंह' आणि धोब्याचे बेवारशी गाढव

श्रोडिंजरला उडणाऱ्या (पंखांच्या) सिंहाचे उदाहरण देऊन काय म्हणायचे आहे, हे जणू आपल्याला माहीत आहे अशा थाटात वऱ्हाडपांडे विचारतात, "अनुभवाशी

सुसंगत नसल्यामुळे अध्यात्म हे सत्य मानावे काय? श्रोडिंजरला असे मुळीच म्हणायचे नाही.'' अनुभवाशी सुसंगत नसणे हे क्वाँटम सिद्धांताचे मूलभूत लक्षण असल्यामुळे भौतशास्त्राचा (व त्याच्या ज्ञानशास्त्राचा) कायापालट झाला व ते गूढानुभूतीची भाषा करू लागले हे वऱ्हाडपांड्यांच्या गावीही नसल्यामुळे ते वरीलप्रमाणे लिहितात व 'श्रोडिंजरच्या प्रमेयामध्ये ईश्वर, अध्यात्म वगैरे भाकडकथांचे समर्थन होईल असे काही नाही' असे अज्ञानमूलक विधान करतात. पण 'उडणारा सिंह' ही भाकडकथा नसून सत्य आहे - आधुनिक भौतशास्त्राचा तो पाया आहे- याची त्यांना कल्पना नाही! त्यामुळे तो सिंह ज्याचे अधिष्ठान बनला आहे ते अध्यात्मही (वा ईश्वरही) भाकडकथा नाही हे त्यांना कसे कळणार? (उडणाऱ्या सिंहाचे उदाहरण ईश्वराचे समर्थन करण्यासाठी श्रोडिंजरने वा गळतग्यांनी दिले आहे हे वऱ्हाडपांड्यांचे स्व-कल्पित आहे. गूढानुभूतिवाद व ईश्वरवाद हे एकच होत ही वऱ्हाडपांड्यांची कल्पना चुकीची आहे. तथापि, वादासाठी तात्पुरते हे गृहीत धरू.) उडणारा सिंह प्रत्यक्षाशिवाय असू शकत नाही या कल्पनेने त्यांनी स्टिफेन हॉकिंगच्या 'ए ब्रीफ हिस्टरी ऑफ टाईम' या गाजलेल्या पुस्तकातील एक उतारा दिला असून त्यातील 'वैज्ञानिक चर्चा अनिरीक्षणीय अशा कोणत्याच तत्त्वांना आश्रय करू शकत नाही' हे वाक्य त्यांनी अधोरेखित केले आहे. हॉकिंगच्या मूळ इंग्रजी वाक्याचे हे भाषांतर तोकडे तर आहेच, पण ते वाक्य (वा उतारा) 'उडणारा सिंह' च सिद्ध करते हे त्यांना कळलेले नाही! ( मूळ सिद्धांत न समजून घेता केवळ 'शुकपाठ' करणाऱ्याकडून दुसरी अपेक्षा काय करणार?) हॉकिंगचा हा उतारा ज्या प्रकरणातून त्यांनी घेतला आहे, ते प्रकरण हायजेनबर्गच्या अनिश्चिततेच्या तत्त्वाचे विवरण करणारे असून अणूच्या पातळीवरील घटना समजून घेण्यासाठी भौतशास्त्रज्ञांनी (गणिती) समीकरण कसे निर्माण केले आहे हे ते सांगते. या समीकरणाला 'श्रोडिंजरचे समीकरण' किंवा 'वेव्ह फंक्शन' म्हणतात. श्रोडिंजरच्या आलंकारिक भाषेतच बोलायचे तर ते समीकरण म्हणजे 'उडणारा सिंह' पकडण्यासाठी भौतशास्त्रज्ञांनी तयार केलेला एक 'सापळा' च आहे असे म्हणता येईल! (याला गणिती भाषेत 'स्टेट व्हेक्टॉर' म्हणतात.) मग तो सिंह पकडला जातो काय? त्याचे उत्तर होय व नाही असे आहे. सिंह पकडला जातो हे निःसंशय. पण जे प्रत्यक्षात पकडले जाते ते एक तर त्या सिंहाचे शरीर असते किंवा त्याचे पंख! 'उडणारा सिंह' गायब होतो! ***याचा अर्थ तो फक्त गणितातच पकडला जातो! प्रत्यक्षात नाही!*** (म्हणून श्रोडिंजरने त्याला 'उडणारा सिंह' हे नाव दिले आहे.) अशा रीतीने 'उडणारा सिंह' गणितात पकडला जातो, पण तो 'प्रत्यक्ष' नसतो आणि प्रत्यक्षात जो पकडला जातो तो 'उडणारा सिंह' नसतो. पण तो प्रत्यक्षात दिसत नाही, म्हणून खोटा म्हणता येत नाही. तो खोटा म्हटले तर त्याचे शास्त्रीय अस्तित्व सिद्ध करणारे श्रोडिंजरचे गणित

(वेव्ह फंक्शन) व संपूर्ण क्वाँटम मेकॅनिक्स खोटे म्हणावे लागेल. पण वऱ्हाडपांड्यांच्या 'विवेकवादा' ची अडचण ही आहे की, हे क्वाँटम मेकॅनिक्स त्याला खरे म्हणता येत नाही! कारण ते खरे म्हटले तर 'प्रत्यक्ष' नसलेला 'उडणारा सिंह' त्याला खोटा म्हणून नाकारता येत नाही! पण तो नाकारल्याशिवाय 'व्यावहारिक प्रत्यक्ष' च खरे म्हणणारा चार्वाकवाद उभा राहू शकत नाही! अशा रीतीने वऱ्हाडपांड्यांच्या 'विवेकवादा' ला एकीकडे क्वाँटम मेकॅनिक्सचा (विज्ञानाचा) आधार घेता येत नाही. पण तो सोडताही येत नाही. (कारण त्यांचा 'वाद' 'विज्ञानाधिष्ठित' आहे!) तर दुसरीकडे 'उडणारा सिंह'प्रत्यक्ष नसल्यामुळे त्यात त्यांच्या चार्वाकवादाला आधार मिळत नाही. पण तो सोडताही येत नाही! (कारण मग 'विवेकवाद' खोटा ठरतो हे मान्य करावे लागते.) म्हणजे त्याला एकीकडे विज्ञानाचा व दुसरीकडे चार्वाकवादाचा असा दोन्हीकडचा आधार धड घेताही येत नसल्यामुळे व सोडताही येत नसल्यामुळे त्याची अवस्था या बाबतीत धोब्याच्या गाढवासारखी 'न घर का न घाटका' अशी होते ! ('उडणारा सिंह'च्या जागी 'ईश्वरा' ची कल्पना केली की विज्ञानाविषयीचे हेच म्हणणे अध्यात्माला लागू होते.)[२]

पुढे वऱ्हाडपांडे जनतेतील साक्षरतेच्या प्रमाणाचा आकडा उपलब्ध आहे, पण स्त्रियांतील व पुरुषांतील प्रमाण-आकडे उपलब्ध नाहीत है उदाहरण 'उडणारा सिंह' चा (व पर्यायाने 'ईश्वरा' चा) खोटेपणा सिद्ध करण्यासाठी देतात! पण हे उदाहरण त्यांचा चार्वाकीय 'विवेकवाद' च खोटा ठरवतो हे त्यांना कळलेले नाही!कारण प्रत्यक्षात स्त्री-पुरुषांच्या साक्षरतेचे प्रमाण आकडे मिळाल्या शिवाय जनतेच्या साक्षरतेचा प्रमाण आकडा मिळतो काय? मग स्त्री-पुरुषांच्या साक्षरतेचे प्रमाण आकडे उपलब्ध नाहीत, या म्हणण्याला काय अर्थ आहे? ते उपलब्ध नाहीत हे मान्य करणे, म्हणजे 'जनतेत' स्त्री-पुरुषच नसल्याचे मान्य करणे होय. पण हे मान्य केले तर जनतेच्या साक्षरतेचे प्रमाण-आकडाही मान्य करता येत नाही! कारण 'जनता' ही स्त्री-पुरुषाहून वेगळी असू शकत नाही. अशा रीतीने हे उदाहरण 'मला जीभ नाही' असे एखाद्याने म्हणावे तसे वदतोव्याघाती व म्हणून खोटे आहे. आणि हे उदाहरण खरे आहे असा दावा क्वाँटम सिद्धांताच्या आधारे वऱ्हाडपांडे करीत असतील तर क्वाँटम सिद्धांत 'प्रत्यक्षा'तील स्त्री-पुरुष खोटे म्हणतो-'प्रत्यक्ष' नाकारतो हे त्यांना मान्य करावे लागेल! म्हणजे आपले क्वाँटम सिद्धांताचे हे उदाहरण त्यांनी खरे म्हटले तर त्यांचा 'प्रत्यक्षच खरे' म्हणणारा चार्वाकवाद खोटा ठरतो व त्यांनी आपला चार्वाकवाद खरा म्हटले तर त्यांचे क्वाँटम सिद्धांताचे हे उदाहरण खोटे ठरते. पण त्यांच्या 'विवेकवादा' ला क्वाँटम सिद्धांतही सोडता येत नाही व चार्वाकवादही सोडता येत नाही! (पहिला सोडला तर तो 'अवैज्ञानिक' ठरतो, दुसरा सोडला तर तो 'अव्यवहारी' ठरतो.) म्हणजे रजकगर्दभाचे 'न घर का न घाट का' हे त्याचे नशीब काही

चुकत नाही! To make an ass of oneself या इंग्रजी म्हणीचे इतके चपखल उदाहरण दुसरे कचितच सापडेल!

## एडिंग्टनला ''भौतिकीही कळत नाही व व्यवहारही कळत नाही'' (इति वऱ्हाडपांडे!)

एडिंग्टनने व्यावहारिक जगाहून वैज्ञानिक जग कसे वेगळे आहे, हे दाखवून देण्यासाठी दोन टेबलांचे (एक व्यावहारिक टेबल व दुसरे वैज्ञानिक टेबल) उदाहरण दिले आहे. वऱ्हाडपांडे पाण्याचे उदाहरण देतात! हे त्यांचे पाण्याचे उदाहरण त्यांना भौतविज्ञानाचे प्राथमिक ज्ञानही नसल्याचे व एडिंग्टनच्या टेबलाचे उदाहरण देण्यातीत मूळ उद्देशाचे आकलन झाले नसल्याचे द्योतक आहे. हे उदाहरण देऊन ते म्हणतात, 'आपण ज्याचे (रासायनिक) पृथक्करण केले ते पाणी आहे, दुसरे कोणते नाही हे रसायनज्ञाला कसे कळावे? व्यावहारिक प्रत्यक्षात दिसणारे जग भौतिकज्ञ खोटे मानतो असे म्हणणाऱ्यांना भौतिकीही कळत नाही व व्यवहारही कळत नाही'. हा आरोप ते अर्थात माझ्यावर करतात. पण तो आरोप आपण खुद्द एडिंग्टनवरच करत आहोत याचे भान त्यांना राहिलेले नाही! कारण खुद्द एडिंग्टनच भौतिक (व्यावहारिक) जग वैज्ञानिकदृष्ट्या खोटे म्हणतो! मी म्हणत नाही! तसे तो म्हणाला नसता तर मी त्याचे उदाहरणच दिले नसते. याबद्दल वऱ्हाडपांड्यांना आणखी पुरावा पाहिजे असेल तर त्याच ठिकाणी पुढे एडिंग्टन म्हणतो. "The external world of physics has thus become a world of shadows.In removing our illusions, we have removed the substance, for indeed we have seen that substance is one of the greatest of our illusions."

या उताऱ्यात भौतिक जग हा सावल्यांचा खेळ आहे व ज्याच्यापासून हे भौतिक जग बनले आहे ते 'द्रव्य' हा आपल्या (भौतिकातील) भ्रमापैकी सर्वात मोठा भ्रम आहे, असे एडिंग्टन स्पष्ट म्हणतो. मग एडिंग्टनला भौतिकीही कळत नाही व व्यवहारही कळत नाही असे समजायचे काय? या ठिकाणी रसायनशास्त्राचे- पाण्याचे -उदाहरण देणाऱ्या वऱ्हाडपांड्यांना एडिंग्टनने भौतिक जग ज्यापासून बनले आहे त्या भौतिक 'द्रव्या' चे उदाहरण का दिले आहे, रसायनाचे का नाही हे कळलेले नाही! भौतविज्ञानाच्या प्राथमिक संकल्पनांचीही जाण नसलेल्या वऱ्हाडपांड्यांनी भौतविज्ञानावर लिहावे (किंवा आपला विवेकवाद विज्ञानाधिष्ठित आहे असे म्हणावे) ही विज्ञानाची पोर थट्टा आहे. [व्यावहारिक पातळीवर भौतिक जग खोटे आहे असे मी किंवा कोणत्याही भौतशास्त्रज्ञाने म्हटलेले नाही. माझ्या लेखातील या विषयीची माझी विधाने अशी : ''याचा अर्थ भौतशास्त्रज्ञांना व गूढानुभूतिवाद्यांना भौतिक जग खोटे किंवा मिथ्या आहे असे वाटते असा मुळीच नाही... भौतिक जगाविषयी सर्वसामान्य (माणसाच्या) कल्पना आणि गृहीतके चुकीची

आहेत एवढेच त्यांना म्हणायचे असते.'' (पृ. २३७) माझा लेख नीट न वाचता माझ्यावर खोटा आरोप करणाऱ्यांना काय म्हणावे?]

## वऱ्हाडपांड्यांच्या डोक्यातील दुहेरी गोंधळ

पुढे वऱ्हाडपांडे म्हणतात, ''गळतग्यांच्या डोक्यात किती गोंधळ आहे हे त्यांनी दिलेल्या व्हाईटहेडच्या अवतरणावरून उघड होते. व्हाईटहेड 'कॉमनसेन्स म्हणजे सामान्य बुद्धीला जगाचे जे स्वरूप आहे असे वाटते तसे ते नाही असे आधुनिक विज्ञानावरून दिसते' असे म्हणतो.'' मग मी दुसरे काय म्हटले आहे? माझी वाक्ये अशी आहेत: 'म्हणजे सामान्य माणसाला भौतिक जगाचे स्वरूप जसे आहे असे वाटते तसे ते मुळात नाही हे दोघांनाही (भौतशास्त्रज्ञाला व गुढानुभूतीवाद्याला) पटले आहे असा याचा अर्थ होतो. याचा अर्थ, भौतशास्त्रज्ञाला व गुढानुभूतीवाद्यांना भौतिक जग खोटे आहे असे वाटते असा मुळीच नाही'' (पृ. २३७) तेव्हा येथे जर कुणाच्या डोक्यात गोंधळ झाला असेल तर तो स्वत: वऱ्हाडपांड्यांच्या ! आणि तोही माझा लेख नीट न वाचल्यामुळे !

यात पुन्हा गंमत अशी की व्हाईटहेडचे म्हणणे मान्य केल्यामुळे आपला 'विवेकवाद' खोटा ठरतो हे त्यांच्या लक्षात आलेले नाही ! (त्यांचा 'विवेकवाद' कॉमनसेन्सवरच आधारलेला आहे.) या त्यांच्या डोक्यातील दुहेरी गोंधळाला काय म्हणावे? *स्वत:च आपला 'विवेकवाद' व्हाईटहेडचे म्हणणे मान्य करून खोटा ठरवीत आहोत,* हे त्यांच्या लक्षात येऊ नये ही त्यांची कसली 'वैज्ञानिक जाण' म्हणावी ? किंवा कसली 'आकलनशक्ती' म्हणावी ?

''गूढानुभूती ही अनुभूती आहे हे वऱ्हाडपांड्यांना मान्य आहे की नाही?'' या माझ्या ज्या प्रश्नामुळे वऱ्हाडपांड्यांना ''गळतग्यांना आधुनिक भौतिकीच्या अत्यंत गहन कल्पना कळाव्या अशी कुणाची अपेक्षा नाही'' अशी गळतग्यांच्या बौद्धिक कुवतीची अस्थानी उठाठेव करावीशी वाटली व ''अहो, वऱ्हाडपांडे ज्या अर्थी 'गूढानुभूती' असा शब्द वापरतात त्या अर्थी ते गूढानुभूती ही अनुभूती आहे असे मानतात याबद्दल मराठी समजणाऱ्याला शंका असू नये'' हे वाचकांना मुद्दाम सांगावेसे वाटले, तो माझा प्रश्न युक्तिवादात्मक वा खंडणमंडणात्मक (Procedural) आहे, हे अगदी सामान्य वाचकालासुद्धा सहज कळण्यासारखे आहे. त्यात मराठी जाणण्या न जाणण्याचा प्रश्न नाही आणि हे वऱ्हाडपांड्यांना कळत नाही असे नाही. पण मग गळतग्यांना भौतिकीच्या अत्यंत गहन कल्पना कशा कळत नाहीत, हे आत्मप्रौढीने वाचकांना सांगण्याची वऱ्हाडपांड्यांना संधी कशी मिळणार?

''गळतगे 'विवेकवाद म्हणजे काय?' हे प्रकरण वाचूनही (मूल्याच्या मुद्यावर) विवेकवाद व बुद्धिवाद यात गल्लत करीत आहेत'' असे वऱ्हाडपांडे म्हणतात. यामध्ये खरोखर कोण गल्लत करीत आहेत हे पुढील त्यांच्या व माझ्या विधानावरून स्पष्ट होईल. ''अमुक मूल्य हे मूल्यच नाही असे **विवेकवादी** म्हणू शकत नाही'' हे वऱ्हाडपांड्यांचे विधान तर ''मूल्याच्या मुद्यावर **बुद्धिवादा**ला मर्यादा आहेत हे वऱ्हाडपांड्यांना मान्य आहे'' हे माझे विधान. (मूल्यामध्ये जो विवेक करतो तो केवळ प्रत्यक्षप्रमाणावादी-चार्वाकवादी-असूच शकत नाही आणि जो चार्वाकवादी असतो तो विवेकवादी असू शकत नाही.)

## वऱ्हाडपांड्यांच्या दृष्टीने आईन्स्टाईनला झालेले 'बौद्धिक अपचन'

आईन्स्टाईनच्या विशेष सापेक्षता सिद्धांतानुसार काळाला स्वतंत्र अस्तित्व नसल्याचे दाखवून देताना मी रॉकेटमधून अति वेगाने अंतराळ प्रवास करून परत पृथ्वीवर आलेला माणूस पृथ्वीवरील त्याच्याच वयाच्या माणसापेक्षा 'अधिक तरुण' बनलेला असतो असे म्हटले आहे. हे अंतराळ यात्रीचे 'अधिक तरुण' बनणे पृथ्वीवरील त्याच्याच वयाच्या माणसाला काळ भूतकाळाकडे उलटा प्रवास केल्यासारखा वाटेल. उलट अंतराळ यात्रीला पृथ्वीवरील त्याच्याच वयाचा माणूस 'अधिक म्हातारा' झालेला दिसून येत असल्यामुळे त्याला काळ भविष्याकडे प्रवास केल्याचे वाटेल ! म्हणजे जो काळ एकाला भूतकाळाकडे गेल्याचा दिसतो, तोच काळ दुसऱ्याला भविष्याकडे गेल्याचा दिसतो! पण काळ एकाच वेळी भूत व भविष्याकडे जाणे शक्य नाही. तथापि, *दोघांचीही घड्याळे व दिनदर्शिका यांचे पुरावे काळाची ही परस्परविरुद्ध दिशा दाखवत असल्यामुळे* हे खोटे म्हणता येत नाही. काळाची दिशा स्वतंत्रपणे ठरलेली नाही-**काळ वस्तुनिष्ठ नाही** हे यावरून सिद्ध होते. म्हणून माझा -म्हणजे आईन्स्टाईनच्या विशेष सापेक्षता सिद्धांताचा हा मुद्दा खोडून काढण्यासाठी वऱ्हाडपांड्यांनी 'काळाचा बाण' वा 'दिशा' दाखवणारी हॉकिंगच्या पुस्तकातील जी माहिती दिली आहे ती पूर्णपणे अप्रस्तुत आहे. त्यामुळे ''गळतग्यांचे बौद्धिक अपचन कोणत्या थराला गेले आहे हे या उदाहरणावरून स्पष्ट आहे'' हे त्यांचे याविषयीचे विधान शुद्ध बालिशपणाचे ठरते. वऱ्हाडपांड्यांना हे 'बौद्धिक अपचना' चे उदाहरण आहे असे म्हणायचे असेल तर हे ''बौध्दिक अपचन'' खुद्द आईनस्टाईनला झाले आहे असे म्हणावे लागते! कारण हे त्याचेच (सापेक्षता सिद्धांताचे) उदाहरण आहे ! (गळतग्यांचे नाही !)[३] पुढे वऱ्हाडपांडे म्हणतात, ''या उदाहरणाने 'नित्यानुभवातला काळ मिथ्या आहे' वगैरे अध्यात्मवाद्यांची कोणतीच बडबड सुबुध्दपणाची ठरत नाही.'' गळतग्यांनी (किंवा भौतशास्त्रज्ञांनी) ''नित्यानुभवातला काळ

मिथ्या आहे'' असे कुठे म्हटले आहे हे सांगण्याचे मात्र वऱ्हाडपांड्यांनी कटाक्षाने टाळले आहे! कारण असे मी वा त्यांनी म्हटल्याचे माझ्या लेखात कोठेही विधान आढळणार नाही. उलट या विरूद्धच विधान आढळेल. या संदर्भातील माझी प्रत्यक्ष विधाने अशी आहेत: ''गूढानुभूती संपल्यावर (समाधीतून बाहेर आल्यावर) काल मिथ्या असल्याचा त्यांना अनुभव येत नाही. इतराप्रमाणेच काल सत्य असल्याचेच त्यांनाही जाणवते. पण ही जाणीव अंतिम सत्याची जाणीव नव्हे, याची त्यांना खात्री पटलेली असते-जी इतरांना पटलेली नसते. या अर्थाने 'काल मिथ्या आहे' असे ते म्हणतात. पण हे विधान ज्या पातळीवर सत्य आहे असे ते म्हणतात, ती पातळी 'जागृतीची' (सामान्य माणसाच्या नित्यानुभवाची) नसते. वऱ्हाडपांडे ती जागृतीची (सामान्य माणसाच्या नित्यानुभवाची) आहे असे समजतात. येथे त्यांची चूक होते.''(पृ. २३२) *काळ मिथ्या आहे ही नित्यानुभवाची गोष्ट नसल्याचे* इतके स्पष्ट प्रतिपादन मी केलेले असताना मी काळ नित्य अनुभवात मिथ्या आहे असे म्हणतो असा वऱ्हाडपांडे माझ्यावर आरोप करतात, इतकेच नव्हे तर त्यांची चूक कोठे होते हे मी स्पष्ट दाखवून दिलेली असताना परत तीच चूक करतात व ही ''अध्यात्मवाद्यांची बडबड'' म्हणतात. यावरून त्यांची दृष्टी 'विवेकवादी' दृष्टिदोषाने किती आंधळी बनली आहे व ही 'विवेकवादा' वरील आपली 'अंधश्रद्धा कुरवाळण्या'साठी ते किती विपर्यस्त व खोटे लिहू शकतात याची वाचकांना कल्पना येईल.

माझ्या लेखातील काळाविषयीचा मुद्दा अशा रीतीने व्यावहारिक पातळीवरचा-नित्यानुभवातला- नाही, ( उलट 'काळाचा बाण' हा व्यावहारिक पातळीवरचा नित्याच्या अनुभवातला आहे) तर तो विज्ञानाच्या आणि गूढानुभूतीच्या पातळीवरचा आहे. काळाचे सत्य स्वरूप हे व्यावहारिक पातळीवर ठरत नसून वैज्ञानिक आणि गूढानुभूतीच्या पातळीवरून ठरते हे माझ्या लेखातील मुख्य प्रतिपादन आहे. (व्यावहारिक पातळीवरील अनुभव सत्य मानता आले असते तर वैज्ञानिक संशोधन करण्याची गरज काय?) *वैज्ञानिक व गूढनुभूतीच्या पातळीवर काळ पुढे जाऊ शकतो, पाठीमागे जाऊ शकतो, किंवा स्तब्धही राहू शकतो.(कृष्णविवरात काळ स्तब्ध राहतो!) कारण त्याला स्वत:चे वस्तुनिष्ठ अस्तित्व नाही.* आईन्स्टाईनच्या सापेक्षता सिद्धांतानुसार वास्तविक काळ हे स्थळाचेच एक (चौथे) आयाम आहे. म्हणजे काळ स्थळच आहे . ज्याप्रमाणे आपण स्थळात पुढे, मागे, कुणीकडेही जाऊ शकतो व पाहू शकतो, त्याप्रमाणे काळातही आपण जाऊ वा पाहू शकतो. म्हणून द ब्रोग्ली हा प्रसिद्ध नोबेल पारितोषिक विजेता भौतशास्त्रज्ञ म्हणतो की ''प्रत्यक्षातील *स्थळकाळातील* घटना आपल्याला त्यांचे ज्ञान होण्यापूर्वीच अस्तित्वात असतात.'' (**Einstein: Philosopher-Scientist**- Ed. P. A. Schilpp P. 114)

कारण त्या अगोदर अस्तित्वात असल्याशिवाय त्यांचे ज्ञान होणार नाही . किंवा आपण स्थळकाळात पुढे, मागे पाहू वा जाऊ शकणार नाही. आणि *त्या जर अगोदरच अस्तित्वात असतील तर त्यांची भूत भविष्याची विभागणी ही काल्पनिक ठरते* हे स्पष्ट आहे. जशी स्थळातील पुढे मागे ही विभागणी काल्पनिक ठरते. म्हणून आईन्स्टाईन म्हणतो,

"The distnction between past, present and future is an illusion." (**About Time** : Einstein's unfinished Revolution - Paul Davies. P. 70)

म्हणजे ''काळाची भूत, वर्तमान व भविष्य अशी आपण जी विभागणी करतो ती भ्रममूलक आहे.''

माझ्या लेखातील आईन्स्टाईनच्या कालविषयक विवेचनाला वऱ्हाडपांडे गळतग्यांची 'अर्थशून्य शब्दांची जुळणी' म्हणतात ! वऱ्हाडपांड्यांच्या या दृष्टीने पाहता द ब्रोग्ली व आईन्स्टाईन यांची वर उद्‌धृत केलेली विधाने 'अर्थशून्य शब्दांच्या जुळणी'च्या ही पलीकडील शुद्ध वेडेपणाची विधाने ठरतात! अशा रीतीने आपल्याला भौतिकी समजते हा भ्रम केवळ वऱ्हाडपांड्यांच्या 'विवेकवादा' विरूद्ध लिहिणाऱ्या गळतग्यांनाच झाला आहे असे नसून त्यांच्या 'विवेकवादा' विरुद्ध वरील सारखी (वेडसर !) विधाने करणाऱ्या आईन्स्टाईनसुद्धा सर्व भौतशास्त्रज्ञांना झाला आहे असे म्हणावे लागते ! (वस्तुत: गळतग्यांनी दुसरे काही केलेले नसून या उपर्युक्त भौतशास्त्रज्ञांची फक्त री ओढली आहे.)

पुढे वऱ्हाडपांडे म्हणतात, '' काळाचा उलटा प्रवास केवळ गणितीय कल्पनेत शक्य आहे.'' पण मग श्रोडिंजरचा 'उडणारासिंह' सुद्धा गणितीय कल्पनेतलाच आहे. किंबहुना सर्वच भौतिकी सिद्धांत गणितीयच आहेत. जे गणितीय आहे ते खोटे आहे असे वऱ्हाडपांडे म्हणत असतील तर सर्व विज्ञानच त्यांना खोटे म्हणावे लागेल!

## गूढानुभूतीचे ज्ञानात्मक मूल्य आणि रसेल

''श्री. वऱ्हाडपांडे बर्ट्रांड रसेलचा विवेकवाद प्रमाण म्हणून स्विकारतात हे तर झालेच (रसेलशी ते किती प्रामाणिक राहतात हे पुढे दिसेलच.)'' या माझ्या विधानावर वऱ्हाडपांडे म्हणतात, ''रसेलने जी रॅशनॅलिझमची व्याख्या केली आहे तीच माझी विवेकवादाची व्याख्या आहे असे मी म्हणालो आहे. याचा अर्थ 'रसेलशी मी प्रामाणिक राहण्याची शपथ वाहिली आहे' असा गळतगे घेत असतील तर त्यांना साध्या मराठीतील वाक्ये देखील कळून येणे जड आहे मग पुंजभौतिकी, अनिश्चितता सिद्धांत, कालाची दिशा वगैरे आधुनिक भौतिकीतील संकल्पना समजण्याची क्षमता त्यांच्यात आहे असे कसे मानावे?'' स्वत:लाच विज्ञानातील प्राथमिक संकल्पनांचीही जाण नसताना

प्रतिपक्षाला विज्ञानातील काही कळत नाही हे सांगण्यासाठी वऱ्हाडपांड्यांना कसलेही निमित्त पाहिजे असते याची वरील त्यांचे विधान साक्ष होय. रसेलच्या विवेकवादी विचारसरणीशी वऱ्हाडपांडे सहमत आहेत असे समजण्यात काय चुकले? True to Russell's ideas ऐवजी True to Russell (रसेलशी प्रमाणिक) असे मी म्हटले इतकेच. True याचा या संदर्भात 'प्रामाणिक' असाच अर्थ होतो.) येथे शपथ वाहण्याचा कुठे प्रश्न येतो? शिवाय वऱ्हाडपांड्यांना रसेलबद्दल वाटत असलेला आदर (जो काही ठिकाणी उदा. ५९ पानावर- उतू जातो) पाहता असे समजण्यात वावगे काय आहे? ज्या रसेलशी प्रामाणिक राहण्याची गोष्ट काढताच वऱ्हाडपांड्यांचा अहंकार दुखावला त्या रसेलला एरवी ते डोक्यावर का घेतात हे ते सांगतील काय? उदा. त्यांच्या ग्रंथाच्या पान ५९ वर रसेलचा अधिकार वऱ्हाडपांडे आईन्स्टाईनपेक्षाही जास्त आहे असे म्हणतात! इतकेच नव्हे तर गणित आणि तर्कशास्त्र रसेलपुढे हात जोडून उभी आहेत अशी खुषमस्कऱ्याची भाषा ते वापरतात! अशा ज्ञानशिरोमणी रसेलला गूढानुभूतिविषयी मात्र वऱ्हाडपांड्याइतकेही कळत नाही! कारण रसेल गूढानुभूतीविषयी ज्ञानात्मक मूल्य मानतो, वऱ्हाडपांडे ते मानत नाहीत! अशा रीतीने रसेलला गूढानुभूतीविषयी वऱ्हाडपांड्यांइतकेही कळत नसल्यामुळे वरील शास्त्रांनी रसेलऐवजी वऱ्हाडपांड्यांच्या पुढेच हात जोडून उभे राहावयास पाहिजे असे आता वाचकांनी समजावे !

वऱ्हाडपांडे म्हणतात, ''गूढानुभूती काही अपवादभूत पुरुषांना होत असते अशी सर्वसाधारण कल्पना आहे. तेव्हा मूल्य भावनेचा समावेश गूढानुभूतीत करणे इष्ट नाही.'' हे अजब तर्कशास्त्र आहे. अपवादभूत पुरुषांना जो अनुभव येतो त्याला जर मूल्य नसेल तर व्यास, वाल्मिकी , कालिदास, शेक्सपीयर, होमर या सारख्या अपवादभूत पुरुषांच्या काव्य प्रतिभेलाही काही मूल्य नाही असे मानावे लागेल.

पुढे वऱ्हाडपांडे म्हणतात, '' 'उपासतपास केल्याने स्वर्ग दिसतो. तसेच दारू प्याल्याने साप दिसतात. दारूच्या तारेत दिसणारे साप खरे हे जसे ठरत नाही, त्याचप्रमाणे गूढानुभूतीच्या तारेत दिसणारा स्वर्ग खरा हे ठरत नाही' असे रसेल म्हणतो. रसेलच्या या मुद्याला उत्तर देणारी कोणती माहिती गळतग्यांनी पुरवली?'' असा प्रश्न विचारणाऱ्या वऱ्हाडपांड्यांना ही साधी गोष्ट कळायला हवी होती की एकीकडे गूढानुभूतीचे ज्ञानमूल्य मान्य करणारा रसेल दुसरीकडे तिचे ज्ञानमूल्य नाकारणारे विधान कसे करील? वास्तविक येथे गूढानुभूतीत 'स्वर्ग' दिसतो असे म्हणणाऱ्यांची रसेलने टर उडविली आहे. गूढानुभूतीची जी नऊ लक्षणे मी दिलेली आहेत, व रसेलनेही जी चार लक्षणे दिली आहेत, त्या लक्षणात 'स्वर्ग दिसणे' हे लक्षण सांगितलेले नाही आणि कसे सांगितलेले

असेल? कारण *'दिसणे' हा प्रकारच गूढानुभूतीत नाही.* ज्याप्रमाणे काही वैदू सर्व रोग बरे करण्याचा आव आणून समाजाला खोटे औषध देऊन फसवतात, त्याप्रमाणे काही अध्यात्मक्षेत्रातील ढोंगी लोक गूढानुभूतीचा आव आणून 'स्वर्ग' दिसल्याचा दावा करीत असतील तर रसेलने त्यांची का टर उडवू नये? (ख्रिश्चन धर्मात असा दावा करणारे पुष्कळ लोक होते व आजही आहेत.)

याच ठिकाणी ''भांग प्याल्याने गूढानुभूति होते असे कोलमनची 'ॲबनॉर्मल सायकॉलॉजी' सांगते,'' असे वऱ्हाडपांड्यांनी जे म्हटले आहे, त्याचाही विचार करता येईल. माझ्याकडे कोलमनच्या ग्रंथाची १९७५ सालची ४ थी सुधारून वाढवलेली आवृत्ती असून त्यात त्याने असे कुठेच म्हटलेले नाही. 'युफोरिया' याचा अर्थ वऱ्हाडपांडे 'मिस्टिक एक्स्पीरियन्स' असा करत असतील तर त्यांना इंग्रजी शब्दांचा अर्थ नीट कळत नाही असे म्हणणे भाग आहे.

## गूढानुभूतीविषयीची ब्रॉडची वास्तववादी दृष्टी

सर्व काळातील व सर्व देशातील गूढानुभूतीवाद्यांचे अनुभव व त्यांची लक्षणे सारखीच आढळून येतात, हा गूढानुभूतीच्या सत्यतेचा एक पुरावा आहे, असे सी. डी. ब्रॉड या वास्तववादी तत्त्ववेत्त्याने म्हटले आहे. वास्तववाद (Realism) अनुभवाची सत्यता स्वीकारतो. उदा. सुख व दु:ख हे अनुभव आहेत. ते प्रत्यक्ष प्रमाणाने सिद्ध करता येत नाहीत म्हणून खोटे ठरत नाहीत. माणसाला अनेक कारणांनी सुख वा दु:ख होते व तो ते अनेक तऱ्हेने व्यक्तही करतो. पण सुखदु:खाची ही कारणभिन्नता व अभिव्यक्तीभिन्नता सुख वा दु:ख खोटे ठरवत नाहीत. त्याचप्रमाणे उपनिषद्‌कार, बुद्ध, महावीर, येसू इत्यादींनी अनेक प्रकारांनी गूढानुभूती अनुभवली व ती वेगवेगळ्या रीतीने व्यक्त केली म्हणून त्यांची गूढानुभुतीही खोटी ठरत नाही. अनेक पद्धतींनी निर्माण होणाऱ्या विजेवर अनेक प्रकारचे कारखाने चालतात व अनेक प्रकारच्या वस्तू तयार होतात, म्हणून वीज खोटी असे कोण म्हणतो काय? वऱ्हाडपांडे असेच म्हणत आहेत, हे वरील गूढानुभूतिवाद्यांच्या अनुभव घेण्याच्या व तो व्यक्त करण्याच्या भिन्नतेच्या कारणास्तव त्यांच्या अनुभवाची सत्यता ते नाकारतात यावरून स्पष्ट आहे.

वऱ्हाडपांडे म्हणतात, ''मीच फक्त ईश्वराचा प्रेषित आहे, मला न मानणारे सारे नरकात जातात' असे महंमदला गूढानुभूतीत कळले.'' गूढानुभूतीत असे काही 'कळत' नाही. *गूढानुभूतीचा स्वर्ग नरकाशी वा अन्य कोणत्याही पारलौकिक वा भौतिक प्रत्यक्षाशी कांही संबंध नाही.* प्रतिपक्ष जे प्रतिपादित नाही, ते खाटे म्हणण्यात वऱ्हाडपांडे

कसला पराक्रम गाजवत आहेत? [ गूढानुभूतिवादी स्वत:चे अनन्यसाधारणत्व कधीच मिरवत नाही. उलट (ज्ञानेश्वरांच्या शब्दात) **'विचरे विश्व होऊनी। विश्वामाजी'** अशी त्याची विश्वात्मवादी व सर्वात्मवादी धारणा असते. येशू असाच एक गूढवादी होता हे जॉन डेव्हिड्सन या भौतशास्त्रज्ञानेच विस्तृत संशोधनाअंती **The Gospel of Jesus** या ग्रंथात दाखवून दिले आहे.)]

## वऱ्हाडपांड्यांचे 'मनोविकृतिशास्त्र,' 'छिन्नमनस्कता' व 'मिरगी'

'मी ईश्वर आहे' ('अहं ब्रह्मास्मि') असे म्हणणाऱ्या व्यक्तीत व 'मी अलेक्झांडर आहे' असे म्हणणाऱ्या वेड्याच्या इस्पितळातील व्यक्तीत काहीही फरक नाही असे वऱ्हाडपांडे म्हणतात! पण सौंदर्यानुभूतीच्या पायावर सौंदर्यशास्त्राची उभारणी होऊ शकते हे ते मान्य करीत असल्यामुळे गूढानुभूतीच्या पायावर गूढानुभूती (अध्यात्म) शास्त्राची का उभारणी होऊ शकणार नाही? असा मी त्यांना प्रश्न विचारल्यामुळे तशी ती होऊ शकते हे ते मान्य करतात. पण ते म्हणतात, ''गूढानुभूतीचे शास्त्र म्हणजेच मनोविकृतीच्या एका प्रकारचे शास्त्र होय... गूढानुभूतीचे शास्त्र होऊ शकते, याचा अर्थ गूढानुभूतीतले ज्ञान खरे असे ठरत नाही.'' आता या तर्कपद्धतीला काय म्हणावे? सौंदर्यानुभूतीच्या पायावर सौंदर्यशास्त्राची उभारणी होऊ शकते, कारण सौंदर्यानुभूती खरी आहे, त्या अनुभूतीला वस्तुनिष्ठ मूल्य आहे म्हणून होय हे स्पष्ट आहे, याच न्यायाने गूढानुभूतीचे शास्त्र होऊ शकते, हे वऱ्हाडपांड्यांनी मान्य केले तर, गूढानुभूतीही खरी आहे, त्या अनुभुतीलाही वस्तुनिष्ठ मूल्य आहे हे त्यांनी मान्य करावयास नको काय? अन्यथा गूढानुभूतीला शास्त्र म्हणण्याला काय अर्थ आहे? *जे खरे नाही त्याचे शास्त्र कसे होऊ शकते ?,* हे वऱ्हाडपांडे सांगतील काय? 'खोटे' आणि 'शास्त्र' या परस्परविरुद्ध संकल्पना आहेत. वऱ्हाडपांड्यांकडे सशाच्या शिंगाची बायोमेट्री (जीवमापनशास्त्र) आहे काय? किंवा कासवीच्या दुधाचे डायटेटिक्स (आहारशास्त्र)? प्रतिपक्षाने आपल्या भूमिकेची तार्किक परिणती दाखवून देऊन कोंडीत पकडल्यावर ती तार्किक परिणती नाइलाजाने मान्य करायची, तरीही आपली मूळ भूमिका सोडायची नाही, याला आडमुठेपणा किंवा हेकटपणा याशिवाय दुसरे काही म्हणता येत नाही. याला वऱ्हाडपांडे 'विवेकवाद' म्हणत असतील तर गोष्ट वेगळी!

तथापि, गूढानुभूतीचे (अध्यात्माचे ) शास्त्र होऊ शकते, पण ते मनोविकृतीचे शास्त्र होय, या भूमिकेचा तर्कशुद्ध परिणाम (वा अर्थ) काय होतो हे वऱ्हाडपांड्यांच्या लक्षात आले आहे काय? आले असेल तर ही अतिरेकी भूमिका निभावून नेण्याचे शास्त्रीय सामर्थ्य त्यांच्या 'विवेकवादा'त आहे काय? गूढानुभूतिशास्त्र हे वेदांतशास्त्रच असून ते

उपनिषद्कारांच्या गूढानुभूतीतून स्फुरल्याचे बादरायण व्यासापासून वा शंकराचार्यापासून ज्ञानेश्वर-विवेकानंदांपर्यंत किंवा अरविंदापर्यंत सर्व थोर गूढानुभूतिवादी मानतात. हे सर्व गूढानुभूतिवादी मनोविकृत होते व **ब्रह्मसूत्रापासून ज्ञानेश्वरी-अमृतानुभवापर्यंतचे** किंवा **राजयोगापर्यंतचे** त्यांचे सर्व ग्रंथ मनोविकृतिशास्त्राचे नमुना -ग्रंथ आहेत असे वऱ्हाडपांड्यांच्या या म्हणण्यानुसार ठरते! हे सर्व गूढानुभूतिवादी व त्यांचे ग्रंथ मनोविकृतीयुक्त ठरविणारे वऱ्हाडपांडे हेच काय ते शहाणे आहेत व त्यांचा 'विवेकवाद' हाच काय तो शहाणपणावरील ग्रंथ आहे असेही या म्हणण्यानुसार ठरते! गूढानुभूतीचे शास्त्र हे मनोविकृतिशास्त्र असेल तर हा निष्कर्ष अटळ आहे. पण मग गूढानुभीतीचे शास्त्र हे मनोविकृतिशास्त्र आहे हे आपले म्हणणे सिद्ध करण्यासाठी वऱ्हाडपांडे कोणती शास्त्रीय कसोटी वापरतात? 'सत्याची कसोटी' व 'गूढवादाचा गौप्यस्फोट' या त्यांच्या **विवेकवाद** ग्रंथातील प्रकरणांत भौतिक सत्य हेच काय ते एकमेव सत्य होय, हे चार्वाकीय तत्त्वज्ञान त्यांनी प्रतिपादले आहे. ते कसे अशास्त्रीय तर आहेच पण तर्कविसंगत आहे हे मी माझ्या 'सत्याची बद्धिवादी कसोटी' या पैलतीर' १९९१ च्या अंकातील लेखात साधार दाखवून दिले आहे.(या ग्रंथातील **प्रकरण ९** पाहा) पण या ठिकाणचा मुद्दा वेगळा आहे. या ठिकाणचा मुद्दा गूढानुभूती ही मनोविकृती आहे काय, व ही भूमिका शास्त्रशुद्ध आहे काय? हा आहे आणि हा मुद्दा वऱ्हाडपांड्यांनी वैद्यकशास्त्रीय कसोटीच्या आधारे सिद्ध केला पाहिजे. हे त्यांनी कोठेही सिद्ध केलेले नाही. हे त्यांनी सिद्ध केलेले नसल्यामुळे उपनिषद्कारांपासून विवेकानंद अरविंदापर्यंतच्या सर्व गूढानुभूतिवाद्यांना मनोविकृत ठरवणारे व स्वत:ला शहाणे (वेड नसलेले) समजणारे वऱ्हाडपांडे 'मी अलेक्झांडर आहे' असे म्हणणाऱ्या व्यक्तीहून ***तत्त्वतः*** वेगळे आहेत असे का मानावे हे त्यांनी सांगितले पाहिजे !

''स्वत:ला ईश्वर समजणाऱ्या पुष्कळ गूढवाद्यांच्या अनुभूतीच्या मुळाशी छिन्नमनस्कतेचा व्याधी असतो'' असे वऱ्हाडपांडे म्हणतात. 'पुष्कळ गूढवाद्यांच्या' असे ते का म्हणतात? 'सर्वच गूढवाद्यांच्या' असे ते का म्हणत नाहीत? म्हणजे **काही** गूढवाद्यांच्या अनुभूतीच्या मुळाशी छिन्नमनस्कतेची व्याधी नसते हे त्यांना मान्य आहे. याचा अर्थ छिन्नमनस्कता हे गूढानुभूतीचे **आवश्यक व पुरेसे (Necessary and Sufficient)** कारण नाही असा होतो. ते तसे कारण असते तर **प्रत्येक** छिन्नमनस्क व्याधीग्रस्ताला गूढानुभूती आली असती! आणि वेड्यांची इस्पितळेच काढावी लागली नसती! गूढानुभूतीची काही उथळ लक्षणे छिन्नमनस्कतेच्या काही मूलभूत लक्षणासारखी दिसतात म्हणून छिन्नमनस्कतेमुळे गूढानुभूती येते किंवा छिन्नमनस्कता व गूढानुभूती एकच

होत असे मानणे म्हणजे क्वचित अन्न बिघडल्यामुळे ते खाणाऱ्यामध्ये विषबाधेची लक्षणे दिसतात म्हणून अन्नामुळे विषबाधा होते किंवा अन्न हे विषच होय असा निष्कर्ष काढणे होय. एखादा वेडा नागवा फिरतो व दिगंबरपंथी साधू वा मुनीही नागवे फिरतात. म्हणून मुनी वेडे आहेत, किंवा नागवे फिरणे हे वेडाचे लक्षण आहे असे कोण म्हणतो काय? वरवरच्या लक्षणांना भुलून कार्यकारण- विवेक गमावण्याला शास्त्रीय दृष्टी म्हणत नाहीत.

''रामकृष्ण परमहंसांच्या गूढानुभूतीच्या मुळाशी मिर्गीची व्याधी होती'' असे वऱ्हाडपांडे म्हणतात. याबद्दल त्यांच्याजवळ कोणते 'प्रत्यक्ष -प्रमाण पत्र' उपलब्ध आहे? मिरगीची व्याधी गूढानुभूतीच्या मुळाशी असते असे वैद्यकशास्त्राचे म्हणणे आहे, असा त्यांचा दावा असेल, तर मिरगी झालेल्या प्रत्येक व्यक्तीमध्ये गूढानुभूतीची लक्षणे दिसतात हे त्यांनी वैद्यकशास्त्राच्या आधारे सिद्ध केले पाहिजे. 'पेटिट माल' (सौम्य मिर्गी) याला गूढानुभूती समजणे म्हणजे वरीलप्रमाणे छिन्नमनस्कतेला गूढानुभूती समजण्यासारखे कार्यकारणविवेक हरवून बसणे होय. मनुष्य तापातही बरळतो, नशेतही बरळतो, आणि वेडातही बरळतो, म्हणून ताप, नशा आणि वेड हे एकच होत असे कोणी म्हणत नाहीत. फेफरे (मिरगी) झालेली व्यक्ती 'मी ईश्वर आहे' असे ( रामकृष्णाप्रमाणे) म्हटल्याचे एक तरी उदाहरण वऱ्हाडपांडे देऊ शकतील काय?

केन विल्बर या लेखकाने हायजेनबर्ग, श्रोडिंजर, आईन्स्टाईन, द ब्रोगली, जेम्स जीन्स, मॅक्स प्लँक, वुल्फगँग पॉली, एडिंग्टन हे प्रसिद्ध भौतशास्त्रज्ञ गूढानुभूतीवादी असल्याचे त्यांच्या ग्रंथातील उतारे देऊन- म्हणजे सप्रमाण-दाखवून दिले आहे (पाहा : **Quantum Questions** -Ed. Ken Wilber) यापैकी श्रोडिंजर व एडिंग्टन सारख्यांनी आपल्या विज्ञानावरील ग्रंथात गूढानुभूतीवर खास प्रकरणेसुद्धा लिहिली आहेत. श्रोडिंजरने तर 'मी ईश्वर आहे' (I have become God) ''आत्मा म्हणजे ब्रह्म'' (ATMAN= BRAHMAN), ''अनेकत्व ही माया (MAYA) आहे'' "I AM THIS WHOLE WORLD" ही विधाने सत्य म्हणून स्वीकारली पाहिजेत असे उपनिषदांचा हवाला देऊन तर स्पष्ट प्रतिपादले आहेच; पण हे सर्व कसे बरोबर आहे हे तर्कसंगतीने त्याने दाखवूनही दिले आहे. (पाहा: **My view of the world** आणि **What is Life?**) वऱ्हाडपांड्यांच्या वरील विचारसरणीनुसार हे सर्व शास्त्रज्ञ मनोविकृत ठरतात! या मनोविकृत वैज्ञानिकांच्या विज्ञानाचा अवलंब आपला 'विवेकवाद' करतो असे वऱ्हाडपांडे आता म्हणू शकणार नाहीत! पण आधुनिक विज्ञानाचे हेच मुख्य संस्थापक व प्रवक्ते असल्यामुळे इतर कुठल्या वैज्ञानिकांच्या विज्ञानाचा अवलंब त्यांचा 'विवेकवाद' करतो हे ते सांगतील काय?

## वऱ्हाडपांड्यांची 'अर्थशून्य शब्दांची जुळणी' व 'वेडाचे लक्षण'

"गूढानुभूतीचे शास्त्र होऊ शकते याचा अर्थ गूढानुभूतीतले ज्ञान खरे असे ठरत नाही." असे वऱ्हाडपांडे म्हणतात. येथे वऱ्हाडपांडे 'खरे' म्हणजे 'भौतिक-प्रत्यक्ष' समजतात. समाधी पटकीचे जंतू दिसावेत म्हणून लावायची असते अशी त्यांनी याच भूमिकेतून स्वत:ची समजूत करून घेतली आहे! (अशा लोकांना पातंजल योगशास्त्र हे थोतांड म्हणायचे असावे!) गूढानुभूतीची जी नऊ लक्षणे मी दिली आहेत, त्यांची याच भूमिकेतून त्यांनी वासलात लावली आहे! (वास्तविक ही लक्षणे मी पदरची दिलेली नसून 'गुडफ्रायडे' दिवशी हार्वर्डच्या २० विद्यार्थ्यावर पाहंके या मानसशास्त्रज्ञाने केलेल्या प्रयोगात त्या विद्यार्थ्यांनी आपल्याला जे अनुभव आल्याचे सांगितले, त्या अनुभवावरून शास्त्रशुद्धपणे काढलेले ते निष्कर्ष आहेत. तेव्हा त्यांची वासलात उथळपणे लावणे हे वऱ्हाडपांड्यात शास्त्रीय दृष्टी नसल्याचे द्योतक आहे.) रसेलनेही हीच लक्षणे आपल्या **Mysticism and Logic** या ग्रंथात दिली असून त्याला गूढानुभूतीचे ज्ञानात्मक मूल्य मान्य असल्यामुळेच ती त्याने दिली आहेत. त्यातील पहिलचे लक्षण 'अंतरंग व बहिरंग अनुभवांची एकात्मता' (Sense of unity) हे असून गूढानुभूतीचे ते मूलभूत लक्षण आहे. (गूढानुभूतीची इतर सर्व लक्षणे याच लक्षणातून निष्पन्न होतात, म्हणून रसेलने त्याचा आवर्जून उल्लेख केला आहे.) या लक्षणाविषयी वऱ्हाडपांडे म्हणतात, "ही शब्दांची अर्थशून्य जुळणी आहे. तिच्यावर विचार करण्याची जरूर नाही." कशी असेल? कारण त्याचा विचार केला तर वऱ्हाडपांड्यांना आपला 'विवेकवाद' गुंडाळून ठेवावा लागतो! कसे ते पाहू.

मागे हायजेनबर्गच्या 'अनिश्चितता तत्त्वा' मुळे स्थलकालाची व्यावहारिक ('विवेकवादी') कल्पना कशी कोलमडते हे आपण पाहिले आहे. या स्थलकालाच्या कल्पनेबरोबरच कार्यकारणभावाची संकल्पनाही कोलमडते. (कारण कार्यकारणभाव स्थलकाल वस्तुनिष्ठ असतील तरच उभा राहू शकतो.) उदाहरणार्थ, एखाद्या रेडियमच्या तुकड्यातील अल्फा कण केव्हा उत्सर्जित होईल हे आपल्याला निश्चितपणे सांगता येत नाही. (निश्चित भाकीत करता न येणे याचाच अर्थ कार्यकारणभाव कोलमडणे.) दोन हजार वर्षात तो केव्हाही उत्सर्जित होईल. समजा, आम्हाला त्याचा निश्चित काळ ठरवायाचे आहे. तो कसा ठरवता येईल? हायजेनबर्ग म्हणतो की, "**त्यासाठी आम्हाला संपूर्ण विश्वाचे आणि स्वत:चेही संपूर्ण ज्ञान करून घ्यावे लागेल.** पण हे अशक्य आहे." (**Physics and Philosophy** - P. 82) विश्वाचे (बहिरंग) आणि स्वत:चे (अंतरंग) या दोन्हीचे संपूर्ण ज्ञान भौतशास्त्रात अशक्य असले तरी गूढानुभूतीत ते सहज शक्य आहे. किंबहुना गूढानुभूती याचा अर्थच स्वत:च्या (अंतरंगाच्या) आणि विश्वाच्या

(बहिरंगाच्या) अनुभवाची एकात्मता असा आहे. (ही अनुभवाची एकात्मता आहे, भौतिक 'ज्ञान' प्राप्ती नव्हे हे येथे लक्षात ठेवले पाहिजे.) प्रिन्स्टन युनिव्हर्सिटीचा प्रसिद्ध भौतशास्त्रज्ञ जे. ए. व्हीलर याने मानवाच्या स्वत:च्या व बाह्य भौतिक विश्वाच्या या आनुभाविक एकात्मतेला Participation (सहभाग) हे नाव दिले आहे. किंबहुना *भौतिक विश्व हे मानवी जाणिवेच्या सक्रिय सहभागातूनच निर्माण होते,* असे तो आपल्या लिखाणातून प्रतिपादितो. उदा. तो एके ठिकाणी म्हणतो,

"May the universe in some strange sense be 'brought into being' by the participation of those who participate?... The vital act is the act of participation. 'Participator' is the incontrovertible new concept given by quantum mechanics. It strikes down the term 'observer' of the classical theory, the man who stands safely behind the thick glass and watches what goes on without taking part. It can't be done, quantum mechanics says." (**Gravitation**. P.1273)

वरील उताऱ्यात प्रयोगकर्ता शास्त्रज्ञ (मानवी जाणीव) व प्रयोगवस्तू (भौतविश्व) हे स्वतंत्रपणे अस्तित्वात असल्याची रूढ विज्ञानाची कल्पना क्वॉंटम सिद्धांताने खोडून काढली असल्याचे व भौतविश्व हे भौतशास्त्रज्ञाच्या (मानवी जाणिवेच्या) भौतविश्वाशी होणाऱ्या कृतिशील सहभागातून 'निर्माण होत असल्या'चे (Brought into being) व्हीलरने स्पष्ट प्रतिपादले आहे. या विश्वाला त्याने 'सहभागी विश्व' (Participatory Universe) म्हटले आहे. (पाहा: **Quantum Theory and Measurement**) सहभाग (Participation) हा तर गूढानुभूतीचा केंद्रबिंदू आहे. **विश्व आणि मानवी जाणीव यांचा कृतीशील सहभाग म्हणजेच गूढानुभूती होय. (आपणचि विश्व झाला ! तरी भेदभावो सहजचि गेला। ज्ञाने. १२.१९१)** ही कल्पना व्हीलरने पॅरमेनाइड (ज्याला रसेलने पाश्चात्य जगाचा आद्य गूढानुभूतीवादी असे म्हटले आहे.) याचे पुढील विधान उद्धृत करून व्यक्त केलीआहे. व्हीलर पॅरमेनाइडच्या शब्दात म्हणतो, "What is... is identical with the thought that recognises it." (म्हणजे "जे आहे (बहिरंग) ते त्याला जाणणाऱ्या विचाराशी (अंतरंगाशी) तादात्म्य पावलेले आहे.") (**The Physicist's Conception of Nature**. Ed. J. Mehra P. 244.)[४] अशा रीतीने गूढानुभूती (म्हणजे अंतरंग व बहिरंग यांची एकात्मता) हा क्वॉंटम सिद्धांताचा अपरिहार्य तात्त्विक निष्कर्ष आहे. वऱ्हाडपांड्यांनी याला 'अर्थशून्य शब्दांची जुळणी' म्हटले यात आश्चर्य कसले? त्यांनी आईन्स्टाईनच्या कालविषयक विवेचन करणाऱ्या सापेक्षता सिद्धांतालाही 'अर्थशून्य शब्दांची जुळणी' म्हटले आहे!

गूढानुभूतीत 'मी' चा अस्तित्वात्मक आणि नास्तित्वात्मक असा एकाच वेळी अनुभव येणे या गूढानुभूतीच्या लक्षणाला वऱ्हाडपांडे 'वेडाचे लक्षण' म्हणतात हे जर

वेडाचे लक्षण असेल तर गूढानुभूतीवाद्यांप्रमाणे सर्व भौतशास्त्रज्ञही या लक्षणाने युक्त आहेत असे म्हणावे लागते! कारण हे शास्त्रज्ञही आपल्या अनुभवांच्या पातळीवर हीच परस्परविरुद्धता (Paradoxicality) प्रतिपादितात. याविषयी 'श्रोडिंजरच्या मांजरा' चे उदाहरण प्रसिद्ध आहे. हे श्रोडिंजरचे मांजर एकाच वेळी 'जिवंतही आहे' आणि 'मृतही आहे' असे क्वाँटम भौतिक शास्त्रज्ञ सांगतात.(याला ते 'सुपरपोझिशन'-अधिरोहण म्हणतात.) आता मांजर (किंवा कोणताही प्राणी) एकाच वेळी जिवंतही असणे व मृतही असणे कसे शक्य आहे? पण हे शक्यच नव्हे तर खरे आहे असे क्वाँटम भौतशास्त्रज्ञ म्हणतात. अन्यथा क्वाँटम सिद्धांताला शास्त्रीय दृष्ट्या काही अर्थ नाही (क्वाँटम गणित खरे म्हणता येत नाही.) असे ते सांगतात . ( पाहा: **In Search of Schrodinger's Cat** -John Gribbin)[५] असाच 'मी' चा अस्तित्वात्मक व नास्तित्वात्मक असा विरोधाभासात्मक अनुभव एकाच वेळी येतो. तसा तो आला नाही तर त्याला गूढानुभूती म्हणता येणार नाही असे अध्यात्मशास्त्रज्ञही सांगतात.

## वऱ्हाडपांड्यांची 'बस'

गूढानुभूतीत 'कांही तरी' प्राप्त झाल्याची जाणीव होते हे एक तिचे लक्षण सांगितले आहे. 'ही जाणीव वेळेवर बस मिळाल्यानेही होते' असे म्हणून त्याची (व अशाच इतर अनुभवांची 'त्यात गूढ काय आहे?' असे म्हणून) वऱ्हाडपांड्यांनी वासलात लावली आहे. फर्माटचे प्रमेय सोडविणाऱ्या एखाद्या गणितज्ञाला किंवा अनंताचा 'सटा' ने शोध घेणाऱ्या एखाद्या कँटॉरला, किंवा जागतिक बुद्धिबळ स्पर्धा जिंकणाऱ्या एखाद्या कॅस्पोरॉवला 'काही तरी' प्राप्त झाल्याची जी जाणीव होते ती वेळेवर मिळणाऱ्या वऱ्हाडपांड्यांच्या 'बस' प्रमाणे डोळ्यांना दिसत नसल्यामुळे तिलाही त्यांच्या या 'प्रत्यक्ष' प्रमाणवादानुसार काहीही किंमत नाही हे उघड आहे! डोळ्यांना दिसणाऱ्या भौतिक वस्तूशिवाय माणसाला 'काही प्राप्त' होऊ शकते असे मानणे वेडेपणाचे आहे असे या प्रत्यक्ष प्रमाणवादानुसार ठरते ! मानवी प्राप्तीची ही सर्वात दरिद्री संकल्पना होय. बाकी ती चार्वाकाच्या देहात्मवादाशी सुसंगत अशीच आहे. एखाद्या बुडणाऱ्या व्यक्तीला वाचवणाऱ्याला कशाची 'प्रत्यक्ष' प्राप्ती होते? असे हा वाद विचारील! त्याला कशाचीच 'प्रत्यक्ष' (भौतिक) प्राप्ती होत नसल्यामुळे बुडणाऱ्या व्यक्तीला वाचवण्याची या वादानुसार काहीच आवश्यकता नाही ! रामकृष्ण परमहंसांना गूढानुभूतीत काय 'प्रत्यक्ष' प्राप्ती झाली? पण त्यांना गूढानुभूतीत जे प्राप्त झाले त्यामुळेच त्यांनी सर्वात्मवाद प्रतिपादिला आणि त्यातूनच सर्वांची दुःखे दूर करणाऱ्या 'रामकृष्ण मिशन' च्या समाजकल्याणकारी शाखा देशभर चालवण्यात येऊ लागल्या हे विसरता येत नाही. देहात्मवादी चार्वाकीय

तत्त्वज्ञानातून असे घडणे केवळ अशक्य आहे. सर्व जीव दुःखमुक्त व्हावेत ही भावना सर्वात्मवादी दृष्टीतूनच निर्माण होते. देहात्मवादी दृष्टीतून नाही. सर्वात्मवादी (वा विश्वात्मवादी) तत्त्वज्ञान आत्मा प्रत्यक्ष नसला तरी अनुभवप्रमाणाच्या आधारे तो खरा मानते. देहात्मवादी तत्त्वज्ञान देह प्रत्यक्ष असल्यामुळे तोच फक्त खरा मानते. त्यामुळे पहिले तत्त्वज्ञान आचरणात आणणारी व्यक्ती सर्व आत्म्यांचे सुख हेच आपल्याही आत्म्याचे सुख मानते आणि परमार्थ -सुखवादी बनते [महायान पंथानुसार सर्व जीवांना निर्वाण मिळेपर्यंत बुद्धाने स्वतःला निर्वाण नाकारले आहे. **''नैतान् विहाय कृपणान् मुमुक्षु एकः''** (**भागवत**) ही कल्पना वैदिक धर्मातही आहे.] या उलट देहात्मवादी तत्वज्ञान आचरणात आणणाऱ्या व्यक्तीला स्वतःच्या देहसुखाव्यतिरिक्त इतर कुणाच्याही देहसुखाची (आत्मसुखाचा तर प्रश्नच नाही) चिंता करण्याचे कारण पडत नाही. (तशी चिंता त्याने स्वतःच्या सुखासाठी न करता इतरांच्या सुखासाठी केली असेल तर तो आपल्या (चार्वाकीय) 'प्रत्यक्षा' ऐवजी प्रतिपक्षाच्या 'अनुभव' प्रमाणाला शरण जातो असे निश्चित समजावे! नव्हे, अनुभव प्रमाण मानल्याशिवाय इतरांची चिंताच त्याला करता येणार नाही!) अशा रीतीने देहात्मवादी (प्रत्यक्षप्रमाणवादी) हा व्यक्तिसुखवादी (देहसुखवादी) बनतो. तर सर्वात्मवादी (अनुभवप्रमाणवादी) आत्मसुखवादी वा परमार्थसुखवादी बनतो. हा त्याचा परमार्थ डोळ्यांना दिसत नसल्यामुळे खोटा वाटतो. उलट व्यक्ती (देह) सुख वा स्वार्थ डोळ्यांना दिसत असल्यामुळे खरा वाटतो. त्यामुळे पहिला खोट्याच्या पाठीमागे लागलेला आणि म्हणून वेडा ठरतो. तर दुसरा खऱ्याच्या मागे लागलेला व म्हणून शहाणा ठरतो. पहिल्याला प्रत्यक्ष प्रमाणानेच वेडा ठरवता येत असल्यामुळे त्याचे स्वतःच्या प्रत्यक्ष देहाची सुद्धा शुध्द (काळजी) नसल्याप्रमाणे वागणे हे वेडाचे लक्षण मानले जाते किंवा ही लक्षणे (उदा. भावसमाधी) वैद्यकीय ग्रंथात दिलेल्या मिरगी, स्किझोफ्रेनिया या सारख्या व्याधीच्या लक्षणाप्रमाणे दिसत असल्यामुळे अशी व्याधी त्यांना झाली आहे असा त्यांच्यावर शिक्का मारून मोकळे होता येते. अशा व्याधीच्या लाखो लोकांपैकी एकही व्याधीग्रस्त वेड्याच्या इस्पितळात जाण्याऐवजी रामकृष्णाप्रमाणे वेदांती व ईश्वरभक्त का झाला नाही, एकही व्याधीग्रस्त बुद्धाप्रमाणे करुणामय का बनला नाही, एकही व्याधीग्रस्त येसूप्रमाणे प्रेममय शिक्षक का बनला नाही, एकही व्याधीग्रस्त उपनिषत्काराप्रमाणे चिंतनशील ब्रह्मज्ञानी का बनला नाही, एकही व्याधीग्रस्त महावीराप्रमाणे अहिंसावादी 'केवलज्ञानी' का बनला नाही, एकही व्याधीग्रस्त ज्ञानेश्वराप्रमाणे विश्वात्मक 'चिद्वादी' का बनला नाही, याचा विचार 'प्रत्यक्षा'च्या कुंपणात अडकलेल्या 'विवेकवादी' दृष्टीला करण्याची गरज पडत नाही. कुठलाही शास्त्रीय पुरावा न देता सर्व गूढानुभूतीवाद्यांना सरसकट मनोविकृत ठरवणे ही

'विवेकवादा' ची सर्वात मोठी भाकडकथा आहे! -की सर्वात मोठा विनोद?पण या भाकड कथेवरच -या 'विनोदा' वरच- 'विवेकवाद' उभा आहे!

## टीप-

प्रस्तुत लेखासंबंधी दोन गोष्टी येथे स्पष्ट केल्या पाहिजेत. पहिली गोष्ट म्हणजे प्रस्तुत लेखाचा (व 'पैलतीर' १९९५ मधील माझ्या मूळ लेखाचा)- प्रकरण १० चा- उद्देश बुद्धिवाद विज्ञानपद्धतीचा अवलंब करतो, हा त्याचा दावा कसा पोकळ आहे व त्याच्या आधारे गूढानुभूतिवाद खोटा ठरवणे कसे अवैज्ञानिक आहे हे दाखवून देणे एवढाच मर्यादित आहे. मुळात बुद्धिवाद-ज्याला वऱ्हाडपांडे 'विवेकवाद' म्हणतात- विज्ञानविरोधी असून तो विज्ञानाचा पुरस्कार आपल्या सोयीनुसार व तोंड देखला करतो, (हे मी प्रकरण ३ व ६ मध्ये साधार दाखवून दिले आहे.) १९९४ च्या 'पैलतीर' मधील 'आपुले मरण पाहिले म्या डोळा' या माझ्या लेखावरील वऱ्हाडपांड्यांच्या टीकेवरूनही हे स्पष्ट झाले आहे. (पैलतीर १९९५ मधील त्यांचा टीकालेख व त्याला माझे उत्तर पाहा.) माझा मूळ लेख, त्यावरील वऱ्हाडपांड्यांची टीका व त्याला मी दिलेले उत्तर हे सर्व माझ्या **विज्ञान आणि चमत्कार** या ग्रंथातील १० व्या प्रकरणात वाचकांना वाचावयास मिळेल. दुसरी गोष्ट म्हणजे, विज्ञानाचा आणि गूढानुभूतीचा अर्थाअर्थी काही संबंध नाही. (गूढानुभूतिवाद विज्ञानावर अवलंबून नाही किंवा त्याला विज्ञानाच्या कुबड्यांची जरूर नाही. गूढानुभूतिवादाचा जन्म विज्ञानाच्या जन्माच्या हजारो वर्षे अगोदर झाला आहे.) विज्ञान गूढानुभूतीचा पुरस्कार करीत असेल तर तो त्याचा प्रश्न आहे. पण ते तो पुरस्कार का करते हे समजून घेणे उद्‌बोधक आहे आणि त्याचा विचार येथे (वा मागच्या लेखात) करण्याचे हेच मुख्य कारण आहे. तथापि, तो विचार येथे जरूरी पुरताच केला असून त्याचा सविस्तर विचार करायचा तर स्वतंत्र लेखनच केले पाहिजे.

## संदर्भ टिपा

१. आईन्स्टाईनच्या याविधानाचे महत्व भौतविज्ञानातील अलीकडील 'तंतू' च्या सिद्धांतामुळे जास्त स्पष्ट झाले आहे. हा सिद्धांत भौतवस्तू कणांची (Particles) बनलेली नसून तंतूंची (Strings) बनलेली आहे असे सांगतो. हा तंतूंचा सिद्धांत कणांच्या सिद्धांताप्रमाणे औपपत्तिकच आहे. म्हणजे कणांच्या सिद्धांताप्रमाणे तोही प्रत्यक्षावर आधारलेला नाही; आणि कसा असेल? कारण कोणी कणही ' पहिलेला' नाही व तंतूही 'पाहिलेला' नाही! दोन्ही गणिती संकल्पनाच आहेत. (पाहा : **Superstrings** Ed. P. C. W. Davies and J. Brown. 1992)

२. चार्वाकीय प्रत्यक्षाच्या आधुनिक भौतशास्त्रातील स्थानासंबंधी वाइनबर्ग या प्रसिद्ध नोबेल पारितोषिक विजेत्या शास्त्रज्ञाच्या अलीकडील **The Dreams of Final Theory** या ग्रंथातील पुढील माहिती वाचकांना उद्‌बोधक वाटेल, "The idea that quarks

and gluons can in principle never be observed in isolation has become part of the accepted wisdom of modern elementary particle physics, but it does not stop us from describing quarks.' P.184.)

( म्हणजे "क्वार्क व ग्लुऑन हे मूलभूत कण तत्त्वत: स्वतंत्रपणे कधीच पाहणे शक्य नाही, हे आधुनिक अणुविज्ञानाला आता मान्य करण्याशिवाय गत्यंतर नाही. असे असले तरी ते खरे मानून त्यांचे वर्णन करण्यात भौतशास्त्रज्ञांना कसलीच अडचण वाटत नाही.") जे डोळ्यांना दिसत नाही मग तो 'उडणारा सिंह' असो, क्वार्क असो वा ग्लुऑन असो, ते दिसणे तत्त्वत: अशक्य असले तरी ते शास्त्रज्ञांना खोटे म्हणता येत नाही, याचे कारण त्याचा भौतशास्त्रज्ञांना गणिती ( सैद्धांतिक ) पडताळा येतो हे आहे. 'अनुभवाचा पडताळा' येण्यासाठी अशा रीतीने अध्यात्म शास्त्राप्रमाणेच भौतशास्त्रही चार्वाकीय (व्यावहारिक) प्रत्यक्षावर अवलंबून नाही.

३. काळाचा बाण वा दिशा हे व्यावहारिक सत्य आहे. अंतिम सत्य नाही. ते अंतिम सत्य मानले तर सापक्षेता सिद्धांत व क्वाँटम सिद्धांत हे दोन्ही खोटे ठरतात ! कारण या दोन्ही सिद्धांताच्या दृष्टीने काळाला वस्तुनिष्ठ (अंतिमत:) अस्तित्व नाही. म्हणूनच हॉकिंगसारख्या काही शास्त्रज्ञांनी उष्णतागतिशास्त्रीय व विश्वशास्त्रीय बाणाचा काळाच्या मानसशास्त्रीय बाणाशी मेळ घालण्याचा प्रयत्न केला आहे. पण मन मेंदूवर अवलंबून असेल व मेंदू हा संगणक असेल तरच हा मेळ घालता येईल. पण या दोन्ही गोष्टी असिद्ध आहेत. (भविष्यज्ञान- Precognition- मानवी मनाला होऊ शकते, ही वस्तुस्थिती या दोन्ही गोष्टी सिद्ध होऊ शकत नसल्याचा पुरावा होय.) पण त्या सिद्ध झाल्या तरी व्यावहारिक पातळीवर काळाची दिशा (बाण) निश्चित का आहे हे कळेल. त्यामुळे काळ अंतिम सत्य असल्याचे सिद्ध होणार नाही. का होणार नाही हे सहज कळण्यासारखे आहे. उष्णतागतिशास्त्र व विश्वशास्त्र ही स्वत:च सापेक्षता व क्वॉटम सिद्धांतावर (क्वाँटम ग्रॅव्हिटीवर) आधारलेली आहेत आणि हे दोन्ही सिद्धांत काळ अंतिम सत्य नाही म्हणतात.

४. व्हीलर प्रतिपादित पॅरमेनाइडचा हा गूढानुभूतिवाद ज्ञानेशांच्या पुढील ओवीशी ताडून पाहावा :

**तरी बाह्य आणि अंतरा। आपुलिया सर्व व्यापारा।**
**मज व्यापकाते वीरा। विषयो करी॥ १८.१३.५३.**

५. भौतविज्ञानाच्या तात्त्विक चर्चेत 'श्रेडिंजरचे मांजर' व 'आईन्स्टाईन कनेक्शन,' (ईपीरआर पॅरॅडॉक्स ) या दोन विरोधाभासाइतकी दुसऱ्या कुठल्याही विरोधाभासांची चर्चा झालेली नाही. या दोघा शास्त्रज्ञांना मात्र हे विरोधाभास मांडताना याची अजिबात कल्पना नव्हती. आईन्स्टाइनच्या विरोधाभासाचा विचार करण्याचा प्रसंग प्रस्तुत लेखात आलेला नसला तरी गूढानुभूतीच्या दृष्टीने तो सर्वात जास्त महत्वाचा आहे. (पाहा : **Wholeness and Implicate Order** - David Bohm.) या विषयीची विस्तृत शास्त्रीय चर्चा **विज्ञान आणि चमत्कार** या ग्रंथात केली आहे.



# लेखकाची इतर दोन पुस्तके

## १) विज्ञान आणि चमत्कार

(डॉ. काटेस्वामीजी, वडाळा महादेव (जि. नगर) यांचा 'संतसाहित्य पुरस्कार' प्राप्त)

"या ग्रंथाची एक महनीय अपूर्वता म्हणजे चमत्कार, वास्तवदर्शन, उपपत्ती इ. माध्यमातून लेखकाने वाचकाला 'माया आणि ब्रह्म', 'जीव, जगत्, जगदीश' अशा निखळ वेदांताच्या दालनात नेऊन सोडलेले आहे. या ग्रंथाद्वारे अतींद्रिय सामर्थ्य, ब्रह्मविद्या, योगसिध्दी, मायावाद, संकल्पशक्ती, भविष्यशास्त्र, साधना-आराधना-उपासना, इच्छाशक्ती, क्वाँटम सिध्दांत, उच्चकोटीचे अध्यात्म, दैवतशास्त्र, मरणोत्तर जीवन, पुनर्जन्म इत्यादी गहन विषयांची अगदी जवळून ओळख होऊ शकते. तात्पर्य, श्रध्दाळू व अश्रध्द, आस्तिक व नास्तिक, वैज्ञानिक व अध्यात्मवादी अशा सर्वच प्रकारच्या मंडळींना हा ग्रंथ वाचनीय व चिरसंग्राह्य ठरेल."

**प्रा. अ. कृ. देशपांडे**

('मृत्युनंतरचे जीवन' या ग्रंथाचे लेखक)

**'विज्ञान आणि चमत्कार'** वेदांतविवेक प्रकाशन,

भोज (बेळगाव) ५९१२६३

पृष्टे ६६४, मूल्य रु. ४००/-

## २) विज्ञान आणि अंधश्रध्दानिर्मूलन.

प्रस्तुत पुस्तकात लेखकाने महाराष्ट्रातील अंधश्रध्दानिर्मूलन समितीच्या काही प्रसिध्द प्रकरणातील लबाडी (बुवाबाजी) व 'सत्याला सामोरे जाण्यातील तिचा भ्याडपणा' सज्जड पुराव्यानिशी मांडला आहे. तसेच महाराष्ट्रातील स्वतःला बुध्दिवादी व विज्ञानवादी म्हणवून घेणाऱ्या मंडळींना नाडीग्रंथापुढे कशी हार खावी लागली याचाही किस्सा सांगितला आहे. हे पुस्तक अंधश्रध्दानिर्मूलन समितीबद्दल आंधळी भक्ती व विश्वास बाळगणाऱ्या लोकांनी तर वाचलेच पाहिजे. पण विज्ञान व त्याची सामाजिक बांधिलकी या विषयाची आस्था बाळगणाऱ्यांनीही अवश्य वाचले पाहिजे.

**दै. तरुण भारत** (बेळगाव)

**'विज्ञान आणि अंधश्रध्दानिर्मूलन'**

वेदांतविवेक प्रकाशन, भोज (बेळगाव) ५९१२६३

पृष्टे १९८, मूल्य रु. ८०/-

## पुरस्कार



प. पू. राजीव महाराज
श्रीदत्त देवस्थान
श्री मल्लिकार्जुन डोंगर,
आडी (चिक्कोडी-बेळगाव)

'विज्ञान आणि बुध्दिवाद' हा प्राचार्य अव्दयानंद गळतगे यांचा लेखसंग्रह आहे. यामध्ये डोळस श्रध्दा ठेवून बुध्दियोगी वैज्ञानिक दृष्टिकोनातून विश्वोत्पत्ती जीवोत्पत्ती, गूढानुभूती इ. विषयांचे चिकित्सक विश्लेषण केलेले आहे. सनातन धर्मसिध्दांतांचे स्वरूप प्राचीन ऋषीमुनींची योगसाधना आणि अंत:स्फूर्ती यातील सत्य दर्शनावर आधारलेले आहे, अशी यांची प्रामाणिक श्रध्दा आहे. किंबहुना अतींद्रीय शक्तींचे अस्तित्व, मरणोत्तर अस्तित्व, पुनर्जन्म इ. सिध्दांत अशा साधनेचीच फलश्रुती आहेत, असा श्री. गळतगे यांचा दावा आहे. परामानसशास्त्रातील संशोधन आध्यात्मिक सिध्दांतांची सत्यताच सिध्द करते, हे या पुस्तकातील लेख दाखवून देतात. विज्ञान आणि बुध्दिवाद यातील संबंधाचे दर्शन घडण्यासाठी या पुस्तकाचे वाचन उपयुक्त आहे.

---

प्रा. गळतगे यांचे लेखन प्रांजळ आधुनिकांची झोप उडवून टाकणारे आहे. विज्ञानाचा बदललेला दृष्टीकोन व अतींद्रिय मानसशास्त्राचे भरीव स्वरुप त्यांच्या लेखनामध्ये सप्रमाण पाहावयास मिळते... अद्ययावत् माहिती व बिनतोड युक्तिवाद स्वत:ला बुध्दिवादी आणि विज्ञानवादी म्हणविणाऱ्यांचा चांगला पाणउतारा करतात. अतींद्रिय संशोधनातील साधक-बाधक बाजू त्यांनी समर्थपणे मांडल्या आहेत. त्यांची प्रशंसा करावी तेवढी थोडीच.

– डॉ. ब. स. येरकुंटवार, संपादक, 'प्रज्ञालोक', नागपूर

प्रा. गळतगे यांनी तथाकथित बुध्दिवाद्यांवर व त्यांच्या अकलेवर चांगला प्रकाश टाकला आहे. त्यांचे वाचन किती दांडगे आहे व अभ्यास किती खोल आहे याचे यथार्थ ज्ञान होते व कौतुक वाटते, प्रत्येकाने वाचावे असे हे सुंदर पुस्तक आहे.

– डॉ. प. वि. वर्तक, पुणे

प्रा. अद्वयानंद गळतगे यांचा तत्त्वज्ञान, मानसशास्त्र व विज्ञान यांचा व्यासंग विस्मयकारक आहे. आपल्या लेखनास आधार म्हणून त्यांनी अद्ययावत् ग्रंथांचा उल्लेख केला आहे. त्यांचे लेखन प्रत्येकाने मनन करावे असेच आहे.

– डॉ. भा. प. बहिरट, पंढरपूर

प्रा. गळतगे यांचे परामानसशास्त्राचे विवेचन विचारप्रवर्तक व आव्हानात्मक वाटते. तथाकथित अंधश्रध्दानिर्मूलकांच्या हातात काही दैनिके आहेत. त्यामुळे गोबेल्सचे प्रचारतंत्र ते वापरू शकतात; आणि सामान्य जनतेपर्यंत पोचणे अवघड होते.

– श्री. ग. वा. तगारे, सांगली

प्राचार्य गळतगे यांच्या लेखनावरून त्यांचा अभ्यास, वाचन व चिंतन किती प्रचंड आहे, याचा प्रत्यय आला.

– श्री. वा. ज. खेर, बार्शी